

# श्री चैतन्य विजय ग्रंथ

## श्री गौरांग महाप्रभु यांचे आदिलीला चरित्र

मुद्रक :- वसंत बुलडाणा)

प्रकाशक -: श्री हरीदास शास्त्री वृंदावन (मथुरा)

## 卐 अध्याय १ ला 卐

श्री गणेशायनमः ।। श्री सरस्वत्यैनमः ।। श्री सीतारामचंद्रायनमः ।। श्री उमामहेशायनमः ।। श्री गुरुभ्योनमः ।। ॐ नमोजी गणनायका । सकल विद्या वरदायका । वेदशास्त्रादि अपार अनेका । तुझिया विना नाकळति ।१। तुझिये कृपेचेनि गुणें । नाना विद्येचीं स्फुरणें । स्फुरती बुद्धीच्या आयतनें । प्रकाश उपजे ।२। तूं सकलविद्या कलाधीश्वर । कीं सदाचा विघ्नहर । नमूं गुणेश मोरेश्वर । गौरीहर पुत्र म्हणोनियां ।३। जयाच्या कृपेचें बळ । नाना विघ्ने कांपती चळचळ । वंदू मंगळाचा मंगळ । कार्य सफळ व्हावया ।४। हरिहरादि अमर । वंदिती, अनाथाचें माहेर । भ्रांतीची पडळें पार । वितुळति अपार जयांचियां ।५। बा ! अंतरीं माझ्या वसावें । हें कवित्व जें आघवें । मजकरवी करवावें म्हणोनि विनवी अहर्निश ।६। गणेशाचें स्तवन करितो । मति प्रकाश होय निश्चिती । वाचें गुणानुवाद गाती । त्यासी सरस्वति प्रसन्न होय ।७। जरी झाला मंदमति । गणेश चिंतितां निश्चिति । करी मनकामना पूर्ति बुद्धिदाता वाग्पति सर्वथा ।८। त्याशी माझा नमस्कार । मंदमति अल्पज्ञ किंकर वर्णावया झालों तत्पर । दुस्तर सामर्थ्य हीन मी ।९। आतां वंदू ब्रह्मसुता । जी शारदा वेदमाता । अमरहीं वर्णिती वाग्देवता । सरस्वती नाम जियेचें ।१०। जिचें योगें शद्बांकुर । वाणी वदे अपार । जी शद्बांचें रहस्य थोर । निरंतर दावी उकलूनि ।।११।। सृष्टीचा सकल व्यापार । वाणीनें होय साचार । भाषा भिन्नें अंतर । विचार स्पष्ट होतीं ।।१२।। संसार आणि परमार्थ सरस्वतीचेनि यथार्थ । परी मुक्याकरवी अनर्थ । सहजचि घडे ।।१३।। सरस्वतीचे उपासक । ज्ञानमार्गी आणि साधक । ईश्वर प्राप्तीचा विवेक । सत्वर जाणती ।।१४।। परमार्थ मार्गीचा विचार । निवडूनि दाखवी सारासार । भवसिंधूचा पैल पार शद्बबळें पाववी ।।१५।। वेदशास्त्र श्रृति पुराण । अखंड जिचे करिती स्तवन । त्या शारदेचा महिमा गहन । किती म्हणोन वर्णावा ।।१६।। जें जें अंतरी आले । ते तें वाणीनें प्रकट केलें आणि कर्तृत्वही जें झाले । तें फळलें शारदेचेनि ।।१७।। जी हरिदासांची निजभक्ति । आत्मनिष्ठांची अंतरस्थिति । जी जीवनमुक्तांची मुक्ति । सायुज्यता शक्ति शारदा ।।१८।। त्या शारदेसी माझे नमन । अल्पमति बालक न्यून । उणें पुरें करी पूर्ण । वरदकर संपूर्ण असो तुझा ।।१९।। आतां वंदू सदाशिव । जो सदांचा राही शिव । स्तवन करिता अशिव । स्पर्शू न शके ।।२०।। स्मशा-नस्थ

शिवहर । लोक कल्याणी बद्ध परिकर । रामें वंदिला गौरिहर । तो मजवर कृपा करो ॥२१॥ रामास जयाचें ध्यान । ते करिती रामगुणगान । ऐसा भावसंबंध अन्योन्य । अलौकिक जाण भक्तांचा ॥२२॥ कृपा जयाची अत्यंत निर्मळ । तो भक्त असो वा अवखळ । म्हणोन वदती सांब भोळा । महादेव सोज्वळ देवांचा ॥२३॥ लोककाजीं घेतले विष । अमरांचा केला संतोष । टळलें संकट भूचें निःशेष । नीलकंठ विशेष संज्ञा जया ॥२४॥ अल्पायु मार्कंडेयबाळ । त्यासी स्पर्शूं न शके काळ । शंकरकृपा प्रबळ । असतां मृत्युचें बळ कैचें ॥२५॥ संहार देवता भयंकर । ब्रह्मांड जाळीं एक्या करें । परि भक्तासी झाला प्रियकर । अभयकर शंकर दीनासी ॥२६॥ प्रतिज्ञा करी कामदेव । भ्रष्ट करीन महादेव । परी कामाचा नुरेचि ठाव । त्र्यंबका पुढें तेधवा ॥२७॥ कामबाण हृदयीं भिडला । क्रोधें तृतीय नेत्र उघडिला । देवे कामदेव जाळीला भस्म जाहला तत्काल ॥२८॥ प्रार्थी मदनाची रति । शांत जाहला उमापति । वर दिला केली तृप्ति गौरीपति आयुतोष ॥२९॥ अखंड गाती रामकथा । भक्तभाविक उमा श्रोता । आश्रमींब्रऋषिमुनी तत तां । आस्वाद घेती कथेचा ॥३०॥ शंकर ब्रह्मज्ञानी वक्ता । विवत, सात्विक. भाविक श्रोता । त्या आनंदाची थोरवी गाता । असमर्थता होय वाचेसी ॥३१॥ रामकथेचें सार । रामनाम हें साचार । सहस्त्र नामाहूनि थोर । श्रुतिस्मृति अपार वर्णिती ॥३२॥ काशीक्षेत्री मृत्यू पावती । तारक मंत्र कथी क्षेत्रपति । विश्वनाथ करी मुक्ति । रामनामें, प्रचीती नित्याची ॥३३॥ रामनामाचा महिमा । शिवाकरवी ऐके उमा । त्या नामाचा गरिमा । पामरें म्या काय वर्णावा ॥३४॥ ऐसा जो का शंकर । जयास वदती लोक शंकर ॥ मम मस्तकी वरद कर । ठेवा सत्वर विनवितो ॥३५॥ आता वंदू श्रीराम । जो पतितांचा विश्राम । भक्तांचे कैवल्य धाम । योग्यासी आराम नित्याचा ॥३६॥ जो दशरथाचा नंदन । दशेंद्रियें जया आधीन । एकबाणी एकवचन । ब्रीद रक्षण कुलाचें ॥३७॥ रघुकुल रीत अनन्य । प्राण जाय परी बचन । त्यास्तव तनु समर्पण । करिती नृप निपुण रविवंशी मातापितयाचे वचन । सत्य व्हावा वरिलें कानन । गेले राज्य त्यागून । धन्य धन्य श्रीराम ॥३९॥ रावणासि सद्गति पूर्ण । दिधली प्रभु केला बिभीषण मनीं भरताचें चिंतन । लंकेहून त्वरित पातले ॥४०॥ भरताचा भाव जाणून । हृदयीं धरिला आलिंगून । सनाथ झालें अयोध्यापुर जन । धन्य धन्य श्रीराम ॥४१॥ शबरीचीं उष्टी बोर । चाखी न गणी सानथोर । मार्गी अहिल्योद्धार । गुह

श्री चैतन्य विजय पान १
आदिलीला पा १

भव पार पावविला ।४२।। नामें पाषाण तारिलें । ऐसें देखिलें ना ऐकिलें । रामावतारीं सत्य घडलें । वानरांकरवीं श्रीरामें ।।४३।। विश्वामित्र गुरूचा सांगात । जेथे दिसे असुरसंघात । त्यांचा करून निःपात । संरक्षण केलें यज्ञाचें ।।४४।। यज्ञ ऋषीमुनींचें रक्षण । तैसे गोब्राह्मण संरक्षण । वेदशास्त्र स्मृति पुराण । हेंचि पालन धर्माचें ।।४५।। मानूनि केलें रामराज्य । प्रजा केली सुखी सहज । पाखंडी, धर्मलंडाचे काज । उरोंचि नेदी सर्वथा ।।४६।। ऐसा जो श्रीरामराय झाला जगताची माय । त्याचें वंदितसे पाय । काव्य स्फुरण व्हावया ।।४७।। आतां वंदू जगज्जननी । जी जानकी जनकनंदिनी । जगन्माता म्हणोनि । मातृभाव मनीं उचंबळे ।।४८।। रामप्रिया मेदिनी सुता । चंडी म्हणोनि विख्याता । दुर्गा ऐसें संबोधिता मानिताती कुलस्वामिनी ।।४९।। चांदवडीं रेणुका विख्यात । सप्तशृंगी भवानी वसत । एकवीरा अश्वस्थपुरींत । वास्तव्य होत दुर्गेचें ।।५०।। मनुबाई देवाळयांत । मंगळाई साताऱ्यांत । आंग्लाई सज्जन गडांत । समर्थे स्थापिली स्वहस्तें ।।५१।। दुर्गा भवानी तुळजापूर । कालिमाता भवानीपुर । माहूर गडीची अंबिका थोर । लक्ष्मी करवीर क्षेत्रीच ।।५२।। माहेश्वरी जोगेश्वरी बेटावदीं वज्रेश्वरी नटेश्वर अर्धनारी । गौरीहर अवतरले ।।५३।। विंध्यवासिनी नर्मदातीरीं । तुंगेश्वरी पार्वती तीरीं भद्रकाली नासिकक्षेत्रीं । किती अवतारी वर्णाव्या ।।५४। मदालसा प्रवरा तीरीं । कामाक्षी, मीनाक्षी दक्षिण माझारीं । शांता दुर्गा गोप्याभीतरीं । अवतार जगज्जननीचे ।।५५।। कलीचंडी विनायक । चंडी तीं जानकी देख । तिचें स्मरण करिती निःशेख । दोख, संकटें नासती ।।५६।। मातेनें केला अव्हेर । ऐसा घडेचिना प्रकार । माता ती माताचि थोर । करी सर्व लेकराचें ।।५७।। म्यां माते जवळीं हट्ट धरावा । वरदहस्त मस्तकीं असावा । काव्यग्रंथ पूर्ण करावा माझ्या करवीं तूचि हा ।।५८।। जन्मदात्री कोड पुरवी । जगज्जननी का न करवी । म्हणोनि मस्तक हें नमवी । जानकी देवी चरणासी ।।५९।। तीर्थक्षेत्रीच्या गंगा गोदा । तैसी माता नर्मदा । चित्त निर्मळ करोत सदा । होवोत सिद्धिदा मजलागीं ।।६०।। उपास्य देवतेसीं करूनि नमन । पुढील अध्यायीं संत सज्जन । तयांचें करूनियां स्मरण । वंदीन चरण सद्भावें ।।६१।। संताचें शुद्ध चरित । गावया व्हावें पुनीत । चित्त करूनिया सुचित । धरूनि हेत स्तवितसे ।।६२।। श्री चैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदिलीला प्रसंग सोज्वळ । देवता नमन मंगल । प्रथमाध्यायीं वर्णिले ।।६३।। श्रीराम ।। प्र० अ० स०

# 卐 अध्याय २ रा 卐

श्रीगणेशाय नम: । श्रीसरस्वत्यैनम: । श्री गुरूभ्योनम: । आतां वंदु संत सज्जन ज्यांचेनि कृपे ग्रंथ संपूर्ण गुरूमाऊलीचा वरदहस्त पुर्ण । व्हावा दीन मजलागीं ॥१॥ संत विश्रांतीचें घर । संत आनंदाचें माहेर । संत पुष्पवाटिका पवित्र । समाधान थोर प्राप्तीचें ॥२॥ जेथ सुविचारांचा समीर । विरक्तीचा सुवास मधुर । शांतीची हिरवळ आर्द्र । करी प्रसन्न चित्तातें ॥३॥ साधुचरित शुभ्र कार्पास । त्याचें फळ निरस । परी गुणमय हा विशेष । परछिद्र नि:शेष दुरावे ॥४॥ स्वये कष्ट भोगी कापूस । वस्त्रमिषें ये उपयोगास । संतांना तोचि हव्यास । दुख:पार व्हावें आस ही ॥५॥ परमार्थाचें मुख्य अधिष्ठान । शास्त्र, गुरू, संत, सज्जन । ज्यांचेंनि प्रकट गुप्त ज्ञान । अध्यात्म जाण ताथवा ॥६॥ दुलर्भ वस्तु जरी असलो । संतकृपें सुलभ झाली । म्हणोनि संत थोरबी भली । शिणली वाणि वर्णनीं ॥७॥ अणुरेणूत ब्रह्म भरलें । दृष्टीस न दिसे भलें । संत सगे कळो आलें । ज्ञानदृष्टीला स्वानुभवें ॥८॥ तेथ सूर्यशक्ति खुंटे । तार्किकांचा तर्क आटे वेद वाणी ही नुमटे निजवस्तु चोखट दावाया ॥९॥ त्या वस्तूचा अपूर्व लाभ । संतासी होये सुलभ । म्हणौनि सत्संगाचा लोभ हृदयीं वसे ॥१०॥ संतासरिस गर्भ श्रीमंत । मोक्ष श्रीनें अलंकृत । ऐसा कोण असे दिख्यात । दाता उदार भूमडळीं ॥११॥ जीव दरिद्री असंख्यात । कृपा दृष्टीनें केलें तृप्त । ऐसे कितीक हीन पतित । नृपती झाले ॥१२॥ म्हणोनि संतासरिस उदार । सायुज्य मुक्तीचे दानशूर । जें कोणी न देती भूवर । भांडार खुले तयाचें ॥१३॥ संत म्हणजें धर्म क्षेत्र । संत पुण्य पवित्र । विवेक संतोषाचें सत्पात्र । सुखस्वरूप मात्र सत हे ॥१४॥ सत्संगावीण विवेक । राम कृपेवीण सत्संग देख । सुलभ ना भवतारक । भयमोचक संग साधूंचा ॥१५॥ त्या सतासी शरण । जाई दृढ धरी चरण । मज दीनावरी कृपापूर्ण । करा अनुदिन विनवितों ॥१६॥ मातापिता गुरूजन अल्पमति मी बालक सान । मस्तकी वरदहस्त ठेऊन । आशीर्वचन द्या कृपेचे ॥१७॥ आतां संत कवीश्वर । वंदु शब्द सृष्टीचे आगर । अथवा थोर परमेश्वर । वास्तव्य करी शारदा ॥१८॥ अध्यात्म ग्रंथांची उत्पत्ति । परमार्थाची अपूर्व स्थिति । इहपर कल्याण प्राप्ति । होय तृप्ति ज्याचेनि ॥१९॥ जयाचेनि धर्म रक्षण । शास्त्र अध्यात्म निरूपण । विषय विषबीज संपूर्ण । नष्ट जाण होय ते ॥२०॥ वैराग्याचा अंकुर फुटे । वरी भक्तिपूर लोटे । दुर्वृत्ति नि:शेष पालटे ।

सामर्थ्य ऐसे कवितेचें ॥२१॥ प्रेमळ, रसाळ, मधुर । ज्ञानगर्भ, सात्विक थोर । काव्य निर्मिति अतिसुंदर । मतिप्रकाश ज्या योगें ॥२२॥ उपमा, साहित्य, अलंकार । नाना रसांचा अश्वाप सुकर । पांडित्य, लालित्य कलाप्रकार । सात्विक रूपे प्रकटति ॥२३॥ वैराग्ययोग, भक्तियोग । ऐसे जे कां थोर कविश्वर । असती अनंत अपार । झाले आहेत पुढें होणार करी नमस्कार साष्टांग ॥२५॥ वाल्मिकी, व्यास, नारद थोर । रामायण, भारत भक्ति सूत्र । भागवत प्रेमाचें सरोवर । शांतिप्रद ग्रंथ निर्मियले ॥२६॥ श्रीमज्जगद्गुरू शंकराचार्य । प्रस्थानत्रयी भाष्यकार । तयासी माझा नमसार धर्मसंस्थापक पुण्यात्मे ॥२७॥ मुकुंदराज, ज्ञानेश्वर । नाथ, गिरधर, मुक्तेश्वर । महिपति, संत श्रीधर । कवित्व थोर भक्तांचें ॥२८॥ समर्थ दासोपंत प्रसिद्ध । अमृतराय तुकोवा सिद्ध । मोरोपंत, वामन कटिबद्ध । काव्यामोदें डोलविती ॥२९॥ नाथ भागवत, ज्ञानदेवी । काव्यामाजी ख्यात होआवी । विवेक सिंधु प्रकटवी । दासवोध, गाथा, कल्पतरू ॥३०॥ भक्तिविजय नवनाथ सार । हरिविजय रूक्मिणी स्वयंवर । हरिवरदा, दयार्णव कविवर । करितो थोर कवित्व की ॥३१॥ ऐसे कित्येक संतकवि । त्यांची काय वर्णावी थोरवी । जनता जनार्दना करवो । गौरव सद्ग्रंथ म्हणोनियां ॥३२। ऐसे थोर कवि असती । तेथें माझा पाड किती । मी तो केवळ अल्पमति ॥३३॥ अल्पमति । काव्य स्फूर्ति मज होय ॥३३॥ एसिया काव्य सम्राटीं । पुढे ओवी लिहिल मराठी । सुवर्ण तबकीं ठेविली नरोटी । हें असत्य केंवीं घडे ।३४॥ अहो ! म्यां करावे कवित्व । ऐसे कोठें आहे कर्तृत्व । एका श्रीहरीचें प्रभुत्व । मजकरवीं करवितसे ।३५। पूर्ण चंद्र पाहूनि उचंबळे । सागर आनंदें खळबळे । तसें थोरांचें हृदय थोरलें । वैभव देखोनि आनंदे ॥३६॥ अंजली भरली सुमनांची । बामसव्य आमोदाची । उभयां सारिखी परिमळाची । वृत्ति ठेवि पुष्प तें ॥३७॥ तैसा संतांचा स्वभाव । काव्य लघु अथवा गुरू होय । उभयासी सारिखाचि भाव । तोष देती सकलांना ॥३८॥ ईश चरणीं पुष्प समर्पिलें । तें सोनचाफा वा कांटेरी असलें । परा सद्भावें अर्पिलें । श्रीहरी प्रेमळ संतोषे ॥३९॥ तैसा माझा काव्य संभार । अल्प मतीचा जोजार । परी संत स्वभाव उदार । सत्य गौरविती काव्यातें ॥४०॥ परगुण परमाणु असले । परी ते पर्वता परी केले । त्यासी वदती संत भले । वर्णिलें वैखरी पुरे कीं ॥४१॥ पंचपक्वान्नाचें भोजन । केलें, विटलें कीं वदन । रूचि पालटा कारण । अवीट अन्न सेविती ॥४२॥ तैसें माझे हें कवन । असलें जरी पूर्ण । मानावें

श्रीश्रोते सज्जन । भगवान् मूर्ति म्हणोनियां ।।४३।। आपुल्या शक्तिनुसार । भावें पूजावा परमेश्वर । परंतु पूजूं नये हा विचार । कोठेंचि नाहीं ।।४४।। ऐसें समर्थ वदती । मी तो काय अल्पमति । माझी बुद्धी गति किती । काव्य निर्मिती करावया ।।४५।। बुद्धि हीन वाग्दुर्बळ । चातुर्य ना, प्रबंध केवळ । भक्ति, ज्ञान, वैराग्य सकळ । येणेंविण निव्वळ रिता असे ।।४६।। परी मनीं एक भरवसा । संतचरित्रा अति सुरसा । गावें इच्छेनें मानसा । वृत्ति राहे भरूनियां ।।४७।। ती प्रेरणा जगदीशाची । तशीच गुरूजन, संतांची । आज्ञा मानूनि मनीचीं । हौस पुरवितों यथेष्ट ।४८। संतचरित्र रसाळ । गावया व्हावी बुद्धि निर्मळ । संतासीं विनवी सोज्वळ । करी सफळ मनोरथ ।।४९।। मागील अध्यायीं देवासीं नमन । द्वितीयांत संत, कवि, सज्जन । त्यासी विनम्र होवून । तृतीयाचें वर्णन करीतसे ।।५०।। श्री चैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदिलीला प्रसंग सोज्वळ । संत, कवि, नमन मंगल । द्वितीयाध्यायीं वर्णिलें ।।५१।।

इति श्रीचैतन्य विजय ग्रंथ आदिलीला प्रसंग, संत, कवि, सजणन नमन – द्वितीयाध्याय समाप्त     ओवी सं० ५१



## 卐 अध्याय ३ रा 卐

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरूभ्योनमः । करूनि श्रीरामाचें स्मरण । चैतन्य प्रभु रामकृष्ण । चरित्र गावया संपूर्ण । सामर्थ्य यावें मजलागीं ।।१।। नित्यानंद प्रभु मान्यवर । त्यांनीं गाईलें चरित्र थोर । चैतन्य कृपा तयावर । ज्ञानी भक्त म्हणोनियां ।।२।। त्या नित्यानंद कृपेवीण । चरित्रस्फूर्ति न हो एक क्षण । म्हणोनि वंदितसे चरण । नित्यानंद प्रभूचें । ३।। त्यांचा असतां आशीर्वाद । काव्य स्फूर्ति निर्विवाद । त्यांचेनि मति प्रबोध । निश्चित होय पूणत्वें ।।४।। चैतन्य चरित्र गातां । चित्तीं वैराग्य उपजे तत्वत्तां । शांति, सुख लाभे तृप्तता । होय चित्तां समाधान ।।५।। भक्तिप्रेमाचा सागर । हृदयी हेलावे निरंतर । मधुर भावाचा रस सत्वर । प्राप्त होय सातत्यें ।।६।। संसारदुःख दारूण । मिटे, वाचितां ग्रंथ संपूर्ण । तैसेंचि दोष दारिद्रय दहन । होती, तत्काल सत्य हें ।।७।। मोक्ष श्रीचे

वैभव । वैकुंठ पुरीचा गौरव । मनोरथ पुरती सर्वथैव । कल्पवृक्ष हाचि जाणिजे ॥८॥ नित्यनिरंतर भक्तिप्रेम । कधीं न होईजे विषय भ्रम । इये ग्रंथाचा लाभ परम । भाविका होय त्वरित कीं ॥९॥ विषयीं रति नुरे । संसारप्रेम सरे ईश्वर भाव भरे । अंतर्यामीं ॥१०॥ ऐसें ग्रंथाचे महिमान । चैतन्य कृपें होय पूर्ण । तें चरित्र्य गावया संपूर्ण । आज्ञा केली संतांनीं ।११। चैतन्य अवतार समय । दिल्लीचें तक्त यवनमय । दुराचाराचा आश्रय । भारती झाला सर्वत्र १२ धर्मांधतेचे तांडव । उध्वस्त होती मंदिरें सर्व : उन्मत्तपणाचा गौरव । सर्वत्र होऊं लागला ॥१३॥ मथुरेचीं राम मंदिरें । तीर्थक्षेत्रींचीं गोपुरें । नानादेवालयें मनोहरें । यवनें केलीं उध्वस्त ॥१४॥ प्रबल सत्ता देशभर । चालती सर्वत्र अत्याचार वंग, ओरिसा, प्रांतभर । हाहाःकार माजला ॥१५॥ सूर्यवंशी नृपवर । पुरूषोत्तम देव थोर । क्षत्रियांत अतुलवीर्थ । मान्यवर होती तेधवां ॥१६॥ तदुपरि प्रताप रूद्रदेव । सिंहासनीं बैसे अपूर्व वैभव । वंगदेशीं राज्य कर्तत्व राजा गणेश देवाचें ।१७। राजा गणेश पुत्र यदु । मातेचिया पोटीं विषादु । कुलकलंक दुःखदु । जाहला प्रजेसी सर्वदा ॥१८॥ केला परधर्म स्वीकार प्रताप । पुत्रास मारिले ठार । त्याचीही गति सत्वर । तैशाचपरी जाहली ॥१९॥ राज्य गेले धर्म गेला । संसार प्रपंच हुकला । सर्वस्व गेलें जीवा मुकला । कलंक कुला, यदुन्या ॥२०॥ वंगीं आलें यवनराज्य नरबली घेती दररोज । अत्याचार, व्यभिचार सहज । पचनीं पडती तेधवा ॥२१॥ त्या यवनांचें आक्रमण । ओरिसांत झालें दारूण । हिंदूराज्य संपूर्ण । सत्वर नाश पावलें ॥२२॥ तेथील अत्याचार कथा । कानीं नायकवे होय व्यथा । लेखणीस शीण वृथा । अल्प वार्ता देतसे ॥२३॥ मठ मंदिरें नष्ट केलीं । भजन मंडळें धुळीस नेलीं । टाळ मृदंगें फोडिलीं । शिक्षा करिती हरिदासां ॥२४॥ शिक्षा होय धर्मांतराची ऐसी युक्ति काजीची । धन्य ऐशा धर्म सत्तेची । वाहवा काय वर्णावो ॥२५॥ कोणी ग्रामांतर करिती । तेथेंचि त्यासी सुळी देती । ऐसी ही धर्मनीति । येई प्रचोति जनतेला । २६॥ प्रथम पानपत संग्राम झाला । दक्षिणीं विजया नगराला । मेवाड, राजस्थानीं अशांततेला । यवन सत्ता जाहलीं कारण ॥२७॥ सर्वत्र धुमाकुळ माजला धर्मसेतू खिळखिळा जाहला । जनतेच्या दुःखसंकटाला । सीमा मुळी न राहिली ॥२८॥ लोक झाले उदासीन । अर्थकारणीं दक्षपूर्ण । देवधर्मांचा गेला अभिमान । पाखंडी जन जाहले ॥२९॥ स्वस्ताईचा हीता काळ । रूपयास आठमण तांदूळ । बाराआणे मण तीळतैल । दीडरूपया मण तूप मिळे ।३०

जीवनाची नुरे चिंता । कासया आठव भगवंता । परमार्थी विकल अवस्था । अवनत जनता जाहली ॥३१॥ त्याचे कांही प्रकार ऐकतां । अवित हास्य फवारे उडतां । संयम राखावा चितां । सादर परिसतां सुजन हो ॥३२॥ संपत्तीचा निघे धूर । दांभिकता माज घरोघर । तेथींचा पहा चमत्कार । संतति नसे म्हणोनिया ॥३३॥ विवाह लाविती । बाहुलीचा । कित्येक श्वान मार्जारींचा । अजाण वाल बालिकांचा । खेळ नित्याचा होतसे ॥३४॥ वर वधूपक्ष मेळा । जन पाहण्या होई गोळा । संपूर्ण विवाह सोहळा । धनाचा उधळा करिती तैं ॥३५॥ चोरी, चहाडी, डाकुगिरी । पैशापायीं कितीवरी । सतित गलें स्वेच्छाचारा । बमलीं सारीं नारीनर ॥३६॥ आपला सत्य भाव रावा । प्रयत्न करित कधिही तेधवां त्यांसी मृत्यूचा सांगावा । दुष्टाकरवी त्वरित ये ॥३७॥ आपण स्वयें नाचविती कोणी केलें न साहती । ऐसीं दुष्टांची रीति । करतो छळण सज्जनांचें ॥३८॥ कैचा तेथ परमार्थ विचार कैचा भवित कैचा ईश्वर । सारे पाखंडी शिरजोर । सत्वर जाहले ते वेळां ॥३९॥ हे असो ज्ञानियांची अवस्था । काय पुसावी तत्वतां । साहित्य चर्चा विशेषत: । नवद्वीपीं होतसे ॥४०॥ वंगप्रांतीं नवद्वीप सिद्ध । पांडित्य, ज्ञाने प्रसिद्ध । घरोघरीं आबाल वृद्ध । शास्त्रार्थ करिती उच्चस्वरें ॥४१॥ घटपटाची खटपट । हाचि गौरव मानिती चोखट । तेंथ ईश्वराची कैसी भट । वाद दुर्घट नित्याचा ॥४२॥ नाना देशींचे छात्र येती । विविध शास्त्राभ्यास करिती । त्याविण नोहे सन्मान प्राप्ती मानिती विद्यापाठीं तैं ॥४३॥ ज्ञानापोटीं उपजे गर्व । त्यांत दंग होती सर्व । अहंकार मत्सर अपूर्व । विवेकबुद्धि नष्ट होय ॥४४॥ शृंगार रसाचा आस्वाद । साहित्य काव्यात तोचि प्रवाद । वैराग्य भवितभाव विशद । कोणी न करितो पीठीं तैं ॥४५॥ पंडित परी तर्कट । नास्तिक, वादी, पोरकट । द्विज ही होती आचार भ्रष्ट । यज्ञोपवित चिन्ह ओळखण्या ॥४६॥ वेद विक्रय सुरू जाहला । केवळ दानाचा अधिकारी बनला । जपजाप्य उपासनेला । फाटा दिधला सकलांनी ॥४७॥ क्षत्रिय झाले तैशाच रीती । धर्म रक्षिणीं असमर्थ होती । वैश्यांचा वौद्ध प्रीति । ब्रह्मवृत्तीचे वैरी शद्राकीं ॥४८॥ वर्णाश्रम धर्म बुडाला । अधर्म सदा बोकाळला । कुटुंब पोषणी गूंतला गर्वे भरला सकलजन ॥४९॥ संन्यास धर्माचें वैराग्य । उठें, पोटीं विषयानुराग । वस्त्र धारणीं तत्पर सवंग । मान्यता जनांत पावले ॥५०॥ नाहीं वैराग्याचा अभ्यास । नादीं भगवंताचा ध्यास । भक्तीप्रेमाचा हव्यास । तेंथें कैचा ॥५१॥

कोणी केलें ईश्वर भजन । अथवा केलें पुराण, किर्तन ।। म्हणती गांव उजाड संपूर्ण । करण्या येथ पातला ।। ५२ ।। याला बुडवावा जलांत । अथवा भाजावा अग्नीत ।। ऐसी वदती अति मुखांत । उमटो लागे अखंड ।। ५३ ।। वैष्णव शैवाते निंदिती । शाक्त वैष्णवातें दूषिती । पंथोपंथाची वृत्ती । सर्वत्र विकृति जाहली ।। ५४ ।। ईश्वर भक्तींचें सम्यक् ज्ञान । अथवा उपासना भजन ।। दावाया अवतार पूर्ण । व्हावा वाटे सूज्ञ जनां ।। ५५ ।। कांही सात्वीक सन्मती । शास्त्र मर्यादा न सांडती ।। आचार विचारें सत्प्रवृत्ती । वाढविती भक्ती प्रेमाने ।। ५६ ।। तें समयीं भारत वर्षीं । पृथक प्रांतीं सात्वीक वंशीं । संत जन्मले समयासीं ।। भक्ती, निती उपदेशावया ।। ५७ ।। वैष्णव धर्माचा प्रचार । तैसा नीति सदाचार ।। अध्यात्मज्ञान साचार । चित्त स्थिर व्हावया ।। ५८ ।। काशी क्षेत्रीं रामानंद । रैदास, नानक गुरुगोविंद । कबीर, सूरदास, श्रीचंद । तुलसीदास, मीरा तैशापरी ।। ५९ ।। उत्तर भारतीं असंख्य संत । झाले असती विख्यात । तसे महाराष्ट्री विरक्त । साधु संत परियेसा ।। ६० ।। निवृत्ती, ज्ञानेश, मुक्ता, सोपान । नामा गोरा, चोखा, भूषण ।। नरहरी, विसोबा, भक्तजन । हरिपरायण असती ते ।। ६१ ।। नाथ, समर्थ तुकाराम । त्या दोन शतकी भक्तपरम । ज्यांनी जाणविलें भक्तीवर्म । निर्भय केलें संसारी ।। ६२ ।। तैशाचपरी वंग प्रांत संत जननीं झाला पुनीत । तो सकळ वृतांत । कथितो समस्त श्रोतया ।। ६३ ।। संत मिषे प्रभू अवतार । घेऊनि करी जगदोद्धार । प्रत्यक्ष प्रकटे भूमीवर । भक्त प्रचार वाढाया ।। ६४ ।। वंगी कृष्णभक्ती विशेष । नामसंकीर्तनावेश । देहभान विस्मृति निःशेषमुर्छित । होती सप्रेमे ।।६५।। जै धर्माची ग्लानी होई । साधुसंत छळण, पाही । अधर्माचे उत्थान होई । अवतार तै हो प्रभुचा ।।६६।। साधुंचे परित्राण । दुष्कृत्यांचे नाशंन । धर्माचे संस्थापन । संभव होई युगीं युगीं ।। ६७ ।। गीतीं भगवंत बोलीला । कलियुगीं सत्यकरण्याला । चैतन्य प्रभु अवतरला नवद्वीपी पार्वदा समेत ।।६८।। त्या अवताराचे दोन हेतु । अंतरंग बहिरंग निश्चितु । त्याचें विवरण येथ । अल्प विस्थारें करितसे ।। ६९ ।।श्री मद्भागवत कथा सुरस । त्यांत दशम स्कंध विशेष।। श्रीकृष्ण जन्म रहस्य । गर्गें कथिले नंदासी ।। ७० ।।

श्लोक :– आसन् वर्णास्त्र योह्यस्य गृन्ह्य तोऽनु युगं तनूः ।। शुल्को रक्तः तथा पीतः इदांनी कृष्णतां गतः ।। १०–८–१३ भागवत्

युगी युगीं अवतार धारण । चतुर्युगीं चारवर्णं । त्याचें स्पष्ट विवरण । कथिलें लघुभागवतीं ।। ७१ ।। शुक्ल, रक्त, पीत

कृष्ण । चारी युगांचे चारवर्ण । नाम, वर्ण, सादृश्य पूर्ण । हेतु गर्भ अवतार ।। ७२ ।। ज्या ज्या युगांचे जें जें नाम । नामा प्रमाणें वर्ण क्रम । सत्य युगी सत्य परम । रक्त वर्ण त्रेतायुगीं ।। ७३ ।। द्वापारी वर्ण कृष्ण । तैंसा कली माजीं पीतवर्ण । मागील चतुर्युगीची घडण । यथाक्रम होतसे ।। ७४ ।। पूर्वीं चतुर्यूगी कृष्ण । तेचि अधुना नंदनंदन । तैसे पूर्वीं झाले गौरकृष्ण । चैतन्य रुपे प्रकटति ।। ७५ ।। गर्ग कथिती नंदाप्रति । तो प्रभु प्रकटे कृष्ण मुर्ती । अद्‌भुत लीला करी जगतीं । पसरे कीर्ति दिगंतरी ।। ७६ ।। वर्तमाम कलीयुगीं । ते कृष्ण प्रभु येती वेगीं । जगदोद्धारा लागीं । गौररुप जगीं घेऊनियां ।। ७७ ।।

श्लोक :— कृष्ण वर्णं त्विषा कृष्णं सांगोपाङ्गास्त्र पार्षदम् ।।
यज्ञैः संकीर्तन प्रायैः यजन्ति हि सुमेधसः ।। ११–५–३२ निमि करभाजन संवाद भागवत्

निमि करभाजन संवाद । एकादश स्कंधी प्रसिद्ध । चतुर्युगीं उपास्य अवतार । विशद पूजोपकरणीं वर्णिले ।। ७८ ।। कलियुगी संकीर्तन यज्ञ । पार्षदगणा सहित प्राज्ञ । अंगोपांग मानूनि यज्ञीं । भगवंताते अर्चिती ।। ७९ ।। वर्ण जरी कृष्ण असे । परी कान्तीनें पीत भासे भक्ती प्रेमाचा पाऊस । ओसरे, आर्द्रकरी तनु ।। ८० ।।

श्लोक :— अंतः कृष्णं बहिर्गौरं दर्शिताङ्गादि वैभवम् ।। कलौ संकीर्तनाद्यैः स्मः कृष्ण चैतन्य माश्रिताः ।।

आंत कृष्ण बाहेर गौर । पीत दिसे ज्यांचे शरीर । कलौ नाम संकीर्तन अपार । महिमा प्रकट होतसे ।। ८१ ।। तो अवतार मी होईन । स्वयें करीन संन्यास ग्रहण । करवी हरिभक्ति ग्रहण । दीन, अनाथ उद्धरण हो ।। ८२ ।।

श्लोक :— यत्र यत्र च सद्भक्ताः प्रशान्ताः समदर्शिनः ।। साधवः समुदा चारास्ते पूयन्त्यपि कीकटाः ।।

स्वयें निरुपिती भगवत । ज्या स्थानी समदर्शी प्रशांत भक्त । निवास करिती सदोदीत । अपुनीत होती पुनीत तीं ।।८३।। त्या स्थानासी कीकट संज्ञा । ते स्थान अपवित्र जाणा जनन वा वास्तव्ये सतजनां येई स्थानां पवित्रता ।।८४।। कीकट देश असती प्रसिद्ध । अंग, वंग, कलिंग सौराष्ट्र मगध । या देशी यात्रा, गमन निषेध । शास्त्र सिद्ध वचन ऐसें।८५।

श्लोक — अंग वंग कलिंगेषु सौराष्ट्र मगधेपु च ।। तीर्थ यात्रां विना गत्वा पुनः संस्कार मर्हति ।।

तीर्थ यात्रे वांचून । गमन केलें या देशातून । पुनः संस्कार केल्याविण । गति अन्य नसेचि ।।८६।। ऐसें प्रसिद्ध वचन ।

असले देशाचे अपवित्र पण । परी वंग देशी संत जनन । झाले, भक्तजन कित्येंक ॥८७॥ कित्येक समदर्शी प्रशांत तैसे योगी, विरक्त प्रेमळ, भक्तिभाव नितांत । निष्ठावंत अनंत जाहले ॥८८॥ त्यांचे नि वास्तव्यें पवित्रपण । आलें वंग देशालागुन । ख्यात श्रीकृष्ण चैतन्य । त्यांचे चरित्र परियेसा ॥८९॥ जेथ शक्तिची उपासना । मधुर भावाची साधना । अखड संकीर्तन घोषणा । पडे श्रवणा रात्रंदिन ॥९०॥ त्या देशास केलें पुनीत । आपुल्या चरित्रें विख्यात । तो कथा भाग समस्त । करौं येथ साकल्ये ॥९१॥ ऐसें श्रीकृष्ण वचन । व्याप्रति कथिती उपपुराणी । हे द्वि अवतार कारण । चैतन्य प्रभूंचे ॥९२॥ श्री विष्णु सहस्र नाम । स्तोत्र वाढवी भगवत्प्रेम । सुवर्ण, वर्ण हेमांग उत्तम । श्लोकीं महत्व दाविलें ॥९३॥

श्लोक – सुवर्ण वर्णो हेमांगो वरांङ्गश्चंदनांगदी ॥९२॥ सन्यास कृच्छमः शांतोनिष्ठा शान्ति परायणः ॥ ७६ ॥

यापरी अंतरंग अवतार कारण । कथिलें श्रोतया लागून पूढें चरित्र करी कथन । बहिरंग कारण विस्तरे ॥९४॥ परम कारुणिक भगवान । प्रकट लिला करुनि अंतर्धान । गोलोकीं करिती चिंतन । नित्य धाम संज्ञा तयातें ॥९५॥ जेथ प्रकृतीचें राज्य सरे वैकुंठ ही त्यांतचि विरे । तदुपरी विरजा नदी पसरे । गोलोक मार्गी अपूर्व ॥९६॥ विरजा नदी पार होतां । गोलोक लागे निश्चित ॥ तेंचि नित्य धाम सत्य । वास्तव्य नित्य विष्णुचे ॥९७॥ त्या नित्य धामी करिती चिंतन । शुद्ध माधुर्यमयी भक्ति दान । ज्यां नाही दिले संपूर्ण । प्राप्त झाले जिवासी ॥९८॥ कालाचा अपूर्व प्रभाव । प्रेमा भक्ति विसरले जीव । विस्मृती जीवाचा स्वभाव । वेदान्त शास्त्रीं वणिला ॥९९॥ माझिया प्राप्तीस्तव । प्रेमा भक्तिचा सुलभ उपाव । नामसंकीर्तनी उमटे भाव । स्वयें द्यावें तें दान ॥१००॥ द्वितीय वासनेचें चिंतन । गोप गोपी सारे जण । चाखिती प्रेमरस पूर्ण । भक्ति, प्रेम मजवरी ॥१०१॥ त्याप्रेमाचे स्वरुप आघवें । आपण स्वयें पहावें । गौर रुपे अवतरावें । आस्वाद घ्यावा प्रेमाचा ॥१०२॥ राधेचे निःसीम प्रेम । चाखी रसास्वाद परम । तें अनिर्वचनीय अनुपम । पहावे कैसें असें तें ॥१०३॥ माझ्या माधुर्याचा आस्वाद । घेऊनि राधा होय मुग्ध । तो आनंद उपलब्ध । व्हावा मज वासनाही ॥१०४॥ त्या प्रेमाचे स्वरुप कैसें । त्याचा महिमा कैसा असे । आस्वाद सुख स्वरुप कैसें । त्याची आस मजलागी ॥१०५॥ तो माधुर्याचा भाव । राधेंत राही सदैव । ज्यास सज्ञा महाभाव । देह भाव सारा विसरवी

॥१०६॥ साखरेची गोडी चाखितां । खाणाराची होय तृप्तता । परीसाखरेसी त्याची वार्ता । मुळी नसे ॥१०७॥

श्रीपाद–रुप गोस्वामी म्हणतात श्लोक–श्रीराधाया: प्रणय महिमा कीदृशो वा न यैवा ॥ स्वाद्यो येनाद्भुत मधुरिमा कीदृशो वा मदीय, ॥
सौख्यं चास्या मदनुभवत: कीदृशं वेति लोभात् ॥ तद्भावाढ्य: समजनि शचीगर्भसिंधौ हरीन्दु: ॥

अर्थ :– श्रीराधा प्रेमाचा महिमा कसा आहे । त्या प्रेम द्वारा श्रीराधा माझ्या ज्या अद्भुत माधुर्याचा आस्वाद घेते. तें माझे माधुर्य कसे आहे? त्याच प्रमाणें माझ्या माधुर्याचा आस्वाद घेऊन राधेस जी सुख प्राप्ती होते. त्यासुखाचे स्वरुप काय आहे? या विषयाला उत्तम तऱ्हेने जाणण्याच्या लोभाने श्रीराधाभाव मुक्त होऊन शची देवाचे गर्भात श्रीहरी प्रविष्ट झाले.

ओवी :- तो अस्वाद स्वयें घ्यावा। ऐसी इच्छा उपजे तेधवां। हाचि अवतार हेतु बरवा। पुढें निरुपिला यथाक्रम।१०८। ऐसे अंतर्बहिर्हेत । अवतार कारणे असती सत्य । तें केलें येथ विस्तृत । पूर्व स्थिती कळावया ॥१०९॥ कलियुगीं नाम संकीर्तन । येणेंचि होय हरिदर्शन । विसरुनियां देहभान करिती कीर्तन आनंदे ॥११०॥ याविन जे अन्य साधन । तें ते व्यर्थ होय जाण । ऐसें वर्म करुणा घन ठायी ठायी बोलीला ॥१११॥ त्याचा घ्यावया आस्वाद । चरित्र गातो विशद रसिकासि व्हावा आनंद । संतचरित्र ग्रंथें या ॥११२॥ पुढील अध्यायीं कथन । केलें, करुनि नमन । सद्गुरु कृपा होय पूर्ण चरित्र पुढती वर्णावया ॥११३ यापरि अंतरंग बहिरंग अवतार । कारण कथिले सविस्तर । आतां गावया चरित्र गौर । व्हावी स्थिर मती सदा ॥११४॥ म्हणोनि विनवी नंदनंदन तैसें गौर शचि नंदन करितों चरणीं वंदन । माझें अज्ञान ओसरो ॥११५॥ मी बालक असें अजान माझें कैचें शहाणपण । निर्मल चरित्र गुणगान । करितां पावन होईन ॥११६॥ ऐसी श्रद्धा धरुनी मनीं । मतिवेरी सत्कवनी । गुरुकृपेची छाया म्हणोनि ताप निरसनी सहाय्य हो ॥११७॥ संत कृपेचा सागर । संत आनंदाचें क्षेत्र । संत सगे पवित्र । वाचा मन कलेवर ॥११८॥ श्रीं चैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदिलीला प्रसंग सोज्वळ । चैतन्य अवतार कारण मंगल । तृतीया ध्यायी वर्णिले ॥११९॥ इति श्री चैतन्य विजय ग्रंथ आदिलीला प्रसंग चैतन्य अवतार अंतरंग बहिरंग कारण तृतीय अध्याय समाप्त ओवी संख्या - ११९

# अध्याय ४ था

श्री गणेशायनमः । श्री सरस्वत्यैनमः । श्रीं गुरुभ्योनमः ।। जयजयाजी सद्‌गुरुनाथा । कृपाकरींबा समर्था । तुझेनि प्रसादे सर्वथा । इच्छेची पूर्तता तत्क्षणीं ।। १ । जेवस्तू श्रुतीसि नाकळे । तेतुझे कृपेचेनि बळे ।। साधका सुलभ कळे । परब्रम्हठेले सन्मुख ।। २ ।। तूं संपूर्ण ज्ञान भांडार । साक्षात् ब्रम्हा विष्णुहर । भक्तिज्ञान वैराग्य थोर । होय सुकर तुझेनि ।। ३ ।। तुझी रुपे नामे अनंत । परी दत्तात्रये नामें ख्यात । कलियुगी तारिले असंख्य भक्त । दुःख मुक्त केले कितीं एक ।। ४ ।। तुझेंचरणी करी नमन । द्यावे मज कवना स्फुरण । चित्ता होय समाधान । चरित्र गानें ।। ५ ।। तृतीया ध्यायीं अवतार कारण । चैतन्य प्रभूचें केले कथन । ते अंतरंग म्हणून । करितो कथन बाहेरंग ।। ६ ।। तरी श्रोती अवधान द्यावे । मज करवीं पवन करवावे ।। मम मानस तृप्त व्हावे । वाटे गावे निरंतर ।। ७ ।। गंगा तीरी परम पवित्र । पूर्वकिनारी वंगीय क्षेत्र । संज्ञा जयासि मायापुर । गंगा परिवेष्टित नव द्विपी ।। ८ ।। प्राचीन नामे बामनपुकूर । बेल पुकुर मायापुर । बल्लाळ दिघी नाथपूर । अनेक संज्ञा असतीं त्या ।। ९ ।। ग्राम नव्हे नव द्विप । तेथ असती नव द्वीप । नऊ उपग्रामे वस्ती अल्प । रचना नवद्विपाची ।। १० ।। भागीरथीचे पूर्वतीरी । द्विपे वसती चत्वारी । पंचम पश्चिम किनारी ऐशा विस्तारी नवद्विप ।। ११ ।। पूर्व किनारी वसती द्विपे । अंतर द्विप सोमंत द्वीप । गोद्रुम द्वीप मध्य द्वीप । द्वीपे विचित्रनामाची ।। १२ ।। पश्चिम तीरीची द्वीपें । कोल द्विप, ऋतु द्विप । जन्हू द्विप, मोदद्रुम द्वीप । रुद्र द्वीप पाचवे ।।१३।। सर्वा मिळून एक ग्राम । नवद्वीप विख्यात परम । नदिया जिल्हयाचे क्षेत्र अनुपम । मायापुरधाम तेथ वसे ।१४। नवद्वीपाचा विस्तार । सांगता ग्रंथ वाढे अपारु । उगाची फापट पसारु । ग्रंथांतरी कासया ।।१५।। रत्नागिरीचे प्रसिद्ध आम्रफल । वर्णनीं केला व्यर्थ पाल्हाळ । परी मुखीं लाळ कवळ । गळो लागें ।।१६।। आम्रफलाचा आस्वाद । तृप्तीचा वाटे आनंद । येथ कासया मतभेद । होऊ पाहे ।।१७।। म्हणोनी करु चरित्र कथन । भक्ती प्रेमे प्रेमळ कथन । तेणे मिषें संकीर्तन । घडे अनुदिन गाता, तें ।।१८।।

श्लोक :– कुलं पवित्रं जननी कृतार्था । वसुंधरा पुण्यवतीच येन ।। अपारसंवि सुख सागरेजस्मिन् लीनं परे ब्रम्हणि यस्यचेतः ।।

तें कुल असें पवित्र । येथें शंका नसे लवमात्र । जी प्रसवे जननी सुपुत्र । कृतार्थ जाण धन्य ती ।। १९ ।। ती वसुंधरा

पुण्यवति । जिचियें पृष्ठीं हरिभक्त वसती । जे जन्ममृत्यु चुकविती । पुरविती आर्ति दीनाची ॥ २० ॥ करविती हरी गुण गान । खुंटे तेणें जन्ममरण । ऐसें जयाचें थोरपण । धन्यकुल, जननी, वसुंधरा ॥ २१ ॥ ऐसिया पवित्र कुलात जन्म घेती शचिसुत । श्रवण करा सकल वृत्त । चित्त सुचित करोनि ॥ २२ ॥ मधुकर मिश्र नामे ब्राह्मण । भारद्वाज वंशीं वेदज्ञ । पूर्वीचें वास्तव्य स्थान । याजपूर उडिसा प्रांतीं जें ॥२३॥ याजपुराहूनि श्रीहट्ट । आसाम प्रांतीं विख्यात केलें वास्तव्य तेथ मधुकर मिश्र तेधवां ॥२४॥ मधुकराचें द्वितीय पुत्र । ख्यात नामे उपेंद्र मिश्र । वैष्णव, पंडीत थोर चरित्र । धर्म निष्ठ, सद्‌गुणी लौकिक ॥२५॥ उपेंद्र पुत्र असती सप्त कंसारीं परमानंद, जगन्नाथ । सर्वेश्वर जनार्दन, त्रिलोकनाथ । पद्मनाभ असे सातवा ॥२६॥ तृतीय पुत्र जगन्नाथ । अध्ययन हेतु मनोत । श्रीहट्टाहूनि नवद्वीपांत । पाठशालीं त्वरित पातला ॥ २७ ॥ गंगादास नामें पंडित । त्यांचिया संस्कृत शाळेत । प्रारंभ करी विद्येप्रत । निष्ठावंत छात्र जाणिला ॥ २७ ॥ कुशाग्र बुद्धी जगन्नाथ । तेजस्वी गमे छात्रांत । काव्य शास्त्रीं पंडित । पुरंधर उपाधी पावला ॥ २८ ॥ रूप लावण्य बुद्धि कुशाग्र । विद्याध्ययनीं मन एकाग्र । पुरंधर पदवी शास्त्र समग्र । स्वाधीन मान्यवर जाहलें । २९ । पंडित चक्रवर्ती नीलांबर । आदिस्थान मगडोबा फरीदपूर । विद्याध्ययन व्हावया समग्र । नवद्वीपी पातलें ॥ ३० ॥ झालिया पूर्ण अध्ययन तेथेंचि राहती वास्तव्य करून । त्यासी कन्या पुत्र दोन दोन । यज्ञेश्वर, हिरण्य संज्ञा तया ॥ ३१ ॥ चद्रशेखर आचार्य रत्न । त्यांसी द्वितीय कन्यारत्न । देऊनि केलें कन्यादान । मुक्त त्यांतून जाहले ॥ ३२ ॥ जगन्नाथ मिश्र पुरंदर । विद्वान शास्त्री, रूप सुन्दर । त्यांसी ज्येष्ठ, उपवर । रूपवर कन्या अर्पिली ॥ ३२ ॥ कन्या शची रूपी निधान । जामात ज्ञानी विद्वान् । नीलांबराचें संतोषें मन । धन्य मानिती आपणया ॥ ३३ ॥ नवद्वीपीं मायापुर । गंगातीर अती पवित्र । वास्तव्य करी पुरंदर आश्रम धन्य व्हावया ॥ ३४ ॥ सकल सुखाचा लाभ पूर्ण । स्वयें पंडित सुलक्षण । शचिदेवि चतुर गृहिण । प्रसन्न वाटे आश्रमीं ॥३६॥ तोचि गृहस्थाश्रम धन्य ॥ जेथ कांहीं न पडे न्यून्य । पुत्र, कलत्र, आप्तजन । मनासारिखे पूर्ण लाभती ॥ ३६ ॥ नोकर, चाकर परिवार । दक्ष वचनी तत्पर । परमार्थी बुद्धि थोर । तोचि आश्रम धन्य हो ॥ ३७ ॥ यथोचित धनादि दानें । देऊनि तुष्टती दीनजनें । तृप्त होती अन्नदानें आश्रम तेणें धन्य हो ॥ ३८ ॥ गायीं वृषभांचा सांभाळ । करोनी पोशी सकळ ।

सर्वत्रांस सदा प्रेमळ । तोचि आश्रम सफळ हो ॥३९॥ परमार्थ आप्तींचा विचार । वसे जेथ निरंतर । भजन भक्ति भाव मधुर । सुखकर आश्रम, धन्य हो ॥४०॥ संसारीचें जें जें सुख । तें कोण भोगी निःशेख । जें कल्पिले तें तें देख । दुःखदायक अभ्यंतरी ॥ ४१ ॥ शचि देवीच्या संसारी । अष्ठकन्या एकसरी । एक ही नुरे तें अवसरी । यमपुरी गाठिली सकलांनी ॥ ४२ ॥ प्रथम पुत्र विश्वरुप प्रसिद्ध । द्वितीय चौदाशे सात शकाद्ब । फाल्गुन पौर्णीमा शुद्ध दिन शद्ध शनी, वसंती ॥ ४३ ॥ नुतन तरुपल्लव बहुवस । बहर ये पुष्पफळांस । होता हुताशनी दिवस । संध्या समयास जन्म हो ॥४४॥ पाच वाजुनि बावन्न मिनिटे । गौर हरि अवतार प्रगटे । राशी, लग्न सिंह उमटे ज्योतिष शास्त्रीं तेधवां ॥४५॥ राहु, रवि, बुध कुंभेत । गुरु स्वगृही, मंगलासह धनूंत । शनिउच्चेचा वृश्चिकेंत । शुक्र मेशांत राहिला ॥४६॥ चंद्र, केतु, सिंह लग्नांत । सकल ग्रह उच्चस्थ । शुभ षड वर्ग युक्त । धर्म स्थानगत शुक्रही ॥४७॥ शभ काल नव वसंत । सर्वत्र बहरला दिसत हरिबोल हे गर्जत । ध्वनी सर्वत्र उमटला ॥४८॥ तैं कर्मकोलाहल बंद झाला । लोभ प्रपंच व्यवसाय भुलला । श्रीकृष्ण संकीर्तन करुं लागला । ठायी ठायी तेधवां ॥४९॥ हरिकीर्तन सुधावर्षा पडे । दुर्भिक्ष दुःख दूर दडे । नास्तिकांचें ही मन मुरडे । आनंदे मग्न नृत्य करी ॥५०॥ स्त्रीरुपे देवांगना येती सत्वर । पाहावया शचीसुत सुंदर । नरनारी विविध उपहार । आणिती मिश्र घरा ते ॥५१॥ गौर हरि दर्शना अधीर । होती असंख्य नारीनर । बाल पाहूनि नयन मनोहर । तोष वाटे सकलांसी ॥ ५२ ॥ आचार्य रत्न चंद्रशेखर । श्रीवास आणिक पंडितवर । करितीं जातकर्म संस्कार । मिश्रपुत्राचा तेधवां ॥ ५३ ॥ त्याबरीं दिधलें अमित दान । उपरीं करिती अन्नदान । कित्येकां वस्त्र प्रावर्णे । तृप्त केले याचकां ॥ ५४ ॥ यापरि झाला अवतार । शची उदरीं गौरचंद्र । आनंदले नवद्वीपपुर । मिश्र दंपति संतोषे ॥ ५५ ॥

श्लोक :– कालान्नष्टं भक्तीयोगं नीजं यः । प्रादुष्कर्तु कृष्ण चैतन्य नामा ॥ आविर्भूतस्तस्य पादारविंदे । गाढं गाढं लीयतां चित्तभृंगः ॥

कालाचा अमित प्रभाव । येणें लोपे भक्तिभाव । तो भक्तियोग अपुर्व । प्रकटवावया निजसामर्थ्यें । ५६॥ चैतन्यरुपे आविर्भूत । केलें मिश्रगृह पुनीत । त्यांचे चरणी रे चित्त । होई त्वरित स्थिर तूं ॥५७॥ आप्त इष्ट सगे सोयरे । मित्र परिवार शेजारी । सर्वत्रांचा पडे घेरा । बालका भोंवती सदैव ॥५८॥ दृष्ट न लागी म्हणूनि विष्णु रक्षा देवीरक्षा

स्तोत्रांनीं । लावूनि कारती संरक्षण । वात्सल्य प्रेमे पुत्राच्या ।।५९।। जैं बालक रोदन करी । समजा वितीतया परोपरी हरीनाम गजर उच्च स्वरीं । शांत होई तेधवां ।।६०।। ही खुण मनीं जाणून । नित्य थांबविती रुदन । निष्क्रमण संस्कार देवपूजन । यथाविधि विधान जाहलें ।।६१।। गंगापूजन, षष्ठि पूजन । तदनंतर नामकरण । ऐसे विविध संस्कार पूर्ण । शास्त्रें कथिले केलें तें ।।६२।। बालक रांगू लागला । पाडी फोडी सकल वस्तूला । माता दिसता समयाला । निद्रिस्त होई सत्वरीं ।।६३।। मातेसीं वाटे आश्चर्य थोर । कोणीं केला हा कारभार । म्हणे बालक निद्रिस्त थोर । पालक माझारीं पहुडला ।।६४।। चार महिण्याचे बालक ऐसे कर्म करी, अशक्य । पिशाच्य प्रकार वाटे देख । शंका येई मानसीं ।।६५।।मीश्र बोलतीं पत्नीस । करीतींमंत्र तंत्रास ।त्रास न व्हावा पुत्रास । संतोष हो आवा सर्वदा ।।६६।। पितामह चक्रवर्ती ज्योतीषज्ञ । वदले बालक नव्हे अज्ञ । अतिमर्थ महापुरूष प्राज्ञ । विश्वंभर संज्ञा पावेल ।। ६७ ।। तेरा मास गर्भी शयन ! हें नव्हे की साधारण । अलौकिक कर्म प्राज्ञ । शास्त्रज्ञ तैसे मानिती ।। ६८ ।। म्हणोनि संज्ञा विश्वंभर । वदती निमाई गौरीहर । गौरांग, महाप्रभृ । गौर सुंदर । नामे संबोधिति बालकां ।। ६९ ।। बालक अभिरूचि पहावया वस्तु ठेविति ओळखावया । तयांत ग्रंथ भागवत घ्यावया । धावू पाहे शिशु तदा ।। ७० ।। पोथी मिषें समस्त अनित्य । भागवत ग्रंथ वस्तु नित्य । जनासि दावीं सत्य पंथ । सुचित केलें सकल जनां ।। ७१ । बालक चालूं लागला । गृहीं देखिला सर्प थोरला । त्यावरी शेषशाई बनला । लोक जाहला भयचकित ।। ७२ ।। गरूड नामें आक्रदन । करिती ललना गण । तें देखोनि सर्प तेथून । निघोन जाई सत्वरीं ।। ७३ ।। सुखरूप बालक देखिला आनद झाला जननीला । त्वरें जवळीं घेंऊनि त्याला स्तनपान करविलें सप्रेमें ।। ७४ ।। बालक लावण्य सुकुमार । पायांत पैंजणरव मधुर । नित्य जाई घराबाहेर । नारींनरा द्यावया संतोष ।। ७५ ।। पाहूनि बाल सुंदर किशोर । केश कुंतल काळेंभोर मोहित होती नारीनर । रूचिकर मिठाई देती त्या । ७६ ।। बाल कौंतुकें तें वेळां । सारी मीठाई करीं गोळा । हरिगुण गाई त्याला । निमाई प्रसाद देतसे ।।७७।। भेटीस येती त्याबस्तूत । खाद्य पदार्थ अतिरिक्त । सकला वाटू नि त्वरित। निमाई होत मोकळा ।।७८।। दह्या दुधाची करी चोरी लोणी साखर चोळी उदरीं । पळे सत्वर भितऱ्या परी। लीलाकरी अहर्नीस ।। ७९ ।। ऐके दिनीं घडला प्रकार । लेवूनि आभरणें आंगभर । खेळे एकाकी घरभर । बाल सुंदर

(श्रीचैतन्य विजय आदिलीला)

निमाई ।।८० ।। तष्कर द्रव्यें देखीला । उचलुनि स्कंधीं घेतला । काननी नेती तयाला स्वार्थ हेतु भुलविला निमाई
।। ८१ ।। एकदेस देश खावयास । दुसरा काढी आभणास । श्रम जाहला तस्करास । गमनास मार्ग सुचेना ।। ८२ ।।
परतले तैं मिश्र घराला । बाळ पितयासान्निध पातला । भयभीत तस्कर तें वेळां । पळू लागतीं जीब भयें ।। ८३ ।।
प्रत्यक्ष कृष्ण भगवान । पळविती नंदनंदन कंसाचीं करणी दारुण । जाणे भगवंत द्वापारी ।। ८४ ।। तोचि भगवंताचा
अंश । निमाई लिला दावीं प्रत्यक्ष । केला तस्कर मतिभ्रंश । पटे साक्ष तयासी ।। ८५ ।। मृतिका भक्षणाचा प्रकार ।
कृष्ण दावी विश्वरुप घोर । यशोदा पाही आश्चर्य थोर । भीति अपार मानसीं ।। ८६ ।। मातेनें दिधले खावयास ।
विविध पधार्थ क्षीर संदेश । ते सारुनि मृत्तिकेस । भक्षी निमाई तेधवा ।। ८७ ।। मुखांतील माती काढींता पार्थिव
भाग अन्न तत्वतां । बाळ बोले संपूर्ण अभेदता । विकृति असे मृत्तिका ।। ८८ ।। बाळ तुझे बोलणें खरें । म्हणोनि
मृत्तिका खावी कारे । शरीर जर्जर. विकारें । स्वाद कैचा अन्नाचा ।। ८९ ।। मृत्तिकेचा विकार अन्न । खातां पुष्ट
होय तन । येथ योग्या योग्य विचार पूर्ण । करणें कर्तव्य सांसारिका ।। ९० ।। मातेंचें उत्तर करी श्रवण । निमाई जाब
संतोषोन । एकदेशी विचार अपूर्ण । ज्ञानियां करणे अन्यथा ।। ९१ ।। गृहीं देखोनी भव्य प्रकाश । माता पाही, दिव्य
पुरुष । पुजा विधि करिती अनेक । स्तविती निमाईस सप्रेमें ।। ९२ ।। माता जाहली भय चकित । सत्वर पातली
अंतर्गृहांत । निद्रेंत निमाई स्वस्थचित्त । नवल अद्‌भुत वाटलें ।। ९३ ।। पतीसि कथिलें सविस्तर । बाळ अलौकिक
बोलती, मिश्र । एसें अपूर्व प्रकार । करी अपार बालक ।। ९४ ।। एके दिनी आला पांथस्थ । ब्राम्हण होता गोपाळ
भक्त । मिश्रांचें स्विकारी अतिथ्य । वैष्णव सेवा परायण ।। ८६ ।। पाकसिद्धि करोनि ब्राम्हण । ध्यानीं आणी गोपाळ
कृष्ण । नैवेद्य करावा समर्पण । हेत मनीं वागवी ।।९६।। नेत्र झांकोनि ब्रह्मार्पण । करी, निमाई घेई भोजन । अतिथीने
त्यागिले अन्न । स्पर्शिलें बाळें म्हणोनियां ।। ९७ ।। पुन: पाकसिद्ध केला । वरी तोचि प्रकार जाहला । प्रार्थूनियां
करविला ।। ब्राम्हणा करवीं पाक तैं ।। ९८ ।। सारे राहती सावध । बालक अडविला केलाबद्ध । नैवेद्यार्थ द्विज हो
सिद्ध । आराध्यास भोग चढविला ।। ९९ ।। निद्रेनें सारे घेरिलें । बालकें आपणां मुक्त केलें । नैवेद्य जेंऊ लागलें । योग
म्हणोनि भाळ पिटी ।। १०० ।। तोंचि चतुर्भुज सुंदर । रुप दिसले मनोहर । सेवक परम पवित्र । आकृष्ट झालो

भक्ती नें॥१०१॥ कृष्णावतारी हेंचि दृश्य । म्या दाखविलें हो तें तुजसीं । आश्चर्य न करी मानसीं । द्विजवर विश्वासीं मजलागी ॥ १०२ ॥ तुझी भक्ती अनुप । दाविले म्यां चतुर्भुज रुप ॥ देखोनि द्विज तुष्ट स्वरुप । भक्त प्रसाद ग्रहण करी ॥ १०३ ॥ ईप्सित पूर्ण जाह्ला ब्राम्हण । कोणासी न करी बा कथन । ऐसी आज्ञा देऊनि । प्रभु अंतर्धान पावले ॥ १०४ ॥ असो एशा अनंत लिला । निमाई दावी जनाला । तेणें संतुष्ट आप्त सगळा । तुष्टली माता, पिता हि तै ॥ १२५ श्री चैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदिलिला प्रसंग सोज्वळ । आविर्भाव परम मगल चतुर्थात बाळलीला कथियेल्या ॥ १०६ ॥ इति श्री चैंतन्य विजय ग्रंथ आदिलीला प्रसंग चैतन्य अवतार प्राकटच बाळलीला वर्णन चवथा अध्याय समाप्त

ओवीं संख्या १०६ – एकुण ओ. सं. ३३९



## अध्याय ५ वा

श्री गणेशाय नमः । श्री सरस्वत्यै नमः । श्री गुरूभ्यो नमः । ओं नमोजी गजवदना । सकल विद्या कला निधाना । अज्ञान ध्वांत नाशना । धूम्रवर्णा नमन तुज ॥ १ ॥ विद्यारंभी तुझें नमन । केल्या ओसरे अज्ञान । तुझेनि कृपे ज्ञातेपण कल्याण कारण तूंचि कीं ॥ २ ॥ जगाचा तूं मूळारंभ । तैसा निर्गुणाचा प्रारंभ । ओंकार स्वरूप स्वयप्रभ । विद्यालाभ तुझेनि ॥ ३ ॥ व्यासें कथियलें महाभारत । तुवा स्वहस्तें लिहिला ग्रंथ । तुझेनि ग्रंथ विख्यात । झाला ख्यात त्रिभुवनी ॥ ४ ॥ तुवां मर्दिला नरांतक । तैसा दैत्य देवांतक । रक्षियेलें सकल लोक । संकट नाशक देवांचा ॥ ५ ॥ तू जगांचा ज्ञानदाता । तैसा अससी विघ्नहर्ता । तुज नित्यनेमें भजतां । दरिद्रता सरे । सकलही ॥ ६ ॥ चत्वार वाचेचें मूळ । आदिमाया शारदा केवळ । जियेचेनि होये सफळ । तत्काळ विद्यारंभ जो ॥ ७ ॥ शारदा मयूर वाहना । हाती नित्याचें वाद्य वीणा । मधुर स्वरें करी गायना । वेदमाता संज्ञा पावली ॥ ८ ॥ सगुण, निर्गुण, ब्रह्मज्ञान । न होय

तरीच घडे संत सेवन । कारण अज्ञानीं जीव मी ।। १० ।। संत चरित अद्‌भुत अपार । कवि विशाल बुद्धिसागर । असला, तरीच पावे पार । नातरी असार श्रम तो ।। ११ ।। मी जीव असे अज्ञानी । गावें संत चरित आस मनीं । भावें वाही मति कवनीं । धरूनी कृपेचा भरवसा ।। १२ ।। तुमचियां कृपेचें निधान । हेंचि माझें चिरजीवन । ते ठेवीन जपून । करी कवन सप्रेमें ।। १३ ।। मागील अध्यायी जन्मलींला । केल्या अल्पशा वर्णिल्या । पंचमीं विद्यारंभाला । केले कैसे चतन्यें ।। १४ ।। तेंचि आता करी कथन । श्रोती द्यावें अवधान । तेणें होय कवन स्फुरण । मजला जाणा, सत्यकीं ।। १५ ।। विद्यारंभ परम पवित्र । कर्णवेध, चूडाकरण संस्कार । पिता करी सत्वर । संपन्न निमाई व्हावया । ।। १६ ।। एक्या दिनीं अक्षर ओळख । समस्त संयुक्त वर्ण विषयक । तीन दिनांत बालक । भगवन्नामें लिहो तदा ।१७। कृष्ण मुरारी मुकुंद । राम, वनमाळी गोविंद । नाम लेखनीं विशेष छंद । वाचे वदे मधुर स्वरें ।। १८ ।। कें उडता पक्षी मागावा । चंद्रमा देखोनि हट्ट घ्यावा । प्राप्त न होतां निघावा पंचम सुर ।। १९ ।। तदा संकीर्तन गजर । श्रवणीं येतां गौरचंद्र । शांत होई राहीस्थिर । माता पितरें तोषवी ।।२०।। बाल्यीं अतीव चांचल्य । दिसू लागलें अतुल । जलक्रिडा करिती बाल । चौर्यादि केलीं चालविती ।। २१ ।। धके चपेटे मारितीं गान्हाणीं येती मातेप्रति । माता क्रुद्ध होय न मानिती । धिंगाणा घालिती सकल गृहीं ।। २२ ।। बालाची खोडकर वृत्ति । वाढे अधिक प्रवृत्ति । नरनारी कथन करितीं । माता पितया तेधवां ।। २३ ।। बालिका करिती गंगास्नान । गंगातटीं करिती पूजन । निमाई वदे काय कारण । गंगा दुर्गा पुजितसा ।। २४ ।। माझी पूजा करा सत्वर । मी ईप्सित देईन वर । गंगा, दुर्गा दासी लाचार । मज कारणें सेविती ।। २५ ।। ऐसें निमाई वदुन । पूजा सामग्री करी ग्रहण । स्वयें खाद्य, फळें घेऊन । खाई सत्वर त्या स्थानीं ।। २६ ।। खाद्य भक्षण केल्यावर । देऊं पाहे ईप्सित वर । तुम्हासि मिळे पति सुंदर । धनी, ज्ञानी, रसिक कीं, ।। २७ ।। त्यासि आयु राही भरपूर । तुम्हांसि होती पुत्र पौत्र । वरी क्रोध अतरी मधुर । वचन रूचिर गौरांचें ।। २८ ।। जो खाद्य न देई बालिका । मिळे पति रोडका । साऱ्या मुलींचा घोळका । तुजसी होई जाण हें । ।।२९। शाप ऐंकूनि देती खाद्य । ऐशा किती लिला प्रसिद्ध । ऐकूनि पिता होई क्रुद्ध । ताडण करण्या बालकां ।। ३० उभयतां मनीं विचार करिती । अद्‌भुत बालक निश्चिती । वाटे पुत्र रुपे प्रभु येती । चित्ती संतोष द्यावया ।। ३१ ।।

मुलाचा चंचल स्वभाव । खोडया करी, गृहीं सदैव । तैं क्रोधाचा उपजे भाव । मिश्र मनी तेधवां ॥ ३२ ॥ क्रोधाचा येतां उमाळा । ताडण करूं इच्छिती बाळा । कीं थांबेल त्याचा चाळा । निर्वाळा मनीं वसे ॥ ३३ ॥ एके दिनी निशीं स्वप्नांत । महापुरुष यें अकस्मात । बोले हे मिश्र पंडित । असाधारण सुत तुझा कीं ॥ ३४ ॥ त्यासीं करिसी निर्भत्सना । दंड द्यावा इच्छिसी मना । युक्त न वाटे तव कल्पना । सामान्य जनापरी न हा ॥ ३५ ॥ स्वप्नीं मिश्राचे उत्तर । सुत महापुरुष थोर । मी पिता तो मम पुत्र । कर्तव्य तत्पर होणे मजलागीं ॥ ३६ ॥ बालकासी योग्य शिक्षण देतां द्यावे लागे शासन । हाचि पितृ धर्म जाणून । वर्तन करी सर्वदा ॥ ३७ ॥ त्यासी पुरूष वदे पंडित । बाल अद्‌भुत शास्त्र पारंगत । शिक्षण कर्तव्य नसे खचित । दुःखित कासया । करितसा ॥ ३८ ॥ तदा मिश्र देई उत्तर । पितृ धर्म असे दुस्तर । पुत्रासि शासन निरंतर । कल्याणकर वाटे मज ॥ ३९ ॥ ऐसें निस्पृह उत्तर । ऐकतां तोषला पुरूषवर । देऊनि आशीर्वचन सत्वर । अंतरधान पावला ॥ ४० ॥ नवद्वीपी वसे शांतीपूर । तेथींचे पंडित अद्वैताचार्य । संस्कृत पाठशाळा मायापुरीं । अध्ययना कारणें : चालविती ॥ ४१ ॥ तेथ आचार्य करिती आराधन । जल तुलसीद्वारां नारायण । कथा गाती वैष्णव गण । श्रीवास गंगादासादि ॥ ४२ ॥ चंद्रशेखर, ठाकूर, मुरारीगुप्त । शुक्लांबर, हरिदासादि पंडित । भगवत्कथा गात गात । काळ घालविती आनंदे ॥ ४३ ॥ निमाई बंधु विश्वरूप । तेणें जाणिलें संसार स्वरूप । वैराग्य होय आपोआप । बाल्यापासाव तयासीं ॥ ४४ ॥ विश्वरूप षड्‌शास्त्र पंडित । सकल गुणें वरिष्ठ । संसारी अति विरक्त । जनांत राहणें न रूचे ॥ ४५ ॥ प्रातःकाली गंगास्नान । मानस पूजा देवतार्चन । अद्वैत सभेंत श्रवण किर्तन । चाले नेम नित्याचा ॥ ४६ ॥ भोजन समय टळलियावरीं । माता निमाईस पाठवी सभें माझारी तेजें सदृश कृष्णमुरारी । मुग्ध अंतरी सभासद ॥ ४७ ॥ विश्वरुप सदना येऊन । भगवत् प्रसाद करी ग्रहण । जाई अद्वैत सभेंत तूर्ण । असार मानून सर्वही ॥ ४८ ॥ गृही विष्णु मंदीरीं । विश्वरूप नित्य वास्तव्य करी । पडे विवाह चर्चा कर्ण विवरीं । मनस्ताप भारी होतसे ॥ ४९ ॥ मातें संसाराचा वीट । कासया मज देतीं कष्ट । संसार, असार, वोंखट । स्वीकारावा इष्ट न हें ॥ ५० ॥ संसाराची बांधूनि बेडी । मग अडकविती दोन बापुडी । मन न घे ... संसाराचा वाटे शीण । नको ऐश्वर्य, थोरपण । प्रपंचाची चिंता दारुण

अनुदिन लागे पाठीसी ।। ५२ ।। नरदेह परमपवित्र । प्रपंचास्तव वेची पामर । जन्ममृत्यू न चुके फेर । दुःख अपार तयांत ।। ५३ ।। संसारी सुखी जाहले । ऐसें देखिलें ना ऐकिलें । लोभास्तव जे गुंतले । यातनेंचे झोलें खावया । ५४ । यास्तव नको संसार । न करवी भवपार । भजता जरी कृष्णचंद्र । फेरा चुकवी मृत्यूचा ।। ५५ ।। ऐसें विचार येती मनी । विश्वरुप दुःखीत मनी । विचार करी संन्यास ग्रहणीं । अनुसंधानी ईश्वर राहिला ।। ५६ ।। एकें दिनी स्वमातेसी । दिधलें हाती ग्रंथासी । केलें कथन तियेसीं । द्यावे निमाईसी तारुण्यीं ।। ५७ ।। पुस्तक तयासी द्यावें । कदा न हे भुलावें । पुढती उपयुक्त होआवें । एतदर्थ जपावें तयासी ।। ५८ ।। माता बोले तयालागुन । मजसीं होय विस्मरण । तूंचि ठेवी वा जपून । गृही अवस्थान नित्य तुझें ।। ५९ ।। स्वयें तूं असशी पंडित । तयासी पढवी गृहांत तूंचि द्यावा त्यासी ग्रंथ । हेंचि संमत मज वाटे ।। ६० ।। विश्वरुप वदे मातेसी । असलो स्थिर गृहासी । अवश्य देईन तयासी । तूंही स्मृतीसि राखावें ।। ६१ । निशा समय गाढ प्रशांत । स्वस्थ सारे निद्रेंत । विश्वरुप राही जागृत । चिंतन करीत ईशाचें ।। ६२ ।। आपुलें वृद्ध मातापिता । त्यांसी अहर्निश संसार चिंता । जीवनाची अनिश्चितता । बालक निमाई अजाण ।। ६३ ।। ऐसे विचार येतां मनीं । चित्त विचलित तें क्षणी । परी ईश्वराची करणी । भरण पोषण करी तो ।। ६४ ।। आपण केवळ निमित्त मात्र । जगाचें हालवी तो सूत्र । तोचि देई अन्नवस्त्र । चिंता अणुमात्र नसेचि ।। ६५ ।। ऐसा विचार करुन । निद्रित मातेसी केलें नमन । कृपाकटाक्षें निमाईस बघून । गमन केलें देशांतरी । ।। ६६ ।। पूर्व संकेतानुसार । लोकनाथ होता गंगातटावर । प्रसन्न पाहूनि परस्पर । गंगापार जाहलें ।। ६७ ।। कांहीं काळ लोटलियावरी । विश्वरुप संन्यास ग्रहण करी । शंकरारण्य तें अवसरीं । नामाभिधान पावले ।।६८।। करुनि संन्यास ग्रहण । भारती तीर्था केलें भ्रमण । दोन वरुषे कालक्रमण केलिया पंढरीत पातलें ।। ६९ ।। पांडूरंगाचें घेतलें दर्शन देखतां उडे देहभान । आत्मस्वरुपाची ओळखण । विश्वरुपा जाहली ।। ७० ।। ऐशा या पवित्र क्षेत्रीं । पावन चंद्रभागा तीरीं । देह ठेविला सत्वरी । भौतिक शरीर त्यागिलें ।। ७१ ।। प्रातःकाल जाहलियावरी । विश्वरुप नसे शय्येवरी । वास्तपूस करीती शेजारी । मित्र गृहींही नाढळें ।। ७२ ।। विश्वरुप लोकनाथ । गृह त्यजूनि झाले विरक्त । उभय गृहीं आकांत । दुःखी समस्त जाहले ।। ७३ ।। मातेचें करुण आक्रंदन । सकलास होय शोक दारुण । विश्वरुप गाता

गुण । श्रवणीं रूदन नायकवे ।। ७४ ।। विश्वा ! तुझी वृद्ध माता । त्यागिलें केली निष्ठुरता । माझा अपराध तत्वता। काय ? पाप पदरीं ये ।। ७५ ।। वृद्धपणीं पुत्र शोक । अत्यंत जाणवे दुःख । त्यासी कारण होसी देख । उचित कैसें वाटे हे ।। ७६ ।। यापरी माता विलाप करित । देखूनि निमाई मूर्छित । सावध होतां समजावीत । अश्रु पुशीलें मातेचें ।। ७७ ।। शोधार्थं धाडिती मिश्र । नाढळथी उभय पुत्र । यतिधर्म आचरावया पवित्र । अभ्यंतरी ऐसें । भाविलें ।। ७८ ।। प्रपंची धैर्य धारण । करूनि राहिले । पतिपत्नी येती आघात करिती सहन । तयाचें निरसन कोण करी ।। ७९ ।। ईश्वरेच्छा । बलीयसी । मानूनि राहले गृहासीं । नित्य प्रार्थिती ईश्वरासी । दुःख मुक्त आम्हासी करीं त्वरें ।। ८० ।। तें समयीं अपूर्व घटना । नैवेद्याच्या भक्षूनि पाना । मूर्छित होतां नंदना । सावध केला उभयतांनीं ।। ८१ ।। बालकें अपूर्व कथन केलें । भय्याने मज दूरी नेले । संन्यास ग्रहणीं आदेशिलें । उत्तर दिधले तें परिसा । । ८२ । माझें मातापिता अनाथ । संन्यास ग्रहणीं मी असमर्थ । बालक अजाण अनभ्यस्त । सेवक माता पितरांचा ।८३। माता पित्याचें शुश्रुषण । करिता संतुष्ट नारायण । ऐसें ऐकतां माझे वचन । पोचवी त्वरित स्थानीं या ।। ८४ ।। माझें कोटी नमस्कार । माता पितया कथी सत्वर । कथा मिषें भावी विचार । केला स्पष्ट संकेतें ।। ८५ ।। श्रीचैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदिलिला प्रसंग सोज्वळ । विद्यारंभ, लीला. मंगल । विश्वरूप चरित कथिलें पंचमीं ।। ८६ ।।

इति श्रीं चैतन्य विजय ग्रंथ । आदिलीला प्रसंग विद्यारंभ, लीला, विश्वरुप चरित्र कथन अ० पां० समाप्त । ओवी ८६



## 卐 अध्याय ६ वा

श्रीगणेशायनम: । श्रीस्वस्वत्यैनमः। श्रीगुरूभ्योनमः।, नमन माझे भगवंता । कृपाळु वा करूणावंता । तुजसी भावे नमितां चित्ता शांति लाभतसे ।। १ ।। तूं सकल वेद कर्ता । तुझें विश्वासें उत्पत्ति तत्वता । सागरीं । दडविले असतां ।

पुनरपि तयातें रक्षिले ॥ २ ॥ वेद जगाचा आधार । वेद ज्ञानाचा सागर वेदीं वर्णिले संस्कार । ब्रह्मप्राप्ति निरंतर व्हावया ॥ ३ ॥ इहपरलोकीं कल्याण । व्हावया वेदाचें अध्ययन । द्विजा आवश्यक असें जाण । अज्ञान तिमिर ध्वंसे तें ॥४॥ द्विजत्व प्राप्त व्हावया देख । उपनयन संस्कार आवश्यक । तेणेंपावे इहपर लोक । ज्ञानाधिकार प्राप्त हो ॥ ५ ॥ प्राप्त व्हावया वेदाधिकार । आवश्यक असे संस्कार । ब्रह्मत्व राही तेणें स्थिर । गुरु होई पिता स्वयें ॥ ६ ॥ उपनयनीं ब्रह्मचर्य । दीक्षा द्यावीं लागे सत्वर । गुरूगृहीं आसन स्थिर अध्ययनीं करणें छात्रासी ॥ ७ ॥ गायत्रीची उपासना । अग्नी, सविता उपासना । सूर्य नमस्कार विधाना । करावे, नियमन संयमें ॥ ८ ॥ नित्य राखावे लागें ब्रह्मचर्य । संचय तेज, बलवीर्य । तेंजस्वी तनु बुद्धि चातुर्य । चतुरस्त्र मेधा होतसे ॥ ९ ॥ यास्तव उपनयन संस्कार । वाढवी शक्ति, तेज, वीर्य । तैसी वेद विद्या अपार । देई फल निर्धारें ॥ १० ॥ तो उपनयन संस्कार । निमाईचा जाहला तो प्रकार । ऐकावा येथ सविस्तर । अवधानें स्थिर होआवें ॥ ११ ॥ विश्वरूपें केलें संन्यास ग्रहण । निमाई विद्याभ्यासीं जडवी मन । चांचल्य जाई निघोन । समाधान न राही पितया ॥ १२ ॥ बालक अभ्यासीं रत असतां । संतोष वाटे माता पित्यां । येथ उफराटी अवस्था । जगन्नाथ मिश्राची जाहली ॥ १३ ॥ शास्त्राभ्यासी वडील पूर्ण । तेणें केलें संन्यास ग्रहण । निमाई विद्या संपन्न । होतां सदन त्यजिल ॥ १४ ॥ म्हणोनि वारिलें अध्ययन । बालका गवसे मुक्त रान । ग्राम्य खेळी गुंतें मन । ऐसें जनीं भासवी ॥ १५ ॥ अशुचि स्थलीं बैसे जाऊन । माता समजावी प्रेमानं । अपवित्र स्थान सोडून । करी स्नान सत्वरी ॥ १६ ॥ बाल वदे माते लागून । मीं मूर्ख अज्ञानीं । मज कासया कळे विवेचन । भल्या बुऱ्या जाण गोष्टीचें ॥ १७ ॥ मीं न बैसे अपवित्रस्थानीं त्याची जाणीव माझें मनीं । शुद्धाशुद्ध कल्पना मनीं । घेसी जननी कासया ॥ १८ ॥ असलें अपवित्र स्थान । माझ्या गमनें पूर्ण । शुचित्व तया लागून । समर्थपणें माझिया ॥ १९ ॥ जेथ माझे गमन । तें जान पुण्यस्थान । गंगा यमुना तीर्थाधिष्ठान । तेंचि जाण निश्चित ॥ २० ॥ भगवंतासी विमुख होऊन । व्यर्थ शुच्याशुचि वस्तु विवेचन । वैदिक मतें अशुद्धि जाण । मत्स्पर्शानें पावित्र्य ये ॥ २१ ॥ मृत्तिका पात्रीं नैवेद्य । बने, कैसे हो अशुद्ध । तेथे विष्णू नैवेद्य संबंध । पावन करी वस्तु स्थलां ॥ २२ ॥ बालभाव मधुर वचन । ऐकता माता आश्चर्य पूर्ण । तथापि तेथून

हटवून । पाचारी स्नाना सत्वरी ॥ २३ ॥ पित्यासि कळतां रागावेल । म्हणोनि माता उतावीळ । निमाई बोले तेयें वेळीं । शिक्षणा प्रतिबंध कासया ? ॥ २४ ॥ अध्ययनासी अनुज्ञेवाचून । कदा न सोडी हें स्थान । ऐसे ऐकिता शेजारी जन । माते लागून समजाविती ॥ २५ ॥ पहा सर्व साधारण मुला । शिक्षणीं असे कंटाळा । नाना परी बालकाला । समजाविता नायके ॥ २६ ॥ येथीच्या उफराटच्या प्रकारा । बाल वदे माता पितरां । मज अध्ययना दुजोरा । द्यावा विनवी आश्चर्य हें ॥ २७ ॥ वाटें, शत्रुचें कुबुद्धि कर्म । माता पितरां मतिभ्रम । बाळासि विद्या परिश्रम । करण्या विरोध अपुर्व हें ॥२८॥ माता पितयां भूल पडली । वाटे भूतबाधा जाहली । विरोधिती शिक्षणकालीं । धन्य जाहली जन वदे ॥ २९ ॥ हट्टें नेला बालक । करविलें स्नानादिक । कळलें पितयां वृत्त बोधक । अनुज्ञा बाल पावला ॥ ३० ॥ शुभ समयीं उपनयन संस्कार, । उपवीत धारण । बाळ करी भिक्षाग्रहण । वामन रूपे बटू स्वयें ॥ ३१ ॥ द्वीपीं गंगादास पंडीत । त्यांचीं पाठशाला संस्कृत । निमाई बनें विचक्षण छात्र । आनंदित, मेधाबघूनिया ॥ ३२ ॥ गंगादास शिष्य प्रसिद्ध मुरारिगुप्त कमलाकांत । कृष्णानंद प्रभृतिवृध्द । कुट प्रश्नें होती निरुत्तर ॥३३॥ ऐसा निमाईचा स्वभाव अध्ययनी बुद्धि अपुर्व । वाद विवादीं उतर पूर्व । पक्ष, करितां नवल हो ॥ ३४ ॥ विनंती करीं एक दिन । मातेसी बोले शचिनंदन । देई मजसी एक दान । हरिदिनीं भोजन न करावें ॥ ३५ ॥ मातेने शद्ब मानिला । आनंद होई निमाईला । तैं पासूनि एकादशी व्रताला । करू लागली शची देवी ॥ ३६ ॥ निमाईची दिनचर्या दारुण । गंगास्नान विष्णू पूजन । करी तुलसीसि जल दान । प्रसाद ग्रहण करीतसें ॥ ३७ ॥ गृह वा निर्जन स्थान । एकांतीं करी अध्ययन । सूत्रादिकांचें टिप्पण । विद्यार्जनीं तन्मय होतसे ॥ ३८ ॥ सुखार्थी न करी विद्यार्जन । विद्यार्थी ना पेक्षीं सुखासन । करावें लागे नियमन । चैन आवड निवडीचें ॥ ३९ ॥ वर्तमान विद्यार्थी गण । स्वेच्छावास, शृंगार दर्शन नाना खाद्य पेयें चैन । पश्चात् चिंतन विद्येचें ॥ ४० ॥ ना वाचन, ना चिंतन । कैचे तेथ ग्रंथ मनन । परीक्षा मिषें जागरण । अध्ययन मौजेचें ॥ ४१ ॥ निमाईचे गाढ अध्ययन । पाहूनि झाले मिश्र प्रसन्न । कल्याणार्थ, करूणावचन । सुतार्थ ईशान प्रार्थिती ॥ ४२ ॥ त्यांसी नसे जाणपण । निमाई स्वयें कृष्ण भगवान । गृहीं असे अवतीर्ण । अज्ञ जीवा उद्धराया ॥ ४३ ॥ एकदां मिश्रासी पडे स्वप्न । निमाईनें केलें संन्यास ग्रहण । भगवे वस्त्र धारण । करी संकीर्तन

नृत्यही ॥ ४४ ॥ चढे विष्णु सिंहासनीं । ठेवीं भक्त, मस्तक चरणीं । ब्रह्मा, शिवादि, देवता गणीं । स्तविला, गानीं नामें त्यां ॥ ४५ ॥ ठायी ठायीं संकीर्तन । नृत्यादिकीं हरिस्तवन । सन्निध येतीं भक्तगण । नीलाचलीं गमन कराया ॥ ४६ ॥ ऐसें स्वप्न पाहून । मिश्र होय चिंतामग्न । निमाई गृह त्यागून । जाय, कल्पना दृढ हो । ४७ ॥ पत्नी शची करी सांत्वन । कासया व्यर्थ चिंतन । निमाईचें ऐसें अध्ययन । गार्हस्थ चालवी निश्चित ॥ ४८ ॥ निमाई बुद्धि चतुर पिता आनंदे निर्भर । मनीं कामना करी अपार विविध प्रकार चिंतनीं ॥ ४९ ॥ व्हावा विवाह संस्कार । वधुसवें पहावा पुत्र । तेणें तृप्त होती नेत्र । ऐसा विचार मनीं ये ॥ ५० ॥ तो समय यावा सत्वर । होती पति पत्नी अधीर विधि घटना विचित्र । न कळे पार ब्रह्मादिकां ॥ ५१ ॥ द्वादश वर्षें वय पूर्ण अध्ययनीं रत अनुदिन । माता पितया नमन । घे आशीर्वचन निमाई ॥ ५२ । पुढें पातला दुर्दिन । मिश्र ज्वरें पीडिले दारूण । दुःखें वरिलें अंथरूण । दुःश्चित मन जाहलें ॥ ५३ । निमाई पुसे मातेसी काय झालें पितयासी । ज्वरें व्यापिले तयासी । मानसीं चिंता वाटे कीं ॥५४॥ पितया सन्निध जाऊन । कोमल कर भाळीं, वचन । बोले, पिता संतोषोन । जलपान अपेक्षी ॥ ५५ ॥ सत्वर जल पाजिलें । स्वयं वस्त्रें मुख पुशिलें । निमाई मन उदासलें । न सुचे अन्य तयासी ॥ ५६ ॥ ज्वराचा बहर न ओसरे । मिश्र वदले क्षीण स्वरें । मम जीव नाशा अंतरे । ईश्वरेच्छा बलीयसी ॥ ५७ ॥ मातें न्यावें गंगातीरीं । निमाई तें अवसरीं । पितयासी नेई सत्वरीं । जटा शंकरीं दर्शन हो ॥ ५८ ॥ निमाई करित रुदन । बाबा ! कवणा सोंपवून जातां, कैंचें अवस्थान । मज सांगा ना सत्वरीं ॥ ५९ ॥ क्षीणस्वरें वदे मिश्र तुझा रक्षक विश्वंभर । म्हणोनि झाकिले नेत्र । चित्तीं ईश्वर ध्यायिला ॥ ६० ॥ एसा समय कठिण । मिश्र पावले अंतर्धान । मातेंचें दुःख दारूण । सांत्वन करी निमाई ॥ ६१ ॥ गंगेत नश्वर शरीर । त्यागुनि जाती पंडित मिश्र । शचि देवी आक्रोश करी । दुःखभार सकला जाहला ॥ ६२ ॥ पित्याचा अंत्यसंस्कार । केला वैदिक कर्मानुसार । दानें तोषविले द्विजवर । पितरा सद्गति लाभाया ॥ ६३ ॥ मातेंचें दुःख दारूण । निमाई करी सांत्वन । माते संसार दुःखपूर्ण । सुख कल्पना अन्यथा ॥ ६४ ॥ मी तुझी सेवा करीन । गृहाश्रम स्वीकारीन । गार्हस्थकर्म । आचरीन । तोषवीन । तुजलागीं ॥ ६५ ॥ ब्रह्मा, महेशासि दुर्लभ । ऐसा घडबिन वस्तु लाभ । मनीं न आणी तूं क्षोभ । प्रभु प्रसन्न सत्य हो ॥ ६६ ॥ मातापित्याचे

ऋण । न फिटे, शास्त्रप्रमाण । मुक्त व्हावया, चरण । न सोडीं, जाण तुझें मी ।। ६७ ।। माते ! नश्वर शरीर । केंव्हां तरी जाणार । घटना घडवीं विश्वंभर । दुखभार कासया मस्तकीं ।। ६८ ।। प्रवाहीं जमलीं काष्ठ । तरी एकत्र येतीं वहात । त्यापरीं मनुष्य मात्र । संसारीं मायेंत सापडे ।। ६९ ।। प्रवाह ओघ जै बदले । काष्ठें होती वेगळाले । कोणीं राही, कोणी पळे । आयुष्य सरलें म्हणोनि ।। ७० ।। म्हणोनि शोक न करावा । ईश्वर हृदयीं धरावा । तेणें शांती मिळे जीवा । मानवा संत उपदेश ।। ७१ ।। ऐसें मातें समजाविलें । दुःख अल्प हलकें झाले । बाळ लीला करू लागलें । मर्कट चाळे तेधवां ।। ७२ ।। निमाई स्वयें असता ईश । बालभाव उपजे विशेष । तेणें पीडा बहूवस । मातेसी होई अहर्निश । ७३ ।। एकदां गंगास्नान समयीं । पूजा सामग्रीं मागें निमाई । थांब न करी घाई । वदली माता बालकां ।। ७४ ।। क्रोधें मोड तोड करी । घरभरी वस्तु पसरी । मातींत लोळे सत्वरीं । करी त्रागा गौर हरी ।। ७५ ।। सामग्री घेऊनि सत्वरी । निमाई गेला गंगेवर । परतोनियां माघारी । भोजन करी नित्याचें ।७६। माता उपदेशी बालकां । तू पितृ विहींन देख । वस्तु नाशनी हरिख । तोख कासया तुज लागीं ।। ७७ ।। त्यावरी आपूले जीवन । नष्ट कराया काय कारण । विश्वंभर करी पोषण । व्यर्थ चिंतन कासया ।। ७८ ।। ऐसें वदूनि परतला बाल अध्ययनार्थ गेला । सुवर्ण आणी दोन तोळे । दिधलें मातें निर्वाहा ।। ७९ ।। श्रींकृष्ण करी पोषण । त्याचे हें प्रत्यंतर जाण । मातें दिधलें सुवर्ण । तुजकारण द्यावया ।। ८० ।। मातेसी वाटें आश्चर्य । यांत असें भलें बुरें । पुत्र सामर्थ्य कळतां थोर । अंतरीं निश्चित जाहलीं । ८१ ।। ब्रह्मचारी करी अध्ययन, । ऊर्ध्व तिलक भाळीं धारण । गुरु संन्निध जावोन । शास्त्रालोउन करी सदा ।। ८२ ।। स्वतंत्र चालवी मति । सूत्र व्याख्या नव्य रींतीं । देखोनि प्रत्युत्पन्नमति । संतुष्ट होती गुरूजन ।। ८३ ।। आसन, भोजनी एक वृत्ति । शास्त्र चर्चा राही चित्तीं । न, हो वाद विवादीं तृप्ति । तेजस्वी ख्याती जाहली ।। ८४ ।। गुरूसी वाटें धन्यता । अपूर्व शिष्य लाभ हातां । यें. अनुकरणीं तत्परता । दावी छात्रगण आगळा ।। ८५ ।। आत्मप्रौढ असती शिष्य । निमाई दावी तयांचें दोष । तदा पश्चातापें विशेष । निमाईस मानिती नम्रत्वें ।। ८६ ।। सकलास वादे हारविती । विरोधका उपरोधिती । सभेंत त्यांची होय

होती सभाजन ॥ ८८ ॥ द्वीपीं धनी मुकुंद संजय । त्यांच्या चंड मंडपीं स्वाध्याय । प्रारंभ करी निमाई । झाला विशाल रूपा ये ॥ ८९ ॥ पाठशाळेचें प्रयोजन । शास्त्र विषयक खंडन मंडन । अन्यांचें शास्त्रीय ज्ञान । दृढतर होई चर्चेत ॥ ९० ॥ पुरां हस्त लिखिता वरून । होई ग्रंथाध्ययन । शास्त्रें कंठस्थ करून संपादन होई विद्येचें ॥ ९१ ॥ द्वीपीं न्यायशास्त्र प्राधान्य । पूरक शास्त्र व्याकरण ; त्याविण पडे न्यून । ऐसे शास्त्रज्ञ मानिती ॥ ९२ ॥ वैय्याकरणीं निमाई पंडित । करी, पंची टीकाग्रंथ । ग्रंथ टिपणी तरळ प्रख्यात । अत्यंत मान्यता पावली ॥ ९३ ॥ टिपणीचा जाहला आधार । छात्रांची त्यावरी मदार । अध्ययनीं सुलभ बोधपर । स्तुतिपात्र होई पंडिता ॥ ९४ ॥ नवद्वीपीं पंडित श्रेष्ठ । वासुदेव सार्वभौम वरिष्ठ । त्यांची पाठशाला प्रतिशिष्ठ । पांडित्यें प्रतिभट नुरेचि ॥ ९५ ॥ त्या पाठशालीय पंडितां । अपूर्व लाभे सर्वज्ञता । सर्वत्र पावती मान्यता । ऐसीं महता तियेची ॥ ९६ ॥ नव्यन्याय टिका जागदीशी । तिचा प्रणेता जगदीश । गुरु भवानंद ईश । अध्ययनास होते यास्थानी ॥ ९७ ॥ जगप्रसिद्ध नामे 'दीधीति' ग्रंथ रघुनाथ प्रणेते । समकालीन निमाई पंडित । शिष्यात श्रेष्ठता पावले ॥ ९८ ॥ याच पाठशाली अध्ययन । झाले, तर्कशक्ति विलक्षण । नैय्यायिक हा अभिमान दाटे, भारती अन्य ना ॥ ९९ ॥ निमाईशी गाढ मित्रता । झाली, कळली योग्यता । भावी नैय्यायिक लखतां प्रतिभट वाटे तयासी ॥ १०० ॥ एकदा थोर नवल वर्तलें । गुरुनें रघुनाथां पाचारिले । सोडवी न्याय पंक्ति कथिले । दीर्घकाली सुटला प्रश्न तया ॥ १०१ ॥ गुरुसि दावी हर्षाने । रघुनाथ परतें प्रसन्न मनें । गृहीं अग्नि सिद्ध करुन । भोजन केले स्वहस्ते ॥ १०२ ॥ तो निमाई पातले तेथ । समय कासया अतिरिक्त । न्याय पंक्ति गुरुक्त । न, सुटे काल जाहला ॥ १०३ ॥ सुटता, गेलो गुरु गृही । निवेदल लवलाही । येऊनि पाकसिद्धी पाही । करिता होई समय हा ॥ १०४ ॥ पंक्तीचा काय विशेष । मज कळावा निःशेष । पूर्ण करी माझे मानस निमाईस पंक्ति कथी तदा ॥ १०५ ॥ निमाई करी हास्य विकट । कासया इतुके पडलें कष्ट पंक्ति असे सुलभ स्पष्ट । यात बिकट कायसें ॥ १०६ ॥ सहज पंक्ति सोडविता । आश्चर्य करीं रघुनाथ । मनी जाहला लज्जित । येई ध्यानात निमाईच्या ॥ १०७ ॥ भोजन करावें बा स्वस्थ । फिरूनि बोलूं शांत चित्ते । वदोनि निमाई परते । रघुनाथ अस्वस्थ जाहला ॥ १०८ यासी लोटला अल्पकाळ । निमाईची न्याया कांक्षा प्रबल । शिकोनि केला ग्रंथ । अमोल । टिपणी लिहीली

त्यावरी ।। १०९ ।। रघूनाथाचा दीधितीं ग्रंथ । होई निश्चित जग प्रथित । ऐंसे भावितां मनांत । निमाई ग्रंथ कानी ये ।। ११० ।। नाथा वाटे पाहावा ग्रंथ । केंसा लिही निमाई पंडित । म्हणोनि भेटींसि त्वरित । पंडित सत्वर निघाला ।। १११ ।। उभयांचीं जाहली भेट । रघुनाथ बोलें अस्पष्ट । तुमचा ग्रंथ चोखट । अवलोकावा मज वाटें ।। ११२ ।। ऐकतां सोडीं हास्य फवारे । निमाई पंडीत बोलें बा ! रे । तूं प्रसिद्ध पंडित प्रवर । मनो विनोदे लिहीले म्यां ।। ११३ ।। तुला ठकविले असे कोणी । माझा ग्रंथ केवळ खेळणी । तुझीं वृत्ती गौरव पूर्ण । भाग्य लक्षण जिज्ञासा ।। ११४ ।। उदयीक दावीन ग्रंथ । गेंले पोथीसह शाळेत । परतलें, बैसले नौकेत । श्रवण करी बा ग्रंथ हा ।। ११५ ।। ऐककी निमाई ग्रंथ । पंडित नेत्री अश्रुपात । देखोनी, वदे गा, पंडित । दुःखींत कासया होतसा ।। ११६ ।। वदे निमाईस रघुनाथ । माझा ग्रंथ जग विख्यात । व्हावा ऐसी मनिषा सत्य भग्न चित्त जाहलो ।। ११७ ।। विद्वत्ता प्रचुर तुझा ग्रंथ । पाहूनि भंगले मनोरथ । या वेदने व्यथित । अश्रुपात येतीं नेत्रीत ।। ११८ ।। तुझ्या ग्रंथाचें वैशिष्ट । त्या परिस माझा कनिष्ट । करिता प्रसिद्धीचें धाष्टर्य । श्रेष्ठ न मानिती तयासीं ।। ११९ ।। पाहूनि स्नेंह मनस्ताप । न करीं बा ! अनुताप । उभतांची मैत्रीं अरूप । समर्पी तुजसाठी सर्वस्व ।। १२० ।। जयास्तव होती कष्ट । तो ग्रंथ करवि नष्ट । म्हणोनि सोडी गंगेत । धारिष्ट अपूर्व निमाईचे ।। १२१ ।। लोकेषणेंचा केला त्याग । मित्र तुष्टविला यथायोग । रुंधला कंठ. अश्रुवेग । नेत्रीं सवंग, पडेगळा ।। १२२ ।। रघुनाथाचे दिधलें आलिंगन । भाई ! निमाई, धन्य धन्य । अपूर्व त्यागे लोकोत्तर पण । मानी तृण लोकेषणा ।। १२३ ।। तूं थोर महापुरुष । मज प्रतिष्ठेची चाड विशेष । ग्रंथपासाव त्याग, निःशेष । आगळा; भविष्य जनांत हो ।। १२४ ।। तुझिया त्यागाची ख्याति । होईल सर्वत्र जगतीं तुच्छ माझी ग्रंथ निर्मिती ।। ऐसी महति तुझी असे ।। १२५ ।।पच्छाताप दग्ध पुर्ण । पंडीत गेले निज सदनीं । मित्रास्थव ग्रंथ । समर्पण । करुन गंगेत, अपुर्वता ।। १२६ ।।जनांत दाविले मित्रप्रेम । शाळेसि दिधला विराम विद्येचे कस्ट परम । त्यागूनि, शमवि चित्ताला ।। १२७ ।। मित्रप्रेम मिषे लिखाण । गंगोदरीं निमाले पुर्ण । जनांचे झाले वंचन मुकले ग्रंथा अलौकिक ।। १२८ ।। धन्य निमाई पंडित । अमोल तुझा न्याय ग्रंथ । मित्रप्रेम समर्पीत । गंगोदरांत ठेविले ।। १२९ ।। भगवत लोकेषणा । जवळी न राखिती एकक्षणा ऐसा उदारचरित्रांना । नमना करीं

निमाई जाहला विद्वान । व्हावें विवाह बंधन । ऐसें मातेचें चिंतन । आनुदिन होतसे ॥ १३१ ॥ गार्हस्थ्य धर्म अनुसरण । केले कैसें निमाईनें । त्याचें करा श्रवण । जन सप्तम अध्यायीं ॥ १३२ ॥ ऐसें चरित्र रसाळ । उदार, तैसें प्रेमळ । श्रवणें कामना सफळ । गर्वगळे सत्वरीं ॥ १३३ ॥ इति श्री चैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदिलिला प्रसंग सोज्वळ । उपनयन संस्कार मंगल । वैकूंठ गमन मिश्राचें ॥ १३४ ॥ विद्या ग्रहण पांडित्य कथन । मित्रप्रेमे ग्रंथ सर्मपण चरित्र कथिले संपूर्ण । षष्ठाध्यायी जाना हें ॥ १३५ ॥ इति श्रीं चैतन्य बिजय आदिलीला, प्रसंग, उपनयन जगन्नाथ मिश्र वैकुंठ गमन, विद्याग्रहण पाठशाळा स्थापन, मित्र प्रेमास्तव ग्रंथ गंगापर्ण, इत्यादि चरित्र, अध्याय सहावा समाप्त ओवी संख्या १३५ एकूण संख्या ५५०



## 卐 अध्याय ७ वा

श्रीगणेशायनम:। श्रीसरस्वत्यैनम:। श्रीगुरुभ्योनम:। जगच्चालका जगज्जिवना । तुजसी करि मी नमना ॥ परमात्मा जगदाभरणा दीनार्ती हरणाविश्वभंरा ॥ १ ॥ तूं जगसूत्र चालक । उत्पत्ति स्थिति संहारक । तुझे नि जीव असंख्य । प्रपंचासी विस्तरी ॥ २ । वेदीं तुवां सांगितलें धर्म । चार वर्ण चार आश्रम । गार्हस्थ्य श्रेष्ठ परम अनुपम सुख लाभे ॥३॥ धन्य गृहस्थाश्रम । आश्रयेत्रय आश्रम । त्यासी लाभें आराम । जाण अंतिम गार्हस्थ्यीं ।४। जाहला जरी संन्यासी ब्रम्हचारी वनवासी । जपी, योगी । तापसी ॥ क्षुधा शांति आवश्यक ।५। होई क्षुधा शमन । गार्हस्थ्यी मिले भोजन । अंध । पंगु । दुःखी दीन । जगती तेणें धन्य हा ॥६॥ भूतदया । परोपकार । कुलधर्म । कुलाचार होय प्रपंच विस्तर । सत्वर **धर्म** फल मिले ।७। प्रपंचीं सकल साधनें । अन्न, वस्त्र, आछादनें गृहिणी विना होय उणें । भासे तेणें संसारीं ॥ ८ ॥ कीर्तनीं जैशी आर्या उपोषणीं **युक्त वर्या** प्रपंची तैशी भार्या । जान आर्य असावी ॥ ९ ॥ भार्या दक्ष, सद्गुणी

पुत्र हेची प्रपंचाचें सुत्र । नित्य भगवन्नाम पवित्र । इहामूत्र लाभ शांतीचा ॥ १० ॥ संसारी आनंद सदन । सुत असती बुध्दिमान । कांता न करी कटुभाषण । कार्यी मंत्री पण स्विकारी ॥ ११ ॥ सच्चरित मित्र, धनवान स्वस्त्रीठायी प्रेम पुर्ण । सेवक आज्ञा परायन । तेणें धन्य आश्रम हो ॥ १२ ॥ गृहीं अतिथि संतपर्ण नित्य, शिव, विष्णू पुजन । वैश्वदेव, नैवेद्यप्रतिदिन मृष्टान्न भक्षन नित्यांचें ॥ १३ । तैसें ईशाराधन । सत्संग लाभ अनुदिन ॥ सग्रंथ, कथा किर्तन आवडे धन्य आश्रम तो ॥१४॥ ऐंशा आश्रमीं प्रवेशुन । केले आदर्श जिवन करावी कथा श्रवण । श्रोतेजन निर्धारे ॥ १५ ॥ मिश्र परलोकी गमन मागिल अध्यायीं कथन । केले व्हावे सावधान । मंगल निधान विवाही ॥ १६ ॥ व्दीपी वल्लभाचार्य वैष्णव लक्ष्मीचें स्वरुप वैभव । त्याची कन्यारत्न अपुर्व । धाव अनूरूप वराची ॥ १७ ॥ उदेला भाग्य दिवस । लक्ष्मी जाई गंगा स्नानास । तेथ देखिलें निमाईस । मने वरि ती उभय तें ॥१८॥ आचार्य वनमाली मध्यस्त । मातेसी कथिलें समस्त । आचार्य कन्यावृत्त गमती योग्य वरवधू ॥१९॥ शचिदेवि बोले नावेक । पितृ विहीन बालक । ज्ञान व्हावे आवश्यक । वैवाहिक विचार नरुचे ॥२०॥ निराश होई वनमाली । विवाह आशा मावळलीं । निमाई भेटी ते वेळी । झाली, केली मात तया ॥२१॥ हास्यमूखे बोले मातेला । वनमाली का परतविला । संमत मी विवाहाला लावण्य बाला लक्ष्मी असे २२॥ मातें आचार्य पाचारिलें । मनोदयासीं यश आले वल्लभाचार्य प्रसन्नले । लाभलें जामात निमाई ॥२३॥ घरी अठरा विश्वें दारिद्रय । चिंतायुक्त हे ती आचार्य । कैसा पुजावा श्रेष्ठवर । पाचारी तदा वनमाली ॥२४ ॥ वदे देई पंच हरितकी शक्ति माझी थोडकी । कन्यादान करी निकें । वरदक्षिणें की असमर्थ ॥२५॥ बंगाली हरितकी महत्ता । असे, न गणावी लघुता कटुरसाची श्रेष्ठता । भोजनी मान्यता पावली ॥ २६ ॥ विवाह समय निश्चित जाहला । गोरज महूर्त योजीला श्वशुर गृहा जामात आला । पाणिग्रहण झालें लक्ष्मीचे ॥ २७ ॥ लग्नी कैंचा थाट वैभव दारिद्र ग्रासिलें सर्व । एकाह पक्षीं अपूर्व । विधिवत संस्कार जाहला ॥ २८ ॥ पुत्र विवाह जाहला माता, आप्त, आनंदला सुनमूख पाहो निघाला परिवार सकल ॥ २९ ॥ भाग्ये स्नुषा गृहा आली । पायगुणाची म्हणती भली विविध दर्शने दिसु लागली । मातेलागीं ॥ ३० ॥ कै अद्भूत ज्योति दिसे । सुत कुक्षींज्वाला भासे । गृहीं सुगंध दरवळलासे । वसे लक्ष्मी नारायण ॥ ३१ ॥ द्वीपीं अवतरे भगवान । श्री लक्ष्मीं नारायण । [illegible]

निमाई लक्ष्मी जाण । अवतार पूर्ण जाहला ! ३२ ।। सर्वत्र होई मंगल । विधिविधान सकल । पाहतां वधुवर युगल भासले रति काम की ।। ३३ ।। गोरज मुहूर्तीं विवाह झाला । अपूर्व मंगल ठरला । श्रवणी ठेवी कथेला । मांगल्य गृहीं वसे सदा ।। ३४ ।। विवाह उमाशंकर । कीं रुक्मिणी स्वयंवर । तैसा सीता स्वयंवर । जाणा लक्ष्मी गौरहरि ।। ३५ ।। हे विवाह करी श्रवण । स्वये करित तैसे पठण । मंगल अनुष्ठान । नित्य नूतन गृहीं हो ।। ३६ ।। अध्ययनी अतीव गोडी । भ्रमण करी चौंघडी । सवें शिष्यगणांची जोडी । धुंदी चढे विद्येची ।। ३७ ।। श्रीकृष्णापरी सकलां । निमाई दिसे जनतेला । नानारूपधारी झाला । लीला करी सर्वत्र ।। ३८ ।। आपुल्या दृष्टीप्रमाणें । निमाईवरी आरोपण । पाखंडियां यम दारूण । स्त्रीयांस मदन भासला ।। ३९ ।। पडितां बृहस्पति । वैष्णवा विष्णूभक्त । ऐसें निमाई पडित । भासती सकलां ।। ४० ।। गंगावास, अध्ययन । यास्तव येंती वैष्णव जन । नवद्वीपाचें महिमान । श्रवणी किर्ती नित्यये ।। ४१ ।। मुकुंद दत्त सभेंत । हरिकीर्तन चालें नित्य । निमाई होतां भाव युक्त । दत्त कीर्तनी सप्रेमें ।। ४२ ।। न्यायशास्त्रीं गाढ पांडित्य । निमाई पंडित मानिती दत्त । पुर्वोत्तर पक्ष सिद्धांत । द्वंद्वांत परिणती सप्रेमें ।। ४३ ।। श्रीवासादि पंडिता । वादांगें त्यासी हारवीत । पाहूनि कौशल्य अद्भूत । भीती वाटे सकलासी ।।४४।। म्हणोनि टाळिता वादांग दत्त त्यजि निमाई संग । परी मार्गीं पडला प्रसंग । भेटीचा योग उभयांचा ।। ४५ ।। चुकवी मुकुंद निमाईस । त्यांच्या तें पडे दृष्टीस । मुकुंद मित्र गोविंदास । प्रेम वशें कथिती पंडित ।। ४६ ।। मुकुंदास वाटे मीं बहिर्मुख । विवादीं घेतो बुद्धिसुख । वैष्णव शास्त्र भाव बिमुख । वाटे, ऐक वचन ।। ४७ ।। मी वैष्णवामाजीं अग्रगण्य । झालों दिसेन एकदिन । ब्रह्मा शिवादि वैष्णवगण । आंगणीं माझ्या तिष्ठति ।। ४८ ।। करिती गान कोटी गुणें ! मज पाहती विकृतीने । सन्निध येंतो ते प्रेमाने । चरणी रत अखंड ।।४९ ।। भक्तिरस आद्य सूत्रधार । भक्तिरस कल्पतरु अंकुर । वैष्णव संन्यासी श्री माधवेंद्रपुरी । गोस्वामी पूर्व गुरू सांप्रदायिक ।। ५० ।। त्यांची शिष्य परंपरा । अद्वैत प्रभू, ईश्वरपुरी । पुंडलिक, ब्रह्मानंदपुरी । श्रीरंगपुरी विद्यानिधि ।। ५१ ।। कृष्णानंद सुखानंदपुरीं रघुपति, केशवपुरी । नित्यानंद प्रभु परमानंदपुरी । अद्वैत प्रभु शिष्य हें ।। ५२ ।। गुरूसह तीर्थ भ्रमण । अष्ट वर्षे केलें नित्यानंदाने । द्वादशवर्ष वय सान । दर्शने घेतली तीर्थाचीं ।। ५३ ।। गुरू माधवेंद्रपुरी । त्यांचे शिष्य ईश्वरपुरी ।

द्वीपीं छत्रवेशधारी । अद्वैत सभेत पातलें ।। ५४ ।। प्रख्यात निमाई पंडित । अध्ययनाध्यापन करीत होतें नवद्वीपांत येती इश्वरपुरीं तें समयीं ।।५५।। ईश्वरपुरीचा वृत्तांत । अल्पसा कथितो येथ । ग्रामकुमार हट्ट । कायस्थ कुलीं जन्मलें ।। ५६ ।। वैष्णवासी जातीं बंधन । करितां संन्यास ग्रहण । नसे अणुमात्र जाण । कारण हरिजन म्हणोनि ।५७। गौडीय संप्रदाय प्रमुख । माधवेंद्रपुरी देख । त्यांचें अंतरंग शिष्य । ईश्वरपुरी मुख्य जाहले ।। ५८ ।। विश्वरूपें त्यागिता शरीर स्व तेज दिधलें ईश्वरपुरी । गुरू आश्रमी तो प्रकार । जाण अपुर्व जाहला ।।५९।। गुरू त्यागि नश्वर शरीर । तें समयीं आश्रमीं ईश्वरपुरी । तयासि दिधलें प्रेम सार । लाभ अपूर्व जाहला ।। ६० ।। संन्यासी ईश्वरपुरी । भ्रमण करिती तीर्थक्षेत्रीं । भावें उन्मत्त शरीरीं । उच्चारी वैखरी कृष्णजय ।। ६१ ।। भ्रमता तें अवसरी । आले अद्वैताचार्य घरीं । गुरूबंधु जाणूनि सत्कारीं । पूजा करीत सप्रेमें ।। ६२ ।। वास्तव्य केलें किंचित् काल । सत्संग, कृष्ण कथा प्रेमळ । ध्यानीं श्रीकृष्ण घननीळ । आस केवळ भक्तीची ।। ६३ ।। त्यांचे देखोनि अपूर्व तेज । वैष्णव संन्यासी ऐसा समज । करूनि कीर्तन करिती सहज । मुकुंद, गोपाळकृष्णाचें ।।६४।। अंगी कृष्णप्रेमा दाटला । अष्टसात्त्विक भाव उमटला । अंग, प्रत्यंग डोलू लागलें । ओळखी जाहली सकलांची ।। ६५ ।। द्वीपी निमाई पंडित । तर्कवितर्कवादी ख्यात । जाणूनि उपेक्षिती तयाप्रत । भेंटी प्रसंग टाळितीं ।। ६६ ।। मार्गी एकदा अकस्मात । भेटती श्रीपाद, निमाई पंडित त्वरें प्रणाम करीत । श्रेष्ठ संन्यासी म्हणोनिया ।।६७।। पृच्छाकरिती पंडित । पाहोनी श्रीपाद तनुकांत । शास्त्रज्ञाने मंडित । पंडित भिक्षार्थ पाचारी ।।६८।। नैवेद्य जाहलीया वर । पंडितें भीक्षा केली सत्वर । करोनिया अत्यंत आदर । मधुर भोजने तृप्त करी ।।६९।। श्रींकृष्ण प्रेंम विव्हल । पाहोनि श्रीपाद निर्मळ । नित्य दर्शनार्थ सांजवेळ । भावबळे जाती पंडित ।।७०। गोपिनाथ आचार्य सदनी । वास्तव्य केले ईश्वर पुरीनी । काल घालविती ग्रंथ लेखनीं । भक्तगण येती दर्शना ।७१। श्रीकृष्ण लीलामृत ग्रंथ रसाळ । श्रींपादे केला भक्ति प्रेमळ । परिक्षार्थ निमाईस सकल । दाविला उत्तर बोलिले ।।७२।। भक्तीनें ग्रंथ लिहिला । दोष कैचा तेथ पावला दोषैक दृष्टि ठेंवी त्याला । दोष आंगा चढे कीं ।।७३।। मूढ अपराधी तो असे । ज्यासीं सत्ग्रंथीं दोष दिसे । शुध्द भक्ति कवित्व खासे । संतुष्ट होतसे श्रीकृष्ण ।।७४।। हरीस जयांत संतोष तें संपूर्ण होय निर्दोष । व्याकरण जनक दोष । न देखे भक्त वत्सल ।।७५।। ऐसे कोण करी [illegible]

कथेचे वर्णी दोष । परी कथिती पंडितास । समालोचन अल्पसे करावे ।।७६।। एकश्लोकाचा केला विचार । धातु विषयक दाविला प्रकार । अधिक न करी विस्तार ईश्वर पुरीस गौरविलें । ७७।। तेथुनि पुरी तीर्थाटनास । तेणें जाणिले प्रभुस । पुढती महति वाढे विशेष । भाव असा धरुनिया ।।७८।। महा प्रभूची प्रभुता प्रभूत । त्याचे कोण करी गणित । साक्षात रुपे भगवंत । अवतरत्ती येथ भक्तास्तव ।।७९।। इति श्रीचैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदिलीला प्रसंग सोज्वळ निमाई विवाह मंगल । सप्तमाध्यायी वर्णिला ।.८०।। इति श्रीचैतन्य वि. ग्रथ, आदिलीला प्रसंग विवाह, भविष्यवाणी ईश्वरपुरी मिलन , ग्रंथपरीक्षण इ, सातवा अध्याय समाप्त ।। ओ. सं. ८० एकूण संख्या ६३०



## 卐 अध्याय ८ वा 卐

।। श्री गणेशाय नमः ।। श्रीसरस्वत्यै नमः । श्री गुरुभ्योनमः । नमन माझें आदिरूप । जे कां ओंकार स्वरूप । तैसे जें कीं ज्ञानरूप । परब्रह्म स्वरूप जें ।। १ ।। जें ज्ञानाचें आयतन । जेणें झडें अज्ञान । घालवी अंधकार पूर्ण ।। १ ।। स्वसंवेद्य ।। २ ।। जी जी कला ज्ञानेंविण । ती अवकळापूर्ण म्हणोनि ज्ञान प्रधान । तेणेंविणे तगणे नसे ।।३।। ज्ञानेविण अन्य कांही । जगीं पवित्र नाही । ऐसें श्रुति वदे पाहीं । श्रेष्ठत्व राही ज्ञानाचें ।। ४ ।। ज्ञानें श्रेष्ट अध्यात्मज्ञान । त्याहीवरी आत्मज्ञान । जेणें होय ओळखण । आत्मस्वरूपाची ।। ५ ।। आत्म्याची होता ओळखण । तोचि ईशस्वरूप जाण । ऐसे आत्म्याचें आत्मपण । जीवपण दशा निवारी ।।६।। आत्मस्वरुपाची ओळखण । खुंटवी जीवाचे जन्म मरण । ऐसे हे संतवचन । अन्यथा न हो कदाही ।। ७ ।। यास्तव करणें चित्त शुद्ध । तेंचि होय बुद्धि प्रबोध । तेणे लाभे परमानंद । गोविंद प्रेम उचंबळे ।। ८ ।। पांडित्यें जग जिंकिले । किर्ति लाभे अमर झाले । भगवंतासि शरण गेले । तेचि ठेले भगवद्रूप ।।९।। तोची कथा भाग समस्त । निमाई चरित्र मिषें कथित । व्हावया चित्त शुद्ध । अवधान युक्त

परियेसा ।। १० ।। अष्टाध्यायी निरुपण । पांडित्य चमत्कृति पूर्ण । निमाईचे म्हणवून । वर्णन पुढती करी हे ।।११ ।। छात्रासह ग्राम भ्रमण । होय शास्त्र चर्चिच्चरण । भेटे त्यासी चर्चाजाण । करी लीला लीला पंडित ।। १२ ।। मार्गी भेटे मुकुंद पंडित । निमाई पुसें मनोगत । संग त्याग माझा उचित । कासया, त्वरित वदे मज ।। १३ ।। मजविषीं विकल्प । कां केला मनी संकल्प । विकल्प कारण अत्यल्प । कथनी होय मुक्तता ।। १४ ।। रोधिला मुकुंद मार्गात । निमाई वरी करावया मात । अलंकार शास्त्रीयकुट प्रश्नांत । अडवू पाहती तयासीं ।। १५ ।। निमाई वैय्याकरणीं पंडित । कैचा अलंकारीं निष्णात । निरुत्तर करावा त्वरित । मनीं हेत धरियेला ।। १६ ।। मुकुंदाचा काव्य पसारा । तयांत अलंकार दोष भरपूर । दाऊनि केला गोरामोरा । अहंकार नाशिला तत्काल ।।१७।। निमाईचें अमानुष पांडित्य मुकुंद झाला थक्कित । मनीची फिटली भ्रांत । शास्त्रीं प्रभृता सिद्धता हो ।। १८ ।। भेटे गदाधर पंडित । न्यायशास्त्रीं निष्णात । पृच्छा केली त्वरित । कथी लक्षण मुक्तीचें ।।१९।। पूर्णरूपें दुःख नाश । मुक्तीचें लक्षण विशेष । या लक्षणांचें निःशेष । निमाई करी खंडन।।२०।। दोन प्रहरी गंगातीरीं । संगे घेई छात्रवर । शास्त्रचर्चा होई अपार । वैष्णव जन प्रसन्न हो ।। २१ ।। चित्तीं ऐसें भाविती । पंडिता ठायी कृष्ण भक्ति । होतां मनोरथ फळती । द्यावीं बुद्धि दयानिधें ।। २२ ।। कोणी करी प्रार्थना । मति द्यावी कृष्ण भजना । कोणी देतीं आशीर्वचन । प्रेमभावना मनीं हो । ।।२३।। अन्यधर्मीय घेतीं दर्शन । त्यांचे होई समाधान । ऐकतां पंडित वचन । आकृष्ट जन होतसे ।। २४ ।। छात्रासंगे गंगास्नान । परते जलक्रीडा करून । श्रीकृष्ण तुलसी पूजन । प्रदक्षिणा,वरी भोजनासी ।। २५ ।। कांहीं काल विश्राम अध्यापनीं नित्यनेंम । ग्रामस्थासी कोटिक्रम । संभाषणीं विनोद नित्याचा ।। २६ ।। ग्रामीं कोणी विणकर । त्यासीं विनामुल्य मागती वस्त्र । घेऊनि जात्ती सत्वर । ऐसें प्रकार कितीक ।। २७ ।। गवळी दुग्ध विक्रय करी । त्यासी गृहीं पाचारी । मामा नामें पुकारी । विनोद करी तयासी ।। २८ ।। विनामुल्य देई दुग्ध । अंतरी भाव शुद्ध । तयासी व्यक्तितत्व बोध । करूनि देती पूर्णत्वें ।। २९ ।। सुगंधी द्रव्य पुष्पमाला । घेऊनि भक्षिती तांबुला । मोलें विण होई सोहळा । करिती सकलां कृतार्थ ।। ३० ।। अनुपम निमाई रूप । पाहूनि मुग्ध अमुप । दिल्या वस्तुचा मनस्ताप । नोहें निष्पाप मानिती ।। ३१ ।। श्रीधर नामें ब्राह्मण । जनमतें दरिद्री पूर्ण । वस्त्रें लेई अतिजिर्ण । हींनपण दावी जनांत

॥ ३२ ॥ वास्तव्यास पर्णकुटी । प्रपंच करी भेटाकुटी । मृत्तिकेची वाटी थाटी । अर्धपोटीं राही भोजनीं ॥ ३३ ॥ केळ फुलादि भाजी विकून । करी नित्य गुजराण । देवासि नैवेद्य अपर्ण । करी भोजन श्रद्धेने ॥ ३४ ॥ निमाई पातले एकेदिनीं । श्रीधर ब्राह्मण सदनीं । लक्ष्मीकांत सेवीसी नेमानें । दारिद्रय कासया तुजसीं ये ॥ ३५ ॥ करिती अन्य देव पूजन । त्यांचें होई दैन्य हरण । द्विज बोले वचन । सावधान परियेसा ॥ ३६ ॥ राजा सन्निध । असती रत्न । करी नित्य पक्वान्न भोजन । तैसें उंची वस्त्र धारण । ऐसें प्राक्तन नृपाचें ॥ ३७ ॥ पक्षीगण वृक्षावरी कंद, फळे भक्षण करी । ईश प्रेरणा करी । भोगी कर्मफळ आपुले ॥ ३८ ॥ ऐकोनियां द्विजवचन । निमाई वदे, ब्राम्हण । तुझे गुप्तधन मी जाणे संपूर्ण प्रकटवी लोकांत ॥ ३९ ॥ गुप्त ठेवीसी कितीं दिवस । कैसा मनी वसे हव्यास । सारे आणीन चव्हाटयास । विनोदे हास्य करिती तै ॥ ४० ॥ श्रीधर भक्तीचे महिमान । विनोदे मिषे प्रकटोन । माघारी भाजी घेऊन । सदनीं सत्वर पातलें ॥ ४१ ॥ एकदा नभी पूर्णचंद्र । देखतां आठवे कृष्णचंद्र । की जो वृंदावन चंद्र । भावोद्दीपित जाहले । भावावरथी मुरली ध्वनी । करिती शचिनंदन । घडे मातेसी श्रवण । म्हणोन यई बाहेरी ॥ ४३ ॥ अन्यासीं न पडे श्रवणी । सुत विष्णुमंदिरी आसनी । माता देखे सन्निध । जावोनी ध्वनीं तत्काल बंद हो ॥ ४४ ॥ माता देखे पुत्रास । वक्षस्थलीं चंद्र मंडलास । करी मुरली, कृष्ण खास । दिसे अपूर्व शोभा तै ॥ ४५ ॥ श्री शारदावर प्राप्त । होता विजयी पंडित । पांडित्यें देश जिकीत । वादार्थ द्वीपी पातला ॥ ४६ ॥ द्वीप पांडित्याचें आगर विद्येचें असे माहेर । विद्येस्तव येती छात्र । पंडित शास्त्र वेत्ते हीं ॥ ४७ ॥ निमाई पंडित प्रसिध्द । त्यासीं करावया वाद । हत्ती, घोडे, शिष्यसभेत । द्वीपीं येत गर्वसीं ॥ ४८ ॥ करावया गर्व हरण । वाद युध्दीं पाचारण । बैसे पाचावरी धारण । गाळण उडे सकलांची ॥ ४९ ॥ पंडित करिती विचार । वादे करी परिहार । ऐसा निमाई पंडितवर । कथीलें सत्वर वृत्तदा ॥५० ॥ निमाई वदे स्पष्टोत्तर । दर्पहारी जिरवी । अहंकार । दर्पाचा करी चक्काचुर दंभ पार घालवी । ५१ ॥ फलभारें वृक्ष बहरला । नम्रत्व ये सदा त्याला ॥ विनय भूषण ज्ञान्याला ॥ मान्यतेला पाववी ॥ ५२ ॥ हैहय, नहूष, वेन, बाण । नरकासुर तैसा रावण । अहंकारें प्रमत्त पूर्ण देवे चूर्ण केलें गर्वीतें ॥५३॥ अहंकारी दिग्वजयी । पंडीत होऊ पाहे विजयी ॥ ईश सत्ताधीश न्यायी । पांडित्यीं करी

परिहार ॥५४॥ दैव योगें तिथी पौर्णिमा ॥ नभी शोभें पूर्ण चंद्रमा । गौरचंद्र भू चंद्रमा । शिष्य समागमे गंगेंसी यें ॥५५॥ असत्ती पंडींत दिग्विजयी । सन्निध आले निमाई । अदभुत तेज, कांति देही । पाहूनि थक्कित जाहले ॥५६॥ भेटी कुशल समाचार प्रश्न करित्ती परस्पर । निमाई प्रार्थी सादर । काव्य शास्त्री प्रभु तुम्ही ॥५७॥ गंगा पाप नाशिनी । महत्व करा वर्णन । त्याचें घडता श्रवण । पाप दैन्य दूर सरें ॥५८॥ ऐकत निमाई वचन । सतत वर्षे काव्यपर्जन्य । गंभीर खरे गंगास्तवन । रचोनि त्वरें उच्चारी ॥५९॥ श्रोतें आश्चर्य चकित । धन्य गमे काव्य शक्ति । अनर्गल उच्चारण रीत । शीघ्र कवित्व संपवी ॥६०॥ श्लोक प्रवाह चालिला । त्यातून एक निवडिला । पाहूनि स्मरण शत्कीला । पंडित केले आश्चर्य ॥६१॥ इतुक्या श्लोकातून श्लोक । स्मरणात कैसा नेमक । निमाई उत्तर चोख । निःशंक देई पंडिता ॥६२॥ तुम्हा लाभे शारदावर । तुम्ही श्रेष्ठ कविवर । तैसा मीही श्रुतिधर । ययात आश्चर्य कायसे ॥६३॥ 'महत्त्व गंगाया' श्लोक । करा गुण दोष विवेक । निर्दोष समजे, गुणनिके । वर्णी काव्य आपूलें ॥६४॥ निमाई वदे विनयोत्तर । असंतुष्ट न व्हाल जर । अल्प घेतो समाचार । काव्य प्रकार बहु असे ॥६५॥ पंच दोष पंचालंकार असती या श्लोकांतरी । पाही तयाचा विचार । दोषप्रकार कथीं तुज ॥६६॥ विधेया विमर्श, द्वय दोष । विरुद्ध मति, भग्नक्रम विशेष । समाप्त पुनरात्तता दोष । ऐसें पंच असती हें ॥६७॥ शब्दालंकार, अनुप्रास । पुनरुक्त वदाभास । उपमा, अनुमान, विरोधाभास । असती पंचअलकार ॥६८॥ केला विशेष विस्तार । शब्दन् शब्द समाचार रोकडे केलें स्पष्टोत्तर । निरूत्तर पंडित जाहलें ॥६९॥ विविधतेच्या अलंकारें । मंडित केले कलेवर । अल्प श्वेत कुष्टें शरीर । दोषें अनादर, होतसे ॥ काव्यीं अलंकार सुन्दर । काव्य दिसें भरदार । दोषाची त्यात पडे भर । ठरें अपात्र काव्य तें ॥७१॥ यापरी केलें निरूत्तर । म्लान हो प्रतिभा सत्वर । उतरे पंडित चेहरा । करी हास्य छात्रगण त्यांसी प्रतिबंध केला । तया पंडितां गौरविला । होता लज्जित जाहला । करविला निशीं विश्राम ॥७३॥ उदयीं करू विचार । न वाटे जरी दुःखकर । पंडित जाहला चिंतातूर । नाना तर्क चालवी ॥७४॥ जिंकिले प्रकांड पंडित । दुर्दैवें याने केली मात । अन्य पंडिता पुसे संकेत । रहस्य यांत काय असे ॥७५॥ दुर्दैवें झाला अपराध । शारदा देवीं झाली क्रुद्ध म्हणोनी वाग्देवी मंत्रसिद्ध । झाले निद्रिस्त जपतां ॥७६॥ स्वप्नीं

साक्षात् सरस्वती । समीप येई, बदे, देवता । निमाई स्वरुप, गुणवत्ता । वर्णू लागे अपार ॥ ७७ ॥ निमाई जग पंडित । सर्व शक्तिमान भगवंत । त्याची पराबिद्या स्वरुप शक्ति । मी शारदा छाया असे ॥ ७८ ॥ तुज निमाई दर्शने सकळ । मंत्र जपाचे मिळे फळ । व्यर्थ गेले दिन केवळ । ऐसें अंतरी न माने तूं ॥ ७९ ॥ अनंत कोटी ब्रम्हांड नायक । निमाई प्रत्यक्ष देख । शरण जा, हो याचक । ओळखी करी, अर्पीतनु ॥८२॥ जागृत होतांचि पडित तत्काळ झाला शरणागत । निवेदी सकल दृष्टांत । पराबिद्या रहस्य कथियलें ॥ ८१ ॥ वेदवर्णित पराविद्या । तीच वक्ति, स्वसंवेद्या । भक्ति प्राप्ती हो सद्या । अवधि परा विद्येचा ॥८२॥ पराबिद्या प्राप्ता जाण । जीव मानी, तृणसमहीन । तेथें कैचा अभिमान विकार शून्य वृत्ती हो ॥ ८३ ॥ विद्यारुप बधू जिवन । एक श्रीहरी नाम जान तेणें सुख संपुर्ण । तुच्छ मानी सर्व ही ॥ ८४ ॥ राजाचे जैसे राज्य सुख । योगियांचे योग सुख । ज्ञान्याचे जैसे मुक्ति सुख । तुच्छ, याचक भक्तिपुढें ॥८५॥ ऐसे पडितां वोधून । केले तया विनम्रपूर्ण । ब्रम्ह सुखास्वाद देऊन । कृतार्थ तनु केला तया ॥ ८६ ॥ विजयी पंडिता जिकोन । केलें तयाचें मान खंडन । बृत्त कळे द्वीप स्थांना । अर्पूनि पदवी गौरविलें ॥ ८७ ॥ सभे 'वादि सिंह' पदवीं । पांडित्ये जन गौरवीं । ऐंशा अनंत लिला दावीं । सामर्थ्ये अपूर्व गौरहरीं ॥ ८८ ॥ देशो देंशीं कीर्ती पसरे । पांडित्यें चकित साथ थोरें । ऐंशा विविध चमत्कारें । गौरहरे आकर्षिले ॥ ९९ ॥ पंडित असोनि निरभिमानी । हें ना ढळें त्रिभुवनी । रत जे भगवच्चितनी भक्त त्यातूनि वाचले ॥१००॥ ऐसें चरित्र बोद प्रद । श्रवण करिता सुखद । त्यासीं आतुडे गोविंद । गर्व दंभ वर्जित जों ॥१०१॥ या स्तब सेवी हरिच्चरण । न बाधावा अभिमान । काव्यी न पडोन्यून । अशीर्वचन द्या, ऐसे ॥ १०२ ॥ मी दीन पामर । कासयाचा करु अहंकार । ना विद्याना ऐश्वर्य । किंकर संत चरणाचा ॥१०३॥भरे अहंकार ज्वर । तो अबिवेकी शिरजोर । त्याचे प्रज्ञा बळ अस्थिर । दुःखकर सकलासी ॥१०४॥ म्हणोनि त्यागावा अहंकार । विद्यासंपन्न व्हावें चतुर । बिनयें जगीं नम्र । हृदीं शारंगधर कोंडिला ॥१०५॥ श्री चैतन्य विजय ग्रंथ रसाळ आदिलीला प्रसंग सोज्वळ । श्रीधर चरित मंगल । विजयी गर्वहरण अष्टमी ॥१०६ ॥ चैतन्य विजय ग्रंथ, आदी प्रसंग, श्रीधर भक्त चरित्र, पंडित गर्व हरण अध्याय आठवा समाप्त ओ सं १०६

# 卐 अध्याय ९ वा 卐

श्रीगणेशायनमः। श्रीसरस्वयैनमः। श्रीगुरूभ्योनमः। धन्य धन्य हा नरदेहो। जेथब्रम्ह आदि अपुर्व लाहो। घ्यावा ऐसा आधिकार पहा हो। प्राप्त हो तयासी सर्वथा ॥ १ ॥ ब्रम्ह प्राप्तींचें साधन। गार्हस्थ धर्मांचें अनुसरण। तैसे संतसाधू सेवन। पितृदेव पुजन अर्हनिश ॥२॥ देव ऋषी, पींतृ स्मरण ईश प्राप्तीचे मुख्य साधन। ब्रम्ह यज्ञ तर्पण। अवश्य करणें गार्हस्थीं ॥ ३ ॥ क्षेत्री करावे तीर्थ स्नान। तीर्थी श्राध्द पींड दान। येणें मुक्त पितृऋण। हो मुक्ती लाभ नित्याचा ॥ ४ ॥ सत्संग, भगवन्नांम स्मरण। नित्य नेमें ईशदर्शन। श्रवणी कथा संकीर्तन। चित्त शुध्दि कारण हो। ॥ ५ ॥ लाभ कैसा प्राप्त केला। कैंसी केली अपुर्व लीला। निमाईनें तें वेळां कथिलें नवम अध्यायीं ॥ ६ ॥ तरी व्हावे सावधान। द्यावें कथें अवधान परिसा श्रोतेजन। श्रवणीं साफल्य व्हावया ॥ ७ ॥ गार्हस्थ्य लिला पावन निमाईचा आश्रम धन्य। आचार व्यवहारे पूर्ण। अनुकरण शील जाहले ॥८॥ विधिवत पूजा अनुष्ठान। संतुष्ट विष्णु भगवान। प्रसाद, वस्त्रादि उपकरण। वितरण करी याचका ॥९॥ ब्राम्हण, अतिथी, संन्यासी। वैष्णव. अभ्यागत उपबासी। अर्थ वस्त्र भोज्य सामग्रीसी। दाने तोषवी अपार ॥१०॥ दीनाचे दुःखहरण। उचितांचा सन्मान। ईश भजनी पूर्ण मन। वर्तन पत्ती पत्नीचे ॥११॥ गृहस्थाचें दारिद्रय पूर्ण। द्यावें तृण जल आसन। तेंही नसता मधुर बचन। अतिथी पूजन करावे ॥१२॥

श्लोकः– तृणानि भूमिरुदकं। वाक्चतुर्थीच सून्टता। एतान्यडपि सतां गेहे नोच्छिद्यन्ते कदाचन ॥१॥

संतर्पणाचा हव्यास। गृहस्थीं पति पत्नींस। समय येंती दहावीस। संन्यासीं तुष्टवी लक्ष्मीप्रिया ॥१३॥ गृहस्थाश्रमाचा धर्म। अतिथि सेवा परम। न स्वीकारी तो अधम। पशु, पक्षासम मानिती ॥ १४ ॥ ऐंसी शिकवण गृहस्थास। निमाई देती बहुवस। स्वयें आचरूनि आदर्श। सकलांस प्रिय जाहले ॥ १५ ॥ घेंऊनियां भिक्षु वेश। ब्रह्मा, नारद, शिव, शुक, व्यास। भगवत्प्रसाद अभिलाष। वासी येती धरुनियां ॥ १६ ॥ श्री लक्ष्मीनारायण। तैसी लक्ष्मी शचिनंदन। त्यांचें गृही प्रसाद ग्रहण। करूनि तृप्त होती तदा ॥ १७ ॥ लक्ष्मीचा नित्य नेम। अरूणोदयीं गृहकर्म। पूजा सामग्री यथाक्रम। तुलसी प्रणाम करीतसें ॥ १८ ॥ शचिदेवी शुश्रूषण। पाकक्रिया करी संपूर्ण। गृह

कृत्यीं दक्षता राखून । धर्म पालन नित्याचें ।। १९ ।। गृहस्थधर्माचें लक्षण । अतिथी देवता संतर्पण । गुरुजनी आदरपूर्ण सतजन सेविती ।। २० ।। भूतदया गो, पशु पालन । ताहेल्या भूकेल्या जीवन, अन्न । तोषे करी कुटुंब पोषण । ईश सेवन समजोनी ।। २१ ।। शांति, क्षमा, आधीन । क्रोधें, लोभें, न जाय मन । परोपकारी वेची तन । हेंचि जीवन मानीजो ।। २२ ।। मुखें बोले मधुर वचन । दुःशद्बें न दुखवीं मन । आडल्या जाकसल्या । श्रमून । साहचपूर्ण संतोषें ।। २३ ।। नित्य संत ग्रंथ पठण । उपास्य देवता चिंतन । परमार्थ बाणें पूर्ण । अनुदिन काल घालवी ।। २४ ।। कीर्तन भजनाचा थाट । न मानी तयाचा वीट । नित्यक्रम चोखट । चित्त गोमटे कराया ।। २५ ।। निमाईचा ग्राहस्थ धर्म । लक्ष्मी करो सुगम । प्रपंची भाग्य लाभ परम । धन्य आश्रम जन वदे ।। २६ ।। अर्थ प्राप्तीच्या निमित्तें । प्रवास करिती छात्र सभेंत । पद्मातीरी अवस्थित । निमाई पंडित जाहले ।। ३० ।। दाविता पांडित्य प्रभा । छात्र घेती अध्ययन लाभ । पाखंड्याचा होई क्षोभ । जिरे मत्सर दंभ तदा ।। ३१ ।। बहुत काल वास्तव्य केलें । विरहे चित्त पोळलें । लक्ष्मीनें चरण आठविलें । त्यागिलें कलेवर प्रियेनें ।। ३२ ।। परतोनि आले पंडित । मातें अर्पिती अर्थ समस्त पत्नीचे अंतर्धान वृत्त । दुःखित माता देखिली ।। ३३ ।। करिती मातेसी प्रबोध । कालगतीचा न हो अवरोध । संसार अनित्य, शास्त्र, वेद । वदले सकल संतही ।। ३४ ।। संसार असे ईश्वराधीन । संयोग वियोग करीं कोण । कालगतीं विचित्र पूर्ण । कुणाचा कोण संसारीं ।। ३५ ।। पति पूर्वी स्त्रीस मरण । तें जाणावें भाग्यपूर्ण । सद्गति मिळे परमपुण्य न्यून न पडलें तियेंसी । मातेसी केलें दुःखमुक्त । स्वयें असता स्वस्थचित्त । द्वीपीं छात्रासमेत । शिक्षण चाले नित्याचें ।। ३७ ।। नामें तपन ब्राह्मण । परमार्थी भाग्यवान । सेवी महात्मे, संतजन । करी श्रवण अध्यात्म ।। ३८ ।। जीवां श्रेष्ठ मंगल जनक । साधन साध्य प्रमुख । कोणतें समाधानकारक । नकळे उव्दिग्न नित्याचा ।।३९।। ऐसे लोटले बहुदिवस । तयासी पडे स्वप्न विशेष । देखिला दिव्य पुरुष । आदेश, निमाई भेटीचा ।। ४० ।। पंडितां भेटे तपन मिश्र । करीं प्रार्थना, नेत्री अश्रु । बोधिलें त्यासी भक्तिशास्त्र । कथिले जप साधन ।। ४१ ।। हरेकृष्ण, द्विरुक्ति करी । कृष्ण हरे, निर्धारीं । हरेराम अंतरीं । रामहरे जप चित्तीं वसो ।। ४२ ।। सोळा नामीं बत्तीस । अक्षरीं निर्बन्धपूर्वक ग्रहण करी । हा महामंत्र अवधारीं । ऐकमात्र साधन प्रयोजन ।।४३।। तेथ न करीं कपटच्छल । अनन्यभावें घालवीं काल ।

चित्ताची आर्तता केवळ । सोज्वळ करी भजनातें ।। ४४ ।। यापरि कथिले मिश्रास । आज्ञापिलें जावया काशीस । भेटी तेथ हो अवश्य । चित्तीं असो बचन हें ।। ४५ ।। भाळीं संज्ञा हरि मंदिर । ललाटीं न दिसे उर्ध्वपुंड्र । त्यासी लज्जित करिती फार । तिरस्कार मनीं नसे ।। ४६ ।। पंडित वदे वचन । भाळी राही तिलक हीन । जाणावें तुल्य । स्मशान । त्याज्य ब्राह्मण, वेद, वदे ।। ४७ ।। ऐसे कथूनि पंडित । प्रेषीं तिलक लावण्यात्वरित । संध्यावंदनादि कृत्य । कराया देत आज्ञेतें ।। ४८ ।। शास्त्र वचन प्रमाण । देती करिती समर्थन । बक्षस्थल, कंठ कुक्षि दक्षिण । बाहु, स्कंध दक्षिण वामकुक्षी ।। ४९ ।। बाहु, स्कंध वाम ग्रीवा कटि । द्वादशस्थानीं तिलक करिती । शंख चक्रादि चिन्हें बरिती । वास्तव्य करी तेथ श्रीहरी ।। ५० ।। अवश्य पालनीय आचार । शिखा, तिलक मालासूत्र । लज्जास्पद, बेडेचार । वाटती उपहास कारण ।। ५१ ।। हा असे कालप्रभाव । स्वेच्छाचारीं वृत्ति, स्वभाव । वेदधर्म बिरोध वैभव । मानिती उदारत्व भूषण ।। ५२ । असो ऐसीं शिकवण । ग्राह्य मानी छात्रगण । स्वयें दावी आचरण । समाधान होय गुरुचें ।। ५३ ।। निमाई करी लौकिक विनोद । सकलां होतसे आनंद । भाषणीं परस्त्री संवध । नाणी सावध अत्यंत ।। ५४ ।। न करी नेंत्रे दर्शन । निमाई राही अलिप्त पूर्ण । स्त्री विषय शब्द श्रवणीं । पडतां निवारण श्रोत्राचे ।। ५५ ।। व्दीपी अध्यापन कार्य । अहर्निश चाले निर्भर । छात्र करिती शास्त्र विचार । पदवीधर होती शास्त्राचें ।। ५६ ।। ऐसा नित्य कार्यक्रम । माता चिंती गृहास्थाश्रम । कैसा विवाह हो सुगम । उत्सुक परम पुत्राचा ।। ५७ ।। व्दीपीं सनातन मिश्र सद्ब्रम्ह असे पवित्र । विष्णुभक्त सत्यवादी सत्पात्र । शास्त्रवेत्ता जितेंद्रिय ।।५८।। उपाधीयुक्त राजपंडित । त्याची सुता ईशभक्त । विष्णुप्रिया गुणयूत । विवाह निश्चित जाहला ।।५९।। मंगल दिन पातला । निमाई वर योजिला । सुदैव धनी मिळाला । वेंचिलें विवाहार्थ द्रव्यासीं ।६०। शुभ लग्नीं शुभ दिनीं । गोरज मुहूर्ती लग्न योजूनि । ग्रामस्थें जामात बघूनि । तोषोनि दिधलें आशींस ।। ६१ ।। वरातीचा भव्य थाट । सांगे जन समूहाचा गोंगाट । मंजुळ वाद्यें, शोभा उत्कृष्ट । पालखी समेत निघालें ।। ६२ ।। झाला बिवाह पाणी ग्रहण । जोडा लक्ष्मीनारायण । विष्णू प्रिया शचिनंदन वाटे धन्य पितयासी ।६३। मिश्रें कन्या अर्पन । दिधली वर दक्षिणा । विविध वस्त्र आंदण । जामातां देऊन बोळवी ।।

काय करावा विशद । आश्रम होय सुखद । भार्येसह सर्वदा संसारी ॥ ६६ ॥ गृहीं चाले अध्यापन । ऐसें निमाईचें कालक्रमण । इतरत्र पाखंडपूर्ण । विरोध न होई भक्तीसी ।६७। नानामतें नानापंथ । नास्तिक बहु असत । ईश भक्तीचें कुपथ्य, जया वाटे ।६८। सर्वत्र चांडाळचोकडी । तैसे माजले पाखंडी । धार्मिक वृत्तीची रेवडी । उडवी रितीं घडी नसे ॥६९॥ निंदेचा दर्या उफाळला । भक्तोचा पडाव बुडाला । वैष्णव गोंधळ उडाला । दुस्तर पातला काल तैं ।७०।निमाई श्रवणीं पडे वृत्त । प्रकट लालेसीं निमित्त । ठरवी समय युक्त । यात्रेचे प्रस्थान ठेविलें । ७१ । पितरोद्देशें गयाश्राद्ध । करावें हा हेत शुद्ध । यात्रेचें गूढ । अप्रसिद्ध । अल्पबुद्धीस न कळे ।७२। सवे घेती छात्रगण । तीर्थी करिती गमन स्वछंद विहारी पशुगण । पाहूनि वदलें शिष्यांस ।७३। काम क्रोध लोभ मोह मत्त । पशुगण असे समस्त । तैसा कृष्णभजन रहित पशुकोटींत जाणिजे।७४।जी बुध्दि असे पशूंत । तीच वसे मानवांत पशु कृष्ण ज्ञान रहित । मनुष्य तद्वत जाहला।७५। जो करी कृष्ण भक्ती त्यासीं तत्काळ लाभे मुक्ती । परलोकी सुगति प्राप्त होय निश्चित ।७६। मार्गीं लागे चिरनदी । स्नानसंध्या वदनादि । करी, गिरी मंदार प्रसिध्द । सत्वद तेथ पातले ॥७७॥ श्री केशव मथरेंत । पुरूषोत्तम नीलाचलांत । वेणी माधव प्रयागात । आनंदारण्यांत जनार्धन ७८ ॥ केरळ देशीं वासुदेव । दक्षिणीं पद्मनाथदेव । विष्णुकांचीतं विष्णु - वैभव । करि वास्तव्य वरदराज ॥ ७९ ॥ श्रीहरि वसे मायापुरींत । मंदारीं मधुसूदन ख्यात । निन्मभागीं श्री विग्रह अधिष्ठित । पुण्यधाम पवित्र मानिती । मंदारी घेऊनी दर्शन । पंडित निघाले गये लागून । मार्गी ज्वरेपीडा दारूण । ब्राम्हण, चरणोदके मुक्त हो ॥ ८१ ॥ व्दिज पदतीर्थ महिमा । जनीं त्याच्या दावी गरिमा । त्रीतापज्वाला होय शम । सामर्थ परम तीर्थांचे ॥ ८२ ॥ वैष्णव चरणतीर्थ महिमा । प्राप्त होई कृष्णप्रेमा । त्याचे महत्व अनुपम । स्वमुखे कथिता निमाई ॥८३॥ चित्ती नसे कृष्ण प्रेम । कैसा म्हणावा द्विजोत्तम । भक्त, हीनकुली जन्म । तो श्रेष्ठतम स्मृति वदे ॥८४॥ विष्णु भक्त ब्राम्हण । पूज्य वंदावे चरण । करावे चरणतीर्थ प्राशन । कृष्ण प्रेमा वाढवी ॥८५ ॥ पातले गयातीर्थास । पितरोद्देशे तर्पणास । ब्रम्हकुंडी स्नान क्रियेस । करूनि पूजिले गदाधर ॥८६॥ चक्रवेड तीर्थी गदाधर दर्शन घेती गौरचंद्र । माहात्म्य ऐकिलें अपरंपार । प्रेम अपार प्रगटले ॥ ८७ ॥ पांडित्य, तैसे भक्तिप्रेम । एकत्र कठिण परम । या दोहोचा संगम । निमाईत सुगम जाहला ॥ ८८ ॥ सत्य स्वरूप जगाकळे । पांडित्य शंका मावळे

आतम प्रकाशें सोज्वळ । भक्ती लक्षण प्रकटवी ।। ८९ ।। गयेसी आला अपुर्व योग । छात्र गणासि पडे उमग नेत्रीं प्रेमाश्रु धारावेग । वाहू लागे गंगेपरी ।। ९० ।। दैव योगें पडें गाठ । ईश्वर पुरी भक्त श्रेष्ठ । परस्पर होता भेट । कृष्ण प्रेमा दाटला ।। ९१ ।। वदले ईश्वरपुरीस । देखीले श्री चरणास । यात्रा साफल्य हा विश्वास । मजसी वाटे याक्षणी ।।९२ तीर्थी पिंडदान । तृप्तो पितृगण । जयाचियें नामे पिंडदान । तेंचि जाणा उध्दरती ।। ९३ ।। तुमचिया दर्शनमात्रे । मुक्त होती कोटि पितरे । अल्पही बंधन नूरे अधिकार श्री चरणाचा ।।९४।। संत मंगलाचें मंगल । तीर्थाचें तीर्थ सकल । तुम्हासी भवसागर केवळ । गोष्पद जलश्व जाहला ।।९५।। चरणी करी देह अर्पण । तारावे भवसागरातून । श्रीकृष्ण चरणामृत पान । मजकडुन करवावे ।। ९६ ।। हेचि द्यावे वरदान तीर्थाचे फल सत्संग जाणा आत्मसमर्पणा वाचुन । सदगुरु दर्शन नसेचि ।।९७।। भगवत्सेवेचीं माधुरीं । प्राप्तन हो जोवरी । श्राध्द पुजादीं तोवरी विहित करावे करमाते ।।९८ । पिंडदाने पितरा शांति । संतदर्शने जनमुक्ति तिर्थाहुनि थोर जगती । संतचरण असती की ।।९९।। संतचरणरजशक्ति । कृष्णचरणीं वाढे प्रीति । प्रेमामृत रसे तृप्ति । लाभे शांति जीवास ।।१००।।

श्लोक :— एकमेकान्तिनां प्राय:कीर्तनं स्मरणं प्रभो । कुर्वतां परम प्रीत्या कृत्यमन्यन्नरोचते ह. भ. वि. २० विष्णुरहस्य

अर्थ :— याप्रमाणें अनन्यभावानें परम प्रेम पूर्वक प्रभुचे किर्तन. स्मरण करणारांना इतर कोणतेच कार्य आवडत नाहीं.

यापरी जाहला सवाद । समाप्त करिती तीर्थश्राद्ध । लौकिक रीति विशद । केली प्रसिद्ध जनांत ।। १०१ ।। निमाई पातलें स्वस्थानीं । स्वहस्तें पाक सिद्ध करोनि । प्रेमाविष्ट ईश्वरपुरींनीं । केलें आगमन तेधवां । ।। १०२ ।। आसनीं करूनि पूजन । पाक केला समर्पण । आग्रहें घाली भोजन पूरींना तोषवी पंडित ।। १०३ ।। पुरीचें झालीया भोजन । पंडितें केले अन्नग्रहण । करा चरणसेवा प्रदान । कृष्णभावना मज द्यावी ।। १०४ ।। निमांईचीं एकांतीं प्रार्थना । द्यावी मंत्रदीक्षा मजदीना । तुम्ही साक्षात् नंदनंदन । कासया प्रार्थना मजलागीं ।।१०५। पुरीचें ऐकोनी वचन । निमाई, चरणीं लींन । दशाक्षर मंत्रदीक्षा प्रदान । करोनि, केले शिष्यतय ।। १०६ ।। श्रेष्ठगुरु शिष्यअधिकारी । काय वर्णावी तयांची थोरी । कळाया गूरूमहिमा अपार । करीती लीला जनांत ।। १०७ ।। जगानें करावा आचार । वाढवावा सद्विचार । ऐसें जीवन आदर्श थोर । आचरी संत समाजीं ।। १०८ ।। गुरूसि शरण गेल्याविण । परमार्थी फलेच्छाडे

तूर्ण । जगा द्यावया शिकवण स्वयंपूर्ण करी सद्गुरु ॥ १०९ ॥ ईश्वरपुरीचें शिष्य जाहले । कांहीं काल वास्तव्य केलें । आत्मप्रकाशाचा काल । पातला निकट निमाईचा ॥ ११० ॥ प्रेम भक्ती लक्षण । युक्त, दिसो लागे तन । इष्टमंत्राचें ध्यान । काननीं होते करीत ॥ १११ ॥ कृष्ण विरह व्यथा व्याकुळ । होऊनि झाले शोकाकुल । हें कृष्णा ! बापा गोपाळ ! सफळ करी जीवन ॥ ११२ ॥ कां चोरिसी ममप्राण । कां छिपतोसी मजपासून । बापा ! माझें आर्तवचन । कानीं कां न ? पडें तुझ्या ॥ ११३ ॥ निमाई वदे दीन वचन । करीती आर्त रूदन । विव्हल होती घेती लोळणा आक्रदन उच्चस्वरें ॥ ११४ ॥ शिष्य तयां समजाविती । परीं पंडित न मानी क्षिति । आपुली प्रेम विव्हळ वृत्ति । न सोडिती आग्रहें ॥ ११५ ॥ तुह्मीं सारें स्वगृहीं चला । संसारीं मज कंटाळा । जाई मथुरा वृंदाबनाला । तेथ गोपाळा भेटेन ॥११६॥ श्रीकृष्ण माझाप्राण । त्याविण न राही एक क्षण । संसाराची चणचण । मज दारुण वाटें कीं ॥११७॥ कचा संसार घरदार । कैचे आप्तइष्ट सोयरें । मिथ्या कल्पना पसारा । वाटे स्वपर मोहें हा ॥ ११८ ॥ कृष्ण-प्रेमोन्मत्त वचन । ऐकूनि शांतवी छात्रगण । विविधप्रकारें सांत्वन । करुन ये ना यशातें ॥ ११९ ॥ कृष्ण विरह भाव मग्न । निमाई न मानिती वचन । मध्यनिशीं एकदिन । मथुरा गमन केलें त्वरें ॥ १२० ॥ उच्चस्वरें मार्गी गान । कृष्णा! तुज कधीं पावेन । म्हणोनि करिती पलायन । नभीं वाणी उमटली ॥१२१॥ हें बिद्वत् श्रेष्ठ ब्राह्मण । अधुना न करी गमन । प्राप्त समयीं प्रयाण । करी, सदनीं जाई त्वरें ॥१२२॥ सत्वर जावें नवद्वीपीं । वैकुंठपति तुझे स्वरुप हरावया भव ताप । जणासवें आला अवनीसीं ॥ १२३ ॥ कीर्तन द्वारा प्रेमभक्ति । जगां द्यावी तुमची शक्ती । आम्हा सेवकांची उक्ती । कथितां शोभा न पवे ॥ १२४ ॥ यास्तव करितो निवेदन । गृहीं करावें प्रयाण । दैवी वाणीचें कथन । मानी, निमाई सदनीये ॥ १२५ ॥ या दैवी वाणी मिषें । जनासि कळले भविष्य । गृह त्यागुनि संन्यासी निश्चयेसी वने सौर ॥१२६॥ तत्पूर्वी होई संकीर्तन । प्रेम भक्ति विवरण । उमगे जन साधारण । दिसे लक्षण गौराचे ॥ १२७ ॥ पूरींचीं आज्ञा घेऊन । परते गौर गयेहून । द्वीपीं सह छात्रगण । उन्माद सदनीं निमाला ॥ १२८ ॥ यापरी गया यात्रा वृत्तांत । कथिला येथ समस्त । पुढें कथावधानीं चित्त । द्यावें सूचित होवोनी ॥ १२९ ॥ यात्रेचें केवळ निमित्त । सुप्त भाव उमटें स्पष्ट । कृष्ण विरहें व्याकुळ चित्त निमाई अस्वस्थ जाहले ॥१३०॥ संत

चरित कवन । करुणा द्यावें स्फुरण । दास विनवी गुरूजना । आशीर्वचना द्यावया ॥१३१॥ श्री चैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदिलीला प्रसंग सोज्वळ । व्दितीय विवाह मंगल । गयायात्रा सदाचार शिक्षा कथियली ॥१३२॥ ईश्वर-पुरी सत्संग । कृष्ण विरह कथा प्रसंग । वंगदेशी विजय सांग । तपन मिश्र कथा नवमात ॥१३३॥ इति श्रीचैतन्य विजय ग्रंथ आदिलीला प्रसंग निमाई बंगदेशी विजय श्री लक्ष्मी अंतर्धान वृत तपन मिश्र कथा सदाचार शिक्षा व्दितीय विवाह वृत गयायात्रा भ्रमण ईश्वर पुरी गुरुपदेशग्रहण ससंग कृष्ण विरह वर्णन नववा अध्यय समाप्त ओ० सं १३३



## 卐 अध्याय १० वा 卐

श्री गणेशाय नमः ॥ श्री सरस्वत्यै नमः ॥ श्री गुरुभ्यो नमः ॥ धन्य संतसज्जन । तुमचिये चरणीं नमन । कलींत भक्ति महिमान । संकीर्तन मार्गें वाढविलें ॥ १ ॥ पांडित्यें बुद्धि कसरत । न होय स्वस्थचित्त । हरिकथा श्रवणें होत । मानस पुनीत भक्तांनें ॥ २ ॥ पांडित्यें माजें पाखंड । वादांगाचें वाढे बंड । चित्त दुश्चित अखंड । अभिमान प्रचंड येतसे ॥३॥ बल, दर्प, अहंकार । काम, क्रोधें चित अस्थिर । परिग्रह रिपु थोर । करितां दूर शांति होय ॥ ४ ॥ षड्विकार त्यजितां । ब्रह्मचि होय तत्वतां । संसारी सुखवार्ता । तेव्हांचि असे ॥ ५ ॥ संत घेती अनुभव । प्रत्यक्ष भोगिती वैभव । नाथ तुकोबा प्रभाव । सदैव जाणिती भक्त ते ॥६॥ दशमाध्यायीं कथन । निमाई प्रकट लीला वर्णन कथितों द्यावे अवधान । पुण्य पावन व्हावया ॥ ७ ॥ गया यात्रा झालीं समाप्त । द्वीपवासी अंतरंग भक्त । त्यांसी गया महात्म्य गात । तनु पुलकित होतसे ॥ ८ ॥ देखें, विस्मित भक्तगण । गौंराचें हरले देहभान । पांडित्यापोटी भाव पूर्ण । पुर्व पुण्य फळलें ॥ ९ ॥ पूर्वस्थिती आलियावरी । वदले निमाई छात्रवर । गृहीं जावें सत्वर । दुःखभार उदयी कथी ॥ १० ॥ ब्रह्मचारी शुक्लांबर । त्यांचें गृही यावें सत्वर । मनीचा दुःखभार । कथी विस्तारे तयासी

॥ ११ ॥ प्रभातीं द्वितीय दिनीं । श्रीवास पंडित वटि स्थानीं । पंडितादि वैष्णवगण । कृष्णगानीं रंगले ॥ १२ ॥ पुष्पें वेचिती मुखीं कथा । अन्योन्य करिती कृष्णगाथा । रामाई, श्रीवास, गोपीनाथ । पातले तेथ श्रीमान् ॥ १३ ॥ श्रीमान पंडिताचें वचन । भावावेश केला कथन निमाईचें अपूर्व वर्तमान । श्रवणीं, वैष्णव आनंदे ॥ १४ ॥ मुखे करिती हरिध्वनी । श्रीवास वदे, वचन । गोत्रं नो वर्धताम् म्हणून । ऐसें होवो ध्वनी उमटें ॥ १५ ॥ वैष्णव संख्या वर्धमान । व्हावी बोलें भागवत गण । कृष्ण चरणी नम्र होऊन । करिती भजन उच्चस्वरें ॥ १६ ॥ जाती शुक्लांबर घरीं । अणिक येंती पंडितवर । तेथें भगवत् विरह ज्वर । गौरहर अंगीं भरे ॥ १८ ॥ कृष्णा विष्णो हें मुकुंदा । माधवा ! श्रीधरा, गोविंदा । कोठें असशी परमानंदा । दुःखद कासया जाहला ॥ १८ ॥ तूं मज सामोरा असतां । दडूनि बससी कां वृथा । तेणें मम विरह व्यथा । तुझेंविण दुणावे ॥ १९ ॥ धाव, घेई यशोदानंदा । मनस्ताप हो मुकुंदा । तनु होरपळे सर्वदा । नदनंदा कृपे शांतवी ॥ २० ॥ तुझेविण प्राण व्याकुळ । होई अति तळमळ । सिंचन करी कृपाजल । जाहले वदोन मुर्च्छीत ॥ २१ ॥ त्यांचा प्रेमोन्माद बघुन । प्रेमे बेहोष भक्तगण । गेले देहभानविसरून । आनंद मग्नजन हो ॥२२॥ सपेउन्माद आवस्था । झाली बाह्य दशा प्राप्त । कोठें जासी इतुक्या त्वरित । कां न ? भेटसी कृष्णा ! रे ॥ २३ ॥ ऐसें करोनि आक्रंदन । धरणीसी घेतीं लोळण । निमाईस सावरी भक्तगण । करी कीर्तन उच्चस्वरें ॥ २४ ॥ शुक्लांबराचें मंदिर । तेथ होय नाम गजर । शचिमाता देखे प्रकार । आशंका घोर उपजवी ।२५। सुतें न करावा गृहत्याग । न त्यजावा संसार मार्ग । विनवी नित्य कृष्णालागीं । देवा दे गा, दान हें ॥ २६ ॥ ज्येष्ठ पुत्र झाला संन्यासी । निमाई त्याचि पंथासी । मज वृद्धेची गति कायसी । होई परिसे गाऱ्हाणें ॥ २७ ॥ समय जाणें शचिमाता । पुत्रा सन्निध बैसवी कांता । परी कृष्ण विरह व्यथा । दृष्टिपात न करवी ॥ २८ ॥ कोठें गेला माझा कृष्ण । वदे सोडी निश्वास उष्ण । माता पत्नीस भय दारूण । त्यजिलें स्थान तत्काल ॥ २९ ॥ कृष्ण विरहें निद्रा नये । तृषा, क्षुधा हरपू पांहे । बसे, उठे लोळण घेंई । दशाहोई एकांती ॥ ३०॥ एकेदिनी प्रातःकाली । गंगास्नान झालिया वेळीं । अध्यापन वेला पातली । पातली । पाठार्थ आले छात्र तें ॥ ३१ ॥ वाचे हरिनाम घेऊन । पाठास बैसले छात्रगण । हरिस्मरणे आनंदून । शिक्षण घेऊ लागती ॥ ३२ ॥ श्रवणीं ऐकता

हरिगुण । बाह्य दशा गेले विसरून । पंडित भावाविष्ट पूर्ण । व्याख्यान करिती सुत्राचें ॥३३॥ व्याख्येचा विषय एक सकळ शास्त्री कृष्ण देखा । ब्रम्हादिक कृष्ण सेवक । वेदनावेक् स्थिरावे ॥ ३४ ॥ आगम वेदन्तादि दर्शनें । सकल शास्त्रे करिती वर्णनें कृष्णीं भक्ती पूर्णपणें । त्याविणें जन्म वृथाकीं ॥३५॥ भजनाविण शास्त्र व्याख्यान । तो नसे शास्त्रमर्मज्ञ भारवाहि जाणा अध्यापन । तनु श्रमून, व्यर्थ हो ॥३६॥ निमाईचा शिष्य प्रश्न । कैसे जाहले सूत्र व्याख्यान । तुमची व्याख्या केवळ कृष्ण । त्यांचे अनुंसंधान न कळें ॥३७॥ पंडित वदे छात्रास । पूरे, करा अध्ययनास । जाऊं गंगा स्नानास । गंगसी सत्वर पातले ॥ ३८ ॥ सदनीं परते सत्वरीं । पुजा भोजनादि आवरी । शचिमाता प्रश्न करीं । ग्रंथांतरी काय पढविलें ॥३९॥ निमाई बोले वचन । शिकविले कृष्ण गुणगान । गुण श्रवण कीर्तन । सत्य जाण शास्त्रीं तें ॥४०॥ जो कृष्णचंद सेवक । त्यासी होय सत्य विवेक । कृष्ण भक्तींचे द्योतक । तें शास्त्र देख सत्यत्वे ॥४१॥ हरिगुण करीं श्रवण । तैसे कीर्तन, स्मरण । भगर्वताचे पाद सेवन । अर्चन वंदन नित्याचें ॥४२॥ श्रीहरीचे करी दास्य । देव कार्यी न मानी त्रास । ईश्वर मानी भूतमात्रास । करी सेवेस निर्धारें ॥४३॥ मानापमानाचे मुंडाळे । करोनि ठेवि निराळे । देहभावविसरोनि आगळे । हीनत्व आले पत्करी ॥ ४४ ॥ पडिलें कार्य तितुकें करी । वैष्णव सेवा आचरी व्देष मत्सर अहंकारीं । अनादर बुध्दि न चळे ॥ ४५ ॥ कपील मुनी मातेस । करिती ज्ञानोपदेश । त्या ज्ञाने निमाई मातेस । अधिकार पदास पोंचवीं ॥४६॥ आसनी भोजनी शयनी । कृष्णाविण नवदे वाणी । कृष्णनाम श्रवणी । त्याविण किया घडे ।४७।भक्तिविण अध्ययन । तैसे नसे अध्यापन । शिष्यगणीं असमाधान । शिक्षण विषयी जाहलें ।४८।व्दीपीचें महा-विद्वान भक्ति मानिती समाधान । नवल गुरूजनांना । वृत्ति वारणा उपदेशी ।४९। वृत्ति न सोडी कृष्णचंद्र । शिक्षणीं देती अर्धचंद्र । भक्ति प्रेमें नेत्र आर्द्र । मानी भद्र चित्त हे लावे ।५०। स्वेच्छें अध्ययन करा । माझीआशा न धरा । ऐंसा देऊनि इशारा । मुक्त केला छात्रगण ॥५१॥ नित्य करा कृष्ण भजना । चित्ता लाभें समाधान अध्ययन सांगता जाणा शिष्य गणा कथियली ।५२। शिष्य प्रश्न निमाईस । कैसें करावे सकीर्तनास । त्याचा प्रकार आम्हास । खुलासा करुनि दावावा ॥५३॥ हरेकृष्ण यादवाय नमः। गोविंद गोपाळ माधव राम । उद्योषे घ्यावें हरिनाम प्रेमावेंशें नृत्य करा

सुत्रांचा व्याख्या प्रकार । केला कृष्ण नामपर । त्यावरी ग्रंथ बोधपर । हरि नामामृत व्याकरण ॥ ५६ ॥ वैष्णव सेवा केल्याविन । न होई हरि प्रसन्न । द्यावया भक्ती शिक्षण । दावी आचरूनिया ॥ ५७ ॥ वैष्णव देखोनि नमस्कार कृपा याचना मागतीं वर स्नानार्थ येता गंगेवर वस्त्र पिळून त्या देती ॥ ५८ ॥ मृत्तिका देती आणून । पुजार्थ पूष्पे देती वेचून । जे जे पडे कुणाचे न्यून । समजून ईश, सेविती ॥ ५९ ॥ अभक्त, दुरात्मे पाखंडी । त्यांचे संख्याबल प्रचंड । मोडावया सर्वत्र बंड । माझे उदंड अवतार ॥ ६० ॥ ऐसे आवेशे करिती कथन । करविती कृष्णगान । मातेचें शंकित मन । वायु बाधें तन पीडिले ॥ ६१ ॥ विविध औषदोपचारें । बाधा न जाय माता अधिर । श्रीवास पंडिता सत्वर । पाचारी पुत्र वात्सल्लें ॥ ६२ ॥ श्रीवास देखे निमाईस । होती कृष्ण प्रेम बिवश । रोग संबंध नसे त्यास । मातेस हायसे वाटलें ॥ ६३ ॥ अंतरीं चिंता घोर । निमाई त्यजिल संसार । जीबना तोचि आधार । विचारें दुःख दुणावें ॥ ६४ ॥ श्री हट्टी लाऊड परगणा । स्वतंत्र असे संस्थान । तेथ नृपतीचें शासन । प्रजाजनां तोषवी ॥ ६५ ॥ त्या रियासतीचा राजा । दिव्यसिंघ महाराजा । धार्मिक, तेणें सुखी प्रजा । गुणग्राही, भोज, सात्त्विक ॥ ६६ ॥ ज्ञानियांची भरवी सभा । पंडितां गौरवी, वाढवी शोभा । देशोदेशी फाके प्रभा । गुणी, भोजा सपगमे ॥ ६७ ॥ पणगणीं त्या नवग्राम । पांडित्याचा असे बिश्राम । तर्क पंचानन नामें । ग्रामीं पंडित सात्विक ॥ ६८ ॥ त्यांचे पाहूनि पांडित्य । न्याय शास्त्रीं प्रभुत्व अद्भुत । देशोदेशीं विख्यात । लक्ष्मीवंत तैसेचि ॥ ६९ ॥ लक्ष्मी तैसीं सरस्वति । एकत्र कधीं ना वसती । विद्वता दारिद्र्य युत । राही ख्याती निरंतर ॥ ७० ॥ अपवाद तर्क पंचानन । नाम कुबेर पंडित मन्य । रायें राजपंडित नेमून । बहुमान राखिला ॥ ७१ । विद्या, ऐश्वर्य, धन । पंडित असे संपन्न । संसारी असें एक न्यून्य । संताना विन कष्टी तो ॥ ७२ ॥ नसे पुत्रसंतान । होतां गाठिती यम सदन । लाभा देवीचें दुःखी मन यातना दारून तियेसी ॥ ७३ ॥ दुःखद गोष्टीचें निमित्त । त्यागिलें ग्राम त्वरित । द्वीपीं शांतीपुरांत । वास्तव्यार्थ राहिले ॥ ७४ ॥ तर्क पांडित्याचा लाभ । शांतिपुरीं मिळें सुलभ । ईशचिंतन निर्लोभ । चित्त क्षोभ, संतानीं ॥ ७५ ॥ भाग्य येई उदयास । शुकप्रल्हादासम विष्णू अंश । माघ शुद्ध सप्तमीस । आला जन्मास तेधवां ॥ ७६ ॥ नाम ठेंविलें कमलाक्ष । माता पितयां संतोष । दानें अमित वस्त्र द्रव्यास तोषवी द्विज याचकां ॥ ७७ ॥ कमलाक्ष भक्ति परायण

मेधा, विनय, चातुर्यगुण । ज्ञानी जना समाधान । पाहोन दिव्य बालक ।। ७८ ।। वंगी, शक्ति उपासना । वाम मार्गी अवलंबन । करूनि मुक प्राणी हनन । धर्म समजून होतसे ।। ७९ ।। पाहूनि कृत्य निष्ठुर । त्या स्थलीं वाहे रूधिर मानिती अनेक विद्याधर । सुकर उपासना कर्मातें ।। ८० ।। कमलाक्ष पाही दुष्कृत्य । मनीं अति दुःखित । ईशासि नित्य प्रार्थित । दूरीकृत करी अज्ञान ।। ८१ ।। अज्ञानें करितीं हिंसा । मुक्या देती त्रासा । येणें धर्म घडें कैसा । निवाडा करीं प्रश्नाचा ।। ८२ ।। कालीं पूजेचें निमित्त । राज्याकरवीं उत्सव होत । कमलाक्ष जाई शंकित । पाही विपरीत क्रियेंसी । ८३ ।। कालीमातेच्या भेंटीसी । असंख्य बकरें महिषी । अर्पूनि, बळी समयासीं । होई दृश्य भयानक ।। ८४ ।। कीर्तना येती कीर्तनकार । मंडपीं चालें गजर । कमलाक्ष बुद्धि पुरःसर । नमन न करीं, पाही तें ।। ८५ ।। कुबेर पंचानन पुत्र । मंडपीं करी अव्यवहार । राजास परम आश्चर्य । क्षुब्धांतर जाहला ।। ८६ ।। बोले! सुत कमलाक्ष । तूं पंडित प्रवर असतीं न करितां नमन देवीस । बैठकीस कैसा बैसला ।।८७।।हा अनुसुचित व्यवहार । मज अमान्य, दे उत्तर । कमलाक्ष वदे त्यावर । क्रोधे अधीर होवोनी ।। ८८ ।। माता देवी जगज्जननी । संतान तिचे सर्व प्राणी ती खाई पुत्रालागुनि । राक्षसी मनीं वाटते ।८९। पुत्र जाहला कुपुत्र । माता कुमाता न, पवित्र । धर्म नासे कर्म अपवित्र । करूनि वासना शम गमे ।.९०।। यास्तव भगतप्रणाम । करणें उचित धर्म । तो बंदनीय परम । पुज्यनीय सकला कोटीगुणें ।। ९१।। एकोनि बालकोत्तर । राजा जाहला निरुत्तर । पिता बोले हे पुत्र ! अपराध घोर करिसी गा ।।९२।। देवी देवता नारायण । शास्त्री कथीलें प्रतीमा पुजन । करी देवी सन्मुख नमन । पाप भाक् होणें अनुचित ।। ९३ ।। ऐकोनी पितयाचें वचन । कमलाक्ष वदे निर्भयपणें हिंसास्थान न देवस्थान । पुजन न माने देवासी ।। ९४ ।। एकजनी जनार्धन पुजनीय भगवान । तो दिन दयाळ संपुर्ण । त्याचें पुजन योग्य गमे ।।९५।। बालकाचें सुष्टवचन । आश्चर्यें थक्क जाहले जन । राजा करि स्तुतिगान । निर्भय प्रमाण बालाचें ।। ९६ ।। बालक संपवी अध्ययन । पंडित सर्भे आग्रस्थान मिळे, कांहीं काले करून । त्याजिती तन मातापिता ।। ९७ ।। पितयाचा अंतीं आदेश । श्राध्द करावें गयेंस । म्हणोनि गेले यात्रेंस । केले श्राध्दास कमलाक्षें ।। ९८ ।। गदाधराचे घेई दर्शन । सत्वर फेडि पितृऋण । करी पुण्य तीर्थी गमन

सत्वर पातले ॥ १०० ॥ गौडीय वैष्णव संप्रदायी । माधवेंद्रपुरी आचार्य ते समयीं भक्ती भाव मधुर त्याठायीं ॥ कथी संन्यासियां उपासना ॥ १०१ ॥ कमलाक्ष महापंडित । महाविष्णु अंश विख्यात । ईश्वरासी अभिन्न होत । अद्वैत संज्ञा पावले ॥ १०२ ॥ अव्दैंवताचार्य करी नमन । पुरींचें संतोषें मन । नम्र अव्दैत पाहोन । आधिकारी खुण जाणिली ॥ १०३ ॥ गाढ प्रेमें आलिंगन । श्रीकृष्ण मंत्र दीक्षा देऊन । नवशक्ति पात करवून । कृतार्थं केलें तयासी ॥ १०४ ॥ संसारी दीन, भक्ति विहीन । देखोनि वेदना दारुण कथीं. अव्दैत गुरू लागून । आश्वासन दिधलें तयां ॥ १०५ ॥ भक्त भय हारी भगवान । मिरवी दुःख, सुखवी जन करी भक्ती उध्दरण । अवतीर्ण होवोनि जगींया ॥ १०६ ॥ गुरूनीं दिधले आश्वासन । वंदिलें गुरुचरण । व्रजयात्रा संपवुन शांतिपुरीं सदनीं पातले ॥ १०७ ॥ पांडित्यें गाजवी शांतिपुर । कीर्ती पसरे देशभर । दिग्विजय सिंह नृपवर । दर्शना सत्वर पातला ॥ १०८ ॥ करी साष्टांग नमस्कार । माथा नमवी चरणावर । केला कुलाचा उध्दार । पंडितवर धन्य कीं ॥१०९॥ अनुग्रहें करा पुनीत । देखोनिया राजा आर्त । शिष्य करी असतां शाक्त । बोधी अव्दैत कृष्ण कथा । ११०॥ राजयाने राज्य त्यजिले । स्थान एकांत शोधिले कृष्ण कीर्तनीं त्यजिलें तन आपुलें दिग्विजयें ।१११॥ विश्रांतीस्तव शांतिपुरी । माधवेंद्र येती अव्दैता घरी । शिष्या आज्ञापी सत्वरीं । विवाह करी शास्त्रज्ञें ।११२॥ आज्ञा मानी शिरोधार्य । घडविले विवाह कार्य । नारायणपुरी पंडितवर । नामें नृसिंह भादुडी ॥११३॥ त्याचा सुता उपवर सीता ठकुरानी अपर । दोन कन्या एक वर । विवाह सत्वर जाहला ॥ ११४॥ अव्दैत उदार कोमल हृदय । कृष्ण कथा मानी प्रिय । सुखें चाले संसार कार्य । आश्रम धन्य जाहला ॥ ११५ ॥ परम भागवत अद्वैत । श्रद्धा ठेविती ज्ञानी पंडित । अंगी सामर्थ्य अद्भुत । ईश्वर अंश असती ते ॥११६॥ पंडित मिश्रगृहीं अव्दैत । गेले असता अकस्मात । आशीर्वच वदे त्वरित । शची देवी प्रति तेधवां ॥११७॥ तुज पुत्र हो ईशभक्त । जन्मले विश्वरुप विरक्त । द्वितायाशीर्वचें [illegible] राही । सुत अवतारी ॥११८॥ हरावया भूमिभार व्हावा ईश्वरी आवतार । पाखंड नाशावें सत्वर । अव्दैत करिती आराधना ॥ ११९ ॥ करिती कृष्ण नाम प्रचार । संकीर्तन भक्ती घरोघर । वाढुनि मार्ग सुकर । उपरी गौर हर जन्मले ॥१२० ॥ गृहस्थीं दोन कलत्र । असती सहा पुत्र । सारें भगवत्प्रीतिपात्र । सेवा करिती संताची ॥ १२१॥ ऐसें अव्दैत चरित्र । श्रवणीं होय ईश्वरीं प्रीत ।

सत्वर ईशकृपा पात्र । तैसा संत सज्जनांचा ॥ १२२ ॥ मायापुरी अव्दैत भवन । अव्दैताचार्यं पुजास्थान । निमाई मनीं घ्यावें दर्शन । सवें नेती गदाधरा ॥ १२३ ॥ गंगाजलें कृष्णपुजा । दोन्ही उमारोनी भुजा । तुलसी दलें गरुड ध्वजा अर्ची, गर्जत अव्दैत ॥ १२४ ॥ त्यांचि पाहोनि उपासना । प्रेमावेशे निमाईस मूर्छना । ये, आचार्ये देखोनि । भक्ति निधान जाणलें ॥ १२५ ॥ नमोब्रम्हण्यदेवाय मंत्रांनी । सत्वर पुजा करोनि । सानंदे संतत पठनी । शचिनंदन स्तवियला ॥ १२६ ॥ गदाधर बोले वचन । अनुचित बाल पूजन । अदैताचार्यें ऐकुण वदले वचन तयासी ॥ १२७ ॥ पंडित श्रेष्ठ गदाधरा । तूं नेणसी विश्वंभरा । समजें तुज कालांतरां । महिमा अपार गौरांचा ॥ १२८ ॥ गौर प्रत्यक्ष कृष्णावतार । भक्ति प्रबोधा भूमीवर । अवतरले गौरहर । कळे चरित्र पुढती ॥ १२९ ॥ उतरे भाव दशावस्थान । समजून केलें आत्मगोपन । करूं लागलें अद्वैत गान । सत्वर चरण वंदिलें ॥ १३० ॥ आचार्यांचे अमृत वचन । आपण सारे वैष्णवजन । करू श्रीहरि कीर्तन । प्रभु दर्शन व्हावया ॥ १३१ ॥ गौरहरी देती अनुज्ञा । कीर्तन करितां भक्त प्राज्ञ । संशयात्मे तसे मर्मज्ञ । आनंद लुटितो सूज्ञही ॥ १३२ ॥ संकीर्तनी होती तन्मय । देवदर्शनाविण समय । न कदा जाई निरामय । सदया कृष्णा कृपा करी ॥ १३३ ॥ कृष्णवियोग जन्मदुःख । कांथिथीं, अंतरंग भाविकां विश्वंभरासी वाटे, श्रीमुख । दर्शनीं सुख असावें ॥ १३४ ॥ गदाधरासी करिती प्रश्न । कीठें माझा शामल कृष्ण । जो का पीतवसन । तत्काळ नयनां दाखवी ॥ १३५ ॥ तो तुमचियां हृदय मंदिरी । वसे कृष्ण मुरारो । वक्षस्थल नखाग्रें विदारी । गौरा, आवर गदाधर ॥ १३६ ॥ तेव्हांपासूनि विश्वंभर । सन्निध राही निरंतर । माता वदे गदाधरा अवधारणा नित्य असो दे ॥ १३७ ॥ संकीर्तन गजराचा त्रास । जनां होई रात्रंदिस । कडूक्त बोलती श्रीवासास । उपाधीस थांववा ॥ १३८ ॥ परीं निर्भर विश्वंभर । करीं द्वीपीं, नगर संचार । करितां श्रीवास घरीं । अकस्मात द्वारीं पातले ॥ १३९ । बंद पाहोनि द्वारास । उघडोनि वदले पंडितास । कोणाची पूजा करितोस । तें उपास्य येथ उभे ॥ १४० ॥ श्रीवास नृसिह पूजा मग्न । ध्यान केलें संपूर्ण । चतुर्भुज मूर्ती पाहोन । विस्मित मनीं जाहले ॥ १४१ ॥ गौर चतुर्भुज अवतारी । हेंचि दैवत नरहरि । माननियां नमस्कारी । प्रवर म्हणोनि स्तवियलें ॥ १४२ ॥ तदनंतर

बालिका । भक्त नारायणी नामक । प्रभु आज्ञा होता देख । निःशंक गात, नृत्य करी ।। १४४ ।। येती प्रेमाश्रु नेत्रीं । उन्मत्त, झाली आर्द्र धरित्री । श्रीवासाची पटे खात्री । निर्भय केला वरदानीं ।। १४५ ।। ऐसा प्रकट लीलाप्रकार । श्रोतया कथिला रुचिर । येणें संतोषे श्रीकर । कथा मधुर दरिसा कीं ।। १४६ ।। श्रीचैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदिलीला प्रसंग सोज्वळ । अद्भुत भावांतर मंगल । छात्रां भक्ति प्रदानकीं ।। ४७ ।। मातेचें केलें सांत्वन । अद्वैत चरित कथन । श्रीवास गृही लीला प्रकटन । दशमाध्यायीं वर्णिलें ।। १४८ ।। इति श्री चैतन्य विजय ग्रंथ, आ० ली० प्रसंग, अद्भुत भाषांतर, छात्रगणास कृष्णभक्ति प्रदान. माता सांत्वन अद्वैताचार्य चरित्र श्रीवास पंडित घरीं लीला प्रकटनादि दहावा अध्याय समाप्त ओ० संख्या १४८ एकूण संख्या १०१७ फा.व. ५-८५ मंगळवार ३-३-६४



## 卐 अध्याय ११ वा 卐

श्री गणेशाय नमः ।। श्री सरस्वत्यै नमः ।। श्री गुरुभ्यो नमः ।। तुज नमो यादवेंद्रा । तुझेनि मोक्ष गजेंद्रा । सहाय्यकारी देवेंद्रा । अवतार तुझे अनंत ।। १ ।। मत्स्य, कच्छ, वाराहरूप । नृसिंह वामन भार्गवरूप । रामकृष्ण तुझें स्वरुप । बौद्धरूपें विठ्ठल ।। २ ।। ऐसे अनंत अवतार । घेसी रक्षण्या भक्तवर । जेणे दुःख अपार । निर्जर होत मनुजही ।। ३ ।। द्रौपदीसाठी अंबरावतार । धर्मास्तव श्री शंकराचार्य । दीनोद्धारी ज्ञानेश्वर दामाजीस्तव महार हो ।। ४ ।। यज्ञांत उष्टी सावडी । चोख्यासाठीं ढोरे ओढी । गोऱ्यास्तव मडकीं घडी । भक्तांस्तव देवा ! तूं ।। ५ ।। कबीराचे शेले विणी । सखूसाठीं धूतो धुणी । नाथा घरी भरीं पाणीं । चक्रपाणी भक्तास्तव ।। ६ ।। उद्धवाचा सखा । अर्जुनाचा पाठीं राखा । भक्ता रक्षिलें अनेका । झाला निका सारथी ।। ७ ।। भानुदासासाठीं मोत्तदार । उद्धवाचा मुनीम नोकर । कीर्तनीं नाचे मधुर । नाम्यासव ।। ८ ।। ऐसे अनंत अवतार । नामास्तव अवनीवर । घसी नाम प्रभाव

थोर कीर्ती म्हणोनि वर्णावा ॥ ९ ॥ नामें दोष नासती । नामें पातके भस्म होती । नामें होती पावन ॥ १० ॥ हरि नामाचा गजर । पापनिष्कृति साधन थोर । भक्तिप्रेम सागर । उचंबळें अधिकारी नाम ॥ ११ ॥ नामाचा दिव्य प्रताप । एकादशांत वर्णी अमुप । भगवत्प्रेम अपाप : वाढे भक्त चित्तांत ॥१२॥ मुरारीस्तव वराहरुपे अव्दैत हरिदास भक्ति स्वरुपें । त्यांचेच स्त्रिसुलभ सोपें । भक्तिमापे दाविलें ॥ १३ ॥ श्रवण कराजी सावधान चित्त एकग्र करुन कथेस्तव अवधान । राखावें गा ॥१४॥ नानापरी चमत्कार । करिती विश्वंभर । पंडितबुध्दीत आदर । वाढु लागें ॥ १५ ॥ मुरारी गुप्त पंडित । वराह भगवंत भक्त । उपासना दिनरात । तीव्र होत भक्तीने ॥ १६ ॥ पूजा मग्न असतां ध्यानीं । स्तोत्र पडे प्रभुकर्णीं । शूकर शूकर गर्जोनि । अवचित स्थानीं पातले ॥ १७ ॥ दिधले वराह दर्शन सत्वर गाठितीं पूजास्थान । वराहाकृति बनवीं तन । बैसले आसनीं तेधवां ॥ १८ ॥ आमुचें पूजन करावें । स्तुतिपाठ, ध्यान धरावें । नमस्कारोनि गुप्त भावें । स्तवी मरारी लीनत्वें ॥ १९ ॥ प्रभो ! तूं वेदातीत । महिमा वेद शास्त्र गात । न कळें तयांसी अंत । तेथ माझा पाड कितीं ? ॥ २० ॥ प्रभु वदले मुरारी । चित्तीं भय न धरी । कीर्तनीं विघ्नें निवारी । संहारीं नास्तिक पाखंडी । २१ ॥ नामसंकीर्तन द्वारां । करीन जगाचा उद्धार । ऐसें वदोनी भूमीवर गौर निश्चेष्ट पहूडलें ॥ २२ ॥ सावध झालियावर । क्रोधें वदले गौर । जग निर्गुण निराकार । अचिंत्य, परात्पर नमानी ॥ २४ ॥ प्रकाशानंद पंडित । सोहंवादी काशीपुरींत । वेद व्याख्या करितां । निंदी सगुण साकारीं ॥ २४ ॥ तो न मानी सगण रूप । साकारासीं निंदी अमुप । अपराधाचें भरे माप । शापें कुष्ट जाहले ॥ २५ ॥ तरी न होई ज्ञानोदय । निंदेची न करी भी गय । भक्त द्वेषी पुत्र होय । दंडा योग्य. निर्धार हा ॥ २६ ॥ वेदाचें जें असें कथन । त्यासी न मानीं हा दुर्जन वेद माझा भक्त जाण । त्याचें बचन सत्य असें ॥ २७ ॥ ब्रह्म निर्विशेष निराकार । प्राकृत निषेधी आकार । सच्चिदानंद प्रकार । वेद करी वर्णन ॥ २८ ॥ तो नित्य चिदानंद आकार । अनित्य जैसें आमुचें शरीर । ईश सत्तेचा अस्विकार । करी प्रच्छन्न नास्तिक ॥ २९ ॥ मी त्यांसी करी दंडन । भक्तांचें करी रक्षण । वेद मम भक्त प्राण । निश्चित जाण मुरारे ॥ ३० ॥ ऐसे वदोनि केलें गमन । त्वरें पातले स्वस्थानीं । वराह भाव

नामजप । अमुप फळ प्राप्त हो ॥ ३२ ॥ संकीर्तनीं मधुर आनंद । कैसें स्वरूप करी विशद । हरिदास चरित्रें बोधा करा श्रवण आदरें ॥ ३३ ॥ वंगो यशोहर जिल्ह्यांत । बुढन ग्राम विख्यात । ठाकुरदास हरिभक्त । द्विज कुळीं जन्म पावती ॥ ३४ ॥ बाल्यीं मातृपितृ हीन । यवनें केलें पालन । याकारणें यवनपण । हीनपण ये ठाकुरां ॥३५॥ पूर्वजन्म शुभसंस्कार । नामी रूची अपार । भगवंत कृपा थोर । मन रमे कीर्तनीं ॥ ३६ ॥ बाल्यीं त्यजिलें घरदार । बेनापोलीं अरण्य घोर । तेथ बांधोनियां कुटीर । घरोघर भिक्षा मागती ॥ ३७ ॥ एक समय भोजन । मुखीं नित्य भजन । तिन लक्ष जप प्रतिदिन गर्जना करुनि भक्तीनें ॥ ३८ ॥ हिनकुळ, पावन चरित । चितीं राहो हरीप्रीत । पाहोनि जन मुग्ध होत । लाभे शांति सकला ॥ ३९ ॥ हरिनाम उच्च गजरे । पावन होती प्राणि मात्रें । पाप निष्कृति एकमात्र । साधन थोर जीवासीं ॥ ४० ॥ पाहोनी हरिदास भक्ति । जनतेची बहु प्रीति । पसरे भोवती । कीर्ती । प्रेम मुर्ती वाटतसे ॥ ४१ ॥ गांवी होता जमिनदार । रामचंद्र खां धनिकवर । हरिदास यश अपार । पाहूनि मत्सर करिसदा ॥ ४२ ॥ त्याचे वैराग्य व्हावे नष्ट । हिनत्व आणाया करि धाष्टर्य । रुप सुंदरी प्रेषीं दुष्ट । चारित्र्य वोखट व्हावया ॥४३॥ कनक आणि कामिनी । याचे झालीया प्रलोभन । कठीन निग्रह पुर्ण । भुलवी, दारूण देवाहि ॥४४॥ मानवाचा पाड काय । कैचा वाटे त्याचा काय भगवत कृपा होय । तोची उपाय तरावया ॥४५॥ रूप गर्विता वेश्या जान । गर्वें ये नटून थटुन । करि वश्य हा अभीमान । धरूनि तणारी पातली ॥४६॥ अंग विक्षेप संकेत । भक्त न करी दृष्टिपात । भजन करी स्वस्थचित्ते । अंतर हेतु जाणिला ॥४७॥ हरिदास नव तरुण । वरीं मिळे एकांत स्थान । तरुणीचें रुप लावण्य । तनुदान करीं स्वेच्छेने ॥४८॥ऐसें असता क्षणमात्र । न ढळे हरिदास चित्त । श्रीकुष्ण कीर्तनीं स्वस्थ । राही भक्त तेधवा ॥४९॥ हरेराम हा मंत्र । रामराम हरे नित्य । हरे कृष्ण सतत । जपत कृष्ण हरे हरे ॥५०॥ कुलटा आणि विघ्न । करा मजसी भाषण जप झाहलीया पूर्ण । करींन गोष्टी तुजसवें ॥५१॥ लोटती तीन दिन । जप होईना संपूर्ण । वेश्येसी नाम श्रवण । घडे पाप क्षालन हो ॥५२॥ चित्त पालटे संपूर्ण । संपे तिचे कुलटापण । करी क्षमा याचन । प्रार्थना करी भक्ताची ॥५३॥ तुम्ही हरिभक्त थोर । कराजी माझा उद्धार । मी असे पापी घोर । म्हणोनी धिक्कारी आपणा ॥५४॥ नेत्राश्रु कंठ गद्‌गद

होय । पतित पावना करा उपाय । तुमच्या चरणा शिवाय । गती अन्य नसे मज ॥५५॥ भक्त वदे तियेलागून । सर्वस्व करी ब्राह्मणा दान । तुलसीं सेवा रात्रंदिन । लक्षतीन जप करी ॥५६॥ श्रीहरी दयाळू पूर्ण । निश्चये करी पावन नित्य करी सकीर्तन करीवास यास्थानी ॥५७॥ वेश्या करी सर्वस्वदान । भिक्षेने उदर भरण । कीर्तनीं भावपुर्ण । नामें पावन हरीं दासीं ॥ ५८ ॥ सत्संगाचा प्रताप । संगेंनिरसे पापताप । तेथ नसे मनस्ताप । भागवत्स्वरूप आठवे ॥५९॥ रामचंद्र खां दुर्जन । केलें भक्ताचें छळण । त्याचें प्रायश्चित्त तूर्ण । मिळालें जाणा तयासीं ॥ ६० ॥ राजाची चुकली खंडणी । राजदूतीं कोंडिलें बंधनीं । कष्टें अमित यातनानीं । साधू छळणीं फळ हें ॥ ६१ ॥ हरिदास सोडी कुटीर । त्यजिले गांव चांदपूर । गृहीं बलराम आचार्य । वास्तव्य करी आनंदे ॥ ६२ ॥ चांदपूरीचा भूधार । गोवर्धन मुजुमदार । त्यांचें पुरोहित आचार्य । बलराम वैष्णव षट्शास्त्रीं ॥ ६३ ॥ वैष्णव सेवेचा आदर । करी आचार्य निरंतर । भेटें त्याचा सत्कार । सद्भक्त थोर अधिकारी ॥ ६४ ॥ गोवर्धन पुत्र रघुनाथ । असतां बाल्यावस्थेंत । आचार्य गृहीं जाय नित्य । विद्या प्राप्त व्हाबया ॥ ६५ ॥ हरिदासाचा नामजप । नित्य चाले नसें माप । रघुनाथ सदा समीप । श्रवणीं श्रद्धा जडें, लोभ ॥ ६६ ॥ गोवर्धनाची शास्त्र सभा । पांडित्यांची झळके प्रतिभा । परी करी वैष्णव लोभ । लाभ घेई सत्कारूनी ॥ ६७ ॥ सभें नेई हरिदास । केला सत्कार बहुवस । नामस्मरण घोष । मुखें नित्य होतसे ॥ ६८ ॥ सभेंमाजीं होते पंडित । मांडिला तेणें अपसिद्धांत । नामा भास हेचि नाम शुद्ध । समजोनि त्याचें फल वदे ॥ ६९ ॥ नाम संकीर्तन फल उचित । पापक्षय मुक्ति लाभ होत । हरिदासें प्रमाण भागवत । घोषित केलें तयासी ॥ ७० ॥ श्रीकृष्ण प्रेम प्राप्ति । नाम फल हें निश्चित । पापनाश वा मुक्ति । फल उक्त नामाभासाचें ॥७१॥ उच्चस्वरें नामघोष । तेणें जाती सकल दोष । श्रीकृष्ण प्रेमा विशेष । होई संतोष सर्वथा ॥ ७२ ॥ नामाचा केवळ आभास । जपद्वारां तो भासे । तेणें मुक्ति, पापनाश । हें विशेष फळ होय ॥ ७३ ॥ वदले ऐसा सिद्धांत । द्विज गोपाळ चक्रवर्ति । भक्त वच श्रवणें क्रूद्ध । संबद्ध वदे हरिदासा ॥ ७४ ॥ कोटिजन्माचें ब्रह्मज्ञान । कदा मुक्त न करी जाण । नामाभासें ही मुक्तपण । लाभ न कल्पांतीं ॥ ७५ ॥ करावें शास्त्राध्ययन । होई तदा यथार्थ ज्ञान । तदा

वदे निश्चित । सत्य करीन निर्धारें ।। ७७ ।। माझें वचन सत्य । नाम जपे मानव मुक्त । हें प्रमाण असें यथार्थ ।
असत्य न घडें कदाही ।। ७८ । वर्तलें तदा तीन दिन । चमत्कार घडे दारूण । दुर्जन कुष्ठ व्याधीनें नासिका हीन
पीडिला ।। ७९ ।। संताचा करितां छळ । प्रायश्चित्त मिळें प्रबळ । यास्तव अहंकार बळ । अंगीं केवळ नसावें ।।८०।।
इतुका प्रसंग झालियावरी । भक्तासी दुःख झालें भारी । तेथूनि पातले शांतिपुरीं । गृही अद्वैताचार्यांच्या ।। ८१ ।।
शांतीपुर सन्निध पुलिया गांवीं । एकांती करिती वास्तव्य । गुहे माजी तीरी जान्हवी । भाव संकीर्तनी
राहिला ।। ८२ ।। आचार्य गृहीं भोजन । एकान्तीं नामस्मरण । आनंदी वृत्ती पूर्ण । ख्याती पसरे जनांत ।। ८३ ।।
तेथीचा काजी यवन । गोराई इस्लाम अभिमानी । हरिदास यवन हरिगुणगान । करीं, क्रोधे दारुण ।। ८४ ।।
हरिदास नाम प्रभाव । काझीस वाटे उपद्रव । हिंदूचा मानी देव । पात्र सदैव शिक्षेस ।।८५ ।।राजद्वारी ने फिर्याद ।
साधूचा करी विरोध । काफीर, इस्लाम शत्रुबद्ध । राजदूत करिती तात्काळ ।। ८६ ।। प्रजा हिंदु राजा यवन ।
त्याच्या हाती सत्ता पूर्ण । तयांत तीव्र धर्माभिमान । न्यायदान तेथ कैचे हो ।। ८७ ।। हरिदास तेज प्रभाव । पाहतां
चकित हो नबाब । आसनीं करी गौरव । विचारी जाब तयासीं ।। ८८ ।। तूं जातिचा यवन । हेंचि तुझे सौभाग्य लक्षण
त्या धर्मांचें उल्लंघन । लाभ मानी का तूं ।। ८९ ।। जाति धर्म करी उच्छेद । काफीर, करूं शिरच्छेद । याचा
तुज नसे खेद । दुर्बुध गमे सकला ।। ९० ।। हरिदास देती उत्तर । सकलांचा एक ईश्वर । हिंदु यवन यांत अंतर ।
नामीं फेर वाटतसे ।। ९१ ।। मूलतः पुराण कुराण । एक देव भाषा जाण । हें नसे की अप्रमाण । मानी बिश्वास
वचनाचा । ।।९२ ।। भगवान्नाम अतिथोर । त्यावरी श्रद्धा अपार । तयास्तव कलेवर । त्यजीन जाण निर्धारे ।।९३ ।।
तत्वास्तव देई प्राण । धाकास भीक न घालीन । मृत्युची भीति न धरी मन । ब्रीद रक्षीन सदैव ।।९४।। जो जेथराखीं
विश्वास । तेथचि फल प्राप्त तयास । भयाची धरिता कास । गमे आभास श्रद्धेचा ।।९५ ।। यापरी केला युक्तिवाद ।
आपुले कथन विशद । करितां, निर्मळ पडसाद नबाब चित्ती उमटें तें ।।९६।। ऐकुनि बाणी आकर्षक वृत्ति जाहली सा-
त्विक । परी धार्मिक वृत्ति प्रेरक । धाक घाली दंडाचा ।।९७।। काजी वदला सुस्पष्ट । हा इस्लाम द्रोही दुष्ट। दंडावा
तनूस कष्ट । व्हावे स्पष्ट अपार।।९८।। काजी स्वये धर्माधिकारीं । नबाब शिक्षा घोर करी निष्ठूरतेसी हद्दपारी ।

वेत्री प्राण दंड देई तैं ॥९९॥ बावीस बाजारी फिरवून। वेत्र घात पृष्टीं दारुण। फटके ओढिती निर्घृण। रुधिरें तन माखले ॥ १०० ॥ शरीर होय जर्जर भक्त न सोडी नाम गजर। दुःख लेंश न मुखावर। प्राण ही बाहेंर न जाती तैं ॥१०१॥ ऐसे देखोनि जन विस्मित। हरिदास करी मनी चिंता। मारकाचे अमंगल तत्वत: । न व्हावे ऐंसे प्रार्थितसे हे कृष्णा हे शामसुंदरा। पतित पावना दयासागरा। मारक अपराध क्षमा करा। वेत्रयष्टिनें मारिती ॥१०३॥ माझा न जाय प्राण। मारकास होई दंड दारुण। ह्मणोनि केलें कृष्णध्यान। समाधि लावून बैसले ॥१०४॥ भक्तछळ अमित केला। देवें स्वयें सोंशिला। समाधींत पडें दृष्टींला। मजसाठीं देवा ! काय हैं ॥१०५ मारकास वाटे हा मेला। त्वरें कळविलें काजीला। कबरस्थानी ठेविला। तरी मिळे सदगति तया ॥१०६॥ दुर्गति मिळाया कारणे। दिधली आज्ञा दुष्ट काजीनें। गंगेंत द्यावा फेकून। वार्धके त्यजिलें उदकी तैं ॥१०७ गंग माजी प्रवाहात। शब लागे तीरावत। वात्प दशा होय प्रात्प। हरिदास कुटींत पातलें ॥१०८॥ कळे जनतेंस वृत्तांत। दर्शना येतो त्वरीत। नबाब काजीस कळे वृत। अनुतत्प जाहले उभयतां ॥१०९॥ चित्तीं श्रध्दा भावउमटें। भक्ताची दोघे घेती भेंट। क्षमा करा आम्ही दुष्ट व्यर्थकष्ट दिधलें तुम्हा ॥११०॥ नकळें तुमचा अधिकार। तुम्ही संत दयासागर। आम्ही अपराधी घोर दुःख भार दिधलाकीं ॥१११॥ करा आमुचा उद्धार। पापी, हींन अंगींकारी। विनवितीं भक्तवर। उदरी घालावें अपराध ११२ हरिदास बोले उत्तर। फळ भोगे देहा कर्मांनुसार। मनुष्य केवळ निमित्तमात्र। चिंता व्यर्थ कासया ॥ ११३ ॥ माझा रोष नसे तुम्हावर। ऐंशा उत्तरें मोद थोर। दुष्ट वृत्ति परिहार। होता दुःख पार जाहलें ॥ ११४ ॥ भाविका दुःख दारुण। त्यांचे केलें समाधान कुटीं माजीं संकीर्तन। करुं लागती अहर्निश ॥ ११५ ॥ जान्हवी तीरी गुंफ माझीं। वास्तव्य करी भक्तराज ख्यात हो जनामाजी। हरिदास दर्शना लोटती ॥ ११६ ॥ गंगास्नानाचे निमित्त। करुनि भेटती स्वस्थ चित्त। आश्रम परिसरी भीती। दोष उपजें शरिर तैं ॥ ११७ ॥ दर्शनास येता स्थानास। कंड सुटे तनुस। तेंणें शरीरी रक्तदोष। तयास उपाय कळेना ॥ ११८ ॥ शोध करितां कळो आले। विषधर सर्व वास्तव्य जाहले। तेंणें परिसर दुषिला। विष बाधें नासे रूधिर ॥ ११९ ॥ सर्प निश्वासे, उपजें विष। कैंचा वांचेल

हरिदास [illegible]

दुःखद होय । कठिण जनास उपद्रव दारुन । दर्शना येती म्हणोनियां ॥ १२१ ॥ याचा करावा विचार । त्वरें जावे अन्यत्र । हरिदास बोलें स्पष्टोत्तर । योग्य विचार मज वाटे ॥ १२२ ॥ माझें करितां जनतेस । त्रास होय दुःख मनास । उदयीक सर्प न सोडी स्थानास । त्यागीन गुहेस सत्वरीं ॥ १२३ ॥ येथ मी राहीन । वा सर्पाचें वास्तव्य स्थान । उदयीक निर्णय जाण । समाधान राही चित्तांत ॥ १२४ ॥ द्वितीय दिनीं भक्तजन । करूं लागती संकीर्तन । गुहेमाजीं अंधकारपूर्ण । प्रकाशमान जाहलें भोवतें ॥ १२५ ॥ भक्तगणा वाटें आश्चर्य । भोवतीं सारें तेजोमय । सर्प उग्र मणिमय । भक्त वचनें स्थान त्यजि ॥ १२६ ॥ जाणें हरिदास मनोगत । सर्प निघे तेथून त्वरित । स्वप्रकाश सकालां देत । चकित जाहलें भक्तजन ॥ १२७ ॥ मण्याचें अपूर्व तेज गंगातीर । आश्चर्य सर्पराज । दूरस्थ होत दिसे सहज । दूषित तनु न हो तदा ॥१२८॥ भगवद्भक्ताचा प्रभाव । भुजंग त्यजि मूळस्वभाव । ऐसा हरिलीला लाघव । करी गौरव भक्तांचा ॥ १२९ ॥ मार्गीं हरिदास एकदिन । पाहे नाटच कालिया मर्दन । वाद्यासह नृत्यकीर्तन । कथानुसंधान चालें तै ॥ १३० ॥ कृष्णा, यशोदा, नंदनंदन । पात्रें दाविती आवेशून । भक्तराजें दृश्य बघून । पावला मूर्छना आवेशें ॥ १३१ ॥ नायकें भक्त भाव देखुन । तया महापुरुष मानून । थांबवी नृत्य गायन । करूं लागे स्तवनासी ॥१३२॥ इतर जन वंदी चरण । पदधूली पदरीं बांधून । घेतां, पाहे दांभिक ब्राह्मण । सोंग संपादणी करी तै ॥ १३३ ॥ भूमिसि पडें अचेतन । नायकें सकल जाणून । फटके मारी चार दोन । दंभ कारण प्रकटविलें ॥ १३४ ॥ त्या धाकें पळें भूत । दांभिक द्विजयःकश्चित । त्वरें भागला अकस्मात । हसे जनांत जाहलें ॥ १३५ ॥ हरिदास भक्तिभाव । पाहूनि होती नम्र जीव । दंभाचा पूर्ण अभाव । संकीर्तन प्रभाव जाणिती ॥ १३६ ॥ हरिदास चरित कथन । केलें श्रोतया लागून । भक्तिवर्म कथिले पुर्ण । दंभ अभिमान वर्जित ॥ १३७ ॥ सुलभ भक्ति साधन । भगवन्नाम संकीर्तन चित्तां वाटे समाधान । लाभे प्रमाण संताचें ॥ १३८ ॥ अद्वैत, हरिदास चरित । शुद्ध रसाळ प्रेम पूरित । तें कथिलें श्रोतयाप्रत । स्थिर चित्त व्हावया ॥१३९॥ हरिदास भक्त प्रेमळ । नाम गजरें निर्मळ । त्याचें चरित्र रसाळ । श्रवणीं सोज्वळ ठेवितां ॥१४०॥ भक्ताचा न हो बुद्धि भेद । ठकविती न काम क्रोध । कळे भक्ति तत्व विशद । चित्त शुद्ध होतसे ॥ १४१ ॥ नामीं

पूर्ण विश्वास । गोविंद प्राप्ति तयास । भोगिती चिरशांतीस । निराश भव बंधाचा ॥ १४२ ॥ पुढती निमाई चरित कथन । श्रवण करा, देऊनि ध्यान । संतसेवक संतचरण । सेवीं अनुदिन सप्रेमें । १४३ ॥ श्रीचैतन्य विजय ग्रंथ रसाळ आदिलीला प्रसंग सोज्वळ । वाराह, अद्वैत, हरिदास भक्त प्रेमळ । एकादशीं मंगल वर्णिलें । १४४ ॥ इति श्रीचैतन्य विजयग्रंथ आ. ली. प्रसंग वाराहसूत्र चरित, अद्वैत चरित हरिदास कथनादि अकरावा अध्याय समाप्त ओवीसं. १४४



## 卐 अध्याय १२ वा 卐

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ श्री गुरुभ्यो नमः ॥ नमन माझे संतसज्जना । तैसें श्रेष्ठ गुरूजना माथा ठेवी, लीन चरणा । संत सेवक म्हणोनियां । गुरुसि ना अन्य दृष्टांत । देतां होय अप्रस्तुत । श्री गुरू थोर चरित । अज्ञ जीवा न कळे ॥ २ ॥ उपमे द्यावा सागर । तरीं तो अत्यंत क्षार । अथवा क्षीरसागर । तो कल्पांतीं नासेल ॥ ३ ॥ गुरूवृत्ती अति मधुर । शिष्या नेती पैलपार । ज्ञान संग्रह अपार । देतीं सत्वर तयासी ॥ ४ ॥ उपमे चंद्रमा, परिस त्यासी लांछन विशेष । सुवर्णत्व हींन धातूस । परि सत्व कदा न ये त्या ॥ ५ ॥ गुरूसदाचा अकलंकित शिष्या ज्ञानें, गुरूत्व देत । अधिकार वाढे अपरिमित । हेचीं महत्त्व गुरूचें ॥ ६ ॥ तैसे संत सज्जन । असती गुरू-समान । देती भक्ता भक्तिज्ञान । नामसंकीर्तन करविती ॥ ७ ॥ नामाचा अमित प्रभाव । शिष्यास दाविती सदैव नामे देवाधिदेव । बोले ऐसें करिताती ॥ ८ ॥ नाम असे भवतारक । नाम भवभय हारक । दुःखि जीवाचा संतोष एक । नाम घेतां होतसें ॥ ९ नामें तारिले पाषाण । गणिकेचें केलें मोचन । शिलेचे उद्धरण । ऐसे महिमान नामाचें ॥ १० ॥ कीर्तनीं नाम गजर । करीं सकल दीनोधार । पापी बद्ध परिकर । नामे उद्धार तयांचा ॥ ११ ॥ त्यानामाचा

श्रवण करा भक्तवर । तुमचिया अवधानें मजवर । काव्य वर्षाव होतसे ।। १३ ।। राढ देश वीरभूमि प्रात । एकचक्र
ग्राम स्थित । जें विरचंद्रपुर ख्यात । नामे संज्ञा पावलें ।।१४।। त्या सन्निध मोडेश्वर । अन्य संज्ञा मयुरेश्वर । प्रथित
शिवलिंग शंकर । प्रमुख स्थान प्रांताचें ।।१५।। त्या एकचक्र पुरींत । मैथिली द्विज विख्यात । हाडाई ओझा विष्णू
भक्त । सती पत्नीं पद्मावती ।। १६ ।। परम भागवत वैष्णव । ईश भक्ति, मानी विभव । माघ शुक्ल त्रयोदशी
विभव ! शिवकृपें नित्यानंदाचा ।। १७ ।। वैष्णव असोनि पंडित । मयुरेश शिव पुजीत । शिव विष्णु समान प्रीत ।
अंतरीं एक परमतत्व ।। १८ ।। पुरोहित वृत्ति नित्याची । चिंता न करी प्रपंचाची । संतानाविण मनाची । वृत्ति
उभयांची उदास ।। १९ ।। एकदां सतीस पडें स्वप्न । महापुरुष हो प्रसन्न । उदरीं तव विभूति जनन । संकीर्तनें जगा
तोषवी ।। २० ।। शके तेराशे पच्चाणवांत । माघ त्रयोदशी शुद्धांत । नित्यानंद प्रभु ख्यात । गौर भक्त जन्मले ।।२१
निताई नामें संबोधित । बलरामासम बंधु प्रीति । तो कथाभाग पुढती । वर्णनीं कळे कीं ।। २२ ।। निताई रूप लावण्य
कोण करी तयाचें गणन । सौंदर्य शरीर धारण । ऐसें लक्षण तनुवरी ।। २३ ।। पंचमीं उपनयन । प्रारंभ होय अध्ययन
बाल बुद्धी तीव्र विलक्षण । प्रत्युत्पन्न मति जाहला ।। २४ ।। संस्कृत साहित्य कौमुदी ज्ञान । श्रीकृष्णलीला अभिनय
तज्ञ । बालासमेत असाधारण । लीलानुकरण करी भक्तीने ।। २५ ।। श्रीराम श्रीकृष्ण लीला । त्यांत जाई बाल्य काल
विद्या ग्रहणीं चापल्य । बोल, न, ये कुणाचा । ज्येष्ठ पुत्र प्रिय पितयास । कनिष्ठ संतान मातेस । रूप गुणें पुत्र विशेष
प्राणापरिस मानितीं ।। २७ ।। तैसा निताई बाळ मातापितयां प्राण केवळ । बाल लीलेंत जाई काळ । आनंद कल्लोळ
उठे तैं ।। २८ ।। द्वादश वर्ष वय जाहले निताई लीला नित्य चाले । प्रपंचीं सुख सोहळे । भोगिती बहूसाल
दंपती ।। २९ ।। एके दिनी भिक्षार्थ संन्यासी । पातलें सत्कारी तयासी । पंडितें दिधलें भोजनासीं । संतोष मानिसीं
स्वामीयां ।। ३० ।। तृप्तीचे देऊनि ढेकर । भक्ति भाव जाणें अपार । स्वामी तुष्टलें सत्वर । दिन चार केलें
वास्तव्य ।। ३१ ।। यथाशक्ति सेवा करिती । प्रसन्न अंतरीं दंपति । स्वामीसी ईश मानिती । प्रचिती । येई
उभयासी ।। ३२ ।। स्वामी मुखामधून । ज्योति निघे दैदिप्यमान । शांत भाव तेजस्वी पूर्ण । बघून श्रध्दा दृढावली ३३
एकांती करिती भाषण । स्वामी बदले पंडिता लागून । करी भिक्षा याचना । कामना पूर्ण करावी ।।३४।। मी दरिद्रीं

कंगाल । मनीषा कैशीं पुरी होईल । आहे तें अपेक्षाल । देईन तनुला निर्धारें ।।३५।। स्वामी वदे पंडितास । मी मागेंन ज्या वस्तूस ती असे तुजपाशीं । मनीं विश्वास असोदे ।।३६।। वस्तु असे मौल्यवान । देणे होय तुज कठिण । ती अत्यंत प्रिय प्राण । हेचि कारण तयासी ३७।। पंडित बोले देईन प्राण । यापासव काय कठिण ? अंतरीचा नापेक्षी जाण । बहिश्चर प्राण मज व्हावा ।।३८।। दे मज प्रिय पुत्रासी । कल्याण तयाचे निश्चयेसी । पुढतीं वाढे लौकिकासी । मम मनिषा सफळहो ।।३९।। स्वामींची ऐकता मात । मस्तकीं होय वज्राघात । दंपति जाहली अस्वस्थ । चित्त दुश्चित जाहले ।।४०।। देता पुत्र वियोग दारुण नातरी हो अकल्याण । स्वामी शापे सर्वस्व नाशन । हो न जतन कदाही ।।४१।। पंडितें केला विचार । पत्नींस निवेदी सत्वर । पातिव्रत्य धर्म पवित्र । मानी उत्तर दिधले त्या ।।४२।। आपुली आज्ञा मज थोर । मीन न मानी तयाचा घोर ; आज्ञा उल्लंघन अपार । दुःख भार मज वाटे ।। ४३ ।। लोप न व्हावा धर्माचा । ऐसीं माझी असें इच्छा तो विचार करा साचा । खेद त्याचा न करा जीं ।। ४४ ।। पत्नीची मिळतां संमति । पुत्र दिधला स्वामी प्रति । प्रभुराम गाधिज हातीं । दशरथें दिधलें बाटें की ।। ४५ वय द्वादश नित्यानंद । स्वामी सेवे मानीं आनंद । कळाया स्वरुप सच्चिदानंद । स्वच्छंदेस्वारी निघाली ।। ४६ ।। स्वामीसह सकल तीर्थे । त्रिस्थळी, द्वारका, बदरीनाथ । मथुरा, केदार रंगनाथ । जगन्नाथ, रामेश्वर गंगोत्री ।। ४७ ।। भ्रमण केलें तीर्थी । माधवेंद्रपुरी समर्थं । भेटीत, कृष्ण भक्तिप्राप्त । घेत करून निर्धारें ।। ४८ ।। भक्तिप्रेमे विव्हळ । सत्वर पातले गोकुळी । मार्गी स्वामीसी भुलले । कोठें गेले न कळे त्या ।। ४९ ।। नवद्वीपी गौरचंद्र । अवतरे करण्या उद्धार । संकीर्तनी रमे विश्वंभर । निताईसी सारे वृत्त कळे ।। ५० ।। व्रजातुनि करी गमन । नवद्वीपी, झालें समाधान । नंदनाचार्य पंडितसदन । वास्तव्य स्थान जाहले ।। ५१ ।। प्रभू भाविती दिव्यदृष्टी । द्वीपी पातले बंधुश्रेष्ठ । पाचारिले व्हावीं भेट । हेंत निताईस निवेदिला ।।५२।। श्रीवास, हरीदास धुंडति वाढले निताई द्वीपांत । निराश होऊनि त्वरित । वृत्त प्रभूस कथियले ।।५३।। प्रभु वदले भक्ताप्रति मंगल स्वप्न पडे प्रभाती । महापुरुष द्वीपी निश्चित । वास्तव्यार्थ राहिला ।।५४।। तो सदनाचा शोध करी । जाऊं त्याकडे सत्वरीं । भक्तां समेत झडकरी । प्रभु त्वरें निघालें ।।५५।। नंदनाचार्य

निताई अनिमेष दृष्टीनें प्रभूसि निहारी. नुरे भान । भक्तगण मंत्रमुग्ध जाहला ।। ५७ ।। भक्त महिमा करावा प्रकट । प्रभूसि वाटे उत्कट । नेत्रसंकेते स्तुतीपाठ । श्रीवासें स्पष्ट सुचविलें ।। ५८ ।। 'बार्ह्य पीडः' स्तुति श्लोक । वंदू लागे पंडित भाविक । श्रवणीं वाटे हरिख । ये तात्कालि । मूर्छना ।। ५९ ।। निताई मुर्च्छित जाहले । पुन्हां श्लोकातें । श्रावयिले । हुंकार मिषें जाणिले । अश्रु अविरल नेत्रींत ।। ६० ।। शरीरीं रोमांच राहिले । प्रेमोन्मादें नृत्य केलें प्रभूंनी दृढ आलिंगिलें । भान नुरलें उभयास ।। ६१ ।। हरि प्रेमाचा उन्माद । प्रेमाचा उन्माद । उभय भोगिती आनंद हे कृष्ण, माधव, गोविंद । अनिर्बंध रूदन चालले ।। ६२ ।। चौदा वर्षांचा विरह । भरतासि जाहला दुःसह । देखतां धावे, चरणीं देह । पडे अश्रु घळघळा ।६३। निताईची तैसी अवस्था । अंकी बेहोश स्थितींत । मस्तकी फिरविती हस्त । स्पर्श । परमानंद जाहला ।। ६४ ।। प्रभु वदले निताई लागुन । पदधूलीनें केलें पावन । कृतकृत्य जाहलो धन्य । भाग्यवान मानीं आपणा ।। ६५ ।। दुर्धीळ अवधूत दर्शन । कैसे हो सांसारिकांना । आमुचे सौभाग्य म्हणून । कृपादान केलें अहेतुक ।। ६६ ।। ऐसें प्रभूंचें बोलणें । निताई उत्तरे अधीरतेनें । मज व्हावया कृष्णदर्शन । तीर्थस्थाने धुंडिलीं ।। ६७ ।।गेलो प्रमुख पुण्यस्थानीं । विविध दर्शने देवस्थानीं तेथ देखिलें सिंहासनी । मूर्ती शुन्य भासले ।।६८।। म्यां भक्तांसि केला प्रश्न । कोठें असती श्रीभगवान । स्थानी दृष्टी नयें म्हणून । केला प्रश्न तुम्हाप्रति ।। ६९ ।। प्रश्न ऐकता सारे चकित । किती एक अस्वस्थ चित्त । वेंडा मजलागी समजत । भाषण वर्जिलें मजसवें ।। ७० ।। परी एक भेटे भक्त । माझी देखोनि आतुरता कथिला तेणें वृत्तांत । ऐकतां तृप्त जाहलो ।। ७१ ।। नवद्वीपीं श्री भगवान । प्रकटे करी संकीर्तन । नाम घोष अनुदिन । उद्धरण होय जीवाचें ।। ७२ ।। त्यासी जावें शरण । धरावें दृढ चरण । तेचि एक शांतिस्थान । अन्य साधन नसेचि ।। ७३ ।। ऐसें करिता कथन । त्यजिलें वास्तव्य स्थान । त्वरें आलों । ध्यावया दर्शन । चरणीं ठाव मज द्यावा ।। ७४ ।। इतुकें बोलोनिया वचन । तनु केली समर्पण । चरणीं घेंतलें लोळण । खेंद कंपन उमटले ।। ७५ ।। हस्तें धरूनि उठविलें । प्रभु नम्रपणें बोले । अंग प्रत्यंग चिन्हलें । ईश्वर तेनें तनुवरी ।। ७६ ।। हीं माझी स्तुति केंवळ । मजसी पडावी भुरळ । हा गुणनिधी केवळ । वसे सकळ प्रभु देहीं ७७ मी जीव हा साधारण । आपुल्या कृपेचा भिकारी जाणा । ऐसा संवाद श्रवणीं । पडे भक्तजन चकित हो ।। ७८ ।।

मूरारी पुसे श्रीवास । आम्हा न कळे हीं भाष । परस्पर करिती स्तुतीस । गुरुत्व कोणा कळेना ॥ ७९ ॥ ऐशीं चालें प्रभूलीला आचार्य गृहीं विशाला । सागर प्रेमाचा उसळला । हृदय हेलावें प्रतिक्षणीं ॥ ८० ॥ जयास्तव केलें भ्रमण । बहुतची तीर्थाटन । ती मनकामना पूर्ण । गौरांग दर्शनें जाहली ॥ ८१ ॥ प्रभुचरणीं समर्पण । केले सर्वतो भावेन । तयातें सकल मानून । ज्येष्ठत्व दिधलें नितांईसी ॥ ८२ ॥ त्यजिले आचार्य सदन । संगे घेती भक्तजन । श्रीवास्त गृहीं संकीर्तन । भाव पूर्ण प्रकटतसे ॥ ८३ ॥ नित्यानंद भक्त नूतन । उच्चस्वरें करी कीर्तन । विव्हल होती प्रेमपूर्ण । नृत्य, गान अहर्निश ॥ ८४ ॥ हरिबोल नाम गजर । नितांई प्रभु बंधुवर । हस्त धरोनि परस्पर । नृत्य माधुर्य भोगिती ॥ ८५ ॥ नितांई नृत्य देखून । निमाई करिती आकंठ पान । देता दृढ आलिंगन । मूर्छित होती तेधवां ।८६। धरणीवरी होतां पतन । निमाई देखोनि चेतनाशुन्य । ऐसे जाति कैकक्षण । बाह्यदशें उत्थान होतसे ॥ ८७ ॥ उठवोनी बंधु नितांईस । निघोनि जाई भावावेश । संकीर्तनाचा संतोष । चित्तास अपार वाटतसे ॥ ८८ ॥ नितांईचे वास्तव्य स्थान । होय श्रीवास सदन । मातेची व्हावया ओळखण । प्रेमें स्वगृहासि आणिलें ॥ ८९ ॥ माते ! देखें विश्वरूप । परतोन येंई तुज समीप । त्याच भावाचें स्वरूप । त्याचें ठायीं मानिलें ।९०। उद्यीक गुरुपौर्णिमा उत्सव वेदव्यास पूजन करावें । श्रीवास सदन योजावें । नित्यानंदे ऐंसे कथियलें ॥ ९१ ॥ श्रीवास पंडित सदन । युक्त होय संकीर्तना । स्वयें करिती आचार्यपण । सामग्रीं, योजना पूजेची ॥ ९२ ॥ टाकिला पूजनाचा भार । मोदें स्वीकारी पंडितवर । फल, पुष्प, नाना प्रकार । सकल तयारी ठेविली ॥ ९३ ॥ भक्तगण गंगास्नानास । मुरारी गदाधर श्रीवास । निमाई नितांई भक्त विशेष । करी तोषें जलक्रीडा ॥ ९४ ॥ गंगा स्नान झालियावर । पूजास्थानीं पातकें सत्वर । व्यासपीठ शोभे सुन्दर । दृश्य मनोहर भासलें ॥ ९५ ॥ फल पुष्पांचा संभार । खाद्य मिठाई भरपूर । धूपदीप कर्पुर । नैवेद्य प्रकार विविध ॥९६॥ श्रीवास पंडित यजमान आसनी जाहले विराज मान । भक्तिभावे चाले पूजन केले संपूर्ण तेधवा ॥९७॥ ईतर ही भक्तगण । करित्ती भावें व्यास पूजन । नितांई आले सरसावून । आसनीं पूजन करावया ॥९८॥ हाती घेंती पुष्पमाला । अर्पण करण्या व्यास

... जाहलें नितांई ॥९९॥ वरिवरि विनवी पंडित । समय होतसे अर्घ्य त्वरित । परी

... न मानिती वचन कवणाचे ॥१००॥ पंडित निवेदीं निमाईस । विलंब होतसे भक्तास । निमाई नितांई स्वस्थचित्त । न मानिती वचन कवणाचे ॥१००॥ पंडित निवेदीं निमाईस । विलंब होतसे भक्तास । निमाई आज्ञापिती नितांईस । पूजन करा सत्वर ॥१०१॥ आज्ञा होंता विशेष । उतरे भावावेश । अवलोकिलें चहुदिशीं गौरांग प्रभुस देखिलें ॥१०२॥ हातीं होती पुष्पमाला । अर्पी सत्वर प्रभुगळा । देखोनि अपूर्व सोहळा । आनंदला भक्तगण ॥१०३॥भक्तगण हो बेहोश । प्रभु लज्जित झालें विशेष । नित्यानंदास संतोष । धरणीसीं येई मूर्छना ॥१०४ ॥ गौर प्रेमभाव उत्कट । नित्यानंदे केला प्रकट । षड्भुज मूर्ति चोखट । स्पष्ट दिसो लागली ॥१०५॥ मुखकांति अपूर्व शोभा । जणु कोटि सूर्य प्रभा । आयुधासह पद्यनाभ । अदभुत दर्शन लाभ जाहला ॥१०६॥ दर्शनी न हो तृप्तता नेत्री चालले अश्रुपात । दशा पाहोनी भयभीत । सकल भक्त जाहले ॥१०७॥ बाह्यदशा यावया । पंडित करिती उपाया । परी काहीच नुरे सोय । जागृति नितांईसी नये ॥१०८॥ प्रभुचा कोमल हस्त । तनुवरी फिरे अकस्मात उठा ! श्रीपाद त्वरीत । समय निकट पातला ॥१०९ । जयास्तव आपुलें जनन । कार्यासी व्हावा विलंब न । करा जीवोध्दरण । जन भुकेला म्हणोनि ॥११०॥ करा हरिनाम प्रचार । जीवाचा व्हावा उध्दार । भगवन्नाम मधुर उच्च स्वरें गावोनीं ॥१११॥ करस्पर्श होता नितांईस । मूर्छा गेली अनायास । निमाई आज्ञापिती भक्तास जगन्निवास गावू सप्रेमे ॥११२॥ सुरूजाहले हरिनाम । वाद्य नाद उठे परम । वाटे भुवैकुंठ धाम । भ्रम ऐसा भक्त जना ॥११३॥ भजनी रंगले भक्तजन । काल लोटे मावळे दिन संकीर्तन संपवून । प्रसाद देऊन बोळविले ॥११४॥ व्यास पूजेचा अति आनंद । सकीर्तनी लुटती भक्तवृंद । प्रभुरुप सच्चिदानंद । नित्यानंदे पूजिले ॥११५॥ धन्य धन्य नित्यनंद । प्रभुभक्तीत मानी आनंद । सकीर्तनी लुटिला परमानंद बंधन बंधुप्रेमाचें ॥११६॥ ऐसा जोका बंधुभाव चित्ती राहावया सदैव । नितांई कथे ठेवीभाव । परिसा फल भक्तीचे ॥११७॥ जेंसा भरत बंधु प्रेमा । गाठीं भक्ती चरणसीमा । तोचि भक्ती महिमा । नितांई वाढवी जनात ॥११८॥ यास्तव चरित कथन । चित्त होय सुप्रसन्न बंधुप्रेम राही नित्य नूतन । फळजाणा कथनाचें ॥११९॥ पुढील अध्यायी कथन । अव्दैताचार्य भक्तजन । त्यासी प्रकटवि महिमान । सावधान परिसावे ॥१२०॥ श्री चैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदिलीला प्रसंग सोज्वळ नित्यानंद कथा व्यासपुजन मंगळ । व्दादशात वर्णिलें ॥ १२१ ॥ इति श्रीं चैतन्य आ. ली· प्रसंग नित्यानंद चरित व्यासपूजनादीं

कथाकथन नाम अध्याय बारावा समाप्त



## 卐 अध्याय १३ वा 卐

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्री सरस्वत्यै नमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्री गौरहराय नमः ॥ नमन माझें शचिनंदना । भक्तास्तव नंदनंदना । स्वरूप धारी करी अवना । लीला जना दावितां ॥ १ ॥ हे प्रभो शामसुंदर । भक्त काम पुरवो अपार । नाम सकीर्तन प्रकार । भाव निरंतर दाविला ॥ २ ॥ तुमचिया चरणीं विश्वास । ईश दर्शनीं पुरे आस अनुभव ये भक्तजनास । तदर्थ कास धरियली ॥ ३ ॥ तव कृपे चरित्र कथन । करी श्रोतया लागून । अद्वैतां हरि दर्शन । घडे कैसे परियेसा ॥ ४ ॥ जय जी गौरसुंदरा । तव कृपेचा आसरा । घेऊनि, चरित्र विस्तारा । करी, अभय कर असो द्या ॥ ५ ॥ तुम्ही काव्य अधिष्ठान । मी मूढ पामर अज्ञान । कथाकथनीं धारिष्ट धरून । करी प्रेमें मान्य हो ॥ ६ ॥ बालक बोबडें बोलतां । प्रसन्न होती मातापिता । तुम्हीं संत बालकवितां मान्य करा सप्रेमें । तैसे तुम्हीं न कराल । मज काव्य कैचें स्फुरेल । तुमचियां कौतुकें भरेल । चित्त, गौरवें हेलावें ॥ ८ ॥ कवनी संत गुणगान । तेंचि प्रधान मानिती सज्जन । निकृष्ट वाटे कवन । परि हरिगुण तयांत ॥ ९ ॥ तेणे सकलांस मान्य । हेचि वाटे मज भूषण । होई मज काव्य स्फुरण । चरणी संत सेवक हा ॥ १० ॥ श्रोती व्हावें सावधान । मागील कथानुसंधान शांतिपुरीं वास करून । अद्वैताचार्य राहिले ॥ ११ ॥ गौर लीला श्रवण । चित्त सदैव प्रसन्न । इष्टदेव लीला गान । श्रवणीं आनंद हेलावें ॥१२॥ नवद्वीपी नित्यानंद येंता प्रभूसी अत्यानंद । परी लागे अव्दैत छंद । पार्षदगण मृणोनिया ॥१३॥ अव्दैत मनी विचारतरंग । विश्वंभर रुपें श्रीरंग । प्रकटे होय यथासांग । पूजन अखंड केले तें ॥१४॥ आता सहवास करावा । काल सार्थकी न्यावा ऐंसा विचार बरवा । कान यावा चित्तांत ॥१५॥ इष्ट देवें पाचारावे । ऐसे

गुप्तपणें शांतिपुरात संकोच वृथा यावया ॥१७॥ श्रीवास बंधु राम । प्रेषीला आचार्य धामीं । प्रभु संकेत प्रिय परम । विश्राम चित्ती वाटला ॥ १८ ॥ मम इच्छे अवतार । झाला असें विश्वंभर । व्हावा संकीर्तन प्रचार । होतो अधीर आजवरी ॥ १९ ॥ एसें करोनि स्मरण कंठ गद्द मूखी रुदन । विव्हल अश्रुपूर्ण नयन । पत्नीसह जाहले ॥ २० ॥ ओसरे प्रमावेंग । पूजासामग्री लागवेग । घेवोनियां कथासांग । द्वीप मार्गें पातलें ॥ २१ ॥ रामास वदले अद्वैत । प्रभु सान्निध्यीं या अवस्थेंत । न राही जावें त्वरित । नंदन गृहाप्रत जाईन ॥ २२ । जरी असे समप्रीति । त्वरें मज पाचारिती । श्रीचरण मस्तकीं धरिती । चित्तीं उमजे कृपा ही ॥ २३ ॥ मज विषीं ये प्रसंग । जाहले न आगमन, सांग । ऐकूनियां जाय वेगी । स्वगृहीं पंडित पातला ॥ २४ ॥ संध्या समयीं भक्तगण । येती श्रीवास सदनीं । प्रभु भावावेशें पुर्ण । आसनीं त्वरें बिराजले ॥ २५ ॥ अद्वैत येती शांतिपूराहून । गुप्तपणे बैसे आचार्य सदनीं । मम परीक्षा घेऊन । कस लावून पाही हा ॥ २६ ॥ मुरारी करी प्रभु पूजन । धूप दीप नैवेद्य पूर्ण । सुमन माला अर्पून । करी नमन साष्टांग ॥ २७ । वार्ता उमगे अद्वैतास । रामासह येती गृहास । मार्गीं होय भावावेश । प्रेमविवश जाहलें । २८ ॥ कोटी सुर्यसम प्रभा । सदनीं पसरे तेंज, निभा सुगंध, पुष्प सौरभ । भोवतालीं दरवळे ॥ २९ ॥ तेजोमय प्रभुवदन । न, हो, स्पष्ट मुर्ति दर्शन । असह्य जाणावे नेत्रांना । मूर्छना आली तयासी ॥ ३० ॥ ठेवूनि प्रभु सन्निध । संज्ञा शून्य आचार्य वृद्ध । दशा निरखी भक्तवृंद । तुच्छ मानी स्वत:सी ॥ ३१ ॥ वदले प्रभु आचार्य देव । आता सत्वरीं उठावे । विध्युक्त पूजन करावें । सफल व्हावें ईप्सित ॥३२॥ प्रेममय वाणीं पडता श्रवणी । बाह्य दशे माजी येंऊन । भोळया बालका समान । पूजन करू लागले ॥३३॥ वय वरुषे सत्तर । श्रेष्ठ मानिती जगन्नाथ मित्र । व्दिज विव्दान अव्दैताचार्य । गुरुवर्य विश्वरुपाचें ॥३४॥ निमाईस खेळवी अंकावर । ऐसा थोर अधिकार । विव्दद्वर्य आचार्य । पूजिती गौरांग श्रध्देने ॥३५॥ केले चरण प्रक्षालन । अर्घ्य पाद्य चंदन लेपन धूपदीप नैवेद्य सुमन । माला अर्पण केंली तै ॥३६॥ करिती प्रभु स्तवन 'नमोब्रम्हण्यदेवाय' मंत्रेण । कंठ गग्दद अश्रुपूर्ण देह स्वाधीन नराहे ॥३७॥ आचार्य पत्नी सीतादेवी । पूजी ठेंवूनि पुण्य भाव । प्रभु चरणाची ठेव । मस्तकीं पावें उभयांच्या ॥३८॥ विश्वंभर पादस्पर्श । तेणें होती भाव विवश । रुदन करिती विशेष । आश्वासिती प्रभु तय॥३९॥

करावें त्वरें उत्थान । व्हावें नाम संकीर्तन । तृप्त व्हावे श्रवण । समाधान द्यावे सत्वरी ।४०।। उभारिल्या दो भुजा संकीर्तनी होती निर्लज्ज । प्रेमाचा चढें साज । लौकिक काज विसरले ।। ४१ ।। नृत्य चालें नुरे शुद्धि । हळुहळु उमटे स्वेद । सात्विक भाव तोषप्रद । दनुवरी उदय पावला ।। ४२ ।। तालस्वरें चाले संकीर्तन । आनंद लुटी भक्तजन । एक रूप प्रेमी तिघेजण । गौर, अद्वैत, निताई ।। ४३ ।। नृत्य चाले अपूर्व । न देखिलें ऐसें भूतपुर्व । प्रेम लक्षणा भक्तिपर्व । पातले, शर्वरी जाहली ।। ४४ ।। संकीर्तन केलें समाप्त । भक्त, प्रेमी जाहले तृप्त । अद्वैत, देवी, कृतकृत्य कृतार्थ वाटे दंपतीसी ।। ४५ ।। लोटले पुढती तीन दिन । अद्वैत गेले निजसदनीं । मनीं जाहले आकर्षण । द्वीपीं परतोन येती तें ।। ४६ ।। श्रीवास गृहीं सहभक्त । प्रभु श्रीकृष्ण कथा करीत । आचार्यासी सत्कारीत । आसनस्थ केला प्रणाम ।। ४७ ।। आचार्य झाले लज्जित । प्रति प्रणाम केला त्वरित । भक्तप्रेमें आलिंगित । प्रभु सन्निध बैसले ।। ४८ ।। परस्पर होती वार्तालाप । विषोद कोटया अमाप । शचिमातेचा निरोप । पाचारावें आचार्य भोजनां ।। ४९ ।। अहोभाग्य मानी अद्वैत । भोजना पाचारी जगन्माता । निमंत्रण केलें स्वीकृत । कथिलें वृत्त मातेसी ।। ५० ।। परी अंतरीं दुःखित । असती आचार्य अद्वैत । आश्वासिलें पूर्वी सत्य । स्वरूप तुजप्रति दावीन ।५१। न होता स्वरुप दर्शन । कैचें चित्ती समाधान । श्रीवासे केलें कथन । प्रभुसमिध सुस्पष्ट ।।५२।। सत्य स्वरुप ते काय मज न कळे अभिप्राय । दृष्टी पडें निज काय । तेचि स्वरुप जाणावें ।।५३।। श्रीवास कथीं नित्यानंदा । जे दाविलें स्वरुप आम्हांस । त्याचीच अपेक्षा विशेष । आचार्या कांक्षा लागली ।।५४।। स्वयें दिधले आश्वासनें । त्याचीं स्मृति देती करुन । आपुलें इच्छे अनुसरण । करणें तें करावे ।।५५।। भावावेशें असता पुर्ण । जे मी गेलो असे वदून । त्याचे मज विस्मरण । बंधन न हो मजलागी ।।५६।। पंडित वदे दीन वदन । कासया आमुचे वचन । प्रभुस्वयं भगवान स्वरुप पुर्ण परब्रम्ह ।।५७।। प्रभुसि विस्मरण । वृत्तीस नपटे भाषण । आपुले लीला सामर्थ्यपुर्ण । स्वेच्छारुपधारी कीं ।।५८।। तुझे मानीं सत्यभाषण परी मीं नसे स्वाधीन । भावने धरी स्वरुप दर्शन । निश्चित जाण वचनासी ।।५९।। आचार्यासी ईशदर्शन । करीता शामसुंदरध्यान । तत्काल हो मनिषापुर्ण सत्यवचन मानावे ।।६०।।आचार्यं नेंत्र झाकळिले

मुखीं कांती पुर्ण। शोभा चित्त होय तण। भक्तजन करी आश्चर्य॥६२॥ प्रभु वदलें भय न धरा। या भक्ती प्रेम प्रकारा
। हृदीं देखिले शामसुंदरा। लुटिती अपार आनंद ॥६३॥ आचार्य भाग्य थोर। चित्ती देखिती ईश्वर। श्रीकृष्णरूप
मनोहर शरीर सर्थक जाहले ॥६४॥ उतरे आचार्य समाधी। शुद्धि येई होई सावध। भक्त प्रश्न करिती विविध
गदगद कंठ होतसे ॥ ६५ ॥ अद्भुत जाहलें दर्शन। श्रीकृष्ण राजीव नयन। मजसामोरे प्रकटोन। भूत भावन गौर
पातले ॥६६॥ वदले प्रभु हास्य करून। गतनीशींचें जागरण। तेणें पडे तुम्हां स्वप्न। तें भक्तजनां कथितसा ।६७।
आचार्यें कथिलें नको वचन। विश्वासें धरी दृढचरण। द्यावे मज आशीर्वचन। दृढालिंगिलें आचार्यें ॥ ६८ ॥
मम मानस तृप्त जाहलें। श्री चरण दृष्टि देखिलें। मागणे कांहीं नुरलें कृतार्थ केले मजलागी ॥६९ ॥
द्यावे वाटे वरदान। दीनाचे करावे उद्धरण। पाखंडी गर्व हरण। अवतार कारण हेंचि ॥७०॥
इतुके झालियां भाषण। भोजनां जाती सारेजण। मातेनें विविध पक्वानें। केलें भक्तजन तृप्तीतें ॥ ७१ ॥
ऐसें भक्त महिमान। किती करावें कथन। मम सामर्थ्य पडे न्यून। सकल देणें हरीचें ॥ ७२ ॥ एकेदिनी गौरहर
रूदन करितीं उच्चस्वरें। पुंडरीक नामोच्चार। येऊं लागे मुखांतूनि ॥ ७३ ॥ भक्त गाती कृष्णनाम। आठविती
पुरूषोत्तम। प्रभु घती भक्तनाम। पुंडरीक विद्यानिधी ॥ ७४ ॥ भक्त पुंडरीक अद्भुत। वाणेश्वर गंगोपाध्याय
पिता। गंगादेवी शुचिमाता। मेखला ग्रामांत जन्मला ॥ ७५ ॥ पिता शाक्त पंथी थोर। सन्मानिती तया कौलाचार्य।
पंथ विरोधी निपजे पुत्र। पंथ खंडन बाल्यी करी ॥ ७६ ॥ द्वीप विद्येचें माहेर। पुंडरीक अध्ययन करी। भागवत
दीक्षा घे सत्वर। माधवेंद्रपुरी पासोनी ॥ ७७ ॥ माधवेंद्र वदे पुंडरीका। मातापिता शक्तुपासक। वैष्णव धर्म
विरोधक। बहिष्कृत करिती तुजलागी ॥ ७८ ॥ पुंडरीक बोले गुरूप्रति। मज प्राणाची नसे भिति। असतां गुरु कृपा
प्रिती। जीवित राही सुरक्षित ॥ ७९ ॥ वचनें जाहलें समाधान। गुरु होती चित्ती प्रसन्न। शिष्य रूपें केलें ग्रहण
अध्ययन समाप्त जाहलें ॥ ८० ॥ विद्यानिधि उपाधी प्राप्त। होऊनि परते चटगावांत। केलें तया बहिष्कृत। खंत
नसे ज्ञातीची ॥ ८१ ॥ गोकुळीं कृष्णलीलेमाजीं। वृष भानुराज व्रजीं। गौर लीले विराजे। पुंडरीक साजे तैसाचि
॥ ८२ ॥ तो हेतु मनी धरिती। गौर बाप म्हणोनि संबोधिती। प्रेमनिधी संज्ञेप्रति। देत विनोदे तयासी ॥ ८३ ॥

करिती हरिनाम प्रचार । आचार्य निधी संज्ञा पात्र । ऐसा पावले अधिकार । प्रच्छन्न राही स्वरूप ।। ८४ ।। पुंडरीक रुप सुन्दर । विलासें शरीर मनोहर । सजे विभवीं रूचि अपार । राजकुमार भासती ।। ८५ ।। विषय भोग सढळ । वैराग्य कैंचें सोज्वळ । तेथ भक्तिचा परिमळ । सुटे दंभ वाटें जनां ।। ८६ ।। पुंडरीक विषयीं भासला । न कळे कुणा अंतंकळा । प्रभु जाणती आगळा । वेगळा वाटे इतरासी ।।८७।। महाभागवत आचार्य । अवस्थानी कैचा विषय । राही, न गणी असामान्य गणीं अपराधी जाणावा ।।८८।। या वृत्तीचे द्यावया शिक्षण विरोध' कुली हो अवतीर्न । पुंडरिक विषयी पूर्ण अंतःवरण नकळे जाणसीं ।। ८९ ।। चटग्रामीं मुकुंद दत्त । अंतरंग प्रभू भक्त । ते जाणतीं मनोगत । पुंडरीका भक्ताचे ।। ९० ।। विरक्त गंगाधर पंडित । महाप्रभु प्रेमी भक्त । महिमा कथीं दत्त अदभुत । पुंडरीक भक्ताचा ।।९१।। वाटें जावे दर्शना । त्वरे निघाले भेटीस । केला प्रणाम पुंडरीकास । दृष्टिस विषयीं भासले ।। ९२ ।। पाहोनि राज विलास । गमले विषय विवश । भक्तीचा नसे लेश । पंडितास आशंका जाहली ।। ९३ ।। जो नित्याचा विषयासक्त । तो कैचा भागवत । मुकुंदे जाणिले मनोगत । तयांत आश्चर्य जाहलें ।।९४।। मुकुंद स्वर मधुर । श्रवणीं आनंद अपार । भक्त जाहले अधीर । आज्ञापी त्वरें पुंडरीक ।।९५।। 'अहोबकीयं' श्लोक भागवत । श्रवणीं भावोन्मत्त होत । तत्काळ जाहले मुर्छित । पुंडरीक विद्यानिधी ।। ९६ ।। तनु होती नटलेली परी भावांत विखुरली । वस्त्रें अस्ता-व्यस्त झाली । मुखभागी रोम पसरले ।। ९७ ।। मधुर स्वरे गायन । वरिवरी व्हावे म्हणून । आग्रह दत्ता लागुन । करती श्रवण श्लोकातें ।। ९८ ।। करवीं श्रवणीं भाव वाढे । तों तों अंगणीं लोळें पडे । अप्राकृत, चरित्र कोडें । प्रेमा गाढ उपजवी ।। ९९ ।। गदाधर जाहले विस्मित । गमें, भक्त विकृत चित्त । हा अपराध, प्रायश्चित । घ्यावे निश्चित केलें तै ।। १०० ।। वैष्णवाप्रति पाप घोर । मन कलुषित या बिचारे । यासी उपाय सान्यवर । घ्यावें सत्वर दींक्षेला ।। १०१ ।। गुरुभाव ठेवितां चरणीं । होय पाप परिमार्जन । मनीचे हृग्दत समजावोन । सांगे तोषोन पंडीत ।।१०२।। मुकुंदास झालें समाधान । चित्त हो सुप्रसन्न । पुंडरिका झालें बाह्य भान । वृत्त कथन केलें तया ।। १०३ ।। विद्यानिधि वदे, वैष्णव । हें पुजावे सभ्दावे । योग्यतेचा मज अभाव । जाणवें मनीं अहर्निश ।। १०४ ।। दीन भावें करिती कथन

एकांत साधी । प्रभु दर्शनें भावसमाधि । देह शुध्दि नुरे तया ॥१०६॥ पुंडरिका देती अलींगन । आनंदे चित्त गेलें भरून । अश्रुधारा स्रवती नयनीं । पुलकित तन होय तै ॥ १०७॥ पुंडरीक अंकीं ठेऊनि शिर । नेत्री वाहे अश्रुधार वस्त्रें जाहली आर्द्र । दोन प्रहर जाहले ॥१०८॥ दोघांचे उडे देहभान । समयाची नुरे कल्पना । प्रभु जाहले सावधान भक्तगणा सन्निध वाहती ॥१०९॥ परिचय दिधला करुन । पुंडरिकाचे महिमान । निज भाग्याचे स्तवन । भक्तगण करु लागलें ॥११०॥ पुंडरिकें केला प्रणाम । मस्तकी रज पादपद्म । धरी संकीर्तन अनुपम । करी भक्तोत्तमा भोवतें ॥१११॥ संकीर्तंन होत असता । बाह्यदशा होय विस्मृत । हरिनाम नयें मुखांत । प्राप्त होई अवस्था तै ॥११२॥ गमन केलें आपुल्यावरीं । गदाधर पृच्छा करि । कामना राहीं अपुरि । प्रभुसि विचारीं तेधवा ॥११३॥तुज होय सुयोग प्राप्त । पुंडरिका सरिस भक्त । गुरु मिळे तुज सत्य । दुर्लभ विरक्त जगी असें ॥११४॥ समय व्यर्थ न जाय । ऐसीं कांहीं धरिं सोय । आज्ञा मिळता धरिं पाय । गुरुमाय म्हणवूनि ॥ ११५ ॥ पुंडरिकें मंत्रदीक्षा देऊनि केला प्रिय शिष्य । ऐसे अधिकारी विशेष । स्तविती गौर जयासी ॥ ११६ ॥ गौर नेत्रीं येती अश्रु । ऐसा जो भक्त पवित्र । त्याचें वर्णावें चरित्र । पात्र नसे सेवक हा ॥ ११७ ॥ प्रच्छन्न प्रभु भक्त । पुंडरीक असती तयांत । त्यांचें पावन चरित श्रुत केलें श्रोतयां ॥ ११८ ॥ ऐसें भक्त चरित रसाळ । कथिलें श्रोतया स्नेहाळ । प्रकट भाव निर्मळ । श्रवणीं फळ लाभें हें ॥११९॥ पवित्र संत चरित । श्रवणीं होय शुद्ध चित्त । मनो धरोनिया हेत । पुढती कथितों सोज्वळ ॥१२०॥ तेराविया आचार्य अद्वैत । त्यासी आत्मप्रकाश अद्‌भूत । दावोनि केलें संतुष्ट । तृप्त संकल्प केलें त्या ॥ १२१ ॥ पुंडरीक विद्या निधी । देऊनि तयां प्रसिद्धी । केली कृपेची वृद्धि । कृतार्थ केले तयासी ॥ १२२ ॥ चौदाव्या अध्यायीं कथा । कथी तियेंची सुरसता । संकीर्तन रासवार्ता । श्रीवास मंदिरी जाहली ॥ १२३ ॥ तीचि प्रेमळ कथा श्रवणीं द्यावें संपूर्ण अवधान । कारण अवधानविण । दीन संत सेवक हा ॥ १२४ ॥ चतन्य विजय ग्रंथरसाळ । आदिलीला प्रसंग सोज्वळ । अद्वैत पुंडरीक कथा मंगल । त्रयोदयांत वर्णिलीं ॥ १२५ ॥ श्रीचैतन्य विजय ग्रंथ, आ० ली० प्रसंग, अद्वैत आत्मप्रकाश, पुंडरीक विद्यानिधी चरित्र कथा कथन नाम अध्याय तेरावा – ओवी १२५

卐

# 卐 अध्याय १४ वा 卐

श्रीगणेशायनमः।। श्रीसरस्वत्यैनमः ।।श्रीगुरुभ्योनमः श्रीगौरचंद्रायनमः। ।। नमन माझे गोपाळकृष्णा । गोपीजन मानस हरणा । गोकुळी लीला नाना । केल्या अंत ना तयासी ।।१।। दशम स्कंधी संपूर्ण । रास पंचाध्यायी कथन । करीता अनुपम कथा श्रवण । योगीजन हेलावती ।।२।। यमुनातीरी गोपाळ । मेळवूनि खेळिलें खेळ । कालिया मर्दन प्रसंग रसाळ । अदभुत वाटें गोपाळा ।।३।। गोपिकांचें वस्त्रहरण । त्यासवें केले रासक्रीडन । तो प्रसंग विवरण । सविस्तर करिती पंडित ।।४।। कृष्णें चोरिलें नवनीत । संवगडी मेळवि त्याकर्मांत । हरिले गोपीचें चित्त । प्रपंची मुक्त केले त्या ।।५।।संसारी सारा व्यवहार । परी चित्ती शारंगधर । जळी अलिप्त कमळपत्र । तैशापरी गोपिका ।।६।। गोकुळी गोपिका भुलल्या । कृष्ण चरणी लीन झाल्या । विषय संबंधें सुटल्या । कृष्णरुप केल्या समस्त ।।७।। रासक्रीडा खेळती गुप्त होय कृष्ण मनी विव्हल राधाराणी । मधुरभाव प्रकटे तै ।।८। तोरास क्रीडा प्रसंग । श्रीवास मंडपीं गौरांग कृष्णरुप धरिती अव्यंग । यथासांग पूजिलें ।।९।। अदभुत रसाळ प्रसंग । चौदावियें यथासांग । कथन करी लागवेग भाग्य उदेले म्हणोनियां ।।१०।। श्रीकृष्ण कथा प्रेंमरस । घ्यावा वाटे अहर्निश । कवनी व्हावा संतोष । विनवी ईशा सेवक ।।११।। व्दीपी श्रीवास भवनी । नित्य होई संकीर्तन । संकीर्तन रासस्थली संज्ञा । श्रीवास अंगण पावले ।।१२।। वर्षपर्यंत कीर्तन रास । गौर निताई, श्रीवास । कीर्तनी दंग अहर्निश । प्रचार केंद्र बने हे ।।१३।। निताई बरी बहुप्रीति विशेष रुपे त्या जाणती । यास्तव श्रीवासःप्रति । वरदैता गौरहर ।।१४।। तुझें गृही मार्जार श्वान । तेही भजती प्रेंमाने । ऐसें निताई महिमान । भावें भजती भक्तजन ।।१५।। जे जें असतो ईशभक्त । पाचारी सवें करु नृत्य । ऐशा लोटती दिनराती । प्रभु संकीर्तनीं रंगलें ।।१६।। नित्य, अव्दैत हरिदास । मुरारी, गदाधर , श्रीवास । विद्यानिधि हिरण्य, गंगादास, । वनमाला, काशीश, नंदन ।।१७।। विजय, बुध्दिमंत , जगदानंद । नारायण , श्रीराम, गोविंदा वासुदेव , गोपी , गोविंदानंद । ब्रम्हानंद , जगदीश , श्रीधर ।।१८।। श्रीमान , सदाशिव वक्तेश्वर, श्रीं गर्भ, [illegible]

विषयासक्त भक्ति प्रेम त्या कैंचें ॥२०॥ पाखंडी नास्तिक जन । त्यांचा नामी विरोध पूर्ण । विचित्र कल्पना कल्पून भक्तजन निंदिती ॥२१॥ करिती नाना आरोप । भ्रष्ट अक्रिय मद्यपी । कर्णकटु वाणि प्रलाप । श्रवणीं होतीं असत्य ॥२२॥ नास्तिकांचे दुर्वचन । दुर्लक्षिती भक्तजन । प्रभु बाह्य ज्ञान शून्य । होती प्रमत्त संकीर्तनी ॥२३॥ प्रभाती प्रारंभ हरिदिनीस । कीर्तन चाले अहर्निश । जागर करूनि प्रभूस । प्रेमवशे आळविती ॥२४॥ नृत्य, क्रंदन, लोळण क्रिये होय आर्द्र पाषाण । संकीर्तन रास दर्शन । घेण्याजन अधीर हो ॥ २५ ॥ संकीर्तन रास थोरवी । किती म्हणोन वर्णावी । गुप्त रूपे देव, देवी । पाहावया येती उतावीळ । २६ ॥ उत्सव न देखिला दृष्टिभरी । व्यर्थ वेचिले कलेवर । स्वतः दुषिती परोपरी । अशक्य होय जयास ॥ २७ ॥ ऐसें रास संकीर्तन । होई श्रीवास सदनीं । पाखंडियां वदनीं । मत्सर, निंदा होतसे ॥ २८ ॥ ऐसे जें का मत्सर ग्रस्त । त्यांसी योग्य मिळें प्रायश्चित्त । पश्चातापें मुक्त चित्त । उद्धार त्वरित होई तैं ॥ २९ ॥ एके दिनीं प्रातःकालीं । श्रीवास गृहीं भक्त मंडळी । बैसली प्रभु पातले । हेलावलें चित्त ते वेळां ॥ ३० ॥ हृदयीं संचार झाला । भक्तजन ठायीं बैसला । आश्चर्य गमलें सकलां । प्रभुलीला देखितां ॥ ३१ ॥ श्री मूर्ति बाजूसि सारून । स्वये बैसले सिंहासनीं । भक्त हृदीं तेजोकिरण । संभ्रम होय सकलासी ॥ ३२ ॥ तेजोमय गौरतनु । पाहतां दिपती नयन । चंडांशु, सुधांशु एकास्थानी । प्रकाशमान होतीं देखिलें ॥ ३३ ॥ स्तब्ध जाहले भक्तजन । सारे रोधिती श्वसन । गंभीर भावें प्रभुचें कथन । तेणें शांत जाहले ॥ ३४ ॥ विधियुक्त करा अभिषेक । फलित कामना सकळिक । आज्ञा होता भाविक । पुलक युक्त हर्षलें ॥ ३५ ॥ श्रीवास आणि गंगाजल । भक्तगण त्यांत मिसळ । सुगंधीं तैलें मर्दिलें । स्नात जाहलें प्रभूचे ॥ ३६ ॥ रेशमी वस्त्र लेवविले । सिंहासनीं बैसविलें । भाळीं चंदन चर्चिले । माला अर्पिली तुलसीची ॥ ३७ ॥ विविध पुष्पमाला । गौर कंठीं घातल्या । नृत्य करुं लागला । भक्तजन आनंदे ॥ ३८ ॥ ऐसें अद्भूत दर्शन । मातेसी व्हावें म्हणून । पाचारिलें तिजलागून । सुत दर्शन व्हावया ॥ ३९ ॥ मातें ! म्हणसीं माझा सुत । बिघडविती त्यासीं भक्त । नव्हे तो तुझा सुपूत । जगत्पिता सकलांचा ॥ ४० ॥ पुत्राचें तेज अपूर्व तैसा अतुल प्रभाव । मातेसीं गमे साक्षात देव । शचिदेव स्तब्ध जाहलीं ॥ ४१ ॥ मातेसी कांही सुचेना । श्रीवास करीं प्रार्थना । प्रभु सत्य स्वरुप दर्शन

। द्यावे दान मातेसीं ॥ ४२ ॥ भावावेशे प्रभु बोलती । वैशणवाची अप्रीति । म्हणून न हो कृपा पात्र । बिडविला पुत्र वदे ती ॥४३॥ वदले तदा अद्वैत । मातेचीं ती वात्सल्य प्रीत । त्या भावे वशीभूत । बोले माता वैष्णवा ॥ ४४ ॥ मनी नसे द्वेशभाव । अवश्य कृपा करावी । श्रीवास कानी सुचवी । माते ! कराबा प्रणाम ॥४५॥ आता नसे तुझा पुत्र अवतरे कीं कृष्णचंद्र । करावा जगोध्दार । हेतु संकीर्तन निमित्तें ॥ ४६ ॥ आचार्य आज्ञा घमान । मानूनि शिघ्र धरी चरण । करू लागले प्रार्थना । अनाथ नाथा कृपा करी ॥ ४७ ॥ मस्तकीं ठेविले चरण । क्षमुनी, केले इप्सीत पुर्ण शंका किमपी नाणीं । नेत्राश्रु येती सानंदे ॥४८॥ केला मातेचा उद्धार । ऋुण मूक्त झाले प्रभु सत्वर । भक्त करिती उपचार । विबीध प्रकार खाद्याचे ॥ ४९ ॥ प्रभुसि भोग लाविर्ती । ते सारे भक्षण करिती । त्याची न करवे गणती प्रेमपूरित भक्त हो ॥५०॥ उदरी पेटला हुताशन । पुढती येती पक्कानें । सारे करिती भक्षण । परिउपशम नसेचि ॥५१॥ करूनि तांबूल भक्षण । प्रसाद देती सकलांना । अमृत युक्त रसना । बोधी भक्तजना सुबोध ॥५२॥ प्रभूची अमृतवाणी । सारे तृप्त झाले श्रवणीं । देहभान हारपे जनी । प्रपंच भान नुरे तया ॥ ५३ ॥ प्रारंभ हो सूर्योदयी पातला संध्या समय । म्हणोनि नाम सप्तप्रहरिया । भाव महाप्रकाश ॥५४ ॥ प्रभुपाचारिती श्रीधरास । भक्तांत जो प्रिय विशेष । दरिद्री अज्ञ इतरे जनास । प्रभुकृपेस पात्र हो ॥५५॥ त्याचा महिमा वर्णिती । श्रीधर प्रकरी प्रभु स्तुति । अष्टमहा सिध्दी प्राप्ति । करविती प्रभु तयासी ॥५६॥ तो वदे माझें वंचन । कशास! मी असे अज्ञानीं सी सिध्दी तुच्छमानीं । सेवादान अपेक्षी ॥५७॥ माझी केळफुले घेई ब्राम्हण । तो माझा प्रभु जाणा । इतुकींच माझी प्रार्थना । द्यावे वरदान मजसी ॥५८॥ ऐसा निरंहकारी भक्त । पाहोनि सारे चकित । प्रभु ज्याते स्तविती । होय जगती कृतार्थ तो ॥५९॥ रामचंद्ररूपे दर्शन । दिधले मुरारी लागून । कृतार्थ केला कृपावलोकने । थोरपन त्याचे वर्णिलें ॥६०॥ तैसे भक्त हरिदास । प्रिय भक्तकृपा विशेष । थोरवाटे तू मजसी । प्रभु तयासी बोलिले ॥६१॥ तुझा छळ केला अपार । घेई माझे शरीरावर । त्याचे चिन्ह अंगावरी । उदारे त्यासी दाविले ।६२। तयां दिधले वरदान । तू भक्ती अधिकारी पूर्ण । होऊनि राहसी निर्मळपणें । दोष नलिपे सत्य हें ६३ यापरी सकळ भक्तास । यथोचित वरदानास

तथास्तु शद्व गौरांनीं । आचार्यां दिधलें वरदान । यापरी सकल तोषोन केलें भक्त कृतार्थ ॥ ६६ ॥ सकल केलें कृतार्थ राहीं परी मुकुंद भक्त कीर्तनीं गानें रिझवी नित्य । भक्त अंतरंगींचा ॥ ६७ ॥ श्रींवास करी प्रार्थना । द्यावें मुकुंदा समन्वयवादी म्हणून । कृपे अपात्र मुकुंद हो ॥ ६८ ॥ भक्तिरस तृप्ति तयास । कैंची असे रे ! श्रींवास । मानी सकल धर्म मतास । लाचार वृत्ति तयाची ॥ ६९ ॥ बैसे जाऊनि तयांत । अव्यभिचारिणी भक्तिमत । विशेष मानीं लोक कल्पित । वदत गौर श्रींवासा ॥ ७० ॥ जाई ज्या मत सभेंत । तेथ तैसी करी मात । चरणावरी एक हस्त । द्वितीय कंठीं ठेंवितो ॥ ७१ ॥ कार्य प्रयोजनीं हस्त जोडी । न साधे तरी डोळे फोडीं । ऐसी वृत्ति बेगडी । घडी वदले अभक्त कीं ॥ ७२ ॥ कदा कपटें द्यावी दैन्य । दातीं तृण येई शरण । अथवा यष्टीनें ताडण । करणीं समन्वय वाद्याचीं ॥ ७३ ॥ यथेष्टाचार न उदारता । भक्ति, अभक्ति एक न होत । तेणें नोहे इश प्राप्त । पयांत इमली नमिळे ॥ ७४ । जे भक्तिसह अन्य साधन । घेऊनि मानिती समान । ते मज मारितीं यष्टीनें । भक्तिपूर्ण स्वतंत्र ॥ ७५ ॥ भक्तींचा करी अभिनय । पूजा कीर्तनादि अनुनय । परि कपट भाव, परिचय । समयीं जाणें, असंतुष्ट ॥ ७६ ॥ त्याचा सारा स्तुतिस्तव । जर्जर वज्रें अवयव । मुकुंदाचें माया लाघव । तैसे मजपासाव होतसे ॥ ७७ ॥ कीर्तनीं बनें भक्त अन्यत्र मायावादी प्रीत । ऐसा मुकुंद पंडित । कृपे निश्चित अपात्र ॥ ७८ ॥ प्रभुचें ऐसें वक्तव्य । पश्चात् भागीं श्रविलें सर्व । अपराधासी उपाव । एकमेव तनु त्यजावी ॥ ७९ ॥ दत्तासी जाहला अनुताप । गेला श्रींवासा समीप । मजवरी न हो कृपा । ऐसे मायबापा विनवा ॥ ८० ॥ अनुताप झाला चित्तीं । नेत्री अश्रुधारा वाहती । ऐसो मुकुंद स्थिति । दुःखित होती भक्तही ॥ ८१ ॥ श्रीवासें कथिला वृत्तांत । कोटीं जन्में हो मुक्त । प्रभु दर्शन हो निश्चित । ऐकतां नृत्य करी तदा ॥ ८२ ॥ कालाचा कळला अवधी । त्यांत प्रभुदर्शन साद्य । तयाचा हृदीं आल्हाद । देह शुद्धि नुरे कीं ॥ ८३ ॥ प्रभूसि वृत्त कळलें । आणि भक्तासि पाचारिलें । दृढ आलिंगण दिधलें । कृतार्थ केलें तत्क्षणी ॥८४॥ तव अपराध हो नष्ट । सरलें सारें देह कष्ट । एकांतिक भक्ति लाभ स्पष्ट । यथेष्ट हृदयीं विराजे ॥ ८५ ॥ तुझे द्वारां लोक शिक्षण । आदर्श हेतु दाखविणे । प्रच्छन्न नास्तिक जाण । उदाहरण त्यां दाविलें ॥ ८६ ॥ समन्वयवादीं म्हणवितीं । ते भक्ति अपराधी असती । चित् जड एक मानिती । अनर्थ समन्वय बादाचा ॥ ८७ ॥ दत्त वदे मी

सेवाहीन । मज नाकळे प्रभु भाषण । तन, मन वचनानें । असे असमर्थ सर्वथा ।।८८।। जाणूनि मुकुंद विराग । निरुपाधी भक्त्यनुराग । वर प्रदान सुयोग्य । केले भाग्य दत्ताचें ।। ८९ ।। तुझी भक्ति मज आवडे । तुझें कृष्ण गान चोखडें । तेथ माझें येणें घडें । जोखड भक्त मस्तकीं ।। ९० ।। तव कंठ सुस्वर । प्रेम भक्तीचा दिधला वर । आतां जेथें माझा अवतार । होसी अधिकारी गायक ।। ९१ ।। यापरी केलें कृतार्थ । पुरविले भक्त मनोरथ । गौर प्रभु समर्थ किमर्थ उणें मजलागीं ।। ९२ ।। शुद्ध भक्ति लक्षण । जना बोधिले प्रभुनीं । मुकुंद मिष करोनी । बोध वचें तोषविले ।। ९३ ।। नानामतें, नानादेव । तेथ कैचा असे भाव । जनांचा लालची स्वभाव । ऐसा असे ।।९४।। समतेचा आणूनि आव । दंभ मानसी सदैव । भोळया भाळयासी लाघव । दाऊनि वंचिती अहर्निश ।। ९५ ।। आपुलिया सुखस्वार्थी । स्वयं सेविती नानापंथ । स्वार्थ सरता तुरे मत । ऐसी मात तयांची ।। ९६ ।। असतीं प्रच्छन्न नास्तिक । जनास वाटती आस्तिक । तयांची जवळिक । दुःखदायी होय ।। ९७ ।। तेथ नसे भक्ति लेश । कैचा असेल ईश । परी बहिरंग वेश । भासें भक्त हरीचा ।। ९८ ।। मांडूनियां भक्ति बाजार । परांतरीं लाचार । वचनीं अति मधुर । सत्वर कार्य साधिती ।। ९९ ।। नानापरीचें वचक । भाविका नातुडे विवेक । भक्ति लक्षण निष्ठंक भाविकासी नाकळे ।। १०० ।। नानासंत नाना पंथ । नाना विद्वान वा मतें । नाना तत्व सिद्धांत । चित्तांत भ्रम । होतसे ।। १०१ ।। तें सारें चित्तीं धरूनि । स्वतंत्र भक्ति लक्षण । बोधिले गौरांनी । ज्ञान दृष्टि दिधली त्या ।। १०२ ।। द्वीपीं श्रीकृष्ण नाम । गृहीगृहीं व्हावे सुगम । योजिलें भक्त परम । नाम हरिदास, निमाई ।। १०३ ।। नित्य चाले नाम प्रचार । प्रयत्न करिती भक्तवर । वाढविती प्रेमादर । बद्ध परिकर जाहले ।। १०४ ।। द्वीपीं जगन्नाथ माधव । संज्ञा जगाई मधाई । क्रूर कर्मे दोन्हीं भाई । द्विज कुलीं जन्मले ।। १०५ ।।

श्लोक :- राक्षसा कलिमाश्रित्य जायन्ते ब्रह्मयोनिषु ।।

राक्षस गण कलीत । जन्मांत द्विज जातीत । ऐसे शास्त्रवाक्य विदित । असे सकल जाणती ।।१०६।। याचें प्रत्यक्ष प्रमाण । हे दोन बंधु संपुर्ण । नदियाचें कोतवाल म्हणून । यवन सेवक जाहले ।। १०७ ।। शरीरीं वसें तारुण्य । तयावरी सत्ता धन । सन्निध सारीं व्यसनें । नीती बंधन ...

त्याची गणती असीम लज्जायमान सभ्यहो ॥११०॥ देव वेद गो विप्र विव्देष । साधु धर्मांचा करिती व्देष माझा त्यावरी रोष । आशु विनाश तयांचा ॥१११॥ अनन्वित दुष्कर्म प्रकार । विशद करावे कोठवर । मदिरा मांस निरंतर व्यभिचार कर्मी शीण ना ॥११२॥ नगराचा यवन काजी धनाने राखिला राजी । कासया तोकरी न बाजी हो वाज कुकर्मांचा ॥११३॥ मार्गी होता दर्शन । जनाशी भींती जाती प्राण । दिनीं कवाडे लाघून व्यवहार टाकूनि राहती ॥११४॥ जगीं सारीं पातकें । त्याची करीती जवळीक । ऐसे दुरात्मे अविवेकीं । छळें लोक त्रस्तले ॥ ११५ ॥ आहार विहार अनिर्बंध । करितीं वैष्णव निंदा । हाचि नित्याचा धंदां । न पडे फंदी तयाच्या ११६ एकदां मदिरा निशेंत । होते संचार करीत । निताई भेटीं मार्गांत । अवचिन जाहली ॥ ११७ ॥ श्रीहरिकीर्तन जागर जाहलिया । निघे माघारी । श्रीमहाप्रभु घरीं । मध्यरात्रीं पातले ॥ ११८ ॥ दुष्ट विचारी नशेंत । काय नाम नेत्र नेत्र आरक्त । नांव असे अवधूत । कथिलें विनोदे तयासी ॥ ११९ ॥ अवधूत नाम श्रवण । होता मधाई क्रोध पूर्ण शिरी खापर मारी फेकून । रुधिर वाहे भळभळा ॥ १२० ॥ निताईची वृत्ति शांत । जगाई आवरी त्वरित । सत्वर पातलें शचिसूत कोधें सुदर्शना बाहतीं ॥ १२१ ॥ नित्यानंद बोले प्रभुजी । जगाई निवारी बाजीं । त्यावरी कृपा कराजी । होऊनि राजी प्रसन्नले ॥ १२२ ॥ प्रभु दर्शन होतां । पालटे माधाई चित्त । जाहले दोघे अनुतप्त । क्षमिले त्वरित उभयां ॥ १२३ ॥ जाहले प्रभु कृपापात्र । त्यजिले जीवन विचित्र । ईशसेवी, संतसत्पात्र । पापवृत्ति त्यजिली तें ॥ १२४ ॥ उभय जाहले कृतार्थ । दुष्टदस्यु भागवत । केले प्रभु सामर्थ्य । जनांत प्रकटलें नामाचा लागे छंद । लागें सत्संग नाद । उच्चस्वरे रुदत । कठोर तप आचरितीं ॥ १२६ ॥ प्रभाती करोनि स्नान । भेटे त्याचे वंदिती चरण । कृष्ण मुखीं उच्चारण । सफाई करणे घाटाची ॥ १२७ ॥ गंगाघाटी स्वच्छता । ईशभक्ति मानिती । येती त्या ईशमूर्ति । मानूनि सेवा करितसे ॥ १२८ ॥ माधाई तप प्रभाव । ब्रह्मचारी संज्ञा पावे । निर्मल गंगातीर अपूर्व । गौरव होय तयाचा ॥ १२९ ॥ संज्ञा माधाई घाट । पावे प्रसिद्ध गंगाघाट । द्वीप प्रदक्षिणेची वाट । मायापुरी मार्गात ॥ १३० ॥ यापरीं भक्त उद्धार । निताई, हरिदास मनोधैर्य । दुष्टाशी दयाकार्य । मानुनि सुष्ट करिती तें ॥ १३१ ॥ दुष्टांचा केला उद्धार । शुद्ध जाहले कलेवर । हा सत्संग महिमा थोर । दुष्टपण घालविलें

॥ १३२ ॥ हा सत्संग प्रभाव । जाई दुष्टत्व भाव । दुर्लभ, अमोघ, शिव । नारद भक्ति सुत्र कथी ॥ १३३ ॥ निमाईचा महाप्रकाश । मुकुंद उद्धार विशेष । दुष्टांचा दुष्टावा निःशेष । निमाला अशेष सत्संगें ॥ १३४ ॥ करूनियां विस्तार । श्रोतया कथिले सविस्तर । पुढील अध्यायीं लीला प्रकार । सादर कथीं भक्तासी ॥१३५॥ चैतन्य विजय ग्रंथरसाळ । आ.लीं, प्र. सोज्वळ । संकीर्तन रास प्रभुमहाप्रकाश मंगळ । मुकुंद जगाई, मधाई उद्धार चौदावियां ।१३। श्री. चै. वि. ग्रंथ, आ. ली. प्रसंग- संकीर्तन रास क्रीडा निताई प्रभु महाप्रकाश मुकुंद- उध्दार जगाई माधाई उध्दार कथा कथन नाम अध्याय चोदावा समाप्त ओवी सं १३६



## 卐 अध्याय १५ वा 卐

श्रीगणेशायनमः ॥ श्रींसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीगौरचंद्रायनमः ॥ नमन माझें संतजना । तुम्ही ईश्वरांश जाणा । देव गौरवी भक्तांना । श्रेष्ठपणा देऊनि ॥१॥ देवां कष्टविलें साहें । भक्तां गांजिले न साहे ऐसे ब्रीद्र वा पाहे । दास राहे भक्ताचा ॥२॥ तो वैकुंठीं नसे जाण । नसे सूर्य मंडल त्याचें स्थान । योगियां हृदि वास्तव्य करून न राही आण तयाची ॥३॥ भक्तगाती ठायी ठायीं । वास्तव्य करी हृदयी । तेथ मनसोक्त राही ब्रीद्र पाही दे वाचे ॥४॥ नामदेव करुणा कीर्तनी । देव नाचे उभा रंगणी । संतुष्ट हो चक्रपाणी । सन्निधानी उभा ठाकला ॥५॥ हरी नाम संकीर्तनी । भक्ता भक्त कळतीं दोन्ही । आपुली बृत्ति गुढ ठेवोनी । न तगती भक्तजनापुढे ॥६॥ दिसो लागे त्यांचा दंभ । ईश चरणीं नसें लोभ । लोक काजीं हेतु लाभ । कीर्तनीं क्षोभ तेणें हो ॥ ७ ॥ अभक्त बहिरंगे नटती । कीर्तनीं क्षोभाची नसे खंतीं । भय नसें अल्पहीं चित्तीं । स्वार्थप्रीती मानसी ॥ ८ ॥ ऐसें जे कां अभक्त । त्यावरी प्रभु असंतुष्ट । पश्चातापें दग्ध चित्त । कृपापात्र होय तो ॥ ९ ॥ विश्वंभर लीला [illegible]

घडले तें लागवेगी । कथि सत्वर श्रोतयां ॥१०॥ अध्यायी गौरांग लीला । वर्णन करी सकला । जेणें हरि तुष्टला सजला कृपा कराया ॥११॥ तरी श्रोते द्या अवधान । आम्रवृक्ष कथा श्रवण । करा शुल्कांबर भक्तजन । भावना ठेवी प्रभुपदी ॥१२॥ स्त्रीचा हस्तस्पर्श होता । प्रभुसि कळे वार्ता । तेणें चित्ती हो व्यथा । परिसा वृत्त सकळिक ॥१३ सुवर्णसेन वृत्तांत । करी या अध्यायांत । चंद्रशेखर चरित । कथी सविस्तर भक्तांसी ॥१४॥ दारी सन्यासी दांभिक वृत्त कथी सवळीक । इये अध्यायी देख । जवळीक व्हावी संताची १५श्रीवास गृहीं संकीर्तन । चाले व्दारे बंद करून निंदिती बहिर्मुखजन । अप्राकृतपण नकळे की ॥१६॥ एके दिनीं संकीर्तनी । मालती माता बसे छपून । कुतुहल ठेवी मनी । पाही हान्यातून गौप्यें ती १७ संकीर्तन रास नायक । नृत्य करी मनोवेधक । उल्हास नसे स्वाभाविक । भाविका कथी यें समयीं ।१८। या स्थलीं बहिरंग व्यक्ति । छपूनी असे निश्चित । तेणें चित्त दुश्चित । हान्यात मालती देखिली ।१९॥ श्रीवास घरी केशपाश । बाहेर ओढीं तियेस । नास्तिक तू तेणे उल्हास । केला नष्ट संकीर्तनी ॥ २० ॥ तियेस घालवीं बाहेरी । कीर्तन करी गौरहरी । आनंद लुटिती परोपरी । भक्त मधुर नामाचा ॥ २१ ॥ नास्तिक वृत्ति विशेष । सत्ववृत्ति करी नाश । दांभिकत्वाचा आवेश । भरुनि राही सर्वथा ॥ २२ ॥ करुनि कपटाचा अव्हेर । बाहेर घालवी सत्वर । प्रसन्न होती भक्तवर । गजर करी सानंदे ॥ २३ ॥ अद्वैताचार्य भक्तवर । अंतरंग भक्त गौरहर । शिवराम सदृश परस्पर । अपूर्व संबंध जोडिला ॥ २४ ॥ संकीर्तनीं मूर्छित । होती एकदां शचिसुत । चरण रेणु आचार्ये त्वरित । सर्वांगीं चर्चिली ॥ २५ ॥ सावध झालिया गौरहर । करू लागले नृत्य मधुर । पुर्वभाव न राही स्थिर । चित्तव्यग्र जाहले ॥ २६ ॥ कथिली भक्तासी भावना । अद्वैतें केलें कथन । चरण रज म्यां चोरुन । केलें लेपन सर्वांगा ॥ २७ ॥ क्रोधें केली लटकी भाव । येणें हारपे माझा भाव । वदलें लीला लाघव केलें. स्तविती आचार्या ॥ २८ ॥ स्वमुखे भक्त महिमा । बाढविती, यासी नसें उपमा । अव्दैताचार्य परम । संतोषे चरण सेविती ॥ २९ ॥ नवव्दीपीं शुक्लांबर । विष्णु भक्त व्दिज ब्रह्मचारी । कृष्ण नाम मुखीं गजर । करीं आनंदे अहर्निश ॥ ३० ॥ निर्वाह करी भीक्षेवरी । जन वदति हा भिकारी । अपुर्व भक्तीची थोरी । इतरां न कळे ॥ ३१ ॥ विष्णु भक्त आधिकार । जानती योग्य विश्वभंर । भिक्षा आणितां शुक्लांबर । बळे सारित्ती मुखात ॥ ३२ ॥ ईश्वर भावाचा

भुकेला । तुच्छमानी अर्थाला । भुलें भोळ्या भावला । करु लागें दास्यत्व ॥३३॥ चोख्याची ओढी ढोरे । कनक कशि पूशि गुरू गुरें । चंदन घासे साहाणेंवर । नाथा घरी प्रीतीने ॥ ३४ ॥ सावत्याची भाजीं खुडिली । कबिरांचे विणी शेले । भोजनीं स्वाद चा खीला । भुले, कण्यासी विदुराच्या । ३५ । भगीनीचें भाजिपान । खाउनि करि रक्षण । नामा नैवेद्य समर्पण । करी, प्राशान दुग्धाते ॥३६॥ ऐसे होत अनंत भक्त । निर्लज्ज होई, करी प्रित । प्रभुचि ऐसी रीत । भक्तिनें वस्त स्विकारी॥ ३७ ॥ ऐके दिनी विश्वभंर । प्रभु वदले शुक्लांबर । भोजन घालीं बा ! मधुर । स्वयें करी पाकाते ॥३८॥ तुझीया हस्ते भोजन । करावें ऐसें इच्छून । तुजसी करी कथन । भय न धरीं मानसीं ॥ ३९ ॥ ऐकुनि प्रभु प्रार्थना । ब्रह्मचारी दीन वचनें । वदे, मी भिक्षुक पतितजन वंचन कासया करीतसा ॥ ४० ॥ म झियें मनीं करावें भोजन । न करी तु अनमान ॥ येथ नसे गा वंचन । आज्ञा प्रमान मानी गा ॥ ४१॥ शुक्लांबरें केलें स्नान । नाम स्मरणें पाक करून । ठेवी प्रभुसह भक्तगण । पातले सत्वर भोजना ॥४२॥ केला नैवेद्य समर्पण भक्तासह केले भोजन । करून गुणवर्णन । केला विश्राम कुटीरी ॥ ४३ ॥ भक्त असला दिन । भावें हों प्रभु प्रसन्न । करि तयासीं कृपादान । थोरपण हेंचि प्रभुचे ॥४४। निशाकाली एकेदिनीं । नृत्य संपवीतीं संकीर्तनी । पाद स्पर्श करी स्त्री अज्ञानी । वरी वरीं नेणूनि आचरी । ४५॥ दृश्य देखिले प्रभुनी । स्पर्शें व्यथित होती मनी । उडी घेती तत्क्षणीं । स्नानार्थ गंगापात्रात । ४६॥ नित्यानंद हरिदास । पात्रा बाहेरी आणिती प्रभुस । यामिशें भक्तगणास आदर्श आचरे दाविती ॥४७॥ साधक जीव गृहस्थ । यति वा पालखीं पदस्थ । गुरू गोस्वामी वेषात । आचार ध्यानी असावा ॥४८॥ स्त्री करवी चरण सेवा । परमार्थी नसें ठाव । हा ठेंऊनि मनि भाव । पर स्त्रीं स्पर्श त्यजिला की ॥४९॥ जनासि हाचि उपदेश । भक्ता शिक्षा देती आदेश । परमार्थी व्हावा हव्यास । आज्ञा सकलास प्रभुची ॥५०॥ यवन शिष्याचा देखोनि भाव । स्वरुप दाविलें अपूर्व । प्रेमें वेंढावे सर्वथैव । आश्चर्य थोर भायाचे ॥५१॥ त्यासी कृतार्थ केला । प्रायश्चित दिधलें निंदकाला । जो का नाम महिम्याला । मानी तुच्छ सर्वस्वें ॥५२॥ त्या निंदकासी पाहून सचैल केले गंगास्नान । निंदक मनीं तापपूर्ण शरण । चरणीं पातला ॥५३॥ भक्तगण ...

रोंविलें त्या स्थाना । देखता वृक्ष जाहला ॥५५॥ त्यासीं आलीं आम्रफळे । ती झालि पक्क रसाळे । दोन शते तोडोनि फळें प्रभु सन्निध ठेविली ।५६। जले स्वच्छ धुवोन । कृष्णासि नैवेद्य अर्पुन । प्रसाद दिधला भक्ता लागून । ग्रहण केला सकळिकें ।५७। आम्रफलाची अपुर्वता । देखता आश्चर्य होय भक्ता । एक्याफलें क्षुधावार्ता नाशिली तृप्त जाहले ॥५८॥ वैष्णव जन हो तृप्त । गौरप्रभु झाले संतुष्ट । भक्त आंगणी वृक्षीं सतत । फले येऊ लागली ।५९॥ व्दादश मास वृक्ष फळें । हे तो आश्चर्य आगळे । नगर संकिर्तन वेळें । आम्र महोत्सव होतसे ॥६०॥ आम्र महोत्सव स्थान आम्र घट नामाभिधान । तयाची स्मृति अनुदिन । जनी राहीं नित्याची ॥ ६१ ॥ अहो मायेंचा आम्रवृक्ष । हा प्रभुलीला विशेष । ईश्वर सेवेचा उद्देश । असें तयात ॥ ६२ ॥ सत्ययुगीं सुवर्ण सेन । नामें राजा वैभव पूर्ण । होता अति सुखासीन । भोगिता वार्धक्य पातलें ॥ ६३ ॥ पूर्व पुण्य असे थोर । पातले तेथ वैष्णववर । श्री नारद मुनीश्वर । गजर मुखी नामाचा ॥ ६४ ॥ राजा विषयीं संपुर्ण । अतिथी सत्कारी व्यसन । वैष्णव सेवे वेची तन । पूजन केलें ऋषींचें ॥ ६५ ॥ मुनिवर जाहले प्रसन्न । केले तत्वोपदेश प्रदान वैराग्य उपजे तेणें । स्थान माहात्म्य कथियलें ॥ ६६ ॥ मुनि वदले हे राजन् । कलियुगीं यास्थानीं । गौरांग होती अवतीर्ण । महिमान असे येथीचें ॥ ६७ ॥ संग घेतीं भक्तजन । करिती लीला प्रकटन । अद्भूत प्रेमें गाती गुण । संकार्तने तारीती विश्वास ॥ ६८ ॥ धन्य कलिचें महिमान । अवतीर्ण होती नारायण । केंव्हां येई पुण्यक्षण । गौरांग गान मुखी ये ॥ ६९ ॥ प्रभु गुण गाती नारद । गौरांग नाम वाटें सुखद । केलें गमन, राजा सुखद । नाम घेई सप्रेमें ॥ ७० ॥ नृत्यांत वाटे आनंद । राज्य वैभव तोडिला बंध । निद्रेमाजी सुखद । अपूर्व स्वप्न देखिलें ॥ ७१ ॥ भक्तासह गौरहर । हरेकृष्ण वाचे गजर । नृत्य करिती मनोहर । राजद्वारो पातले ॥ ७२ ॥ सप्रेमें देती आलिंगन । कृतार्थ केलें सकल जन । कांति असे सुवर्ण । प्रेम प्रदान करिती ते ॥ ७३ ॥ स्वप्नीच्या दृश्यें राजा जागृत । गौर विरहे हो त्रस्त गौर नामे आक्रंदत । दैवी वाणीं परिसलीं ॥ ७४ ॥ हें राजन् ! न सोडी धैर्य । कलिमाजीं गौर अवतीर्ण । होय, घडे सेवा कार्य । बृद्धिमंतखा नामे कीं ॥ ७५ ॥ श्रवर्णी पडेवाणी । राजा होय समाधानी । बुद्धिमंतखा नामाभिधानी । कलींत राजा पावला ॥ ७६ ॥ झाला महाप्रभु भक्त । भक्त असोनि धनवंत । द्विज कुलीं जनन वसत । प्रभु गृहा

सन्निधीं ॥ ७७ ॥ वायु व्याधि निमित्त । प्रभु स्वसदनीं पीडित । असतां कृष्ण प्रेमें आर्त । व्याधि विव्हळ वाटे जनां ॥ ७८ ॥ आणवूनि चिकित्सक । ओखद दिधलें निःशंक । रोगाचा होतां अतिरेक । समयी द्रव्य वेची तो ॥ ७९ ॥ मागील कथेचा आठव । गैरांचा द्वितीय विवाह । श्रीमंतीच्या विभवें । बुद्धिमंते केला अपूर्व ॥ ८० ॥ स्वयें जाहला यजमान । वरपक्षाचा आभिमान । राजपुत्र कार्यासमान कृती करुनि दाविली ॥ ८१ ॥ द्रव्य व्दारा प्रभु सेवा । सत्संगाचा लुटी मेवा । विषय लोभी धनिका हेवा । भाग्य ठेवा भक्त होंय । ८२ । आचार्य चंद्र शेखर । व्दीपीं वास्तव्य मायापुर । संकीर्तनास्तव आगार । व्रजपत्तन नामे ख्यात जे । ८३ । कृष्ण लीला नाटच आभिनयन । प्रथम येथ प्रवर्तन । तेणें ख्यात व्रजपत्तन । जनीं माग्यता पावलें ॥ ८४ ॥ हरिलीला अभिनय । करावा प्रभू मनीं ये साधन सामग्री संचय । बुद्धिमंता आज्ञापिलें ॥ ८५ ॥ सामग्रीचा केला संग्रह । सुरू जाहला महोत्सह । पात्रांचा अपुर्व उत्साह । लक्ष्मी वेष धारी प्रभु ॥८६॥ दृश्य पाहण्या जितेंद्रिय । अधिकारी देखें नृत्य । निग्रह शक्ति सत्य । राहे स्त्रीरुप देखता ॥८७॥ वदले श्रीवास अव्दैत । आम्ही अपात्र निश्चित । आम्ही निग्रहा असमर्थ । शिक्षण हे तुजवास्तव ॥८८॥ वदले प्रभु चिंता न करा । तुम्ही सारे योगेश्वर ! माझ्या दर्शने अणुमात्र । मोह न पावाल ॥ ८९ ॥ रामकृष्ण हरि बोल । हरि बोल हरि गोविंद गोपाल । नामे नृत्य करू लागले । नाना पात्राभिनये ॥९०॥ गौरांचा सुंदर वेंष । योग माया मूळ प्रकाश रुक्मिणीचा भावावेंष । गौंर हरीस जाहला ॥९१॥ मोह पावलें सारेजन । मातृभावें करिती नमन । आदि शक्ति नृत्यगानें । निताई मुर्छना पावले ॥ ९२ ॥ महालक्ष्मी बैसे आसनीं भक्त करिती स्तवन । कृपाशीर्वाद पूर्ण । द्यावा ऐसें याचिती ॥ ९३ ॥ यापरी आनंदोत्सव । सात दिन अद्भुत प्रभाव । राही प्रकाश अपूर्व । सकला जाणीव जाहली ॥ ९४ ॥ सिंहासनीं शक्तिभाव । गोपीनाथा वात्सल्य भावें । उत्संगीं स्तनपान करवी । तैसें सुखवी भक्तातें ॥ ९३ ॥ लक्ष्मी रुक्मिणी पार्वती । नारायणी, दयादि भावींती । त्याभावें स्तन पान होत । भक्त मत्त प्रेमरसे ॥ ९६ ॥ स्तन पाने दुःख हरवीत । असतां जाहला प्रभात । देवी भाव जाई त्वरित । प्रकृतिस्थ प्रभु जाहले ॥ ९७ ॥ एकदां

(श्री चैतन्य विजय आदलीला)
प्रभु मानसी । तें बिकट केलें हास्य । पातलें घरासी उभयतां ।। १०० ।। काषाय वस्त्रावेष धारी । पाहोनि केला
नमस्कार । आसनीं बैसवी यतिवर । सह गौर निताईसी १०१ तयां दिधला आर्शीर्वाद । विद्या, धन, वंशवृद्धि । वचन
ऐकतां विशद । केलें, आशी नसे हा । १०२ । विष्णु भक्ति व्हावी प्राप्त । हें आशीर्वचन सत्य । आपण संन्यासी प्रतिथ
वदले, अनुचित कैसें हें १०३ प्रभूचें स्पष्ट वचन । यतिवदे श्रवण करून । स्यां आशो प्रसन्न मनें । दिधला बाल म्हणोनि
सुंदर कामिनी, धन दौलत । याविण जीवित व्यर्थ । कैची शरीरी विष्णुभक्ती । वास करी अर्थेविण ।। १०५ ।।
वदले गौर संसार सुख । इच्छूनि नमिले देख । अनपेक्षि रोग दुःख । दैवें तनु फळ भोगी।। १०६ ।। विषयीं मानव
रूचि । देखे वेद काम्य कर्मं प्ररोचा । विषय लोभे अभिरुची । सत्कर्मीं वाढे निश्चित ।। १०७ ।। विषय लोभा कारणें
सत्प्रवृत्तीची कास धरणें । या उद्देशें फलश्रुति वर्णनें । केला असतीं वेदीं कीं ।। १०८ ।। वस्तुतः कृष्ण भक्ती ।
घडो वर हाचि युक्त । संन्यास दीक्षेत्र आयुक्त । धारिष्ट होय वाणीचें । १०९ ।। प्रभु वचन ऐकोनी । निंदी
कटुवचनीं । तीर्थ यात्रा प्रौढो गानीं । ज्ञाना एसें भासवी ।। ११० ।। मुर्खस्य नास्त्यौ पंथ । व्यर्थ होय प्रभु बोध ।
स्तवनें नित्यानंद । आतिथ्य स्वीकारी तयाचें ।। १११ ।। दोघे आसनीं झालें स्थिर । वार्ता करिता परस्पर । संन्यासी
गौरवी गौरहर । फलाहार देवोनी ।। ११२ ।। कुटीमाजीं सुंदर नारी । यति तियेसी पाचारी । उभय पंथी वामाचारीं
बंगाला अघोरी ख्यात ते ।।११३।। स्त्रीवदे आणिते आनंद । गूढ भावी अर्थ मद्य । परिसता नित्यानंदे । पृच्छा करिती
गौरहर ।।११४।। आनंद संकेती मद्य । तुम्हासी तें निषिध्द । विष्णु विष्णु वदे शचिनंद । दुःखद वाटे चित्तासी
।।११५।। करूनिया आचमन । तत्काळ सोडिलें आसन । त्वरे केले पलायन। गंगेमाजीं पहुडले ।।११६।। यति धावला
त्वरित देखे पोहतां गंगेत । प्रभु भावावेशें उदकीं स्थित । शांतिपुर तटीं पातले ।।११७।। तटी करोनि स्नान । त्वरें
गाठतीं अव्दैत सदन । आचार्ये केला सन्मान । भावें प्रश्न कथियेला ।।११८।। ज्ञान श्रेष्ठ की भक्ति । प्रश्न ऐसा
आचार्या प्रति । ज्ञान श्रेष्ठ ऐंसी उक्ति । श्रवणी येई प्रभुच्या ।।११९।। क्रोधें दापिलें आचार्यास । प्रभुचा भावावेश
कृपादृष्टि लोभे विवश । साहतीं आचार्य चपेटें ।।१२०।। ज्ञानापासाव भक्ति श्रेष्ठ । सकला कथिले स्पष्ट देखोनिया
कृपादृष्टि । कृतार्थ केलें आचार्या ।।१२१।। उपरी सुग्रास भोजन । करोनि झाले सुखासीन । गृही पातले व्दितीय दिनीं

निताई प्रभु उभयता ॥१२२॥ ऐसे हें चरित्र । दारीं यतींचें विचित्र । नाममार्गी अघोरपक्ष । शाक्त म्हणवी आपणा ॥१२३॥ प्रत्यक्ष मातेंचा अविर्भाव । स्तनपान करविलें सर्व । ऐसें चरित्र अपूर्व । भक्तास्तव करीं गौरहर ॥१२४॥ संन्याशास्तव त्वरीत । मज्जन केले गंगेत । स्त्रीस्पर्शे पाप महत । आदर्श भक्ता दाविला ॥१२५॥ ऐसे चरित्र लीला कथन । केलें मानावें संतोषोन । पुढील कथा निरुपण । षोडशाध्यायी निरुपिलें ॥१२६॥ चै. वि. ग्रंथरसाळ । आ. ली. प्रसंग सोज्वळ । विविध लीला आम्रोत्सवमंगळ । शुक्लांबर चरित ।१२७। स्त्रीस्पर्श कथा कथन । तैसे चरित सुवर्णसेन दारी यतींचें वामाचरण । वर्णिले साग्र पंधराविया ॥ १२८ ॥ इति श्रीं चै वि, ग्रंथ आ. लीं. प्रसंग विविध लींला आम्रमहोत्सव, शुक्लांबर चरित स्त्रीस्पर्शकथन सुवर्णसेन चरित, दारिसन्यासी चरित कथा कथन नाम अध्याय पंधरावा समाप्त अ. स, ओं. सं. १२८



# अध्याय १६ वा

॥ श्री गणेशायनम ॥ श्री सरस्वत्यैनम: ॥ श्री गुरुभ्योनम: ॥ श्री गौरचंद्रायनम: ॥

परम ग्रंथ भागवत । कृष्णलीला वर्णिली जय त । भक्ति प्रेम सरिता नित्य । निर्मळ वाहे ॥ १ ॥ ज्ञानगर्भ वेदान्त । अध्यात्म काव्य साहित्य । अलंकार प्राप्त अमित । करी पुनीत पाठकां ॥ २ ॥ जेय भगदवतार । वर्णिले असंख्य भक्तवर । ध्रुव प्रल्हाद, कपिल थोर । चरित्रें पवित्र जयांचीं ॥ ३ ॥ भागवंताचे दशावतार । वेदस्तुति ज्ञान गभीर । अंबरीष भक्तवर चरित्रें थोर वर्णिलें ॥ ६ ॥ दशम स्कंधीं कृष्णकथा । वर्णनीं असे अपूर्वता । योगीजन प्रेमें गाता । विसमरती देहांतें ॥ ५ ॥ एकादश स्कंध पवित्र । परमार्थ, वेदांत अपार । जीवाचें सार्थक [illegible]

(श्री चैतन्य विजय ...)

नमन तयातें ॥ ७ ॥ ग्रंथ भक्तीचा अव्हेर । करी पंडित मान्यवर । विश्वंभरें केला तिरस्कार । अध्यायीं सार वर्णिलें
॥ ८ ॥ नित्यानंद तत्व ओळख । देवानंद नेत्रीं अंजन चोख । सब निंदेचा दोख । माता करी तियेसी ॥ ९ ॥ तत्काळ
देती पटवून । केवळ पुत्र प्रेम म्हणून । पश्चात ब्रह्मचारी जाणून । केलें पावन तयासी ॥ १० ॥ केला काजीचा उध्दार
विश्वरुप पाहती आचार्य । ऐसें चरित्र पवित्र । सकळ अध्यायीं वर्णिलें ॥ ११ ॥ तरी अवधानाचा चारा । घालूनि
वाढवा मज पामरा । हीच विनति भक्तवरा । उदारा संतसेवकाची ॥ १२ ॥ एकदा निताई विश्वंभर । बैसले श्रीवास
घरी । तेथ पातले मुरारी । नमस्कारी उभयासीं ॥१३॥ प्रथम नमिले गौरहर पश्चात निताईसी नमस्कार । वदले प्रभु
शिष्टाचार । सोडिला असें मुरारे ॥१४॥ तू स्वगृही गेलियावरी । कळेल तुजसी थोरी । ऐकूनि बोल मुरारी आश्चर्य
करी चित्तीं हे ॥ १५ ॥ निशी निद्रा अवसरीं स्वप्नीं दृश्य पाही मुरारी । जातां मल्ल देशांतरी । नांगर
हस्तीं निताईच्या ॥ १६ ॥ शेष शिरी फणा उभारी । वाटे शेषें धरिलें छत्र । पश्चात भागीं विश्वंभर । व्यजनें
निवारी तापातें ॥ १७ ॥ हास्य करिती विश्वंभर । निताई बंधु असे थोर । सुचवी स्वप्नाभीतर । नित्यानंद तत्व
जाणवी ॥ १८ ॥ दुसरें दिनी नमन । निताई श्रेष्ठ जाणून । प्रथम तया लागून । करी उपरा गौरांगा ॥ १९ ॥ हास्य
करिती विश्वंभर । वदले वदलें व्यवहार । मुरारी वदे प्रकार । आपुलिया प्रेरणेचा ॥२०॥ वचन ऐकूनि तुष्ट । होऊनि
केली कृपा दृष्टि । देतीं तांबुल उच्छिष्ट । मुरारीस भक्षावया ॥२१॥ भाई ऐसें संबोधून । गुप्तास दिधलें आलिंगन
नित्यानंदाची ओळखण झाली तुवा ॥२२॥ कृपाप्रदान केले । मुरारीं गृहीं परतले । भोजनासी बैसविलें । भार्ये
वाढिलें मृष्टान्न ॥ २३ ॥ अन्नग्रास कृष्णोद्देशे । भूमीवरी अर्पी भक्तिवशे । जाणून दुसरें दिवशीं । गुप्तगृहीं येति प्रभु
॥ २४ ॥ पूर्व दिनीं दिधलें अन्न । मज झालें अजीर्ण वाटे करावे जलपान । व्याधी शमन तेणे हो ॥ २५ ॥ करिती
प्रभु जलपान । गौरतत्व ओळखण । झाली आली मूर्छना । मुरारी गुप्ताना तें वेळीं ॥ २६ ॥ जाणुनिया भक्तभाव
ईशकृपा राही सदैव । गौरविती गौरमाधव । भाग्य मुरारी गुप्ताचें ॥ २७ । एकदां श्रीवास मंदिरीं । चतुर्भुज मूर्ति
गौरहरि । गरुड नामे पुकारी । प्रकटे भाव मुरारीस । २८ । प्रभूसि घेतलें स्कंधीं । द्वापरीं तत्स्वरूप उपाधी । सेवा केली
ती शुद्धि । भक्तास तो जाणवी । २९ । आणिलें स्कंधीं वाहूनि । पातले श्रीवास आंगणीं । नाचूं लागती करिती भ्रमण

भक्तवर्णी भाग्यातें ।। ३० ।। ऐंशा बहुविध लीला । करुनि उद्धरतीं भक्ताला । ऐसा स्वभाव आगळा असे, प्रेंमळ गौरांचा ।। ३१ ।। विद्यानगरीं देवानंद पंडित । तपस्वी, ज्ञानी, विरक्त । मोक्षेच्छा करीत । भागवत पाठ करीतसे ३२ भागवत महाध्यापक । हृदयीं वसे भक्ति सम्यक् । मूक्तीचीं वासना देख । संत कृपेविण पोरका ।। ३३ ।। एके दिनीं प्रभु गौरांग । मार्गे जाता लागवेग । श्रवणीं अध्यापन सांग । पडें. क्रोधें उसळले ।। ३४ ।। बा रे ! शास्त्रज्ञ पंडित । अर्थाचा करिसी अनर्थ । कृष्ण विग्रह, ग्रंथ सत्य । भक्तिविण नाकळें ।। ३४ ।। चित्तीं नसे भक्ति प्रेमा । । न जाणें वैष्णव महिमा । श्रद्धा हीना ग्रंथ गरिमा । न कळे अपात्र स्पर्शासी ।। ३६ ।। तुळसी गंगा भागवत । तैसा भगवंताचा भक्त । हीं भगवद्‌रुपें निश्चित । शास्त्रांतरीं वर्णिलीं ।। ३७ ।। जो कां शुष्क हृदय । त्यासी कैसा लाभ होय । केवळ ज्ञानाचा पर्याय । ग्रंथाध्याय व्यर्थ तया ।। ३८ ।। भागवतीं अचिंत्य ईश बुद्धि । जाणे अर्थसार भक्तिशुद्ध । तो अधिकारी त्या प्रबोध । एकांतिक भक्त हरिचा ।। ३९ ।। तुज ज्ञानाभिमान । करिसीं श्रीवास अवमान । ग्रंथ ऐकतां भावपूर्ण प्रेम विवश जाहला ।। ४० ।। पांठात आले विघ्न । शिष्याकरवीं सेचिलें आंगणीं । ते साहिलें आपण । मौन धरिलें तें वेळीं ।। ४१ ।। हा अपराध वैष्णवाचा । करुनि धनी झाला पापाचा । वाक्प्रहारें देवानंदाचा । समाचार घेतला ।। ४२ ।। पंडित अनुतप्त जाहला । तत्काळ शरण पातला । क्षमा याचि श्रीवासाला । जाहला पात्र कृपेसी ।। ४३ ।। भक्ति योगाचें अधिष्ठान । ठेंवूनि करीं ग्रंथ प्रवचन । भागवतीं श्रद्धापूर्ण । भक्ताग्रणी जाण तो ।। ४४ ।। श्रीमद्भगवतार्थ । देवानंद मिषें केला विख्यात । त्याचें सत्स्वरूप यथार्थ । पाठकास ज्ञात करविलें ।। ४५ ।। आपुलिया मातामिषें । । सकल जना उपदेश । साधु निंदा होय दोष । कृष्णकृपे पारखा ।। ४६ ।। मांता करी अपराध । तें वृत्त करीं विशद । जनास होय बोध । शुद्ध चित्त व्हावया ।। ४७ ।। मातेचें वात्सल्य प्रेम । ज्येष्ठ विश्वरूपावरी परम तो स्वीकारी सन्यासाश्रम । अद्वैताचार्य सहवासें ।।४८ ।। ज्येष्ठ पुत्र विरक्त । गौर त्याचि मार्गांत । आचार्यांची संगत । कीर्तनी प्रमत्त होतसे ।। ४९ ।। न गणी संसार सुख । सदा अवलोकीं श्रीमुख । कारण आचार्य प्रमुख । चित्तवृत्ति हरविती ।।५०।। नित्य करीं उच्चार । हाचि मातेचा अपराध घोर । वात्सल्य प्रेमे आचार्य । दुषी हृदय

केलें वरप्रदान । श्रीवास करिती प्रार्थना । मातेची कां अवहेलना । कृपेसी निष्ठुर जाहला ॥ ५२ ॥ प्रभू वदले श्रीवास प्रेमदान न हो मातेस । केलें वैष्णवापराधास । वाचेस क्षीण व्यर्थ कां ॥ ५३ ॥ वैष्णव अपराध मार्जन । कराण्या मी समर्थ न । अंबरीष क्षमा याचन । जैसें केलें दुर्वासें ॥ ५४ ॥ अपराध केला भक्ताचा । अधिकार न चलें देवाचा भक्त परिहार करी त्याचा । गेलिया शरण ॥ ५५ ॥ पुत्र प्रेमवशें आचार्य । माता दुषित दुरुत्तरे । हा अपराध असे थोर । क्षमायाचना तयांची ॥ ५६ ॥ तै होई ममकृपा । प्रेम भक्ति मार्ग सोपा । नष्ट करील तरीच कोपा । दोष मुक्ति तदा हो ॥५७॥ मातेचीं ही अवस्था । आचार्या कळविली वार्ता । श्रवणीं झाले स्तंभित । करित स्मरण विष्णूचें ॥५८॥ जिचें उदरी गौरचंद्र । मी असे तिचा पुत्र । यशोदा. देवकी माता थोर । शचिदेवि तीच होय ॥ ५९ ॥ तिने यावें मज शरण । माझें यांत सत्य मरण । का मारिलां अजाणपणें । चरण सेवक सत्य मी ॥ ६० ॥ करीतां माता वर्णन । प्रेमनिष्ट होती, विस्मरण । बाह्यदशा, लुप्त पूर्ण । देहभान विसरले ॥ ६१ ॥ दशा जाणूनि मातेनें । चरण धुळी मस्तकी ग्रहण । केला झाली विव्हळतूर्ण । जन गर्जली उच्चस्वरें ॥ ६२ ॥ प्रभूचें प्रसंन्न वदन । वैष्णवापराध नाशन । हो विष्णूभक्ति साधन । प्राप्त होय मातेसी ॥ ६३ ॥ मातेचे केलें निमित्त । जनां दाविला भक्तिपंथ । वैष्णव साधु संत । देवाहूनी श्रेष्ठ दाविलें ॥ ६४ ॥ त्यांनी करु नये निंदा । बाधा शिणो न कदा । नरक प्राप्तीचा धंदा । करा कासया फुकाचा ॥ ६५ ॥ देवाहूनि संत थोर । देवासी अभिमान अपार । देव होमे प्रेमें चाकर । निरंतर भक्तगृहीं देवाचा अपराध केला । तो क्षमा करा तयाला । परी भक्त द्वेषी जाहला । वैरी देव तयाचा ॥ ६७ ॥ भक्तास्तव वज्रपंजरु । भक्त उणें पुरे करी । ऐसी प्रभुची थोरी । भर्णावी किती म्हणोनी ॥ ६८ ॥ विरक्त, बाळ ब्रह्मचारी । तपस्वी फल दुग्धाहारी । कीर्तन श्रवणा मंदिरीं । गुप्त ठायीं बैसला ॥ ६९ ॥ कीर्तन प्रारंभ जाहला । चित्ती मोद ना स्फूर्तीला । कारण कळतां गौराला । वदले तत्काळ भक्तासी ॥७०॥ कोणी बहिरंग मनुष्य । या स्थली करीं प्रवेश । निष्पाप ब्रह्मचारी श्रद्धावश । येई दर्शनास कथियलें ॥ ७१ ॥ शोधे घालविला बाहेर । वदले त्यां गौरहर । करुनियां दुग्धाहार । मम प्राप्ति इच्छिसी ॥ ७२ ॥ तपी संन्यासी ज्ञानी झाला । मज शरण नाही आला । व्यर्थ जीवनी शिणला । प्राप्ती नोहे कदा तयां ॥ ७३ ॥ गजेंद्र वानर गोपी गोप । यांनी केलें

नाही तप । भक्ति वर्धे आपोआप । मत्स्यरूप जाहले ॥ ७४ ॥ ब्रम्हचारी सदनी गेला । पश्चातापे पूर्ण न्हाला । माझा भाग्योदय जाहला । दर्शन होई प्रभूचे ॥७५॥ पश्चातापे पोळला । तदा गौरे पाचारिला । केला कृतार्थ तयाला । चरण ठेविले मस्तकी ॥७६॥ तपस्येचा अभिमान भक्तीत गेला जिरोन । भागवदभक्ति सोपान । प्राप्त करावी हरिकृपा ॥७७॥ जप तपादि साधनें । भक्ति विणें होती न्यून । यास्तव हरिपदी लीन । व्हावें जनास मार्ग हा ॥७८॥ मी वैकूंठीचें ठायी नसें । अन्यत्र कोठे न गवसे । जेथ भक्त प्रेमे गातसे । हृदयी विलसे तयाच्या ॥७९॥ प्रथम हरिनाम प्रचार । होई श्रीवास मंदिरी । प्रेमी भक्त थोर थोर । उच्चस्वरे गर्जती ॥८०॥ उपरीं व्दिपी घरोघर । बाढें संकीर्तन गजर । वाद्य मृदंग करताल । घोष होय अहर्निश ।८१। द्विपीचा राजा यवन । हिंदुत्व टाकी करपुन । सत्ताधारीं भवेभन नामस्मरन न हो ॥ ८२ ॥ चांदकाजी फौजदार । नवव्दीपी सत्ताधारी । हिन्दु प्रजा निराधार । यवन सत्तें जाहली ॥ ८३ ॥ प्रकट पणें कीर्तन । न करी, कोणी धर्माचरण । करणें तरी गुप्तपण । राखोंलागें ॥ ८४ ॥ ऐसा कठीन समयाला गौरहरी अवतरले । उच्चस्वरे गर्जले । व्दीप जाहले पुनीत ॥ ८५ ॥ गौरांचा आविर्भाव । जना वाटला माधव । जगोदोध्वार मनी भाव । धरीं व्दीपी पातला ॥ ८६ ॥ जनांसी गौर आधार । दुष्ट साधीती वैर । मानसी राही अनादर धर्मबाहय वर्तती । ८७ ॥ वाढता प्रभुप्रभाव । भक्त वाढविती वैभव । दुष्टासी वाटे हेवा । त्रास द्यावा हेत मनी ॥ ८८ ॥ काजीस केली चहाडी । नी स्वजना घाली बादोडी । परधार्जीणी वृत्ती हाडी । खीळे, चाले परंपरा ॥ ८९ ॥ घरोघरी संकीर्तन । आंम्हा त्रास निष्कारण । नित्य होय जागरण । गौर शिकवण जनांस ॥ ९० ॥ करावे त्वरे निवारण । अधर्माचे परी मार्जन । तक्रार करिती दुर्जन । सत्य काजीस वाटलें ॥ ९१ ॥ दुर्जनांची ऐके फीर्याद । काजी घेई तयांची दाद । जाती कीर्तनवाले निर्वंध । सदना सन्निध श्रीवास ॥ ९२ ॥ कीर्तन प्रेमी भक्तजन । संकीर्तन करी प्रेमान । काजी फोडीं, मृदंग जाऊन । वदे कठोर वचन तैं ॥ ९३ ॥ कोनी करील कीर्तन । त्यासी करीन यवन । विशेष रुपे दंडन । करु वदोनी परतला ॥९४॥ संकीर्तनी आले बिघ्न । प्रभुसी केले निवेदन । तैं कुध्द होवून । प्रभु देती आदेशा ॥ ९५ ॥ गल्लीं गल्लीं करा गान । उच्चस्वरें निर्भय मन । [illegible]

अद्वैत, हरिदास, नित्यानंद । वार्ता देती अत्यानंदे । पताका सडा, समार्जनादि । सदनें सजली सर्वत्र ॥ ९८ ॥ चाले
हरिनाम गजर । पुष्पें उधळती परस्पर । असंख्य पातलें नारीनर । दिंडीमाजीं आनंदें ॥ ९९ ॥ ठायीं ठायीं पंचारती ।
घेऊनी प्रभूस ओवाळती । स्त्रियासी आशीर्वादिती । नाम गर्जती उत्साहें ॥ १०० ॥ प्रभूंचा प्रचंड मेळा । नगर
भ्रमणार्थ निघाला । काजी सदनीं पातला । उमटला ध्वनी नभांत ॥ १०१ ॥ काजीस कळे वृत्तांत । स्वामी परी
भीतिग्रस्त । दडे जाऊनि सदनांत । चित्ताग्रस्त मन हो ॥ १०२ ॥ प्रभू काजीस बाहती । परी त्यास वाटे भीति जन
आश्वासी तयाप्रति । तैं सन्निधी ठाकला ॥ १०३ ॥ हिंदु धर्मोपासना । कां करिसी विटंबना । इस्लाम धर्म वंचना ।
करूनि लाभ कायसा ॥ १०४ ॥ तया केले नानाप्रश्न । नाना सिद्धांत कथन । इस्लाम धर्म प्रमाण । देतां काजी
निरुत्तरे ॥ १०५ ॥ कथन करी काजी वृत्त । तोडितां मृदंग वादित्र । चमत्कार घडे रात्रीं । प्रकटे मूर्ति भयंकर ॥१०६।
देखे मानव शरीर । परी हरिसम शिर । मूर्ति दिसे भयकर । हृदय देशीं बैसली ॥ १०७ ॥ क्रोधे दांत ओठ चावून ।
बोले भय दावून । शकले करिसी मस्तीनें । मृदंगाचें ॥ १०८ ॥ फाडी काळीज, करी निर्वंश । बोले मूर्ति आवेशें ।
नखे विदारी अंगासी । चिन्हें तयाची दावी ॥ १०९ ॥ एसे नरहरीचें कृत्य । काजी कथी प्रभूसि सत्य । भृत्याचें
नवल वृत्त । पुन्हा कथीं ॥ ११० ॥ कीर्तनी व्हावें विश्वास । धाडीं, म्हणोनि भृत्यास । तों अग्निज्वाला मुखास ।
लागे, दाढी पेटली ॥ १११ ॥ जळाले रोम, मुख दग्ध । झाले, हो बहुखेद । नवल पुन्हां करी विशद । आश्चर्याचे
॥ ११२ ॥ हिंदु वदे हरि हरि । पर वस्तु हरण करी । करणे असे बया चोरी । म्हणोनि हरि उच्चारी ॥ ११३ ॥
ऐसा केला परिहास । बहु बदे उपहासें । जिव्हा झाली विवश । वदू लागे हरिहरि ॥ ११४ ॥ माझी इच्छा असे नसे
परी वैखरीं हरि वसे । भृत्यें कथिलें ऐसें । परिसें, वृत्त अद्भूत ॥ ११५ ॥ काजीस होय अनुताप । नामाचा ऐसा
प्रताप । कृतार्थ हो यवनप । उद्धरीला सत्वरीं ॥ ११६ ॥ बाळ नाचूं लागे यवन । गौरहरि तया प्रसन्न । अशुभ होय
नाशन । करी याचन भक्तीचें ॥ ११७ ॥ पुढती संकीर्तनीं विघ्न । नये ऐसी करी प्रतिज्ञा । काजी चरण स्पर्शून ।
वदला प्रभुचरणासी ॥ ११८ ॥ मी आणि माझे वंशजें । कदाहा बाधा नुपजे । ऐसें करिन सहजें । चालिजे कीर्तन
निर्भय ॥ ११९ ॥ ऐसे देऊनियां वचन । चांद काजी गेला शरण । करू लागे संकीर्तन । गौर भक्ति प्रेमें तो ॥ १२० ॥

नगर भ्रमण समयीं । काजी वंशज देती सहाय्य । अधुना तयाचा प्रत्यय । येत असे ॥ १२१ ॥ भाळीं टिळा गळा माळा मुखीं नाम वेळोवेळां । यवन धर्माचा आळ । निर्मळ चाले परंपरा ॥ १२२ ॥ मायापुरी काजीं समाधि । हिंदु दर्शन घेती निर्बंध । मृदंग ताडन उपाधि । केली स्थान प्रसिद्ध हों ॥ १२३ ॥ खोल भांगार डांगानाम । सिद्ध असे स्थान माहात्म्य । यवना देती आराम । कीर्तन मिषें गौरांग ॥ १२४ ॥ चांद काजीचा उद्धार । वंशज तरले आजवर । संकीर्तन माहात्म्य थोर । घरोघर जाहले ॥ १२५ ॥ जनता जाहली निर्भय । गौर जाणूनि सदय । भरे भक्ति प्रेमें हृदय । लोक बाह्य नृत्य करी ॥ १२६ ॥ मोडिलें पाखंड बंड । जिरविलें नास्तिक उंदड । अघोर पंथ्यांचें थोतांड । थंड झाले भक्तिपुढें ॥ १२७ ॥ झाले सारे कलाहीन । मंत्र तंत्र गेलें जिरून । उद्घोष चालें संकीर्तन । पावन झाले शरणार्थी ॥ १२८ ॥ एकदां आचार्य अद्वैत । गोपी भावें कीर्तन नृत्य । करितो श्रीवास अंगणांत । समाप्ति मार्ग दिसेना ॥ १२९ ॥ तया भक्तें केलें स्थिर । स्नानार्थ श्रीवास गंगेवर । आचार्य कृष्ण प्रेमे रिभोर । वारंवार जाती आंगणीं ॥ १३० ॥ आचार्यांची आर्त दशा । कळली महाप्रभुस । तयें नेलें विष्णु मंदिरास । केली बंद कवाडें ॥ १३१ ॥ पृच्छा केली आचार्यास । तव काय अभिलाषा । कृष्णावतारी अर्जुनास । दाविलें विश्वरुप ते दावा ॥ १३२ ॥ ऐसें श्रविलें प्रभूनीं । दिव्य चक्षु तया देवोनी । दाविल्या विश्वरूप दर्शनीं । जिष्णु मनीं प्रसन्नला ॥ १३३ ॥ नानारूपें, आकृति । सहस्त्रशतें दिव्य असतीं । तयातें वर्णू किती । अपूर्व विश्वरूप तें ॥ १३४ ॥ आदित्यवसु अनेंक । मरुद्गण रुद्र कित्येक । अश्विनी कुमार देख । अदृष्ट पुर्व आश्चर्य ॥ १३५ ॥ सचराचर जगत । तूं असें पाहू इच्छिन । तें मम ऐश्वर्य स्वरुपी स्थित । अवस्थित एकास्थानी ते ॥ १३६ ॥ तुज असे जें जें देखणें । कृष्णस्वरुप माझिये असणें । पाही समाधानाचें पारणे । फेडूनि घेईजें ॥ १३७ ॥ मानवी चक्षुव्दारा । मज पाहणें दुर्धरा । म्हणोनि दिव्यचक्षुव्दारा । सुलभ केला पार्षद ॥ १३८ ॥ यापरी विश्वदर्शन । कृतार्थ केला दावून । आचार्य पावे समाधान प्रभु अवस्थे पावले ॥ १३९ ॥ भक्ताची मनकामना । पुर्ण केली गौरानी । कळला ते नास्तिकाना । अधिकार गौराचा ॥ १४० ॥ उध्दरिला काजी यवन । आचार्या विश्वरूप दर्शन । ऐसें असंख्य भक्तजन । कृतार्थ केले ॥ १४१ ॥ संत

श्रोतया समस्त । श्रवण करी तत्राग्न । हो त्वरीत ईशकृपा ॥१४३॥ प्रभुचरणी करी नमन । पुढिल अध्याय कथन । करा मज कृपा दान । संतसेवक याचक हा ॥१४४॥ चै. वि. ग्रंथ रसाळ । आदिलीला प्रसंग सोज्वळ । नित्यानंद तत्व दर्शन मंगल । देवानंद भक्ति प्रदान ॥१४५ । संतनिंदेपासून मातेचे केले बिमोचन । ब्रम्हचारी उध्दरण । कृपा वितरण काजीसी ॥१४६॥ अव्दैता विश्वदर्शन । करविलें केले समाधान । षोडशाध्यायी संपुर्ण वर्णिले यथार्थ ते ॥१४७॥ श्री चैतन्य विजय ग्रंथ आ. ली प्रसंग नित्यानद तत्वदर्शन देवानंद भक्ति प्रदान माता संत निंदा विमोचन । ब्रम्हचारी उध्दरण काजी कृपा वितरण अव्दैत विश्वरूप दर्शन कथन नाम सोळावा अध्याय ओ सं १४७ एकुण १८१८



## 卐 अध्याय १७ वा 卐

श्रीगणेशायनम: ॥ श्रीसरस्वत्यैनम: ॥ श्रीगुरुभ्यो नम: ॥ श्री गौरचंद्रायनम: ॥

नमन माझे वैष्णवभक्त । जे का ईश मनोभक्त जयाच्या भजनें भगवंत । संतुष्ट होय ॥१॥ वैष्णव मुखें कृष्णनाम । भक्तिसुख श्रेष्टपरम । नाम जीवींचा विश्राम । भवभ्रम मिटे सत्वर ॥२॥ वैष्णव सेवा ईश सेवा । भगवत्प्रेम हा विसावा । सत्संग नित्य लाभावा । सात्विके धावा उपजवी ॥३॥ त्या सत्संगाचा लाभ चित्ती संसार क्षोभ । उपजे मनीं नित्य लोभ । वैष्णव संग लाभता ॥४॥ जनी करी संत सेवा तीं फावली विठ्ठल देवा । दळीं दळण देई विसावा । भक्त भावा तोषोनी ॥५॥ वैष्णव सेवेचें महिमान । नारदा गावले भगवान । परम वैष्णव मानीं जन । नामे पुनीत वैखरी ॥६॥ त्या वैष्णवाची भक्ति । कहनी पावली मुक्ति । दुःखी दासीची विरक्ति अध्यायी वर्णिली ॥७॥ सत्संगाच्या लाभार्थ । झाला जरी मृत सुत । संकीर्तन न सोडी भक्त । श्रीवास चरित परियेसा ॥८॥ वैष्णव सेवेचे फल । कैसे मिळे तत्काळ । त्याचे चरित्र रसाळ । सादर परियेसा ॥९॥ गृहस्थ धर्मी श्रीवास

भक्त्या प्रभु केलें वश । चालें संकीर्तन विलास । होतसे नृत्य आंगणी ॥१०॥ आंगणी नृत्य चालें । घर्मानें होई आंग ओलें । स्नानादिकर्म सगळे । श्रीवास स्थळी होतसें ॥११॥ घरीची एकना दासीं । दुःखीं नाम तियेसी । करी नित्यसंत सेवेसी । भरी गंगाजल गृहीं ॥१२॥ विपुल जल स्नानास । दे श्रीवास करी तोष । समाधान वाटें प्रभुस । विपुल जल देखतां ॥१३॥ जल साठवी कोण भक्त । दुःखीचें कथिले वृत । सेवा करीं शुध्द चित्त । सकलासि आज्ञापितीं ॥१४॥ भावें करी संत सेवें । तिचें नाम दुःखी रहावे । मज न वाटे बरवें । सुखी तियेसी संबोधा ॥ १५ ॥ वैष्णव गृहीची सेविका । वैष्णव सेवा पण निका । जगीं तयाच्या सुखा । अंतपार लेखा नसे ॥१६॥ प्रभु कृपा प्रसाद । होतां सुखीसी आनंद । भक्ता वाटे अति सुखद । सुखी नामे बाहती ॥ १७ ॥ तिचा दासी भाव बिराला । जी सेंवी गौरहरीला । भक्त मानुनि तिजला । वागवी श्रीवास मंदिरीं ॥ १८ ॥ दासीचा केला उद्धार । केलें नाही तप कठोर । कंद, फळ दुग्धाहार । नसे श्रद्धा सेवेचीं ॥ १९ ॥ अंतरी भाव अपार । मानूनि प्रभू ईश्वर । सेवा केली निरंतर । भक्तींने उद्धार जाहला ॥ २० ॥ विद्या पांडित्या, वा धन । तप केले दारुण । परी भक्ति प्रेमाविण । कृष्ण प्राप्ति नोहेचि ॥ २१ ॥ श्रीवासाचा शुध्द भाव । आदर्श रूप सदैव । गृहस्थ असोनि वैष्णव । ईश सेवा करीतसे ॥ २२॥ संसारीं मानव जिवन नित्य असे दुःख पूर्ण । सुखाचे अनूसंधान । आचरुन तेणें दाविलें ॥ २३ ॥ शास्त्रीं, गृहस्थ गृहव्रत । हें दोन प्रकार असता हरि सेवेत राही रत । गृहस्थ जागावा सर्वार्थी ॥ २४ ॥ त्याचा आत्मा देह गेह । पुत्र परिजन सर्वंही । कृष्णसेवें रत राही । तो संसारी सुखी असे ॥ २५ ॥ अतिथी साधु संतर्पण क्षुधित, याचक दीन । त्याचे करी समाधान । तो सुखासीन ससारी ॥ २६ ॥ जो असे गृहव्रत । संसारीं राहे आसक्त । गृह, परिवास, कांता, सुत, इतुके मनी सर्वस्व ॥ २७ ॥ त्यासी नाही देवधर्म । न करी कदा सत्कर्म । दानी उपजे शरम । इंद्रियाराम पूर्ण तो ॥ २८ ॥ इंद्रिय सुख, सुख मानी । तदर्थ सर्वस्व करी हानी । मानपान, मेळवणी । ध्येय मानी गृहव्रत ॥२९॥ तो पाप पुण्य रूपीं । दुःख सुख भोगी अमूप । आयुष्याचें करी माप । जन्ममरण भोगाया ॥ ३० ॥ श्रीवासाचा संसार । आदर्श खरोखर । येथून संकीर्तन प्रचार । प्रकट जाहला विश्वांत ॥ ३१ ॥ गृहस्थ धर्म पालन । करी नित्य संकीर्तन । गौरांचें भजन स्थान । श्रीवास सदन जाहले ॥ ३२ ॥ गौरसंकीर्तन [illegible]

समिधारूप रुप जाहला ॥ ३३ ॥ म्हणोनि श्रीवास सदन । झालें भूवकुंठ भुवन । विषय कलि पलायन । संकीर्तन गृह जाहलें ॥ ३४ ॥ एकदां घडें चत्मकार । संकीर्तनार्थ येती गौर । श्रीवास भजन मंदिरीं । कीर्तनीं जाहला उन्माद ॥ ३५ ॥ व्याधिग्रस्त पंडित सुत । प्रिय एकुलता होत । परलोकी अकस्मात । गमन करिता जाहला ॥ ३६ ॥ सर्वत्र हो हाहाकार । आक्रंदती नारी नर । मातेती दुःखभार । पुत्र प्रेमें न सांहवे ॥ ३७ ॥ माता पितयां संसारी वृद्धत्वी विश्राम आधार । पूर्वजन्म दुष्कृत घोर । मृत्यु होय पुत्राचा ॥ ३८ ॥ आकांत श्रवणीं पडतां । श्रीवास येती गृहांत । सकला शांतवीत । प्रबोधित नारीजनां ॥ ३९ ॥ आक्रोश करा बंद । प्रभुसि किर्तन छंद । गौर साक्षात् गोविंद । प्रेमानंदे नृत्यति ॥ ४० ॥ ज्यांचिया नामस्मरणीं । पापी वैकुंठ भुवनीं । ते गौरहरी सहगणीं । कीर्तनीं डुल्लती । ४१ । ऐशा पुण्य समयीं । ज्याचा येथ मृत्यु होई । तयाकारणें शोक काय । व्यर्थ होय अजाणता ॥ ४२ ॥ मला मिळे ऐसें भाग्य । मानिलें असतें सौभाग्य । शोक करणें अयोग्य । पुण्य समयासीं ॥ ४३ ॥ तुम्हीं संसार धर्मारत । शोकावेग न आवरत । प्रभु संकीर्तनीं मस्त । तयांत विघ्न पाप हें ॥ ४४ ॥ कीर्तन चाले अभंग । आक्रोशें होये भंग । बाह्य दशा प्रसंग । आलिया, योग्य नसें हें ॥ ४५ ॥ कीर्तनीं आलिया विघ्न । गंगेमाजीं देह समर्पण । करी हे ध्यानीं आणा । जाणा निश्चय मम हा । ४६ ॥ पंडिताचे ऐंसे बोल । ऐकतां होती अबोल । प्रभु भक्ति मर्म सकला । जागविलें ॥ ४७ ॥ धन्य श्रीवास पंडित । निर्मळ तुमची कृति । पुत्र दुःख आपत्ती । भक्ति पुढती हारविली ॥ ४८ ॥ उत्कट भगवत् भाव । हा पूर्व सुकृत ठेवा । संत संतोवा मेवा । मिळता दुःख कैसेनी ॥ ४९ ॥ वदूनियां, संकीर्तनीं । लीन प्रभु चरणी । शोक, मोह नुरे मनीं । परमानंदे नृत्य करी ॥ ५० ॥ भक्तांसी वृत्त कळलें । तें सारे स्तब्ध राहिलें । प्रभू स्वयें वदलें । चित्त जाहलें दुश्चित ॥ ५१ ॥ वाटे पंडिता घरीं । दुःख असे कांहींतरी । कहर उठे भीतरीं । प्रचीत ये मजलागीं ॥ ५२ ॥ वदे श्रीवास पंडित । जेथ चालें किर्तन, नृत्य । दुःख न राही निश्चित । भावना सत्य मम असे ॥ ५३ ॥ अन्य करिती कथन । पंडित सुत देहावसान । तयां दुःख दारुण । नृत्यप्रेमे रोधिले ॥ ५४ ॥ अडीच प्रहर काल । कीर्तन भक्तीचा सुकाळ । चालें अति निर्मळ । विघ्न येईल म्हणोनि ॥ ५५ ॥ न कथिले कवणासी दुःख गिळीलें मानसीं । चालविलें संकीर्तनासी । ऐसीं प्रीत भक्तीची ॥ ५६ ॥ करितां श्रवण वृत्त । गहिवरे प्रभुचित्त

खरा एकनिष्ठ भक्त । त्याची संगत न तुटें ।। ५७ ।। मजवरी अगाध प्रेमा । पुत्र शोके सांडिली सीमा । त्यासी गौण मानी महात्मा । भक्ति निर्णय घेंई तो । तो भक्त माझा प्राण । सत्य प्राप्त पद निर्वाण । तयाचे संगती सुख पूर्ण मजलागी होतसे ।५९। इतुके करुनि कथन । मुक्तकंठे करिती रुदन । संचित हो भक्तगण । कळें न पुढतीं काय तें ।६०। पुत्राचा अंत्य संस्कार । करण्या जन सत्वर । पातले वचन हळूबार । वदले गौर शिशूसी ।। ६१ ।। कलियुग महिमान पित्याआधीं पुत्र मरण । हें प्रारब्ध कर्मे जाण । पूर्व पाप प्रकटलें ।। ६२।। पंडिताचे पूर्वकर्म । भक्तियोगे जाहलें भस्म । संतसेवा अनुपम । केली परम प्रीतीने ।। ६३ ।। त्यासी देऊनियां दुःख । गृह त्यागिसी देख । तुजसीं काय तेथ सुख । कारण वदे गमनाचें ।। ६४ ।। येथ भक्तिचा आनंद । पंडितासी भक्ति छंद । नृत्यकिर्तन अनिबंध । प्रासादी होतसे ।। ६५ ।। त्याचा मानूनि कांटाळा । अन्यत्र लाभ आगळा । तनु त्यागूनि निराळा । जाऊं पाहसी ।६६। ऐकता प्रभुवचन । आश्चर्ये देखे भक्तजन ! तो मृत शिशु मुखातून । तात्विक वाणी उमटली ।।६७।। आपुल्या इच्छेचें बिधान । त्यासी अन्यथा करणें । ऐसा समर्थ कोण । मज कारणे सांगा ना ।।६८।। प्रभु आज्ञा प्रमाण । मानूनि योजिलें प्रस्थान । ईशनियमोलंघन । करणे घडे अधर्म ।।६९।। ईशसृष्ट जे नियम । तें पाळावे हा स्वधर्म । त्यातचि लाभ परम अंती शांती लाभ हो ।।७०।। मम बास्तव्य सौभाग्य । सरे म्हणोनि करी त्याग । या सदनाचा वियोग । मर्यादे कुरिता ।।७१।। इतुके केलें राहणें । आतां अन्यत्र लागे जाणे । कोटी नमस्कारी श्रीचरण । पार्षदगणासहित ।।७२।। माझे सहस्रापराध । पोटीं घाला करा शुध्द । श्रीदर्शनें प्रबोध । हो झालों पुनीत ।।७३।। त्यजीत असतां सदन । हो पवित्र श्रीदर्शन पूर्वसुकृताविण । लाभ अपूर्व केवींघडे ।।७४।। म्हणोनी केला नमस्कार । पश्चात सोडी कलेवर । पुत्रवाणीतत्व प्रचूर ऐकोनी दुःख विसरले ।।७५।। पंडीत सपरिवार । प्रभुसि करिती नमस्कार । सकलां आला गहिंवर । प्रेमभक्ती याचिती ।।७६।। प्रभो आम्हा प्रतिदिन । यावी बिपत्ति द्या दान । चरणीं आसक्ति पूर्ण । अनुदिन वाढवी ।।७७।। संपत्ती वा विपत्तीत । उत्तम दिन तो सत्य । आपुले स्मरण नित्य । होई कृतार्थ व्हावया ।।७८।। श्रीस्मरणा वांचुन सुना होय जो दिन । तीच विपत्ती दारुण । मजकारण जाहली ।।७९।। जनन वा मरण । तैसे [illegible]

शांती लाभ तयासी ।।८१।। कृष्ण नामाचा विशेष । शोक, मोह जाय निशेष । संसारी नराही आस । धरी कास भक्तीची ।।८२।। प्रपंची जो जो व्यापार । ती कृष्ण सेवा मानी अंतरी । चराचरी देखे कंसारी शिकवण तुमची ।।८३।। ऐकोनी पंडित वचन । चित्ती हेलावे शचिनंदन । मी नित्यानंद सुत दोन । असता दुख कासया ।।८४।। पुत्र शोकादि दुःख । न स्पर्शे तुज देख । तुझिया दर्शने सकळीक । दुःख मुक्त पैं होती ।।८५।। देऊनि आशीर्वचन । पंडिता होय समाधान । मृत मुतासी घेऊन घोष करीत निघाले । ८६।। सकल पातले गंगातीरी । यथोचित केला संस्कार बालकाचा झाला उध्दार । केले स्नान गंगेचे ।।८७।। श्रीवास मृतसुत । अदभूत कथिले चरित । परिसता शुध्द चित्त संसारीं दुःखित जीव न हो ।। ८८ ।। येतां किंचित आपत्ति । जीव दुःश्चित हो चित्ती । संतांचीं न ढळे मन शांती तुच्छ मानिती संसार ।। ८९ ।। ऐसें उत्कट भाव चरित । कथिले जीं तुम्हांप्रत । पुढील अध्यायीं संन्यासा । व्हावे मनांत गौरांच्या ।। ९० ।। तो संपूर्ण कथाविस्तार । करी श्रोतयां सविस्तर । चित्तीं असावें निर्भर । भाव धरोनियां ।। ९१ ।। चैतन्य विजय ग्रथ रसाळ । आदिलीला प्रसंग सोज्वळ । दुःखी दासी, चरित मंगळ । श्रीवास सुत कथा सतराविया ।। ९२ ।

श्री चै. वि. ग्रंथ, आ. ली. प्रसंग दुखी दासी संत सेवन श्रीवास पुत्र निधन कथा कथन नाम अध्याय सतरावा

ओवी संख्या ९२ एकूण संख्या १९१०



## 卐 अध्याय १८ वा 卐

।। श्री गणेशाय नमः ।। श्रींगुरुभ्योनमः ।। श्रींसरस्वत्योनमः ।। श्री गौरचंद्राय नमः ।।

सकला श्रमी श्रेष्ठतम । वेद मानी संन्यासाश्रम । आचार्यें केला सुगम । आचरोनीं ।। १ ।। अष्ट वर्ष वय सान ।

संन्यास करिती ग्रहण । जगद्‌गुरू परम पावन । शंकर नामें विख्यात ॥ २ ॥ केलिया संन्यास ग्रहण । पुनर्जन्माचें नाशन मुक्ति लाभ मिळे तूर्ण । शिव स्वरूप तो होय ॥ ३ ॥ तीर्थ यात्रा भ्रमण । मुखीं नाम कृष्ण कृष्ण । परब्रह्म चिंतन । योग साधन अर्हानिश ॥ ४ ॥ लौकिकाची नसे खंती । परोपकारीं असें रति । ज्ञानदातें प्रबोधिती । अज्ञजन ॥ ५ ॥ नित्याचें ज्ञानदान । संन्यास धर्म भूषण । वासना शुन्य, लोक कल्याण । आचरण श्रेष्ठ जनांत ॥ ६ ॥ आदर्श असे जीवन । नित्य ईश चिंतन । तनु राही विकार शून्य । संन्यासी धन्य जाणावे ॥ ७ ॥ त्यांसी करूनि नमन । करी चरित्र कथन । प्रभूचें सन्यास ग्रहण । अपूर्व जे कां ! जाहलें ॥ ८ ॥ या कथेसी अवधान । अल्पमति करितों कथन व्हावी विरक्ति म्हणून । आचार्य चरण सेवी ॥ ९ ॥ विषय विषाचा रस । प्यालो दाह तनूस । तो त्वरे शमवावयास । शरण जातसे संताना ॥१०॥ मज निर्विषय करावे । हेंचि कृपादान द्यावे । संसारी मन न रहावे । हरि गुण गावें सतत ॥११॥ असे मी मतिहीन । तैसा दीन अज्ञान । तुमचिये कृपे कवन । करीं पुर्ण करवा हें ॥१२॥ गार्हस्थ लीला निरंतर करींत असता श्रीगौर । मनी संन्यास विचार । येऊ लागें ॥ १३ ॥ मुक्ति मिळावया कारण । जन्म मरणाचें बंधन तुटाया संन्यास ग्रहण । करणें त्वरा ज्ञानियां ॥ १४ ॥ करावया जगदोद्धार । अवतरलें गौरहर । मनीं नित्य विचार संन्यास ग्रहणाचा ॥ १५ ॥ एकेदिनीं गौर सुंदर । पाचारिती भक्तवर । एकांतीं कथिला विचार । संन्यासाचा ॥ १६ ॥ निताई ! माझा अवतार । करावा दीनोद्धार । भक्तिपंथें न्यावे सान थोर । मुक्तिलाभ व्हावया ॥ १७ ॥ गदाधर मुकुंदास । कथिला प्रभुंनी मानस । तेणें केलें विरोधास । निराळा संन्यास कासया ॥ १८ ॥ यति वेषें कृष्ण भेटे । त्याविण संतपण वोखटे । वैष्णवपण चोखटे । गार्हस्थ्यीं नसे ॥ १९ ॥ यति नसोनि विरक्त । अंतरंग असे निश्चित । त्याग असंग्रहादिव्रत । ज्ञानदान करितसा ॥ २० ॥ चतुर्थाश्रम लक्षण । निष्ठेनें चाले रक्षण । भगव्या वेषाचें कारण । कासया ॥ २१ ॥ माता दुःखी अनाथ । तीसी त्यागणे, व्यर्थ । वधाचें भागी यथार्थ । व्हावें, लाभ कोणता ? ॥ २२ ॥ गदाधराची स्पष्टोक्ति । भक्तजनां कळविती । कळतां आक्रंदिती । वज्राघात जण होय ॥ २३ ॥

न फिटे जाण । मोक्ष न ऋण मुक्तिविण । शास्त्र वचन ऐसें असे ॥ २६ ॥ जन्मा आलिया मानव । वागवी तीन ऋणे सदैव । तें फेडणें कर्तव्य । ऋषी वचन सत्य हें ॥ २७ ॥ तू ज्ञानी हे जाणसी । मातें कासया दुःखिसी । पति निधनाघात मजसी । तुजसाठीं विसरलें ।२८। वृद्धपणीं आधार । तूचि जाण खरोखर । तव विरहें कलेवर । कैसें राही २९ माझे पापमय जीवन । तुजसाठी केलें धारण । प्रसन्न श्रीमुखदर्शन । घेतां समाधान होतसें ॥३०॥ तू करिसी संन्यास ग्रहण मज जासी सोडून । होय माझें प्राणहरण । निश्चयें जाण बारे ॥३१॥ मातविलाप श्रवण । करूनिया शचिनंदन मदुशब्दे सांत्वन । करिती मातेचे ॥३२॥ माते प्रिय सुपुत्र जाण । आणूनि देती चांदी सुवर्ण । ते भोगीता नाश पुर्ण अशाश्वत धन हे ॥३३॥ माझा भगवंत सेवा धर्म । परम धन कृष्णप्रेम । कृष्णचरण अनुपम । सर्व संपदमय देईन ॥३४। कृष्ण प्रेम शोकरहित । करीन तुज निश्चित । संकीर्तन सहयोगे त्वरीत । जन्मुनि पुत्ररुपे दोनदा ॥३५॥ ऐसे देऊनि अश्वासन । निघालें शचिनंदन । कपिल महामुनींनी । त्यगिले निज मातेसी ॥३६॥ संकिर्तनार्थ सर्वस्व । त्यागिलें अखिल ममत्व । त्यजिले सकल वैभव । निघे संन्यास घ्यावया ।३७। सन्यास ग्रहण तिथि । निश्चित केली आपुले चित्ती नित्यानंदी कथिले एकांती । मानस आपुले ॥ ३८ ॥ माता गदाधर ब्रम्हानंद । शेखर आचार्य मुकुंद । यासी तीथि करी विशद । इतरा गुप्त राखिले ॥३९॥ दीक्षापुर्ण प्रथम दिनी । प्रभु करिती कीर्तन संध्याकाली गंगादर्शन । भक्तासवे गृही पातलें ॥४०॥ भक्तजन सभोवती । तयात आपण बैसती । कंठींचीं माला काढिती । प्रसाद देती सकलांना ॥४१॥ बोला कृष्ण भजा कृष्ण । कृष्ण गानी रतापुर्ण । अन्य विचार कृष्णाविण न करा स्नेहे कथीं हे ॥४२॥ माझिये विषी प्रेम । तरी मुखि असो शाम । रात्रंदिन चिंतनी विराम । वाटे आराम जीवासी ॥४३॥ शिकवण दिधली भक्तास केले उपहारास । श्रीधरे आणिले कडू फळास । हलवा करावया ॥४४॥ दुध हलवा भोजनास । माता वाढी गोरास परी मातेच्या चित्तास । चटका लागला ॥४५॥ आता हे अंतिम भोजन । संन्यास घेई नंदन । मनिषा राही अपूर्ण दृष्टी न पडे वदन हे ॥४६॥ गौरांचें जाहले भोजन । जाती करावया शयन । बहीर्गमन चिंतन । निद्राभंग करितसे ॥४७॥ मध्यरात्र समय उलटे । अरुणोदय प्रभा फुटे । तारांगण रुप पालटे । तेजोहीन होतो नभात ।४८। कर्मकांडयाचा उषःकाल । कर्मीयांची सुखद वेळ । साखर निद्रा प्रबळ । येऊ लागे ॥४९॥ ऐशा निवांत समयी । निद्रेंत पत्नी

विष्णुप्रिया । करूनि निराश्रिया । प्रभु तत्काळ निघालें ॥ ४९ ॥ निष्पाप निर्मळ वदन । न्याहाळिती पुन्हाः पुन्हा । दयें व्याकुळलें मन । नेत्रीं अश्रु पातलें ॥ ५० ॥ स्त्रीस पतीचा आधार । तीस करूनि निराधार । दुःख होय प्रियेसी ॥ ५१ ॥ माझी एकनिष्ठ सेवा । करुनि तोषवी सदैव । निर्दयपणें त्याग व्हावा । हें उचित न दिसे ॥ ५२ ॥ परी संन्यास विचार । करवी कर्म घोर । नाना तरंग वारंवार । मानसी उमटती ॥ ५३ ॥ केलें कठोर अंतःकरण । नयन झाले अश्रुपूर्ण । भोळी भावना त्यागून । त्याग केला पत्नीचा ॥ ५४ ॥ द्वारीं पहुडली माता । चित्त जाहलें व्यथित । मातेसीं समजावीत । प्रणिपात केला तियेसी ॥ ५५ ॥ मातेसी दुःख दारूण । निर्धार न त्यजि नंदन । चरण धूली भाळी ठेवून । प्रबोधिलें मातेसी ॥ ५६ ॥ माता जाहली मूर्छित । गौर निघालें त्वरित । भक्त येती प्रणामार्थ । प्रभु दर्शन घ्यावया ॥ ५७ ॥ द्वारीं तिष्ठली माता । श्रीवास कारण पुसतां । निरूत्तरें माता दुःखिता । नेत्रीं अश्रु वाहती ५८ पुत्र विरह कठिण । जाणवे कष्ट दारुण । गद्‌गद् स्वरें वचन । माता वदे ॥ ५९ ॥ ईश्वराचीं जी जी वस्त । तिचें अधिकारी भक्त । निमाईच्या वस्तु त्वरित । न्याव्या तुम्हीं सत्वर ॥ ६० ॥ मज वाटे जें जें उचित । तें तें करीत निश्चित । अज्ञात स्थलीं निवांत । देह सार्थक व्हावया ॥ ६१ ॥ गौरहरीचें गमन । हेंतु निश्चयें संन्यास ग्रहण । ऐकूनियां भक्तजन । निश्चल जाहलें ॥ ६२ ॥ माते भोंवतीं बैसोनी । कष्टी होती करिती रुदन । नदि या ग्रामीं वृत्त कठिण । गृहींगृहीं पसरलें ॥ ६३ ॥ शत्रु मित्र, उदासीन । पाखंडी, निंदक जन । सारे दुःखित दारुण । श्रवणीं वृत्त ये. तैं ॥ ६४ ॥ निमाईचें थोरपण । त्याची न होये ओळखण । तेणें परिताप पूर्ण । रूदन करिती मोकळे ॥ ६५ ॥ रात्रीचा अन्त्य प्रहर । द्वीप त्यजिलें अखेर । निदया घाटीं गौरहर । गंगापार जाहले ॥ ६६ ॥ कंटक ग्रामीं वट वृक्षातळीं । गंगातटीं कुटि निर्मळ । केशव भारती स्वामी प्रेमळ । वास्तव्य करिती ॥ ६७ ॥ भारती महात्मा विरक्त । प्रेमळ भगवद भक्त । ग्रामी आदर अत्यंत । विनम्र होती श्रध्देने ॥६८॥ कुटी समीप गंगाघाट । भोवती आम्रवृक्ष दाट । त्यातूनि स्नानमार्ग चोखट । निःशंकजन वावरें ॥६९॥ प्रभूचे जाहले आगमन रुप लावण्य तारुण्य । दिव्य तेजस्वी वदन । पाहता नवल स्वामिया ॥७०॥ कोण हा अद्भुत कुमार । वाटे अश्विनी

विचार तरंग मनी । स्वामींचिया ॥७२॥ आर्द्रवस्त्रे शचिनंदन । करितीं पादवंदन । स्वामी मुखि आशीर्वचन । नारायण
शब्द उमटला ॥७३॥ करिता साष्टांग प्राणिपात । नुठवे तनू रोमांचित । नेत्री चाले अश्रुपात । स्वामी प्रेमे उठविती
॥७४॥ तू कोण कोठूनि आलासी । कां इतुका व्याकुळलासी । दुःख कारण मजसीं । कथन करी ॥७५॥ शांतीने करीती
निवेदन मीं निमाई पंडित भगवन् ॥ नवद्विपी वास्तव्य स्थान । पातलो कृपा व्हावया ॥७६॥ मागती व्दीपी येऊनि
भिक्षा मिषें सदन । कृपें पुनीत करुन । आशीर्वचन दिधले ॥ ७७ ॥ तें समयीं आपूले वचन । सन्यास तुजसी देईन
म्हणोनि आलो शरण । दुःख मोचन व्हावया ॥ ७८ । मजसी द्यावी दीक्षा । चरणी मागें हीच भिक्षा । प्रभु प्रेमाचीं
साक्ष । पटवी स्वामीया ॥ ७९ ॥ सुवर्ण सुंदर शरीर । रुप लावण्य ज्ञान थोर । सन्यास दीक्षेचा घोर । लागे आश्चर्य
मजलागी ॥८०॥ गृही असाहय वृध्द माता । रुपमती तरुण कांता । ऐशिया दीक्षा देता । अधर्म होय ॥८१॥ संतानाविण
संन्यास हें मान्य नव्हे शास्त्रास । पापभागी व्हावयास । कासया देऊ मान्यता ॥८२॥ ऐसा करुनि विचार । स्वाम
बोलीले पंडितवर । तू बुध्दि सागर । शास्त्रसार जाणसी ॥८३॥ तारुण्यी विषय वासना नावरतीं संसारीजना । उपरती
विण दीक्ष ग्रहण । स्मृति निषधी । ८४॥ वयवरुणें पन्नास । हो विषय निराश । देऊ संन्यास दीक्षेस । अधिकारी
जाहलिया ॥८५॥ करावें भगवद्भजन प्रपंच । व्यवसायीपुर्ण । ईश्वरीं अनुसंधान । ठेंवी मोक्ष साधन हे ॥८६॥
प्रपंची करिती भोंजन । यति करी उपोषण । गृहादि संसार त्यजून । स्थानेविण वास करी ॥८७॥ जाहला जरी
संन्यासी । मठ मंदिरी करी वास । गोळ भर अन्न उदरास देणें लागे ॥८८॥ म्हणोनी परते गृहासी । नित्य आचरी
प्रपंचासीं । माता पत्नी सकलासीं । तोषवावा ॥८९॥ वदलें प्रभु करुणस्वरे । आपण साक्षात ईश्वर । भवरोग व्हवा
दूर निर्धारे पदि लागलो । ९० । न करावा बुध्दिभेद । पूर्वीचे वचन विशद । वचनीं जानावा बाध । मर्यादा अल्प तनूची
॥९१॥ स्वामीं जाहलें निरुत्तर । निताई आचार्य शेखर । येती करिती नमस्कार । दृश्य अपूर्व देखिलें ॥९२॥ ग्रामीकळे
समाचार पाहण्या येतीं नारी नर । बालक परम सुकुमार । अश्विनीकुमार वाटला ॥९३॥ शोकसागरी सारेंजण
ग्रामस्थ होतीं विषण्ण । इतुके अपुर्व लावण्य । आजवरी न देखिले ॥९४। पाहुनि सौंदर्य अदभूत । स्त्रिया जाहल्या
मोहित संन्यास घेतल्या जीवीत । माता त्यजि ॥९५॥ माता देई आपुला प्राण । तीसीं वेंदना दारुण । स्त्रीं वज्राघाते

चूर्ण होती कठिण यातनं। ॥९६॥ बाबा जाई गृहि सत्वरीं । प्रभुस कथिती वृध्दानारीं । माता पत्नी या अवसरी दुःखित असती ॥९७॥ तुझे लावण्य पाहून । आमुचे उडे देहभान । मातेंची व्यथा दारुण । स्मरता दुःख होतसे ॥ ९८ ॥ स्त्रियांचीं दीनवाणी । श्रवणीं जोडिती पाणी । मातांनों ! आशीर्वचनीं । चक्रपाणी मज भेटे ॥ ९९ ॥ देहे क्षण भंगुर । कृष्ण भक्ति त्यांत दुरतर । जाहल्या सत्संग थोर । करी जीवन साफल्य ॥ १०० ॥ मी करी संन्यास ग्रहण । त्वरें वृंदावना जाईन । कृष्ण कृपा संपादीन । आशीर्वचन मज द्या ॥ १०१ ॥ येणें परी समजावून । स्त्रियांचे केलें समाधान । अन्न उदकावीण । संध्या समय लोटला ॥ १०२ ॥ स्वामीं करिती विचार । यानें सोडिला परिवार अनुज्ञा देतां घोर अन्याय घडे ॥ १०३ ॥ वदले प्रभुप्रति । वृद्ध माता पत्नी युवती । घेऊनि यावी अनुमति उपरी दीक्षा देईन ॥ १०४ ॥ मध्यनिशी माता, पत्नी । त्यजिलो आला या स्थानीं । तुजसी दीक्षा देऊनी । उल्लंघू शास्त्र मर्यादा ॥ १०५ ॥ लोटले बहुत दिन । पूर्वीच केलें समाधान । आलों अनुज्ञा घेऊन । प्रभु वदलें स्वामीसी ॥ १०६ ॥ भारती वदले वचन । वार्तेस लोटले बहूत दिन । उभयास विस्मरण । वाटे ग्राहस्थ्य पाळिसी ॥ १०७ ॥ स्वामीचियां भाषणा पंडित मानी करी गमना । परी पुन्हां पाचारणा । सत्वर केलें ॥ १०८ ॥ स्वामी वदले पंडित । तुझा दीक्षा विचार माझें करवी हें भाकित । न टळे की ॥ १०९ ॥ बाहती उच्चस्वरें । यावें, यावें, गौरहरि । पंडित आनंदे जोडी कर मुकुंद करी गायन ॥ ११० ॥ सुरु झालें संकीर्तन । सामील होती सारेजन । प्रभु भावावेश पूर्ण । होती प्रेमें नाचती ॥ १११ ॥ रात्रीचा शांत समय । कीर्तन चाले निरामय । ग्रामींचा जन समुदाय । व्यवसाय भुलला ॥ ११२ ॥ अरुणोदयीं । प्रातःकाली । स्नान करिती गंगाजलीं । प्रणाम चरण कमळीं । करिती प्रभु स्वामिया ॥ ११३ ॥ ब्रह्म रूप म्हणोनि गुरु । मानिती पृच्छा काय करु । कोणते कार्य अंगिकारु । दीक्षा गुरु तुम्ही असा ॥ ११४ ॥ सामग्री आणावयास । स्वामी धाडिती शिष्यास । ग्रामी जाऊनि बहूवस । साहित्य आणिलें ॥ ११५ ॥ ग्रामांत कळे वृत्तांत अधीर होती येतीं त्वरित । दीक्षेस विरोधू निश्चित । संतप्त जाहले ॥ ११६ ॥ वृद्ध माता पत्नी करुण । एकली नसे

दीक्षा द्यावी लागतसे ॥ १९ ॥ पंडितां विरोध करणें । न घडे असमर्थमणें । वर्णाश्रम धर्माचरणें । गृहस्थासी । १२० ।
पंडित विरक्त थोर । माझियें शक्ति बाहेर । साक्षात ईशावतार । येती जन उद्धराया ॥ २१ ॥ प्रभु प्रार्थिती
सकलांना । तुम्ही सखे, बंधु जाणा । मजवरी स्नेहपूर्ण । तुमचा असे ॥ २२ ॥ मी नसे माझियें आधीन । येथ आणि
मज कृष्ण । आपुले असा आशिर्वचन । नंदनंदन प्राप्त हो । २३ ॥ मी जाईन वृंदावनी । राहीन गोकुळी भिक्षान्नी ।
कदंब वृक्षावलीं रजनी । घालविन ॥२४ । यमुनेंचे जलपान । श्रीकृष्ण नामस्मरण करिन रात्रदिन । कृष्णदर्शन व्हावया
॥२५॥ देखूनि पंडित निर्धार । आनंदले नारीनर सामग्री आणाया सत्वर । बध्दपरकर जाहले ॥२६॥ अन्यसंन्यासी
विरक्त । पाचारिले समस्त । सकल पूजा साहित्य । पल्लवासह आणविलें ॥२७॥ रंभास्तंभ शोभायमान । खाद्य
पदार्थ परिपूर्ण । वेदीकुंड बनवू । तयारीसारी ॥२८॥ पुरोहित आचार्य शेखर । आर्द्रनेत्रे करिती संस्कार गंगास्नानोत्तर
पुजिलें ऋषी देवता । २९ ॥ पितरोद्देशें तर्पण । करितां येती पितृगण । प्रत्यक्ष पिंड ग्रहण । केलें, दिधलें आशीस
॥ १३० ॥ यज्ञ सामग्री आणविली । द्विज सकल भोवताली । यति गणादि बैसलीं । दीक्षा कर्म पहावया ॥ ३१ ॥
समिधा पुष्पे अक्षत । पुगीफल, पर्ण नारकेलयुत । तीळ, तांदुळ, मिठाईयुक्त । कुश दुर्वा, घटादिक ॥ ३२ ॥ धूप दिप
नैवेद्य युक्त । वेदी भोंवतें साहित्य । प्रारंभ केला त्वरित । नापित हरिदास पातला ॥ ३३ ॥ समय होई अति रिक्त
क्षौर कर्मकरी त्वरित । ऐसें स्वामी आज्ञापितां । नापिता पुढती बैसलें ॥ ३४ ॥ हरिदास नामे नापित । प्रेमळ
भगवद्भक्त लौकीक प्रभाव जनतेंत । पंचायत प्रमुख तो ॥ १३५ ॥ स्वजातीचा निर्णय । अधिकारी करी
सत्य न्याय ॥ प्रभुत्व मानिती उभय । वादि प्रतिवादी ते ॥ १३६ ॥ सर्वत्र फिरवी नजर । प्रभुसि करी नमस्कार
मूर्ति पाहि मनोहर । अतृप्त नेत्र निश्चल ॥ १३७ ॥ कठपुतली समान । नापित हो वृत्तिशून्य । पाहि एकटक नयन
प्रभुनी दृश्य देखिले ॥ १३८ ॥ बा! कां लाविसी उशिर । पुढिले कर्म राहि स्थिर । त्वरे करावे बा ! क्षौर । तदर्थ
तुज बाहिले ॥१३९ ॥ हरिदास बोले गौर । आपुले बाल, लांब सुंदर । मी न चालवी शस्त्र । स्वप्नी आशा न धराजी
॥ १४० ॥ रेशीमासारखे कुंतल केस । कर्तनी दुःखमनास । न करी ऐसा कर्मास । नापित अन्य बोलवा ॥ १४१ ऐसे
हे कर्म निर्दय । करिता मनी उपजे भय । पुत्रवध आज्ञा होय । निर्भयपणे करीन ॥ १४२ ॥ प्रभु बोलती हरीदास

अडसर होसी शुभकर्मास । व्याकूळ कृष्ण दर्शनास । होई वा, त्वरा करी ॥ १४३ ॥ मजसी करी सहाय्य । भोगिसी सुख अक्षय । धन संपदा विषय । विपुल लाभे निश्चये ॥ १४४ ॥ हरिदास बोले वचन । स्वर्ग भोग संपदा धन लोभ केलीया जाणा पतन होय ॥ १४५ ॥ मज नावडे नश्वर सुक । आदर नसे वाटे विश्व । प्रभुची व्हावे जवळीक । ऐसे प्रबोधा ॥ १४६ ॥ संन्यासी क्षौरप्रधान । ते तव कर्म असे जाण । म्हणोनी तु साक्षी पूर्ण । जाणूनी दीन दयाकरी ॥ १४७ ॥ श्रीकृष्णास्तव प्राण । तडफडती दारुण । सत्कर्मी नाणी विघ्न । विनवी तुज ॥ १४८ ॥ नापित बोले घ्या संन्यास मी न करीन निराश । परी बोलवा अन्यास । पाप कर्म मज नको ॥ १४९ ॥ हरिदासाचे वचन ऐकूनिया शचिनंदन वदले तुजवाचून । न हो आज्ञा मानी तू ॥ १५० ॥ मी केलीया मुंडण । माझा बुडे धंदा जाणा सर्श न करी इतराकारण । निर्धार ऐसा मम असे ॥ १५१ ॥ ज्या हस्ते माथा स्पर्शिला । तोचि अंतीचा ठरला । तेणे कुटुंब भरणाला । मुकलो सर्वथा ॥ १५२ ॥ करीबा अन्य व्यवसाय । क्षौर कर्म अवश्य होय । भाळी हे तुझेचि कार्य ईश्वरे वा! योजिले ॥ १५३ ॥ विवश होई हरिदास । हस्ते मस्तक धरी केस । कंपे भयभित मानस अश्रु नेत्री पातले ॥ १५४ ॥ क्षौर करित नामस्मरण । थांबूनी करी रुदन । कथिती प्रभु समजावून । क्षौर करी लागे ते ॥ १५५ ॥ मधुनि करी उत्थान । आनंदे सहर्ष नर्तन । गान, हास्य मुक्तरोदन । वर्तन हरिदासाचे ॥१५६॥ ऐसे होता संध्याकाल जाहला संपे कर्म कसाळ । प्रेमालिंगन तत्काळ देती प्रभु हरिदासा ॥ १५७ ॥ अलिंगनें हो बेहोश मुर्च्छित पडे निःशेष चेतना शून्य होय विशेष अवकाशे होई सावध ॥ १५८ ॥ हत्यारे गोळा करून । गंगेसी केली समर्पण हरिनाम मुखातून चाले मुक्त जाहला ॥ १५९ ॥प्रभूचा परम भक्त । तेथें जाहला समाधिस्त । परम पद झाले प्राप्त । प्रभु संसर्गे १६० कटवाग्रामी मधुमोदक । केशकर्तन स्थान स्मारक । जाहले सन्निध देख समाधि स्थान गाजले ॥ १६१ ॥ त्याग वैराग्य प्रेमपाठ । दोन समाधि देति चोखट । दर्शनें तेथ होय स्पष्ट भक्त चरित पावन ॥ १६२ ॥ संत, आणि परिस जाण । तुलना करिती जन । परिस पासाव संतजन थोरपण पावले ॥ १६३ ॥ परिस लोहाते सुवर्ण । करी पालटे लोहवर्ण । परी न दे आत्मपण । संतपण देती अभक्ता ॥ १६४ ॥ भक्ति भावे संतपण । ऐसे संत महिमान । करिती

हरिदास । करी हरीदास जाहला ।। १६६ ।। चित्ती पेटे भक्ति ज्योत । पडे प्रकाश निर्मळ ज्योत । दंभ, मान, लोभ
त्वरीत । दूर होता हरि मिळे ।। १६७ ।। क्षौर कर्म झाले यावर । गंगास्नाना गेले गौर । करूनिया वस्त्रांतर
त्यजिले शिखा सुत्रासी ।। १६८ ।। वेदि सन्निध बैसोनी । करजोडी विनम्रपणे स्वामीसी साष्टांग नमूनि सन्मुख
बैसले ।। १६९ ।। विजया हवनादि उचित । संन्यास कर्म साचित मंत्र दीक्षा विधी त्वरीत । करावा ऐसे कल्पिले
। १७० ।। विकल्प आला स्वामीसी । कैसे द्यावे मंत्रासी । समजले प्रभु मानसी स्वये तयासी कथियले ।। १७१ ।।
कानी कथिती दीक्षा मंत्र । हाचि तुमचा असे मंत्र म्हणोनी प्रथम जाहले गुरू । शिष्य केले गुरूवर्य ।। १७२ ।। आश्चर्ये
चकित गुरुवर । तुमचा दीक्षा प्रकार । केवळ लौकिक व्यवहार । जगा शिकवण द्यावया ।। १७३ । तुम्ही श्रीकृष्णप्रेम
पात्र कासया व्हावी दीक्षा मंत्र । कृष्ण कितन नृत्य सर्वत्र करिता अहर्निश ।। १७४ ।। वैदिक कर्मानुष्ठान । संन्यास
दिक्षा म्हणुन । करावे धर्म पालन । शिकवण देता जनतेसी ।। १७५ । गार्हस्थाचा केला त्याग । यती जहाला लागवेग ।
आचरिता धर्म सांग । निरवत बुध्दीने ।। १७६ ।। ऐसें केलें स्तुती स्तोत्र । स्वामींनी दिधला मंत्र । कथन केलें सार
तंत्र । श्रवणें मुर्छीत जाहले ।। १७७ ।। कृष्ण नाने सावध होती । भगवे वस्त्र दिधले पुढती । कृष्ण प्रेमे जगती ।
किर्तन द्वारा देतसा ।। १७८ ।। संन्यासी नामाभिधान । ठविले श्रीकृष्ण चैतन्य । प्रभुसी केले कथन । विदीत सकला जाहले
।।१७९।। तनु कांती पतिवर्ण । काषाय वस्त्र परिधान । दंड कमंडलु कौपीन । कथा कटिवस्त्र भिक्षेचे ।। १८० ।। देखूनी चकीत
लोक । धन्य हे पुण्यश्लोक कृष्णा प्रेमा अलौकीक । विठ्ठल तनु होतसे ।। १८१ ।। गुरुसी साष्टांग नमन सेवेत
घालविती दिन । निशी कृष्ण संकिर्तन आनंदपूर्ण मानसी ।। १८२ ।। ऐसें अपूर्व चरित रसाळ । हरिदास भक्त प्रेमळ ।
उध्दार केला तत्काळ । स्पर्श होता ।। १८३ ।। सन्यंस्त जाहले आपण । जगा करावया पावन । ऐसे संत चरित गान
दीक्षा करवी करविले ।। १८४ ।। मी असे अल्पज्ञ बाळ । ज्ञानाचा मज दुष्काळ । केले धाष्टर्य केवळ आधार माय
बापाचा ।। १८५ ।। त्याचिया कृपाप्रसादे । कथन केले विशद भोळयाभावा । सुखद वाटावे गा ।। १८६ ।। श्रीकृष्ण
चैतन्य भारती चरण । स्मरोनी करी कथन । करावे न्युनपूर्ण संतसेवक याचितो ।। १८७ ।। चैतन्य विजय ग्रंथ रसाळ
आदिलीला प्रसंग सोज्वळ । गौरांग संन्यास प्रसंग मंगळ अठराविया कथियेला ।। १८८ ।। श्री. चै. वि. ग्रंथ आ. ली

प्रसंग प्रभुसंन्यास ग्रहण कथन नाम अध्याय १८ वा समाप्त ओ वि सं १८८ एकुण सं २०९८ मंगळवार



## अध्याय १९ वा

श्री गणेशाय नम : । श्री सरस्वत्यै नम : । श्री गुरूभ्यो नमः । श्री कृष्ण चैतन्याय नम : । नमन माझे गुरूचरणा । जें ब्रह्मप्राप्ती निधाना । प्राप्तीकरवी भक्तजनां । अज्ञात नाशी ।।१।। जे स्वयेंपूर्ण परब्रह्म । शिष्या करिती सत्सम । अनुग्रहें ज्ञान अनुपम । शिष्या देती ।।२।। ज्ञान नव्हें उदर भरू । जेथ आत्मज्ञान विचारू । जें पाववी पैलपारू । भवसागरू सुलभ ।। ३ ।। अध्यात्म ज्ञान दुःखहर । इंद्रियां होय प्रशमकर । निवेदिती श्रीमदाचार्य । निमे जेणें वासना ।। ४ ।। कथी ज्ञानियांचा राजा । अध्यात्म विद्या ग्रंथराजा । कृष्ण सांगे भक्तराजा गीता विभूति योगांत ।। ५ ।। योगी मुनि रमति । संसार सारा त्यजिती । ब्रह्मानंद भोगिती । विस्मरती विषयातें । ६ ।भोग विद्येचे गूरूवर । असती शिव योगीश्वर । अध्यायाचे मुख्यसार । निर्धार नाम सेविती ।७। मुखी सदा हरिनाम । प्रपंचीं नोहे, निष्काम । विरक्त हृदयीं श्रीराम। ध्याती नित्य स्मशानीं ।।८।। ऐसें अध्यात्म सार । गुरू दाविती अपार । शिष्य होई पैलपार । भवसागर ।। ९ ।। त्यांचें चरणीं नमन । करूनी संन्यास ग्रहण । उपरी गौर कथा कथन । करीतसे ।। १० ।। गुरू भव हारक । गुरू असे पाप नाशक । तोचि बुद्धि प्रेरक । शिष्यालागीं ।।११।। सद्भावें करी नमन । कवना द्यावे जी स्फुरण । संत चरित करी कथन । द्यावे दान कृपेचे ।। १२ ।। गृहाचा करूनि त्याग । परिवार जाहले गौरांग । संन्यास क्रम यथासांग । केलें, निघाले भ्रमणासी ।। १३ ।। गुरू समेत चैतन्य [illegible]

सह त्वरित । पातले गंगातीरीं अवचित । स्वगृहीं प्रभूसि न्यावया ॥ १५ ॥ आचार्य पत्नी सीतादेवी । सुग्रास भोजन बनवी । प्रभु, निताई प्रेमें सेवी । थोरवी न वर्णवे ॥ १६ । भोजनोत्तर पाद सेवन । तें, न रूचे प्रभु लागून । यतींनीं सेवाग्रहण । करणें, अधर्म साधकां ॥ १७ ॥ आपण आचार्य प्रवर । तुम्हां न सेवाधिकार । शास्त्र मर्यादीं तत्पर साधु स्वभाव असे हा ॥ १८ ॥ ऐसें केलें कथन । ग्रामवासी घेती दर्शन । संध्याकाळी नृत्य कीर्तन । चालले सप्रेमें अष्टभाव होती प्रकट । सात्विक वृति चोखट । संकीर्तन नृत्य थाट । प्रेमा दाटला भक्तीचा ॥ २० ॥ संन्यासकालीं भक्तजन । समीप होते सारेजन । आन्हिक जाहले पूर्ण । शोक सकला जाहला ॥ २१ ॥ आतां प्रभु आम्हापासोन । दुर जासी भेटो हो, न । कोठले आता संकीर्तन । पुनीत व्हावया आम्हासी ॥ २२ ॥ मनीं चाले विचार । आज्ञापिती प्रभुवर । जावें आचार्य शेखर । त्वरें द्वीपी स्वगृहां ॥ २३ ॥ चिंता वाटे असमाधान । कैसें जारे सदना । पृच्छा करी सकल जन । असती कोठे गौरहर ॥ २४ ॥ काय सांगो तयासी । विचार चाले मानसीं । मार्ग चालतां स्वदेशीं । गंगातटीं पातलें ॥ २५ ॥ निशासमयीं आले घरीं । सकलां कळला समाचार । येती असंख्य नारीनर । वृत्तप्रभुचे ऐकाया ॥ २६ ॥ मातेसीं कळला वृत्तांत । स्नुषेसह ये, त्वरित । नेत्रीं चालें अश्रुपात । ऐकल्या वृत्त सुताचें ॥ २७ ॥ विष्णुप्रिया शचिमाता । पुत्रास्तव दुखीता । कोठे त्यजिले प्रियसुता । यती होई सत्य हें ॥ १९ ॥ तया विण मम प्राण जाऊं पाहे दे [illegible] । मम यातना कठिण । न साहती ॥ २९ ॥ मम निताई सुकुमार । जाहला असें भिकारी । ही वार्ता असे खरी । सांगा त्वरें ॥ ३० ॥ आचार्य होती दुःखित । साग्र कथिला वृत्तांत विष्णुप्रिया हो अचेत । मातें पदीं पहुडली ॥ ११ ॥ सारी रात्र शोकाकुल । होती, जाहला प्रातःकाल । माता गृहीं पातली । कै भेटे प्रिय सुत ॥ ३२ ॥ वासुदेव श्रीवास । नंदनाचार्य गंगादास । प्रभुविण होती उदास विलाप करिती ॥ ३३ ॥ द्वीपीं तृतीय दिनीं । निताई येती सदनीं । तें वृत्त परिसोनी । उत्सुक जाहले सकल ॥ ३४ ॥ कै होय प्रभु आगमन । ऐसे पुसती आप्तजन अश्रुपूर्ण नयन । नित्यानंदाचें ॥ ३६ ॥ नित्यानंद बोले वचन । प्रभू असती दयाघन । केलें संन्यास ग्रहण । कल्याण व्हावया दीनांचे ॥ ३६ ॥ शांतिपुरी अद्वैत । आचार्य गृही वास्तव्यार्थ । तेथ भेटी निश्चित । होई तुम्हां ॥ ३७ ॥ ऐकूनि सर्व जन । त्वरे निघाले घ्यावे दर्शन । मुखी हरिबोल भजन । उच्चस्वरे ॥ ३८ ॥ भक्त हरिदास सदनीं ।

फुलीया ग्रामी आश्रम स्थानीं । प्रभु वास्तव्य जाणोनी । पातले तेथे ।। ३९ ।। भजन ध्वनी परिसतां । उच्चस्वरें जयकारितां । कुटी बाहेरी चैतन्य येतां । रूदन करीती देखोनी ।। ४० ।। करिती सांष्टांग प्रणिपात । कृपादृष्टी नेत्र संकेत । करूनि आशीर्वचे तृप्त । स्वगृहीं जावे, आज्ञापिलें ।। ४१ ।। कष्टें परते जन । नेत्रीं अश्रू दुःख दारूण । चैतन्यें केलें गमन । शांतिपुरीं ।। ४२ ।। पुढील सारा वृत्तांत । मागील अध्यायीं समस्त । कथिला श्रोतयाप्रत । वृत घडे परिसते ।। ४३ ।। नित्यानंद आले सदनी । वृत पडे माते कर्णीं । केला साष्टांग चरणी । प्रणिपात ।। ४४ ।। बोले माता बेटा निताई । कोठे बंधू निमाई । पुत्र विरहे प्राण जाई । भेटी व्हावी सत्वर ।। ४५ ।। अन्नविण माता क्षीण । देखोनि दुःख कठीण । निताई मातें लागुन । भेटी करवी, बोलीले ।। ४६ ।। सोडी आता दुःख माते निमाई माझिये सांगातें । वसति आचार्य गृहाते । नेंई न तेथ तुजलागी ।। ४७ ।। श्रवणी मातेसी ये थोर । पुत्र बघण्या हो अधींर । निघाले भोजनोत्तर । शांतीपुरी यावया ।। ४८ ।। विष्णुप्रिया वृति थोर । सासूसि बोले उत्तर । मजसि नसे अधिकार । दर्शनाचा ।। ४९ ।। पतीचे संन्यास ग्रहण । सतीने न घ्यावि दर्शन ऐसे असे शास्त्रवचन । मूर्ति अखंडा चित्तात ।। ५० ।। मी असे भाग्यवान । स्थूल देहि न घे दर्शन । आराध्य देव समजून स्थापीन हृदय मंदिरी ।। ५१ ।। निरंतर करी पुजन । चुके माझे जन्ममरण । उध्दरती दोन कुळे । हेंचि प्रयोजन जन्माचे ।। ५२ ।। आपण जावे ऐके वचन । मातेचित्ती समाधान । मेण्या माजी बैसोन । निघाले पुरी जावया ।।५३ ।। सवे आचार्य चंद्रशेखर । मुकुंद दत्त श्रीधर । मातेसी घेऊनि सत्वर शांतीपुरी पातले ।। ५४ ।। हरिध्वनीचा गजर । दुमदुमले शांतिपुर । व्दिपाहुनी भक्तवर । प्रभुभेटि पातले । ५५ ।। आचार्य पाहतां समोर । येति सारे भक्तवर उच्च स्वरे हरीगजर । प्रभुसि सत्वर निवेदिले ।। ५६ ।। त्वरे भेटण्या भक्तासि । पातले केलें नमन यासी । तोष होय मानसी दर्शन जाहलिया ।।५७।। कधी चंद्रशेखर । प्रभो ! माता दुःख विभोर । भेटावया अधीर । सत्वर येई यास्थानी ।।५८ ।। आश्चर्ये कोठे म्हणोनी । पुसती प्रभु तत्क्षणी । सत्वर पातले त्या स्थानी । नमन केले ।। ५९ ।। पुत्र वियोगे दुःखं त कष्टी माता क्षीण बहुत । अलिंगी पुत्रा त्वरीत । कर ठेविला मस्तकी ।। ६० ।। निमाई ! आलासी संन्यासी । माते

अभिमान । परी मज भुलू नको ॥ ६२ ॥ ऐसे म्हणोनी मूर्छित । माता जाहली तत्काल तेथ । प्रभुहि झाले अचेत माता उत्संगी पहुडले ॥ ६३ ॥ माते! मी संन्यासी । परी तुझा पुत्र निश्चयेसी । तू मम माताचि असती । संबंध न सुटे ॥ ६४ ॥ मजवरी तुझे अति ऋण । काहि केल्या फिटेना जाण । मी केला संन्यास ग्रहण । तुजपासाव न वेगळा ॥ ६५ ॥ तुझी आज्ञा प्रमाण । तुझे इच्छे वास्तव्य करीन । त्याचे न करी चिंतन । दुःख न देईन निर्धारे ॥६६ गृहाश्रम करी ग्रहण । ऐसी आज्ञा करीवी जाण । संतोषे मानी प्रमाण । आण तुझी ॥ ६७ ॥ माता बोले प्रभु लागोनी तुज आज्ञारीत याचगो । परी अपकिर्ती श्रवणी येई । दुःख मनीचे ॥ ६८ ॥ तुवा केले संन्यास ग्रहण । मज वाटे सत्य भूषण । परी मज त्यागून । अन्यत्र गमन न करी ॥ ६९ ॥ मी दुःखी करी याचना । पुरवी बा ममकामना । दुःख न होई पुन्हा । ऐसे करी ॥ ७० ॥ वदले माते लागून तू माझे दैवत जाण । तुज दुःख न देईन । ऋणभार असे मस्तकी ॥ ७१ ॥ अपुल्या हस्ते नेत्र पुसोन । मातेचे केले सांत्वन । मातेसी हो समाधान । केले दुःख मुक्तीला ॥ ७२ ॥ पालकीत बैसे माता । आचार्य गृहि येती भक्त । सीता देवीनें त्वरीत । सत्कारीले ॥ ७३ ॥ माते तुझी धन्यता पुत्र प्रसवे भक्त ज्ञाता । तेणें पुनर्जन्म व्यथा । चुकविली ॥ ७४ ॥ पुत्र झालीया ब्रम्हनिष्ठ । चुकती जन्ममृत्यु कष्ट संसार बंधा रिष्ट । स्पष्ट टळे ॥ ७५ ॥ माता राहि सदनी । करी पाक अनुदिनी । पुत्रा करी तृप्त भोजनी शांती लाभ चित्तासी ॥७६॥ नित्य होई संकीर्तन । कं होई, प्रवचन । भावततत्व रहस्य कथन उपासना पद्धती ॥७७॥ जप नित्य नेमे करावा । निर्धार चित्ती धरावा । कल्याण प्रद होय जीवा । उपदेशिती ॥ ७८ ॥ जें जें वास्तव्य स्थान । तेथ करावे नामस्मरण । नेम असावा रात्रंदिन । भव बाधा न हो ॥ ७९ ॥ शिव पार्वती संवाद । प्रभु करिती भक्ता विशद । जपानें सिद्धी लाभ सुखद । प्रतिज्ञें होतसे ॥ ८० ॥ ऐसा उपदेश नित्य । जप माहात्म कथित । गार्हस्थी जे जे उचित । ते निरूपिती ॥ ८१ ॥ शांतिपुरी प्रभु निवास । कळे भक्त आसपास । नरनारी दर्शनास । येऊ लागले ॥ ८२ ॥ होई नृत्य संकिर्तना । मुकुंद करी हरिकिर्तन । अष्टभावाचे उत्थान होऊ लागे ॥ ८३ ॥ स्वग्रामी वास्त व्यस्थान करणे संन्यासा दूषण । संगे घेऊन स्वजन । म्हणोन येथ राहिलो ॥ ८४ ॥ तुम्ही व्दीपी करागमन आज्ञामाना प्रमाण करा नित्य संकिर्तन । जीवन वेचा परमार्थी ॥ ८५ ॥ पुत्राचे सुबोध वचन माता देई तया मान । निलाचली

वास करून । राहि मजवार्ता कळे ॥ ८६ ॥ तू जासी वृंदावनी । न ये वार्ता मज कानी । मम प्राण अनु दिनी व्याकुळेल ॥ ८७ ॥ जावे दक्षिण दिशी । सन्निधी करी वास्तव्यासी । कर्णीं पडे वार्तामजसी । तोष चित्ती होईल ॥ ८८ ॥ मातेचे प्रेमळ । बोल हृदयी रूतले सखोल । भोळा भाव निर्मळ । मानिले वचन तियेचे ॥ ८९ ॥ धन्य शचिनंदन । चोविसावियां विरक्तपण । केलें संन्यास ग्रहण । संपूर्ण भोग त्यागिले ॥ ९० ॥ समग्र मेळवी ज्ञान । लौकिक मान संपादून । बाल्यी जाहले जगमान्य । दिगंत कीर्ति मेळविली ॥ ९१ ॥ अलौकिक ग्रंथ निर्माण । केलें विद्वया प्रचुर पुर्ण । तारुण्यीं संन्यास ग्रहण । अैसे अपूर्व न देखिलें ॥ ९२ ॥ संकीर्तन रूचि प्रबल । कृष्ण भेटीची तळमळ । अष्टभाव निर्मळ । उमटती ॥ ९३ ॥ सकल गुणें वरिष्ट । महाप्रभु असती श्रेष्ठ । अल्पमति मी धारिष्ट । करितसे ॥ ९४ ॥ आचार्य करिती प्रश्न । आमुचे संकीत मन । प्रेमावतार असा आपण । संन्यास ग्रहण कासया ॥९५॥

श्लोक – केयं लीलाव्यरचि भक्ता येष्यमद्वैतभाजा ।
मत्मन्तेष्टस्तमधृत भवानाश्रमं यत्तुरीयम् ॥ अद्वैत :–

संन्यास ग्रहण प्रकार । अद्वैत तत्वानुसार । घडे, मज गमे साचार । वाटे कार्य अलौकिक ॥ ९६ ॥ प्रभुची अगम्य लीला । नाकळे अल्पबुद्धीला । म्हणोनियां प्रश्न केला । समाधान व्हावया ॥ ९६ ॥ हास्य करोनि चैतन्य । स्वयं गाढे विद्वान । स्वमनी पाहा विचारून । कळे कारण यथार्थ ॥ ९७ ॥ मी न मानी अद्वैत । कैसे मानितां चित्तीं । चिन्ह प्रकार व्यतिरिक्त । भेद कोणता ? ॥ ९८ ॥ आपण आणि ईश्वर । केवळचिन्ह भेद प्रकार । अन्य भेद विचार । न संभवे ॥ ९९ ॥ ऐकोनियां समर्थन । अद्वैत वदलें हासोन । वाणीचे स्वामी भगवन् । भासतसा ॥ १०० ॥ आपुलिया पुढती कथन । वाणी पावे अकुंचन । ऐकतां गंभीर वचन । चैतन्य बोलेती ॥ १०१ ॥

श्लो :– भो अद्वैत स्मरकिमुवयं हन्त नाद्वैतभाजो भेदस्तस्मिस्त्वयिच यदिवा रुपतो लिंगतश्च ॥ १०२ ॥

द्वैत असो वा अद्वैत । श्रीकृष्ण भजनीं चित्त । ठेवी, अनन्य प्रीत । लागे सर्वस्व त्यागावें ॥ १०३ ॥ तदर्थ सर्वस्व त्यागिलें । त्वरें तरीय पत्करिलें । [illegible]

भक्तांचें विविध प्रश्न । उत्तरें शांतविती ।। १०६ ।। शांतिपुराहून गमन । करिती तें विवरण । करी विस्तारें कथन । संतसेवक ।। १०७ ।। भक्तास देऊनि दर्शन । मातेचे केले समाधान । आज्ञाप्रमाण मानुन । भ्रमण आरंभिले ।।१०८।। जगन्नाथपुरीस गमन । केले ते वृत्त श्रवण । पुढिले अध्यायी जाण ।अवधान देईजे ।। १०९ ।। गौरांग चरीत्र प्रेमळ । संकिर्तन चित्त शीतल । श्रवण घडावे सोज्वळ । कथी श्रोतया ।।११०।। चैतन्य विजय ग्रंथ रसाळ । आदीलीला प्रसंग सोज्वळ । दीक्षा प्रसंग मंगळ । भक्तदर्शन अध्याय एकोणीसवा ।। १११ ।।

श्री चै. वि. ग्रंथ आ. ली. प्रसंग, दीक्षाग्रहण, भक्तदर्शन, शंकानिवारण, कथननाम अध्याय एकोणविसावा समाप्त

ओ. सं. १११ एकूण संख्या २२०९ दि १–७–६४ वुधवार ज्ये० व० ६–१८८६



## अध्याय २० वा

श्री गणेश।यनम ।। श्री स्वरस्वैयनमः ।। श्री गुरुभ्योनमः ।। श्रीकृष्ण चैतन्याय नमः।। नमन माझे गौर सुंदरा चैतन्य प्रभो उद्धरा । अवतार जगोध्दारा । घेसी धरा पावन ।। १ ।। तुवां घेतला संन्यास । शिकविले वैदीक धर्मास । आचरावया जनतेस । मार्ग सरस दाविला ।। २ ।। वैदीक धर्मा चरण । करावें संन्यास ग्रहण । मुक्ती लाभ संपुर्ण । थोरपण आश्रमाचे ।। ३ ।। तुवां केले यथार्त । जाणुनी धर्म संकेत । दाविला चतुर्थ पुरुषार्थ । भगवन्नामे करुनी ।। ४।। संन्यासी धर्म तत्व अव्दैत । परी झालासी वैष्णव भक्त । कृष्ण प्रेमे विव्हळ होत । रहस्य संकेत दाविला ।। ५ ।। त्याचे यथार्थ वर्णन । वीस अध्यायी केले पुर्ण । श्रोत्यासी व्हावया ज्ञान । सेवा मज घडे ।। ६ ।। व्दीपीचे सकल भक्ता

स्वगृही धाडीलें त्वरीत । शचिमाता समेत बोलविले ॥ ७ ॥ सवे दामोदर नित्यानंद । पंडीत जगदानंद । घेऊनिया मुकुंद । करावी यात्रा दक्षीणी ॥ ८ ॥ गंगातट मार्ग क्रमुन यात्रेस निघाले भक्तजन । मार्गी प्रभु करिती प्रश्न । परिक्षा घ्यावया विरक्तींची ॥ ९ ॥ संग्रही कोणत्या वस्तुसी । सन्निध धन संग्रहासी । सारे कथन करा मजसी । समाधान व्हावया ॥ १० ॥ आपुलीया आज्ञेविण । घ्यावे कैसे वस्तु धन । निस्पृह उत्तर ऐकुन । चैतन्य संतोषले ॥ ११ ॥ मार्गीं ग्रामीं आठीसार । अनंत पंडीत मान्यवर । गृही विधिवत भिक्षा पवित्र । घेवूनी पुढती निघाले ॥ १२ ॥ छत्र भोग वृध्दमंत्रेश्वर । तीर्थी पातले गौरहर । उत्कल राज्य सिमेवर । सत्वर येत जाहले ॥ १३ ॥ मार्गी भिक्षादी प्रकार । शिष्यासह किर्तन गजर । होत आनंदे निर्भर । भक्तजन ॥ १४ ॥ उद्देशिय राजा कायस्त । रामचंद्र खा विषयासक्त त्यासीं कळे वृतांत । सत्वर येई त्यास्थळी ॥ १५ ॥ प्रभुचे कृष्ण किर्तन । विभोर होती रूदन । करिती तणू दैदिप्यमान । केले नमन तयाते ॥ १६ ॥ प्रभु तेज प्रभाव । देखें हरपे देहभाव । बोले सहज स्वभावे । रामचंद्र खां ॥ १७ ॥ मी असें विषय किंकर । दर्शने लाभ सुखकर । शुध्द जाहलें कलेवर । मुक्त पापा पासोनी ॥ १८ ॥ दर्शनें जाहलें पावन । आज्ञा होय ती पाळीन । पैलथडी आम्हा लागुन करिवा! गंगेच्या । ॥ १९ ॥ पुरींस करणे गमन । पार व्हावया राज्य बंधन । त्यातुन करी मूक्तजन । आज्ञा मानी सत्वर ॥ २० ॥ राजा बोले वचन । युध्द काली पार होने । मजसी वाटें कठीन । राजाज्ञा आम्हा म्हणोनीया ।२१। तरी मी प्राणपणें । पैलपार आपणा करिन । आजिकरा संकीर्तन उदईक सकल घडे॥ २२ ॥ छत्र भोग नगरीत । व्दिज असे शुचिष्मत । वस्तिकरुनिया तेथ । केले संकिर्तन सप्रेमे ।२३। प्रातःकाली गंगापार । व्हावया जाती गौर नौके माजी हरिगजर । उमटे ध्वनी गंगेत ।२४। चाले गर्जना नौकेत । बेहोष नृत्य करित । घाबरा होई आकस्मात ॥ नावाडी तै ॥ २५ ॥ विनवी बहुपरी सकळा । ऐका माझीया बोला । नाव जाई तळाला । तुमच्िया नृत्ये ॥ २६ ॥ उच्च स्वरे न करा गर्जना । पैल तीरी घोर कानन । हिंस्त्र पशु पुंडजन । दुख देती ॥ २७ ॥ नावाडयाचे दिन वचन । समाप्त करिती भजन । चैतन्य बंधन । कोन करी ॥ २८ ॥ नावाडी करी विचार असामान्य पुरुषवर । ...

श्लोक :- आर्य दीन दयार्द्रनाथ ! हे मथुरानाथ ! कदावलोक्यसे ॥
हृदय त्वदलोकांतर दयित ! भ्राम्याती की करोम्यहम् ॥ पद्यावली ३३०

आर्य दीन दयार्द्रनाथ । हे प्रभो मथुरानाथ । तुझोया दर्शनाविन चित्त । चचल होई ॥ ३१ ॥ कै होय तुझे दर्शन । कैसे होई समाधान । हे प्रियतम चिध्दन । कथीमज कायकरु ॥ ३२ ॥ करूनिया श्लोक पाठ । कृष्ण विरह वाढे दाट । गात्र चालवी ना निकटती । देवस्थानी ॥३३॥ मार्गी कटकग्रामी साक्षी गोपाल । दर्शने तुष्ट सकल । महीमा श्रावीला रसाळ। निताई मुखे । ३४ । भुवनेश्वरी, क्षेत्रपाल शिव । कदा न शिवे जेथ आशिव । कमलपुरी कपोतेश्वर शिव दर्शन घेती ॥ ३५ ॥ तेथून पुरीस गमन । प्रेमावेशे अलिंगन । द्यावया प्रभुस तूर्ण । धाव घेती ॥ ३६ ॥ प्रभुचे उडे देहभान कर्मचारीं धावे ताडना । बेहोश करीती भ्रमण । भय वाटे सकलांसी ॥ ३७ ॥ तें समयी राजपंडीत सार्वभौम भट्टाचार्य ख्यात । नैय्यायिक वेदांती अव्दैत । त्यास्थानी पातले ॥ ३८ ॥ प्रभुची भावावस्था पाहुन । कर्मचारी धरीली रोखून अदभुत प्रेमा जाणून स्तंभीत जाहले ॥ ३९ ॥ मूर्छित होतें गोरहर । बाहचदर्शेचा पडे विसर शुध्दी न येता सत्वर स्वगृहि आणिले ॥ ४० ॥ महाप्रभुचा महाभाव देखोनी जमले जनसर्व । युवक संन्यासीं अपुर्व । तेज झळके शरीरीं ॥ ४१ ॥ तृतिय प्रहर दिनाला । पावले बाहचदशेला । वास्तव्य केलें त्या स्थला । आचार्यगृहि ॥ ४२ ॥ केले जगन्नाथ दर्शन । तदा झालें समाधान । सुभद्रा , बलराम भगवान । भावे नमिती ४३ ॥ प्रसादी माला चंदन सकल करितो ग्रहण । परम सौभाग्य लक्षण । मानीती चित्ती ॥ ४४ ॥ अव्दैत वेदांती सार्वभौम । पांडित्ये लोकी सार्वभौम । प्रभूसि मानूनि लघुत्तम । उपदेशती ॥ ४५ ॥ तुम्ही संन्यासि तरुण । करावे वेदांत श्रवण । त्यासीं संमती देऊ । सप्त ह मानी राहिले ॥४६॥ केले वेदांत श्रवण । सप्ताह धरीले मौन । त्यांचें पुसिले कारण । सार्वभौमे ॥४७॥ मी ऐकावा वेदांत । आपुली आज्ञा माते । ती पाळीली यथार्थ । दोष काय यांत ॥४८॥ जडप्रतिमेचें श्रवण । तैसे न मानी आपणां । काहो शका समाधान । करावे ऐसा आशय ॥ ४९ ॥ मी असे अज्ञजन । विषय तों अतिगहण । कैसे होई शंकित मन झाना थोरा पुढती को ॥ ५० ॥ परि करितो धाष्टर्य । शंका मांडितो स्पष्ट । तेणें न होती कष्ट । प्रार्थना ही ॥ ५१ ॥ मी अभ्यासिले व्यासमुत्र । त्याचा अर्थ स्पष्ट खरोखर । परीश्रीम शंकराचार्य । निर्मळ सूत्रार्थ

दुरविला।५२।एकताप्रभु वचन आश्चर्ये देखति गुरुजन। भट्टाचार्य शिष्यगण। थक्क जाहले।५३। आचार्य वदले ऐसेकैसे श्रुतिप्रति पाद्यविषय असें निर्गुणब्रम्ह सिध्दि परिसे। शारीर भाष्यी ॥ ५४ ॥ प्रभू देती उत्तर। मानी निर्गुण निराकार श्रुति वर्णन स्पष्ट तर। सगुणी गौणत्व उपेक्षिले ॥ ५५ ॥ हा एक पक्षीय सिध्दात। मी न मानी निश्चित सगुण निर्गुण रुपसत्य। आदरे मानो दोहोते ॥ ५६ ॥ एकमेवा व्दितीय ब्रम्ह। श्रुतिसिद्धांत श्रेष्ठपरम तेचि अव्दितीय ब्रम्ह। अंतिम वर्णन वेदाचे ॥ ५७ ॥ नेह नानास्ति किंचन। ऐसे व्दितीय श्रुतिवचन। संसारी नानात्व दिसे जाण। मिथ्या प्रतिपादन ऐसें हें ॥ ५८ ॥ सर्व खाविदं ब्रम्ह। श्रुतीचे हे वर्णन। दिसतें ते सारें ब्रम्ह। एसे प्रमाण श्रुतीचे ॥ ५९। बहुस्याम सई-त श्रुती। प्रत्यक्ष त्यांची ऐसी रीता। सगुन साकर वर्नीती त्यातें गौणत्व कैसेनि ॥ ६० ॥

श्लोक :– अपाणि पादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षु सश्रुनोत्यकर्ण।
सवेति वेद्यंनच तस्यास्ति वेत्ता। तमाहूर ग्यं पुरुषं महानाम ॥

ब्रम्हासि नसे हात पाव। परीं ते ग्रहण करी सर्व। हा प्रकृतीचा स्वभाव। त्यासी न जानवे ॥ ६१ ॥ वळे हो चलन वलन। चक्षु बिण देखे पुर्ण। कर्णाविण श्रवण लक्षण शब्दजात आद्य ॥ ६२ ॥ जगताचें संपूर्ण ज्ञान। जे जाणण्या योग्य ग्रहण। त्यांते न जाने अन्य। आदि महापुरुषतो ॥ ६३ ॥ ऐसें सगुणाचें वर्णन। आसता कैचे माणूं गौण। हे बुध्दीचे वैलक्षण्य। द्योतक असे ॥ ६४ ॥ माझें असें अनुमान। श्री भाष्यकार भगवान। बुध्दि करावया तीक्ष्ण। व्याख्यान करिती सुत्राचें ॥ ६५ ॥ जो पंडीत बुध्दिमान। पराकाष्ठेचें विचार ज्ञान। अकृत मति प्रत्युत्पन्न। जाणुनि तोषें मानसी ॥ ६६ ॥ मानी जो विचार प्रधान। तो न पाही अधिक उणे। परी असे हृदय प्रधान। त्यासी ओढाताण अर्थाची ॥ ६७ ॥ त्यांचे न हो समाधान। ऐसे ऐकतां प्रभुवचन आचार्य करिती निवेदन नसे भाग्य पदरीचे ॥ ६८ ॥ वेदव्यास आभिप्राय त्या स्पष्टार्थाचें लाघव। आचार्य केले सर्व। नसे कर्तुत्व स्वत:चें ॥ ६९ ॥ वदले प्रभु नम्र भावे वेदव्यास अभिप्राव।। योग्य करिती आचार्य शिव। ऐसे कैसे समजावे ॥ ७० ॥ रामानुजांचें विशिष्टव्दैत। मध्वाचें व्दैतमत। शारीर भाष्य आचार्य कृत। सारे यथार्थ की ॥ ७१ ॥ ...

प्रमाण पारव । सिध्द केले प्रभुनी । शास्त्र पुराणें भारत । कर्ते वेदव्यास ख्यात । तरी चित्त होता अशांत । श्रीमद्‌भागवत रचियले ॥ ७४ ॥ वेदशास्त्र अपूर्व सार । भक्तीचा वाहविला पुर । श्री भागवत ग्रंथ थोर । रचिला शांती लाभाया । ॥ ७५॥ त्या ग्रंथी श्लोक विख्यात । नंद गोपांचें भाग्य वर्णित । पुर्ण ब्रम्ह सनातन हित । परंम आनंद स्वरुप ॥ ७६ । ब्रम्ह निर्गुन निराकार । बाकी सर्व कल्पित मिथ्या सारे । व्यास वर्णन प्रकार विचार करणे आवश्यक ॥ ७७ ॥ व्यास वदे पुर्ण सनातन । तोची श्रीकृष्ण रूप जाणा । कथिति हट्टे आपणा । मिथ्या कैसेनि । ७८ ॥ बुध्दि भगवद्दत्त । बुध्दि चमत्कार प्रथित । प्रति पादिला अव्दैत सिध्दांत । विचाराचा अंत दाविला ॥ ७९ ॥ तर्क शक्ति विचार शक्ति । परा काष्टेला पोंहचविती । जी ही ब्रम्ह सर्वोत्कृष्ट स्थिति । ह्रदयीं ज्यांच्या वसतसे ॥ ८० ॥ शांकर भाष्य स्वाभाविक । वेदान्त विरुध्द असे देख । अव्दैत प्रकृताचें लोक मोहित करावया ॥ ८१ ॥ श्रीं भगवंताचा आदेश । आचार्य शिवावतार विशेष । या प्रकारें कलिले भाष्य । अव्दैत प्रचार व्हावया ॥ ८२ ॥ मी ब्रम्ह अभेद भाव । याचा प्रचार सर्वत्रैव । करिती आचार्य देव । एकान्तीं सत्य बोलिले । ८३ ॥

श्लोक – सत्य पिभेदापगमे नाथ । तवाहं नमामकिनस्त्वं । सामुद्रो हितरंगः कूचन समुद्रो न तारंगः ॥ ८४ ॥

एकांती बैसोनी गंगातीरी नेत्री वाहती अश्रु धारा । त्याचे मुखं उध्दार ध्यानीं घ्यावें ॥ ८५ ॥ करुण स्वरें अश्रुवाहत । सदगद कंठे समुख प्रार्थित । जगती अभेद तुझ्यात । हे स्वामी मी तुझाची ॥ ८६ ॥ स्वामीं मी असे तुझा । परी तु नसें माझा समुद्र तरंग अविभाज्य । तरंग असें सागराचा ॥८७॥ तरंगसागरी अभेद । नवदती तरंगाना समुद्र । या वाक्यी स्पष्टभेद । महापुरुषे ( बोलला ॥८ ॥ अचिन्त्य भेदा भेद सिध्दांत । वेदान्ताचे यथार्थमत । त्याचा करुं स्पस्टार्थ । पुढती कल्पना द्यावया ॥ ८९ ॥ पंडीता शास्त्र प्रामाण्य । बहुविध विचार बुध्दी गम्य । अव्दैताचें वैगुण्य । दाउनी केले हैरान ॥ ९० ॥ भट्टाचार्यांचा प्रश्न । आत्मारामाश्च व्याख्यान । भागवतीं श्लोक विवरण । श्रवणी इच्छीतो ॥ ९१ ॥ प्रभु वदले वचन । प्रथम आपण करा व्याख्यान । तर्क शास्त्र पांडित्य पूर्ण । नऊ प्रकार दाविले ॥ ९२ ॥ अनंतर प्रभु व्याख्यान । अठरा प्रकारे स्वतंत्र पूर्ण । आचार्य चकित होऊन । चरनी शरण जाहले ॥ ९३ ॥ लागे व्हावया आत्मग्लानी । प्रभु जाहले । प्रसन्न

चतुर्भुज दर्शन । दावूनी व्दिभुजरुप दाविले ।। ९४ ।। कृपें जाहली तत्वस्पुर्ती । करु लागे प्रभुस्तुती । शतश्लोकी त्वरीत । वर्णीयले ।। ९५ ।।

श्लोक :– संसार कूपे पतिज्ञ गाधे मोहांधपूर्णे विषयार्ती सक्त: ।
करावलंबं मम देहीनाथ । गोविंद दामोधर माधवेती ।।

संसार आगाध सागर । त्यां माजी बुडे वारंवार । विषया सक्त अधम खर । तारा कर देवोनी ।। ९६ ।। आपुले हातीचा सहारा । देऊनी दींना त्वरे तारा । हे गोविंदा दामोधरा । चरनी लीन होतसे ।। ९७ ।। तयात दोन उत्तम श्लोक । सार सर्वस्व शतश्लोकी । भक्त कंठीचे मौतींक । मुखी साजले ।। ९८ ।।

श्लोक :– वैराग्य विद्या निज भक्तियोग शिक्षार्थ मेक: पुरुष: पुराण: ।।
श्रीकृष्ण चैतन्य शरीर धारी । कृपाम्बुधिर्यस्तमहं प्रपद्ये ।। चै. च. ना. ६-४३

वैराग्य नाम कृष्ण विरह । विद्या कृष्ण चरणी अगाह । कीं चरण सलीली अवगाह । आसक्ती दृढकरी ।। ९९ ।। निज भक्ति योग शिक्षा । जियेला संज्ञा प्रेंम शिक्षा । भक्तासी घाली भिक्षा । श्रीकृष्ण चैतन्य रुप जें ।। १०० ।। चैतन्य रुप सनातन । जो सर्वदा कृपासागर जाण । तयाचे चरणीं प्रपन्न । प्रपदन हा मजसी ।। १०१ ।।

श्लोक :– कालान्नष्टं भक्तियोगं निजंय:, प्रादुष्कर्तूं कृष्ण चैतन्य नामा ।।
अविर्भुत – स्तस्य पादारविंदे गाढ गाढ लियता चित्रभृंग: ।।

कालांतरे झाला नष्ट । भक्तियोग हा श्रेष्ठ । हें पाहुनिया जो स्पष्ट प्रकटला भूतली ।। १०२ ।। तो महापुरुष कृष्ण चैतन्य करी । भक्तीयोग उज्जीवन । तयाचे चरणी कमलीं मन । भृंगापरी सक्त हो ।। १०३ ।। ऐसे शतश्लोक पुर्ण केलीया प्रभुसमाधान । जाहले कृपाभाजन । सार्वभौम ।। १०४ ।। दिधला नाथ प्रसाद । सकलासीं हो मोद । कृष्ण भक्ति प्रबोध केला विशद ।। १०५ ।। प्रभुसि पुसती सार्वभौम श्रेष्ठ साधन उत्तम । सांगावे जी प्रथम । प्रेमासक्ति वाढवी ।। १०६ ।। भक्ताचा प्रेमळ प्रश्न । श्रवणे करिती समाधान । व्हावे कृष्ण किर्तन । मंत्र दिधला तयासी ।। १०७ ।।

हरिनाम केवळ जाण । सकल जिवाचा प्राण त्याविण अन्य गति प्रमाण कलीत नसे ॥ १०८ ॥ हरीनाम करी मुक्त जो भवार्णवी बुडत । नाम नौका त्वरीत । पैळपार पोचवी ॥ १०९ ॥ सावन श्रवणें सार्वभौम । तुष्टमनी परम ज्ञानीया भक्तीप्रेम । प्रेम होता दुणावे ॥११०॥ नामप्रक्रिया कैसी । सात्र सांगा सजसि । प्रकिया नसे नामासी अर्हनिश घ्यावे भक्तीनें ॥ १११ ॥ नित्य हरिनाम जप । चित्ती ध्यावे भगवद्रुप । संकिर्तन गानअमूप । लीला श्रवण करी बा ॥ ११२ ॥ शरीर मन प्राण । इंद्रिये भगवत्परायण । करूनि करावे समर्पण सर्वस्व भावे ईशपदि ॥ ११३ ॥ चैतन्ये नाथदर्शन । केले वास्तव्य अल्पदिन । चित्ती समाधान । होती प्रेमव्हिळ ॥ ११४ ॥ करूनि शास्त्रमंथन पंडिताचे केले समाधान भक्ती रहस्य कथन । सांग वर्णिले ॥ ११५ ॥ हरिनामाचे श्रेष्टपण । सतत दाविले भक्तांना । कृतार्थ केले सकलांना उणेमण किर्मविनसे ॥ ११६ ॥ पुढिल अध्यायी भ्रमण । देशोदेशी संकिर्तन । केले जगोध्दरण । सुरसकथन करीतसे ॥ ११७ ॥ द्यावे मज अवधान । तृप्तीचे ढेकर देईन । संतसेवक चरण । वंदितसे । ११८ ॥ चै. वि ग्रंथ रसाळ मध्यलीला प्रसंग सोज्वळ । जगन्नाथ दर्शन मंगळ । शंका निरसन विसाविया ॥ ११९ ॥ चै. वि. ग्रंथ मध्यलीला प्रसंग जगन्नाथ दर्शन भट्टाचार्य शंकानिवारण भक्ति रहस्य कथन कथानाम अध्याय विसावा (२०) ओ सं ११९



## अध्याय २१ वा

श्री गणेशाय नमः ॥ श्री सरस्वत्यै नमः ॥ श्री गुरुभ्योनमः ॥ श्री कृष्ण चैतन्याय नमः ॥

जयजयाजी श्रीकृष्णा । भक्तजन मानस हरणा । दीन दुःख परिहरणा । नमीं चरणा सद्भावें ॥ १ ॥ तुझिया चरणाचा

महिमा । भक्त गाठीती भक्ति सीमा । नारदे भक्ति सूत्रीं गरिमा । अनुपमा दाविला ॥ २ ॥ व्यास, गर्ग, शांडिल्य भक्ति सूत्र । यांत वर्णिलें भक्तिसूत्र । जेणें भक्ता वर्ण पवित्र । कळे सहज ॥ ३ ॥ सत्संग लाभें सद्‌गुण । येती, परम लाभ वर्णन । भर्तृहरी करी कथन । शतकत्रयीं ॥ ४ ॥ सज्जन संसर्गें वाढावा । परगुणीं प्रेमादर व्हावा । गुरूजनीं नम्र भाव व्हावा । व्यसन विद्येचें ॥ ६ ॥ असो स्वामींरति । लोकापवाद भीति । नित्य शुलपाणी भक्ति । दमनशक्ती असावीं ॥ ६ ॥ दुष्ट संसर्गें दूर । गुणी, निर्मळ, उदार । ऐसा जो मान्यवर । नमस्कार तया ॥ ७ ॥ सत्संग वाढवी सद्‌भावा । रामानंद भोगी आघवा । तें सुरस चरित जीवा तृप्त करी ॥ ८ ॥ त्याचें करी विवरण । अध्यायी परिसा सुजन । तुमचीया अवधानें कवन । वर्धमान होई ॥ ९ ॥ शके चौदाशे एकतीस । संक्रमण दिन माघ मास । संन्यास पौर्णिमा तिथीस । शुभ दिनी घेतला ॥१०॥ फाल्गुन मासीं नीलाचलीं । होलिकोत्सव देखिला डोळां चैत्रीं भट्टाचार्य गृहाला । वस्ती केली ॥११॥ पुरींत वास असतां । दक्षिण यात्रा विचार चित्तां । निश्चय नीलाचलीं होता । नित्यानंद वदे ॥१२॥ दिधल्या आश्वासनें राहावें । भक्त संतुष्ट आघवे । पावन क्षेत्र बरवे । त्यजावें ना ॥१३॥ प्रभूचें करूणोत्तर । विश्वरूप बंधु थोर । दक्षिण देशी पार । जाई, शोधावा तयासी ॥ १४ ॥ दामोदर बोले पुढती । ठाऊका हें आम्हाप्रति । दक्षिणदेशोद्धार गति । मानसीं ॥ १५ ॥ महाप्रभु बंधु थोर । विश्वरूप पंडितवर । षोडशवर्षी विरक्ति अपार । यति जाहले ॥ १६ ॥ प्रपंचाची त्यजी सलगीं मातेसी त्यागिले लागवेगी । आहे नाहीं ऐसें जगीं । वर्तलें ॥ १७ ॥ संन्यास घेतलियावरी । संचारिती विविध क्षेत्रीं वर्ष द्वय उपरीं । पंढरपुरीं पातले ॥ १८ ॥ पंढरपुरी केला वास । पांडुरंगी दृढ विश्वास । तेथेचि सोडिलें देहास । कृतार्थ झाले ॥ १९ ॥ ख्यात कवि वासुदेव घोष । ते समयीं क्षेत्रीं वसतीस । तेणें समाचार भक्तास कथियला ॥ २० ॥ विश्वरूप शोध उपलक्ष । पावन करण्या दक्षिण देश । एकाकी जावे यात्रेस । निवेदिले ॥ २१ ॥ वृत्त श्रवणें दुःखित । हट्ट करिती भक्त । जावे आम्हांसहित । यात्रेलागीं ॥ २२ ॥ नाकारितां, भट्ट प्रार्थना । करिती कां अवगणना । आपुलिया संगेंविना । प्राण न राहती ॥२३॥ करी आपुला सांगात । न्यावें मजला समेत । प्रभु वदले [illegible]

शोकें प्रार्थिती प्रभूस । कांहीं काल वास्तव्यास । करोनी जावें ॥ २६ ॥ वास केला पंचम दिन । पुरीं नाथ दर्शन । नित्य भिक्षा ग्रहण । आचार्य गृहीं ॥ २७ ॥ प्रभातीं नाथ दर्शन । केलें साष्टांग नमन । नाथ अनुज्ञा घेऊन । गमन वरिलें ॥ २८ ॥ प्रसाद माला, प्रसादान्ना । घेऊनि केली प्रदक्षिणा । मानूनि प्रमाण आज्ञा सागरतीरीं पातले । २९ । भट्टाचार्यांची विनति । मार्गी रामानंद भक्त । राजा वैष्णव ख्यात । कृतार्थ करावें ॥ ३० ॥ तयातें प्रभू आश्वासून । मार्ग करिती क्रमण । नित्यानंद भक्तजन । अलालनाक्षीं पातले ॥ ३१ ॥ सागरीं करूनि स्नान । प्रभु घेती दर्शन । कौपीन केली धारण । निशीं कीर्तन जाहलें ३२। भक्तजन प्रातःकालीं । जावया भोवती जमलीं । न यावें संगें आज्ञा केली । चैतन्यांनीं ॥ नित्यानंद कृष्णदास । सांगातें ठेविलें द्वयांस । कौपीन ब्रह्मवस्त्रास । राखियलें ॥ ३३ ॥ मार्गी नामसंकीर्तन । भावें करिती कृष्ण कृष्ण । साथ देती भक्तजन । प्रभुवरां ॥ ३४ ॥ कृष्ण विरह विधुरा गोपी भावें । उच्चस्वरें, चित्त हेलावे । मार्गी ऐसें गात जावें । शरण यावें भक्तांनीं ॥ ३५ ॥ शरण येतीं भक्तवर । तयांत करूनि शक्ति संचार । वैष्णव झाले साचार । प्रचारक ॥ ३६ ॥ यापरी दक्षिण देश । जाहला वैष्णव शेष । कुर्म स्थानीं कुर्म देवेश । नमूनि स्तविला ॥ ३७ ॥ तेथ श्री कूर्म गृहस्थ ब्राह्मण । सश्रद्ध अपार पाहून । केलें भिक्षा ग्रहण । चैतन्य देवें ॥ ३८ ॥ कृष्णभक्ति दिधला आदेश । करी सकला उपदेश । गुरू होई तारी देश । विषय बाधा तुज नसे । मी येई परतून । तों करी संकीर्तन । होई पुर्नमीलन । निश्चयें येथ ॥ ४० ॥ कृतार्थ केले कूर्म द्विजास । नीशीं राहविले वस्तीस । प्रभाती ठेविती प्रस्थानास । पुढीलियां ॥ ४१ । ग्रामीं वासुदेव नामक । द्विज, वैष्णव, भाविक देह गलित कुष्ठ जनक । जर्जर, नमी दुरूनि ॥ ४२ ॥ प्रारब्ध कर्मे दुःख जाणून । प्रसन्न चित्ते करी सहन । दुर्गंधित जाहले तन । खिन्न नसे ॥ ४६ ॥ ईशपदीं ठेवी भाव । कुर्म गृहीं चैतन्य देव । कळे, दर्शने मानव । हरिबोले ॥ ४३ ॥ जाई त्वरें विप्र गृहीं । कळे, मार्गस्थ सर्वही । मूर्छित होयें लवलाही । विलाप करी ॥ ४४ ॥ हतभागी जन्मा आलों दर्शना वंचित झालों । आश्रय तुमचा दयाळों ; । मजलागीं ॥ ४५ ॥ अंतर्यामी श्री गौर । श्रवण करिता आर्तस्वर । तत्काळ घेती माघार । दिधले दर्शन वासुदेवा ॥ ४६ ॥ प्रेमें देती आलिंगन । गलित कुष्ठ माझे तन । सकल रोगायतन । मातें स्पर्श न करा ॥ ४७ ॥ बा तूं परम भागवत । तुझिया स्पर्शें मी पुनीत । दृढालिंगनी गलित । कुष्ट

नष्ट जाहले ॥ ४८ ॥ सुवर्ण कांतियुत तन । अश्रूनीं भरले नयन । उद्धरिला पापीजन । पतित पावन म्हणोनि ॥४९॥ प्रभु ! प्रत्यक्ष नारायण । मज पापीयां केले पावन । महिमा अगाध कारण । धन्य केले दयार्णवा ॥ ५० ॥ केला कुष्टाचा उद्धार । भवीं मुक्त कलेवर । तेथून पुढती सत्वर । सिंव्हाचलीं पातले ॥ ५१ ॥ तेथ जियड् नृसिंह क्षेत्र । जाज्वल्यस्थान पवित्र । दर्शन घेती स्तुतिस्तोत्र । सन्मुख गाती ॥ ५२ ॥ निशा समयी त्यास्थानीं संकीर्तन भजनीं । रमती, प्रभातीं पंथ क्रमोनि । गोदातीरीं पातले ॥ ५३ ॥ देखतां गोदा प्रसन्न । होई यमुना स्मरण । नेत्रीं दिसें वृंदावन । मनीं नृत्य चाललें ॥ ५४ ॥ दक्षिणदेशीं गोदातीरीं । नगर राजमहेंद्री । कोटिलिंग तीर्थ पैलतीरीं । पुष्करतीर्थ ॥५५॥ नामें गोप्पद तीर्थ । तीरी घाट प्रशस्त । यात्रा निमित्ते स्नानार्थ । भावीक येती ॥ ५६ ॥ देशी शासक प्रसिद्ध असे राय रामानंद । स्नानार्थ तीर्थीं गोप्पद । येई द्विजा समेत ॥ ५७ ॥ प्रभु पातले तीर्थस्थलीं । बैसले शांत वृक्षातळीं पालखी समेत द्विज मंडळीं । चाले, राजा भाविला ॥ ५८ ॥ वृक्षातळी वृत्तिशांत । तेजस्वी मूर्ति संन्यस्त । देखें संतोषे बहुत । राजा धावे दर्शना ॥ ५९ ॥ रायें केला प्रणाम । आलिंगिलें हो उपशम । व्हावा मज समागम । करा वास्तव्य विनवी मी ॥ ६० ॥ ग्रामीं वैष्णव ब्राह्मण । गृहीं ठेविले प्रस्थान । केलें ग्रहण भिक्षान्न । विप्रासी तोषविलें ॥ ६१ ॥ जाहला संध्या समय । पातला रामानंदराय । प्रभुसि दावी विनय । नमन करी ॥ ६२ ॥ सन्निध बैसविला राय । वदलें मानव कर्तव्य काय । संसारीं तयाचा उपाय । कथन करी ॥ ६३ ॥ मुख्य जीव प्रयोजन । परम पुरुषार्थ साध्य साधन । श्लोकीं सूचक प्रमाण । द्यावें, वांछा मनींची ॥ ६४ ॥

श्लोक :– वर्णाश्रमा चारवत: । पुरुषेण पर: पुमान । विष्णुराराध्यते पन्था नान्यत्ततोष कारणम् (वि. पु.)

रायें विष्णु पुराण वचन । उधृत केलें विवरण । वर्णाश्रम धर्म पालन । यथार्थ हो उपासना ॥ ६५ ॥ जो ज्याचा वर्ण व्यवहार । तेथे असावे खबरदार । त्याविण विरुद्ध आचार । देवां नावडे ॥ ६६ ॥ वर्णाश्रमाचार पालन । तेणें संतोषे भगवान् । यथार्थ गीता वचन आष्टादशाध्यायीं ॥ ६७ ॥

श्लोक – स्वे स्वे कर्मण्यभिरत: संसिद्धिं लभते नर: ।

विष्णूचें तेणें समाधान । ही साध्य वस्तू जाणून । आचरी ॥ ६९ ॥ परीवर्णाश्रम पालन । करूनि न मिळे साध्य जाण । येथ विष्णुपुराण प्रमाण । बहिरंग साधन म्हणोनि ॥ ७० ॥

श्लोक– कलौकलुष चित्तानां वृक्षायुः प्रभुतीनिच । भवन्ति वर्णाश्रामेणां न तु मच्छरणार्थिनाम् । (द्व-वै-पु-अ-स ९८)

कलिकाळीं कलुषचित्त । त्यांचें जीवन धारण व्यर्थ । वर्णाश्रमाचारीं एकचित्त । मुक्ति न मिळें तयासी ॥ ७१ ॥ जो येई मातें शरण । त्यांचे जीवन धन्य जाण । व्यर्थ न तयाचें जनन । श्लोकीं वर्णिलें ॥ ७२ ॥ श्री भागवती हेचि प्रमाण । प्रथमीं द्वितीय अध्यायीं जाण । वर्णाश्रम धर्म पालन । अनुष्टिलें ॥ ७३ ॥ केलें वर्णाश्रम पालन । परी नावडे ईश्वर भजन । सत्संग, लीला वर्णन । परिश्रम व्यर्थ हो ॥ ७४ ॥ सकाम वर्णाश्रम पालन । हरि विमुख असतां जाण । साध्य लाभ कदा, न, । श्रम एव हि केवल ॥ ७५ ॥ केवळ निवृत्तिरूप धर्म । हरिवीण घडें कर्म । परमार्थ वा साध्य प्रदान । करू न शकें ॥ ७६ ॥ नारद व्यास संवाद । नारद व्यासातें करी विशद । झाला असता ब्रह्मबोध । एका कारता प्राप्त हो ॥ ७७ ॥ उपाधी शून्य ज्ञानबोध । भक्ति विरहित सिद्ध । मुक्तीसी होय विरुद्ध । भक्तिविण न मिळे ॥ ७८ ॥ वर्णाश्रम विहित धर्म । तयांत कथिलें काम्य कर्म । साधन कठिण परम । अनिवार क्लेश ॥ ७९ ॥ दुःखरूप काम्य कर्म । अथवा निष्काम कर्म । ईशचरणीं अर्पूनि चरम । चित्तशुद्धी करावी ॥ ८० ॥ काम्य कर्म हें साधन । चित्त शुद्धीसी कारण । हें बहिरंग साधन भगवत् प्रेम साध्य न हो ॥ ८१ ॥ वर्णाश्रमाचा आचार । अध्ययन तप घोर । होती परिश्रम थोर । प्रतिष्ठा वाढे ॥ ८२ ॥ वाढे ऐश्वर्य वा मान । परी हरिगुण श्रवण । ईशचरणी मन । कदा न राही ॥ ८३ वर्णाश्रम धर्म पालन । मोक्षाप्राप्तीसी शारण । न होतीं । विष्णू प्रसन्न । साक्षात्कार घडेना ।८४। जाहलींया मोक्ष प्राप्ति । परी न मिळे विमुक्ति । विमुक्त नामें विशेष भुक्ति । स्वरूप परमानंद हें ॥ ८५ ॥ काम्य कर्में घडें मुक्ती । रहस्य त्याचे कथी वा ८६ ॥ रामानंद बोले वचन । श्री गीतेवरी ठेवितां ध्यान । नवमाध्यायीं प्रमाण । स्पष्ट असे ॥ ८७ ॥

श्लोक – यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यतपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् (गीता०)

जें करिसी वा भक्षिसी । यज्ञ अथवा दान देसी । तपादि कर्म करिसी । पार्था ! करी मदर्पण ॥ ८८ ॥ ईश्वरचरणीं

अर्पण । करावे निष्काम कर्म विधान । विष्णु भक्तिरूप साध्य पूर्ण । प्राप्त हो ॥ ८९ ॥ वदले प्रभु वचन । निष्काम कमाचे साधन फल कामना धरावी न मानी प्रमाण सत्य हे ॥ ९० ॥ परि तेच फलाची दृष्टि तिष्ण । वरी आग्रह विद्यमान । नित्य नैमित्तिक कर्माभिमान । देहाभिनी वेसे दृढ होय ॥ ९१ ॥ चित्ती वसें अभिमान । मी करी अनुष्ठान । स्वरुपतः सकाम जान । रुप निष्काम कर्माचें । ९२ ॥ कर्म, कर्मफल त्याग । ईशचरणीं अर्पावे सांग । हे न होय साधन अंतरंग । साध्य भक्तीचे जानवा । ९३ ॥ फलापेक्षा न ठेवितां कर्मार्पर्ण । कर्म विपाचे हो उपशमन । चित्तास अल्प समाधान । साक्षा त्भक्ति तिनसे ॥ ९४ ॥ होई देहासी अहंकार । तेणे देहासक्तिस ये वहर । त्यावरी भगवंताचा विचार । ही उन्मुखना गौन ॥ ९५ । म्हणोनीया कर्मार्पण । नो हे भक्तीचे समाधान ।येथ ईश्वर भक्त संग कारण त्याचे त्रिवरण पुढती ॥ ९६ ॥ ईश्वरीं कर्मअर्पण त्याचें असती प्रकार दोन। एकानें फल त्याग संपुर्ण । भगवत्सुख प्रकाश दुजा ॥ ९७ ॥ भगवंताचे दर्शन सुख । त्याचा प्रकाश चित्ती देख । तो प्रयत्न करावा चोख । संगव्दारा भक्ताच्या ॥ ९८ ॥ संताचिये संगती भगवत्सुख उपजे चित्ती । केवळ फल त्यागी नसे प्राप्ति । संतवचन हे ॥ ९९ ॥

(ज्ञा· ह. पा) संताचे संगती । मनोमार्गी गति । आकळावा श्रीपति येणे पंथा ॥

केले असे कर्म अर्पण । फल त्यागहि करून । घडे अभक्त संग तेणे । दुःख पावे ॥ १०० ॥ म्हणोनि शुध्द भक्तसंग तेणे श्रद्धाउपजे । अभंग । भक्ति हे साध्य अव्यंग । अखंड सुख अंतरी । १०१ ॥ या कर्मार्पणाचे नामाभिदान आरोपसिद्धा भक्ती जाण । लौकिक श्रध्देपासुन । प्रारंभ हो या भक्तीचा ॥ १०२ ॥ कर्मापुरते कारण । लौलिक श्रध्दा तीसी संज्ञा व्यवहारी उपयोग करणे । म्हणोनि होई सगुणा ।१०३ कामना पूर्तिस्तव श्रध्दा । तीच जाणावी लौकिक श्रद्धा । तीसी संज्ञा आरोप सिद्धा । भक्ती प्रेम नुपजे । १०४ । ही आरोप सिद्धा भक्ती तीसी सकैतवा म्हणती । जीची जगी फसवी रीती । बाहृय चिन्हांकित ॥ १०५ ॥ ही सकैतक भक्ती । व्हावी धर्मार्थादि कामनापुर्ति । हेंतु ऐसा वसे चित्ती शुद्ध भक्ती तेथ नसे ॥ १०६ ॥ भागवत धर्म प्रथम सोपान । न चढे कदा काळी जाण । धर्मार्थादि वांछाशुन्य । भागवत धर्म पदवाच्य ॥ १०७ ॥ पदवाच्य म्हणजे प्रवेश । भागवतधर्मी विश्वास । जेणे भक्ति सुख संतोष । वाढे संथ ॥ १०८ ॥

परि तेथ स्वार्थ परता । स्पर्श करी सर्वथा । भक्ति, ज्ञान मार्गी तीते । न सेवी करी खंडन ॥११० ॥ ईश्वरप्रीत्यनुकुल व्यापार । भक्ति व्याख्या थोर । सेव्यवस्तुसिसुख अपार । ऐसी क्रीया भक्ती होय ॥ १११ ॥ ती आमुचे असे साध्य तीच असे अनुष्ठेय । निर्गुणा संज्ञा ती होय । वर्णन साध्य भक्तिचें ॥ ११२ ॥ सेव्याच्या सुखासाठी । जी प्रथम अर्पुनि अनुष्ठी । स्वरूप सिध्द । भक्ति श्रेष्ठ होई जाणा । ११३॥ प्रथमानुष्ठान पश्चात अर्पण। स्वार्थपर ता हे दूषण आरोप सिद्ध भक्ति लक्षण । कर्मार्पण प्रकार हा ॥ ११४ ॥ ऐसे चैतन्य देव वचन । राम रामानंद प्रसन्न । होई पुढति करी भाषण । प्रमाण गीता भागवत ॥ ११६ ॥ वर्णाश्रम खूप स्वधर्म । त्यागून धरावे पादपद्म । तेणे संतोषे पुरुषोत्तम । साधन साध्य-भक्तिचे ॥ ११६ ॥

गिता– सर्व धर्मान परित्यज्य मामेकं शरणं व्रज ॥ अहं त्वा सर्व पापे भ्यो मोक्ष यिष्यामि माशुच:

श्री महाप्रभु बोलती । वर्णाश्रम धर्म त्याग प्रवृत्ति । वचन सुलभ कठिण कृति । स्वरूपत: फलत: नसे ॥ ११७ ॥ फलाचा होईल त्याग । परी स्वरूपाचा अशक्य लागे । केवळ वाचेचा आवेग । कार्य न करी ॥ ११८ ॥ आनंदी वृत्ति विशेष । ल्हादिनी संज्ञा तियेस । तीच साध्य भक्ति सरस । महता पासोन प्राप्त हो ॥११९॥ महत् नामें महाभागवत । त्यांची कृपा तसी संगत । तेणें प्रगटे आनंदी वृत्ती । साध्य भक्ति ल्हादिनी ॥ १२० ॥ संत कृपेवाचून । अन्य जरी जाहले साधन । भक्ति प्राप्त नोहे जाण । कृपा संपादन करावी ॥ २१ ॥ वर्णाश्रम धर्म आचरून । हरि कथे रूचि, श्रद्धा ठेवून । राही, जाण भाग्यलक्षण । वर्णाश्रम निष्ठेंमाजी नसे ॥ २२ ॥ म्हणोनि साधु सज्जन । देव भक्तांचें । वासस्थान । मानूनि आपुलें संस्थान । ठेविती सत्त्वगुण वाढाया ॥ २३ ॥ गंगादिक पुण्यनदी । तिचे तटीं नसे उपाधी । तेंचि स्थल संशोधी । वासास्तव ॥ २४ ॥ तेथ संत दर्शन । पारमार्थिक संभाषण । अथवा चरण स्पर्शन । सत्वगुण वाढवी ॥ २५ ॥ तेंथ आला विषयासक्त । पालट हो तयाच्या वृत्तीत । सत्त्वगुण प्रबल होत । वाढे हरिकथा रूचि । ॥ २६ ॥ श्रीहरि कथा रूचि । प्रथमावस्था भक्तीची । नित्य वाढवी अभिरूचि । वर्णाश्रम आचरी जो ॥ २७ ॥ तोचि परमश्रेष्ठ धर्म । अन्य कांहीं न लगे कर्म । साधु कृपेचे प्रधान वर्म । तेथ असे ॥ २८ ॥ स्वरूपत: स्वधर्म त्याग शरणागतिचा उदययोग । साधु कृपेविण लागवेग । सामान्य जीवा अप्राप्त ॥ २९ ॥ संत सेवा शरणागति । श्रवणादि

नवविधाभक्ति । स्वरूप सिद्धा वैधी भक्ति । स्पष्ट कथन केली हें ॥ १३० ॥ या भक्तिचा अधिकारी । कैसा असे विचारी । तयाच्या स्पष्टोत्तरीं । ध्यानीं आणी ॥ ३१ ॥ क्वचित् सत्संग घडला । विशेष संस्कार उदया आला । अनिर्वचनीय भाग्याला । प्राप्त जाहला सुयोगें ॥ ३२ ॥ तया भाग्याच्या फल । भक्ति श्रद्धा वाढे प्रबळ । तोचि । अधिकारी केवळ । साधन वैधि भक्तीचा ॥ ३३ ॥ श्रीमत् भगवद्गीतीं । आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी । ज्ञानी हे प्रकार वर्णिती । अधिकारी भक्तीचे ॥ ३४ ॥ आर्त गजेंद्र, जिज्ञासुशौनक । अर्थार्थी धृव ज्ञानी सनक । हीं उदाहरणें वेचक । शास्त्रांतरीं । कथिलीं ॥ ३५ ॥ परी हे शौनक प्रभुति । शुद्ध भक्ति अधिकारी नव्हती । जिज्ञासा, ज्ञान, अर्थ हेतु, आर्ति । इच्छेपासोनि मुक्त जे । ३६ । ते भक्त कृपा विशिष्ट । भक्ती अधिकारी स्पष्ट । भगवत्कृपेची दृष्ट । तयावरी ॥ त्या त्या इच्छेची क्षीणता । शुद्ध भक्तिवरी श्रध्दा उदित होऊन कांक्षा रहित । आंनंद प्राप्त तया तो ॥ ३८ ॥ भगवंताच्या कृपेनें । गजेद्र वासना होंई क्षीण । तैसे अन्य भक्ताचे जाण । संतकृपा माहात्मे ॥ ३९ ॥ ज्ञानी भक्त संगती । तिच्या फलाची महति । ज्ञान लक्षण स्वरुप स्थिती । ज्ञान होई तियेचें ॥ ४० ॥ भक्त भागवत संगति । तिच्या फलाची फलश्रुति । भक्ति मूळ श्रद्धा उदित । पूर्व महात्म्य ज्ञानासह ।४१। गिताष्टदशाध्याय । सासष्ट श्लोकांचा आशय सर्व धर्म करुनि त्याज । शरण येंई मजलागीं ॥ ४२ ॥ मी सर्व पापा पासुन । तुज करीन मुक्त जाण । येथे शोकाचे कारण मुळी नसे पार्थारे ॥ ४३ ॥ परी तूं होय मन्मन । माझा भक्त माझे यजन । करी मातेचि नमन । सत्य जाण प्रिय मज ॥ ४४ ॥ या हि वचनाचा विचार । केला पाहिजे साचार । केवळ त्यागाचा प्रकार । स्वयंस्फुर्ति नसे ॥ ४५ ॥ श्रीकृष्ण सुखाची चिंता । तेणे ग्रस्त मनी असता । वा वर्णाश्रम तुच्छमानिता । त्याग न घडे ॥ ४६ ॥ येथ अकर्तव्य पाप । या भयाचीं चिंता व्यापें । हेंच देहासक्तिचे माप । मानी निश्चित ॥ ४७ ॥ गोपी कृष्ण प्रेमास्तव । स्वधर्म त्यजिती अहेव । परी तेथ पाप भेव । देहासक्ति लेशना । ४८ ॥ देहासक्ति जाहली जाणा । जागतिक कर्तव्य प्रेरणा । होई कांहीं कारणां । न केल्या पाप घडे ॥ ४९ ॥ ऐसी धरुनि भावना । मनूज कर्म करी जाणा । पाप हो न केल्या कारणां । मुक्त करी, वदे, देव ॥ १५० ॥ यास्तव शोक न करावा । हा देव संकेत आघवा । चैतन्य देवें रावां ।

साधन रूपे दाविला ॥ ५२ ॥ रामानंदराये त्वरित । ऐकूनि प्रभु सिद्धांत । गीता श्लोक पुढती । कथन केला ॥ ५३॥ जीव प्रसन्नात्मा ब्रह्मभूत । शोक, आकांक्षा, विरहित । सममानी भूतजात । परम भक्ति प्राप्त मम ॥ ५४ ॥ यातें संज्ञा ज्ञान मिश्रा भक्ति । या साधने होय प्राप्ति । निश्चयें लाभे साध्य भक्ति । वाटे मजला गीतार्थ ॥ ५५ ॥ ही ज्ञान मिश्रा भक्ति । स्वरूप सिद्धा नसे निश्चित । निर्गुणा साध्य भक्ति । संज्ञा जीतें ॥ ५६ ॥ दोन वस्तूंचें मिश्रण । ज्ञानाचें भक्तीस आवरण । ती न होई भक्ति जाण । आवृत्त करी भक्तीतें ॥ ५७ ॥ मिश्रा शब्द उच्चारिला । ज्ञानाकार लक्षित झाला । या प्रकारें आकार असला । भक्ति प्राधान्य असेचि ॥ ५८ ॥ ती न होई स्वरूप सिद्ध तीसी संज्ञा संग सिद्धा । प्रतिपादिती प्रभु स्वयंसिद्ध । पुढती तें ॥ ५९ ॥ यद्यपि संग सिद्धा भक्ति । होय ती कामना युक्त । आर्त, जिज्ञासू, ज्ञानी, अर्थार्थी । यांचे अधिकार परत्वें कर्म होय ॥ ६० ॥ शास्त्रीय श्रद्धा वा शरणागति । यापासूनि संगसिद्धा भक्ति । परी तीतें सकाम सेविती । न होई अंतरंग साधन ॥ ६१ ॥ मानसीं शोकादि विघ्न प्रवृति नोहे हरिभजनी । म्हणोनि अपेक्षित ज्ञान । वाटे प्रेमभक्तिस्तव ॥ ६२ ॥ ती ज्ञानापेक्षा राखणें । साध्य भक्तींत थे विघ्न । भक्ति निरपेक्षा कारण । ज्ञानापेक्षें युक्त नोहें ॥ ६३ ॥ यास्तव वैराग्य ज्ञान । बहुधा भक्तीस प्रतिकूल । जाण । हेचि भागवती पूर्ण । सिद्धांत वर्णिलें ॥ ६४ ॥ गौरांग विचार श्रवण । करूनि राव बोले वचन । देऊनि भागवत प्रमाण ज्ञान शून्या भक्ति कथियली ॥ ६५ ॥

श्लोक– ज्ञानें प्रयासमुदपास्य नमन्त एव जीवन्ति सन्मुखरता भवदीयवार्ताम् १० १४ ३ भागवत ॥

॥ स्थाने स्थिता: श्रुतिगता तनुवाङ् मनोभि: ये प्रायशोऽजित जितोऽप्यासि तैस्त्रिलोक्याम् ॥

न करी ज्ञान विषयी । थोडाहि प्रयास पाहि । साधु निवासचे ठायी । कदर्यापरी राही जो ॥ ६६ ॥ साधुमूखी स्वभाविक भगवत्कथा येती अनेक । तनमन तशी वाक् । करुनि अवलंब ययांचा ॥६७ ॥ जो करी जीव धारण । काहि न करीं ज्ञान साधन । तयानें वश अजित भगवान । संतव्दारा होतसे ॥ ६८ ॥ रामराय मुखातून । ज्ञानशून्य अकिंचन स्वरूप सिध्द भक्ति विवेचन । श्रवणे बदले चैतन्य ॥ ६९ ॥ हें असे साध्य सार । मान्य असे खरोखर । ही निष्कमा निर्गुणा भक्ति थोर । साधन भक्ति असे परि । ७० । त्याचे पुढति काहि । सांगे राया लवलाहि । दे साध्य भक्ति ग्वाही

कृष्णप्रितीं प्राप्त हो ॥ ७१ ॥ साध्य भक्ति श्रीकृष्ण प्रीती । विधी भक्तिरुप साधनें प्राप्ती । न हो याची निश्चिती जाणें राया सत्य हें ॥ ७२ ॥ राया करीं कथन । स्वरचित्त श्लोक दोन । कृष्णचरणीं लोभ ठेऊन । प्रेम भक्ति प्राप्त हो ॥ ७३ ॥ प्रेममय असे भगवान । प्रेम स्वरूप त्याचें जाण । तो रसराज संपूर्ण । जाणूनि भोगावा प्रेमरस ॥ ७४ ॥

श्लोक– कृष्ण भक्तिरसभाविता मतिः क्रियतां यदि कुतो ऽ पि लभ्यते
॥ तंत्र लौल्यमपि मूल्य केवलं जन्माकोटि सुकृतैर्न लभ्यते ॥ (रामानंदराय

श्रीकृष्ण भक्तीरसे । भावीत मती जैसी असे । तीते प्राप्त करावी सुरसे ज्यामीषे लाभ होय ॥ ७५॥ त्याचे मूल्य असावे लोलुप्य चित्ति धरावे लोभाते अपार वाढवावे । वांछित राहावे हृदयी ते ॥ ७६ ॥ कोटीं जन्म पुण्य केले तरी जे वैधी भक्तिने न मिळे। ती आवेशमय मति प्राप्त जाहली । या साधने ॥७७ ॥ चैतन्य वदले धन्य । तुझे कथन मज मान्य स्वयंरस रूप भगवान् । आनंद स्वरूप तयाचे ॥ ७८॥ करावीं ती रस प्राप्ति । आनंदमय जीव स्थिति । परी एक गोष्ट शेष राहि तीं । श्रवण करावी तव मुखे ॥ ७९॥ त्या रसाचे आस्वादन । अन्यसंबधे होते ग्रहण । करी तो संबध निवेदन । घेईन आस्वाद तयाचा ॥ ८० ॥ अव्दितीय प्रीती पात्र कृष्ण। त्यासी सुखी करावें पूर्ण । दास्यादि भावे सुख विधान करीती भक्त संतोषे ॥ ८१ ॥ साध्य भक्ति व्हावीं प्राप्त । त्याची अनुगति करी त्वरीत । होतसें अत्यंत लोभयुक्त रागानुगा भक्ति साधन तें ॥ ८२ ॥ व्रजि गोपी गोपाल । त्याची नित्य सिध्द भक्ति प्रेमळ । ती साध्यभक्ति निर्मळ जाणावी राया ॥ ८३ ॥ शास्त्र शासन प्रयोजन । ते वैधी भक्ति असे जाण । परीं तृष्णा प्रवृत्तीनें हो उत्पन्न रागानुगाभक्ति रूचि हो ॥८४॥ गौरहरी वदले बचन । प्रेम भक्ति अपुर्व जाण । सर्वस्तध्याचे सारपुर्ण संदेह नसे ॥८५॥ परंतू ममत्व वर्जित । शांत प्रेमा पेक्षा उन्नत । साध्य भक्ति असे निश्चित । विवरी मज ॥८६॥ रायवदे ममतायुक्त दास्य प्रेम असे निश्चित प्रभु वदले ऐकमात्र । तयापेक्षा श्रेष्ट साध्यकथि ॥ ८७ ॥ राये कथिले सख्यप्रेम । गौरवमय असे परम । विश्वास, भावमय, प्रेम । उत्कृष्ट वदले गौरांग ॥ ८८ ॥ त्याहिपेक्षां श्रेष्ठ काय । कथी बा रामराय । पाल्य, अनुग्राह्य भावमय । वात्सल्य कथियलें ॥ ८९ ॥ पाल्य तो श्रीकृष्ण । पालक तो भक्त जाण । अनुग्राह्य

॥ ९१ ॥ रायें केलें कथन । स्वसुख तात्पर्य वर्जन । सर्वांगद्वारा सर्व भावेन । मनीं संकोचा न धरितां ॥ ९२ ॥ श्रीकृष्णाचे जें सुख । त्यावरी अनुसंधान देख । प्रेम पराकाष्ठा आत्यंतिक । श्रेष्ठ असे कान्त भाव ॥ ९३ ॥ कान्त भावाशी तुलितां । प्रेम भक्ति अभावित ममता । विश्वंभर नसे दास्य भावांत । म्हणजे अविश्वास तेथ नसे ॥ ९४ ॥ स्नेह्याधिक्याचा अभाव । सख्य भावात सर्वथैव । निःसंकोच वृत्तीचा अभाव । वात्सल्य रसीं ॥ ९५ ॥ साध्यप्रेमाची परिपूर्तता । कांत भावांत तत्वता । इतरस्स अप्राकृत । एक मात्र प्राकृत कांत भाव ॥ ९६ ॥ ऐसे हे सारे रस । पूर्ण असती विशेष । भक्तास्तव सर्वोत्तम सुरस । वसे अल्प तर नमभाव ॥ ९७ ॥ शांत रसाची कृष्ण निष्ठा । कान्त भावांत वसे स्पष्ट । दास्याची कृष्ण निष्ठा । तैसी, सेवा ममतामय ॥ ९८ ॥ सख्य रसाची कृष्ण निष्ठा । कान्त भावी वसे स्पष्ट । निःसंकोच सेवा श्रेष्ठ । त्यांत राही ॥ ९९ ॥ वात्सल्य रसाचा कृष्णभाव । स्नेहाधिक्य, निःसंकोच सेवा । कान्त भावीं अंतर्भाव । आधिक्य असे ॥ २०० ॥ हें सारे अधिक असून । सर्वांगद्वारां सेवा, रूप, गुण, कान्त भावीं वसे पूर्ण । गोपी सदृश आधिक्यें । १ । गोपींचें कृष्ण प्रेम । साध्यभक्ति अवधी परम । मधुर भाव सेवा उत्तम । ऋणि समजे कृष्ण आपणा ॥ २ ॥ यातही साध्य सिरोमणि । सांगे मज राया ज्ञाणि । राधेचें प्रेम कृष्णीं । परम प्रयोजन चरम हें । ३ । यालोकीं जो हेय रस । गोलोकीं उपादेय सुरस । कारण ही सारीरसा गोलोकींचे प्रतिबिंब विकृत । ४ । दर्पणीं प्रतिबिंब उलटे दिसे । तैसे जगत विपरीतसे । अनित्य जगताचा आदर्श । बिंब पडे तयावरी ॥ ५ ॥ तेंणें गोलोकाचा रस । त्याची छाया विकृत भासे । येणें प्रकारें मानस । चंचलाकार ॥ ६ ॥ रायें शमश: कृष्ण स्वरूप । राधा स्वरूप, रस तत्व स्वरूप । वरी प्रेम तत्व अमूप । वर्णिलें ॥ ७ ॥ प्रभु जिज्ञासा जाणोन करी विप्रलंभ रस वर्णन । विरह वियोग पूर्ण । जेथ वसे ॥ ८ ॥ तो प्रेम विलास विवर्त रूप । नृत्य ज्याचें चक्राकार स्वरूप । रासलीला सुख अमाप भोगाया सांपडें ॥९॥ तो अधिरूढ महाभाव । त्याचे भाव स्वकृत गीत काव्य । गाऊन दाखवी रामराव । चैतन्यासीं ॥ २१० ॥ संसार चिंता व्यथा । तेणें भरले असे जगत । त्या चिंतेच्या अतीत । संत कृपें ॥ ११ ॥ हृदयीं निरंतर लालसा । निष्कपट कृष्ण सेवा लिप्सा । त्याच्या चित्तीं उमटे ठसा । राधाप्रेमाचा ॥१२॥ राधेचें कृष्ण प्रेम । त्यांत वैचित्र्य असे परम । कळणें परी दुर्गम । प्रयत्नें हीं ॥ १३ ॥ शद्वें करावे वर्णन । तें वाचेंसी

असे कठीण । अनुभव शास्त्र जाण । अक्षरे भाव नुमटे ॥ १४ ॥ साखर गोडी चाखिली । दुजें कैसी म्हणोनि पुसिली वाणी कुंठित झाली । अनुभव सत्य ॥ १५ ॥ परी जेसाध्य भक्त । असती परम मुक्त । त्यांना अनुभव प्राप्त । व्हावया अल्प निवेदिले ॥ १६ ॥ तें तत्व सुदुलर्भ । तयाचा घडावा लाभ । श्रीरूप गोस्वामी पाद लोभें । ग्रंथी वर्णिलें ॥ १७ ॥ महत्कृपे पासोन वंचित । साहित्यिक, संप्रदाय पंडित । त्यांना तत्व न कळे निश्चित । व्याख्यान होय निष्फळ ।१८। महत्कृपेचें अधिष्ठान । चढे उन्नत भजन सोपान । तोचि जाणें रस पुर्ण । विपरीत बनवी अपराधी ।१९। म्हणोनि ज्ञानी, विव्दान । प्रेम विलास विर्वत व्याख्यान । समजण्या असमर्थ जाण । तेने विवरण व्यर्थचि ॥ २० ॥ केवळ धर्मनुष्ठान । आथवा भगवभ्दजन । साहित्य सेवा साधारन । हा व्यवहार निराळा । २१ ॥ अतीं बोले रामराव । श्रीराधाकृष्ण प्रेम सेवा । तयाच्या प्राप्तिचा उपाव । प्रभुस कथिला ॥ २२ ॥ व्रज सखोचे अनुगमन । हाचि उपाय सेवेकारण । त्या त्या भावाचें सेवन । मुळ सेवका करवी करी ॥ २३ ॥ जैसा कोनाचा शांतरस । तो स्वभाव सिध्द असे । त्यासी त्याच्या मुळ सेवकास । अनुगत होणें सर्वथा ॥ २४ ॥ शांतरस सेवक जाण । यमूना वेंत्र, वेणु बिषान व्रजातील सारे गोधन । त्यांचे अनुसरण सेवेसी ॥ २५ ॥ दास्यरसाचे रसिक रक्तक, पत्रक, चित्रक त्यांचें अनुगमन स्वाभाविक । करणें लाग । २६ । सख्यभाव रसिकोतम । स्तोककृष्ण श्रीदास, सुदास । त्यांचा करावा अनुगम । सेवा लाभ व्हावया ॥ २७ ॥ वात्सल्य रसास्वादी । असती श्रीनंद यशोदा । तया मार्गाचा अनुरोध । सेवा लाभ व्हावया । २८। तैंसे कान्त रसरसिक । तेणें अनुगत व्रजगोपिका । होऊनि श्रीकृष्ण सेवक । रहावे परम प्रीतीने ॥ २९ ॥ जीव मी ईश कल्पनाकरी । तो अपराध होई थोर । ईशाचा मुळ सेवे करी । तो ही अपराध आधिक ॥ २३० ॥ त्यासी अहग्र हो पासना वदतीही संज्ञा । श्रीमती नंद यशोदा भावना । कलपना करणें स्वतासी ॥ ३१ ॥ वस्तुहः वैष्णव धर्मात । अथवा महाप्रभु शिक्षेत । स्थिरकल्पना अवस्थित । वा आरोप अस्थित्व नसे ॥ ३२ । परम मुक्त सुनिर्मळ । चित्त वृत्तीत सोज्वळ । स्वभाव सिध्द रसउज्वल । उदित होय । ३३ । तो संत कृपेचें फळ । सत्संग लाभला निर्मळ । त्याचे फळ स्वरुप केवळ । स्वयंप्रकाशित होतसे ॥ ३४ ॥ एसे राय मुखे कथन । करविलें तत्वज्ञान । ऐशी प्रश्नोत्तरें गहन । प्रभु प्रेरणें प्रकटली ॥ ३५ ॥ [illegible]

ध्यावया ॥ ३६ ॥ प्रभु करिती प्रश्न । नम्र पणें करावे समर्थन । तो संवाद करी कथन । सावधान परिसा ॥ ३७ ॥ विद्येमाजीं सार विद्या । कोनतीं असे प्रतीं पाद्या । कृष्ण भक्तिविण सद्या । इतर विद्या नसेचि ॥ ३८ ॥ कीर्ति माजी उत्तम कीर्ति । जिवाचीं जगतीं । जिचेनि कृष्ण भक्त ख्याति । सर्वत्र होय ॥ ३९ ॥ दुःखामाजी गुरुत्तर दुःख । कोनते जिवा वाटे तिख । कृष्ण भक्त विरह्या विन अतिरिक्त अन्यथा । २४० ।. मुक्तामाजी मुक्तजिव । कोनता मुक्त, सदाशिव । जयाचे कृष्ण प्रेम सदेव तोची मुक्त शिरोमणि ॥ ४२ ॥ श्रेयामाजी असे श्रेय । जे जिवनसार अतिशय । कृष्णभक्त संग प्राप्त होंय । अन्य नसे ॥ ४२ ॥ घेता भुक्ति मुक्ति आस्वाद त्याचीं गती करी विशद । स्थावर देहवा देव । सन्नध्द । तैसी स्थिती होय ।४३। ऐसा मनोहर संवाद । हो रामानंदा । आनंद । प्रभुपात पद्मीसुखद अनुराग वाढे । ४४ । प्रभुचे साक्षात रूप । श्रीकृष्णा सम स्वरुप । पादपद्मींमन मधुप गुंजारव करी ।४५ । इष्ट देवता दर्शन । दिसो लागे राधाकृष्ण । साक्षात श्री नारायण । वाटेले चैतन्य । ४६ । प्रभुस वदे रामानंद । यथार्थं रूप दर्शनानंद । जेंणें मज सुखप्रद कृपया दावा ॥ ४७ ॥ प्रेमावेशे झाले मूर्छीत । प्रभुच्या पडले चरणात । राधाकृष्ण दर्शन सम्मिलित । रायाजी जाहले ॥ ४८ ॥ प्रभु शरीरी अद्‌भुत । दर्शन जाहले आकस्मात । कृत कृत्य मानी तृप्त । करी भाग्य प्रशंसा । ४९ । प्रभु देती अलिंगन । पुरीस यावे द्यावे त्यजून तेथ आपण दोघेजन आनंद रस पान करू । २६० । रायबोले आपुले हस्ति । माझीं सत्य व्हावीं मुक्ति । पुन्हा भेटेन तुजप्रति । संगे जावू पुरीस । ६१। ऐसे वदोनि कृतार्थ । केला राय कृतकृत्य । निघाले तिर्थ यात्रार्थं । दक्षिण देशी ॥ ६२ ॥ एसा प्रभु भक्त संवाद । अध्यायीं केला विशद । तोचि व्हावा सुखद । भक्तजनां ॥ ६३ ॥ देव देवता तीर्थ क्षेत्र । दर्शन वासुदेव कुष्टी उध्दार । भेटी घेतली मान्यवर रायरामानंदाची । ५४ । त्यांचा सुख संवाद भक्तिरहस्य विशद केलें अल्प आस्वाद । श्रोतया द्यांवया । ५५ । चै. वि. ग्रंथरसाळ मध्यलिला प्रसंग सोज्जळ । तीर्थं यात्रा कुष्टी उध्दार मंगळ । रामानंद भक्ति संवाद एकविसावियां ॥ ५६ ॥ श्री. चै. वि. ग्रंथ । लिला प्रसंग तिर्थ यात्रा भ्रमण वासुदेव कुष्टी उध्दार, रायरामानंद भक्त भेट आणि भक्ति संवाद कथा कथन नाम एकविस अध्याय समाप्त ॥ २१ ॥ ओवी संख्या ॥ २५६ ॥ एकुन संख्या २५८४ दि ८-७-६४ बुधवार जेष्ठ व॥ १४/ ८६ सं. २०२०

卐 ★ 卐

## 卐 अध्याय २२ वा

श्री गणेशाय नमः ।। सरस्वत्यै नमः श्री गुरूभ्योनमः ।। श्री कृष्ण चैतन्याय नमः । जय जयाजी रुक्मिणिरमणा । पांडुरंगा जगज्जीना । कमल नयना विश्वलोचना । संकट नाशना उदारा ।। १ ।। तव भक्त पुंडलिक तयानें केली जवळीक । माता पिता भक्ति मिषे देख । प्रसन्न केले तुजलागी ।। २ ।। चोखा करी जोहार । केला भक्ति निर्धार । झाले चोखट कलेवर । उध्दरुनि तोषवीं ।। ३ ।। नामयाने नैवेद्य अर्पिला । भक्त म्हणुनी सान्नीध घेतला । कीर्तनीं नाचू लागला तयाच्या ।।४।। दामाजीस्तव झोती महार । भानुदासा लागी मोतद्दार विसोबाचा दप्तरदार झाला द्रव्य करी दिले ।।५।। भक्त प्रिय पांडुरंग । प्रभु दर्शना गौरांग । येती वृत्तांत सुभग । कळे विश्वरुपाचा ।। ६ ।। ती संपुर्ण कथा कथन । बरी प्रभुचे भ्रमण । भ्रमणीं दीनोध्दरण कथियले ।। ७ ।। व्यंकटे दिव्जां उध्दरिले । कृष्ण दासा तारियले । पांखंडी मांत्रिका दंडियले । कथियलें वृत्त ।। ८ ।। केला गणिका उध्दार । श्रीराम सेवक भक्तवर दिधला तया अभयकर । मध्वाचार्य भेटी जाहली ।। ९ ।। तें सकळ कथा वृत्त । अध्यायीं कथितो साद्यंत । श्रवण करा सावचित्त । श्रोते तुम्ही ।। १० ।। आपुले श्याम गौर । रसराज महाभाव सुंदर । रुप दावूनि मनोहर । रामराय तुष्टविला ।। ११ ।। पुरीं जावया आज्ञा दिधली । आपण दक्षिण यात्रास्थली । प्रभुस्वारी निघाली । संगें कृष्णदास ।।१२।। विद्यानगर गौतमी गंगा तेथुनी मल्लिकार्जुना लागीं । अहोबल नृसिंह वेगीं । सिध्दवटी पातले ।। १३ ।। स्कंद क्षेत्र त्रिमठ वृध्दकाशी । बौध्द स्थान तिरुपति त्रिमलेश । पानानृसिंह शिवकांची शिवेश । विष्णुकांचा ।। १४ ।। श्रीकाल हस्ती । वृध्द कोल । भैरव कावेरीं कुंभकर्ण कपाल । तेथुनी श्रीरंग क्षेत्रीं आले । पावन केले सकल ।। १५ ।। कर्मी ज्ञानी उपासपक । रामानुज तत्ववादक । वैष्णव कृष्णभजक भक्त सकला वनविले १६ बौधदस्थानी आचार्य पंडित । त्याचे कुतर्क समस्त । खंडन केले उन्मत जिरविला ।। १७ ।। पंडिते षडयंत्रे रचिले । प्रसाद मिषे मद्य मांस आणिले । मार्गी पक्षानी उडविले । थाळीं पडे शरीरी ।। १८ । रक्तविलें तयाचें मस्तक । मूर्छित हो दुष्ट कुतर्की । गुरुदशा देखे सेंवक । शरण येई प्रभुसि ।। १९ ।। त्याकरवीं कृष्ण किर्तन । करविलें गेले मुर्छन । गुरुहोती सावधान वैष्णव बनले ।। २० ।। बौध्द संप्रदाय अवैदिक । सनातन

विष्णु भक्त करून । भागवत धर्म शिकविला ।। २२ ।। कावेंरी तरीं श्रीरंगक्षेत्र । तेंथ रामानुज व्यंकटेश विप्र त्याचे गृह करोनी पवित्र । वस्ती केली चारमास ।।२३।। व्दिज लक्ष्मी नारायण । सेवी नित्य अनुदिन । तयास परिवार भजनी लावियले ।। २४ ।। तेथूनि ऋषभ पर्वत । पाहावे सेतुबंध तीर्थ । दक्षिण मदुराक्षेत्र गौरहर पातले ।। २५ ।। त्याश्रीरंग क्षेत्रि । व्यंकटेश व्दिज सत्पात्र । वैष्णव भक्त पवित्र । गृहि केले वास्तव्या ।। २६।। सायंकाळी एकेदिनी । भ्रमण करिती उद्यानी । विप्रदेखिला आसनी । एकाग्र चित्ते ।। २- ।। गीतापाठ मुखोग्दत । पारायण करीं दिन रात । वाचे अक्षर अशुध्द येत । परि होय तन्मय ।। २८ ।। वाह्य जगाचा निरास । पाठ करी सावकाश । भावे रोमांच तनुस । नेंत्री अश्रुवाहती ।। २९ ।। पाहूनिया भाव निर्मळ । प्रभु स्वस्थ काहि काल । सरला अनुष्ठान काल । तत्काल पुसिले तयासि ।। ३० ।। तुज प्राप्त होई आनंद । अद्‌भुत प्रेमाचा आस्वाद । कैसा होई तो विशद । करुनि सांगे ।। ३१ ।। प्रभो ! व्दिजवंशी जन्मून । राहि केवळ बुध्दि हीन । मज नसे शहाणपण । शुध्दा शुद्ध कळेना ।। ३२ ।। मज न कळे गीतार्थ । पाठ समयी यथार्थ । ध्यानी आणी पार्थरथ । अश्वरश्मीधारीं श्रीकृष्ण ।। ३३ ।। अर्जून असे शोकाकुल । कृष्ण उपदेश सोज्वळ । ते हास्यवदन लास्य सकल । मनोमंदिरीं करी मी ।। ३४ ।। तेणे उडे देहभान जनास वाटे वेंडेपण । टवाळीं निंदा अनुदिन । होते परीं संतुष्ट मी ।। ३६ ।। तो आनंद रसस्वाद । घेता मज नसे शुद्ध । विस्मरे संसार दुखद । त्याचे फल मज मिळे ।। ३६ ।। लोक नित्य हास्य करिती । आपुलीं उलटी प्रचिती वाटे नारायण चित्ति । उदराया आला दिनासि ।। ३७ ।। माझिये पाठाचें फल । आपुल्या दर्शनें सफल । झालो पावन केवळ । कोटि प्रणाम चरणी की ।।३८।। प्रभु देति अलींगन । कृतार्थ जाहला ब्राम्हण । सत्यगितार्थ तुज लागून । कळला बा! ।। ३९ ।। गीतांपाठ शुद्धाशुद्ध । ईश्वरी नसे भेद तयात भाव शुद्ध । पाहि होवें संतुष्ट ।। ४० ।। लाख समयी पाठ केला । भाव अशुद्ध राहिला । योग्य फल न मिळे तयाला । भाव ग्राहि जनार्दन ।। ४१ ।। झाला प्रसन्न ब्राह्मण । केलें आत्मसमर्पण । प्रभु करिती उद्धरण । सन्निध राखिला ।। ४२ ।। द्विज तारिला बुद्धीहीन । तीर्थ रामासी प्रेमेदान । गणिका तेली उद्धरून । पुढती करी कथन ।। ४३ ।। दक्षिय देशीं प्रभुभ्रमण । श्रीरंगम् क्षेत्र पुण्य । मार्गी अक्षय वट पावन । तीर्थी पातलें ।। ४४ ।। निर्वाहास भिक्षान्न । कैं न मिळे कैं कदन्न । कृष्णदास घाली

भोजन । स्वहस्तें ।। ४५ ।। एके दिनीं न मिळें भिक्षेस । उपवास घडे उभयतांग । निर्जन स्थानी कीर्तन, जपास । शिव सन्निध बैसले ।। ४६ ।। कृष्ण कृष्ण नामें ध्वनी । उच्चस्वरें निघे मुखातूनि । त्यामार्गे तीर्थराम धनी । धन गर्वित पातला ।। ४७ ।। यौवन आणि धन । तयांत प्रभुत्व असाधारण । खाद्य, पेय, मनोरंजन । ललने सहकाळ घालवी ।। ४८ ।। संगे गणिका दोन । मानी जीवन सुखनिधान । हास्य, परिहास मार्गानें । शिवालयीं पातले ।। ४९ ।। तेथप्रेमावतार चैतन्य ! एकाकी बैसले पाहून । कांती अनुपम जाई मोहून । पृच्छा करी कोण तूं ।। ५० ।। प्रभु कीर्तन मग्न ।। उच्चस्वरें विचारी कोण । कां रुचले एकान्त स्थान । कथन करी ।। ५१ ।। चैतन्य वदले तयासी । मीं गृह त्यागी संन्यासी । प्रीय भगवंतासी । शोधाया भ्रमन करी ।। ५२ ।। एकांत माझा आश्रय । बंधु असे वैराग्य । संकीर्तन एकमात्र कर्तव्य । नामोच्चारण एकांतीं ।। ५३ ।। ऐसें ऐकोनी उत्तर । कां ति देखे अति सुन्दर । तयामाजीं तारुण्य बहर । विचित्र पुरुष वाटला ।। ५४ ।। उच्चकुलीं दिसे जन्म । वरी वैराग्याचें स्तोम । सुंदरी न मिळे अनुपम । यास्तव चालें भजन ।। ५५ ।। झालिया सुंदरी दर्शन । जाई वैराग्य भुलोन । संगे ललना दोन । बोले तयसी ।।५६।। कामदेव दंडित व्यक्ति । स्त्री सौंदर्य निंदित होती । भिक्षार्थ खापर हाती म्हणोनियां ।।५७।। वदल्या ऐसे अंगना तीर्थराम वदे प्रति वचन । नेत्रीं असे आकर्षण । विरक्त साधू वाटतो ।। ५८ ।। लक्ष्मी गणिका बोलें वचन । प्रपंच गेला नासोन म्हणोनि डोई मुंडोन । सन्यासी जाहला ।। ५९।। नारि मुईधर संपति नासि । मुंडमुडाई भये संन्यासी ।। खाण्या न मिळे एकशीत । करी एकादशीं व्रत । तैसा संन्यासी विरक्त । आम्हीं दृष्टीं नसो तो ।। ६० ।। तीर्थरामे केला पण दारूण । साधुवरी घाली मोहन । वांछा सकल पुर्खीन । उभयतांची ।। ६१ ।। गणिका रूप गर्वित । प्रभु सन्निध गेल्या त्वरीत । नेत्रसंकेत करीत । चित्रभंगू लागल्या ।। ६२ ।। प्रभु किर्तनी तन्मय । त्यांसी ही कृति अज्ञेय । लक्ष्मीवदे साधु महाशय । पृच्छा करणे असे की ।। ६३ ।। प्रभु पतित पावन । अविकार नेंत्रे पाहून । माते! हा संतान दीन । काय आज्ञा मजसी गे ।। ६४ ।। इतुके ऐकता शब्द । गणिका झाल्या मुग्ध । वाचा खुंटे जाहल्या स्तब्द तयाचे धैर्य गळले ।।६५।। पेटे पश्चातापाग्नि । दग्ध झाली ह्रदये दोन्ही । जाहली आत्मग्लानी । समुन्व कर जोडोनी ।।६६।

जाई धावोन । पश्चाताप दग्ध पुर्ण । धरिले प्रभु चरण । उध्दरा दीन पामरा ॥ ६८ ॥ उच्च स्वरें करी चीत्कार प्रेम विव्हळ गौर । आलिंगन देती त्वरे । नृत्य करिती त्यासवे ॥ ६९ ॥ हें दयामय प्रभुवर । पापी मी करा उध्दार तू पुण्यत्मा अससी थोर। तुझेनि पवन झालो मी । ७० ॥ तु असे भाग्यवान । जो श्रीहरींचे करी सेवन । त्याचे पाप जाई पळोन । वदले प्रभु, धन्य तु ॥७१॥ देऊनि हरिनाम मंत्र । बनें वैष्णव पवित्र । स्मरण हरिचे अहोरात्र । तिलक माला करी सदा ॥७२। गणिका जाहल्या पवित्र । हरिस्मरती अहोरात्र । काम विकर अणुमात्र । नराही प्रभूकृपे ।७३। पाती निष्ट भार्या तीर्थराम । कमलकुमारी देवीनाम । तोषे पाहि साध्वी परम । पति वैष्णव जाहला ॥ ७४ ॥ ती ही शरण जाई प्रभूस । संतोष दयाघनास । देति हरीनाम मंत्रास । केला उध्दार सतिचा ॥ ७५ ॥ तीर्थराम केला कृतार्थ । गणिकासीं लाविला भक्तिपंथ । यापरी वटेश्वरी दिनसात । वास्तव्य केंले ॥७६॥ तेथुनि श्रीरंगम क्षेत्रास ॥चातुर्मास्य होई वास । भक्ता लाभे सहवास । प्रभु मदुरेस पातले ॥७७॥ मदुरेसीं विप्रभाविक । श्रीराम निःसिम सेवक । परमार्थ मार्ग पथिक । भिक्षेस पाचारिया प्रभुसि ।७८। नित्यमुखी सीताराम नेंत्राश्रुदाटती परम । उच्च स्वरे वदे नाम । भाव उत्तम वानला ।७९। भिक्षेसी दिधले निमंत्रण । पात्रि परि न दिसे अन्न । पृच्छा केली ब्राम्हण भिक्षेसी उशीर कासया ॥ ८० ॥ विप्र भावावेशें पुर्णं । रांधुनि घातले भोजन । आपण आनशन करुनिराही ॥ ८१ ॥ प्रभु पृच्छा करितीं विप्रा । दु:खित कासया अनिवार । प्रसाद न भक्षी कणभर कोण्या कारणे ॥ ८२ ॥ विप्र बोले सिताहरण । करुनि गला दुष्ट रावण । मातेसी स्पर्श केला म्हणुन । दुःख दारुन मजलागीं ॥ ८२ ॥ त्याचें मज नित्य स्मरण म्हणोनि न करी अन्नग्रहण । वाटे त्यजावे जीवन । अनुदिन फ.टे काळीज ॥ ८४ ॥ एसा देखुनीं अनुराग । चकित होती गौरांग । हा उच्चभाव जगी न देखे । वाह धन्य म्हणोनिया ॥ ८५ ॥ तु थोर अससीं विव्दान । कैसे दाविसी अज्ञान । सितेसी करण्या हरण । रावण सत्य असमंब ॥८६ । ती असें ईश्वर लिला । तु करी भोजनाला । प्रभु आग्रह देखिला । केले अल्प भोजन ॥ ८७ ॥ परी न होई समाधान ॥ रामायणी कथा सिताहरण । चिंता वाढली दारूण । अशांत मन तयाचे ॥ ८८ ॥ प्रभु करी मार्ग भ्रमण । कृतमाला तीर्थी स्नान । महेंद्र गिरी परशुराम दर्शन । तैसें सेंतुबंध रामाचें ॥८९॥ धनुष्य तीर्थाहून रामेश्वर । न मिळे भावे शिव शंकर । ब्राम्हण मुखे कथा मनोहर

। कुर्म पुराणी ऐकीली ॥ ९० ॥ प्रसंग सिता हरण । पुराणीक सांगे खुलवून । सिता देखे दुष्ट रावण । अग्नि आराधन ते केले ॥ ९१ ॥ आग्निने केलें रक्षण । तीसी पुरो ठेविले नेऊन । छायेंचे केले हरण रावणें ते वेळी ॥ ९२ ॥ रावणा करुनि वध । नंतर केला सिता शोध । आग्निचा यता संबंध । सितेने देह आर्पिला ॥ ९३ ॥ अग्नि करि रुप प्रकट । दिधली सितामाई चोखट । आज्ञा काय ? स्पर्श ओखट । दुष्ट करी ॥ ९४ ॥ प्रभुनी केली कथा श्रवण । जाहले अती प्रसन्न । त्याची प्रतीलीपी करून । आपुल्या संगे घेतली । ९५ ॥ ही राम भक्ता दाखवावी । शंका तयाची जावी । परी अशंका न यावी स्वकाव्य म्हणोनी ॥९६॥ आपली नक्कल दिधल ब्राम्हणा । तिर्ण घेतली आपण । विक्षेप न हो मनी । ऐसें केलें॥ ९७ ॥ जीर्ण पृष्ट सन्निध घेवोन । मदुरेसी यती परतोन । दाविलें रामसेवका लागुन । समाधान जाहले तयाचे।.९८॥ व्दिज जाहला प्रेमाकुल । तेणें धरिल चरण कमल । आजि दुःख केले । जाहलों संतुष्ट ॥९९॥ तुम्हीच माझे इष्टदेव । श्री रघुनाथ वाटती सदैव । दर्शनें मजसी ठेव । अमोघ प्राप्त जाहली ॥ १०० ॥ केले सप्रेमे स्तवन । प्रभु देती प्रेमालींगन । ऐसा न देखिला भावपुर्ण । तया केले कृतार्थ ॥१॥ प्रभु दिन दुःख भजन । करिती भक्त समाधान । संतावाचूनिया कोण दीनां उध्दरी ॥२॥ पांडय देशी ताम्रपर्णी तीरी । श्री नव तिरुपति क्षेत्र तिल कांचीत शंकर । दर्शन घेंती ॥ ३ ॥ गजेन्द्र मोक्षणी लक्ष्मीपती । पानागडीं सिता पति । चाम्ता पुरीं राम लक्ष्मण, सिता । श्री वैकुठ दर्शन घतले ॥ ४ ॥ श्री अगस्त्य कन्याकुमारी । आम्लीतळी श्रीरामचंद्र । तीर्थे करीत मालावर प्रदेशीं पातले ॥ ५ ॥ प्रांती भट्टधारी नामे साधु । परी कृतीचा असे भोंदु । मरणोच्चाटन तंत्र विद्या बांधु वशीकरणी तत्पर ॥ ६ ॥ कृति स्त्रियासि भुलविती । आपुलें सन्निध राखिती । त्यांचे प्रलोभन दाविती । वाटसरावया पंथासी । ७। प्रभु सन्निध कृष्णदास । निष्ठेंने करी प्रभु सेवेस । स्त्रिचे दावूनि आमिष । वश केले । ८॥ केली बुध्दी भ्रष्ट । प्रभुसी जाहलें कष्ट । कृष्ण दासा द्यावे स्पष्ट मागणी केली । ९ ॥ प्रभुवरी सोडीले अस्त्र । मारण्या धावल शस्त्र परी परतविलें तयावर । शरीरी पडें ॥ ११ ॥ सारे भ्याले भट्टधारी । करिती तेथुनि पोबारा । केश पकडूनि बाहेर ।

पयस्विनी । तिचे करूनियां स्नान । आदि केशवाचें दर्शन । प्रणामे, स्तविले ।। १४ ।। स्तुति करितां भावाविष्ट । जाहले प्रेमाविष्ट । स्थानिय लोक जाहले आकृष्ट । अपुर्व प्रेम पाहूनिं ।। १५ ।। प्रभूसि प्राप्त जाहला तेथ । ब्रह्म संहिता अपूर्व गंथ । पंचमाध्याय आविष्कृत । वैष्णव सिद्धांत सार असे ।। १६ ।। ग्रंथाचे विशेष अपूर्वत्व । कृष्णाचे सर्व कारणकारणत्व । कृष्ण धाम, माया, सृष्टितत्व । अवतार तत्व विभिन्न जे ।। १७ ।। निर्विशेष ब्रह्मतत्व । हरि धामाचे स्वरूप, देवी, शिव । सूर्य, शक्ति, गणेश, विष्णुतत्व । तारतम्य तयांत ।। १८ ।। प्रेमभक्ति आदि सिद्धांत । नाना प्रकारें ग्रंथित । ग्रंथ नक्कल करूनि तेथ । सन्निध ग्रंथ ठेविला ।। १९ ।। तेथूनि अनंत पद्मनाभ । मंदिरीं राहिले प्रभु । जनार्दनाचा लाभ । दर्शन केलें श्रद्धेने ।। २० ।। पुढती पयस्विनी तीरी । शंकर नारायण हरी । तेथूनि आद्य मठ श्रुंगेरी । स्थानी त्वरे पातले ।। १२१ ।। आद्य अव्दैत मत पीठ । बद्रिकाश्रमी जोशीं मठ । पुरी गोवर्धन मठ । शारदामठ व्दारकेशी ।।२२।। दक्षिणी आद्य मठ श्रुंगेरी जगदगुरू शंकराचार्य । श्रीरामचंद्र भारती आचार्य । भेटि घेतली सप्रेमे ।। २३ ।। पश्चात मत्सतीर्थ । स्नानें तुंगभद्रे केले कृतार्थ । येति कर्नाटक प्रांती । उडपी क्षेत्री पातले ।। २४ ।। उडपी सन्निध पाजक क्षेत्र । व्दैतमती श्रीमध्वाचार्य त्यांचे अष्ट मठ पवित्र । श्रीमूर्ति नर्तक गोपाळ ।। २५ ।। येऊनिया उडपी क्षेत्री । प्रभु राहिले त्रिरात्र । नृत्य कितंन अहोरात्र । केले गोपालमंदिरीं ।। २६ ।। मध्वसंप्रदाय तत्ववादी । मायावादाचा विरोधी । तत्वे श्रीपुरुषोत्तम बोध जो कां सविशेष ।। २७।। मायावादी केवला व्दैतवाद । तत्ववादी शुध्द व्दैतवाद । मानिती दोघात विरोध । वादे स्पष्ट होय ।। २८ ।। प्रभु संन्यासी मायावादी । असंभाव्य समजली तत्ववादि । मनीकट्टा विरोध । दाविती माध्व ।। २९ ।। प्रभुंचा अदभुत भाव विकार । वैष्णव देखोनि होई सत्कार । माध्ववैष्णव अहंकार । दुर व्हावा म्हणोनी ।। ३० ।। आचार्यास करिती प्रश्न । साध्य साधनी श्रेष्ठ कोण । वर्णाश्रम धर्मचालन । कर्मफल अर्पण करोनी ।। ३१ ।। श्रीकृष्ण चरणी मन । कर्म मिश्रा भक्ति श्रेष्ट साधन । पंचविध मुक्ति प्राप्त करून । वैकुंठि जाणे साध्य हें ।। ३२ ।। गीता भागवत प्रमाण । देऊनि प्रभु करितीं कथन । वर्णाश्रम धर्म त्यागून । अनन्य शरण श्रीकृष्णी ।।३३।। अनन्य शरण होऊन नवविधा भक्ति अनुशिलन । विशेषे श्रवण किर्तन । श्रेष्ठ साधन हे असे ।। ३४ ।। पंचम पुरुषार्थ कृष्णप्रेम । हेंचि

साध्य श्रेष्ठ परम । निंदिती शास्त्रे कर्म । तैसे पारमार्थिक ॥३६॥ कर्मव्दारा प्रेमभक्ति । कृष्णाचे ठायी अशक्य प्राप्ति । भक्त त्यजिती मुक्तिा । पंच नरक तुल्य त्या ॥३६॥ म्हणोनि कर्मा ज्ञानीं । दोन्ही असती भक्ती विहीन । ऐसे ऐकोनी विवरण । स्तंभीत जाहले सकल ॥३७॥ आपूलिया मता अपूर्णता । आचार्य दिधली मान्यता । चित्ती अहंकार तत्वता । पार गळे ॥ ३८ ॥ मार्गीची तीर्थे करोनी । प्रभु येति गोकर्णी । घेऊनि शिव दर्शन । करवीरी पातले ॥ ३९ ॥ महालक्ष्मी दर्शन । घेऊनि केले पुढति गमन । भीमातीरा लागून पंढरी क्षेत्रि पातले ॥ १४० ॥ पांडुरंगाचे घेती दर्शन । चित्तीं होय समाधान । भाविक विप्रें पाचारण । भिक्षेस केलें ॥ ४१ ॥ स्वीकारिलें निमंत्रण प्रभूचें जाहले भोजन । विप्रें केलें कथन । वृत्त अपूर्व परियेसा ॥ ४२ ॥ येथ भगवत भक्त नामा । श्री माधवेंद्रपुरी महात्मा । तयाचा शिष्य परम । श्रीरंगपुरी ॥ ४३ ॥ तयाचें नाम ऐकतां । प्रभुसि जाहली आतुरता । करवीं भेटी त्वरीत । विप्रा महापुरूषाची ॥ ४४ ॥ श्रीरंग पुरी वास स्थानीं । दुरूनी देखीले नयनी । साष्टांग नमन करूनि विनम्र होती चैतन्य ॥ ४५ ॥ प्रभु विनम्र पाहून । पुरी देतीं आलिंगन । आमुच्या गुरू कृपेवाचून । नम्रता न ये ॥४६॥ संन्यासीं असोनि विनय । हें महान आश्चर्य । आपुला द्यावा परिचय । असाधारण वाटतां ॥ ४७ ॥ भक्तिभाव प्रवर्तक श्री माधवेंद्रपूरी अलौकीक । त्याचे ईश्वरपुरी शिष्य प्रमुख । मंत्रदीक्षा गुरुमम ॥ ४८ ॥ श्रीमत केशव भारतीं संन्यास दीक्षा गुरुअसती । व्दिपी माझी बसती । पुर्वाश्रमीचीं ॥ ४९ ॥ वृत ऐकूनि पुरीं प्रसन्न । आपण निकेटसंबधी जाणा । पुर्वीचें स्मृति चिन्ह उमटो लागे ॥ ५० ॥ व्दिपी अव्दैताचार्य । गृहि गुरूसवें होते वास्तव्य । जगन्नाथ मिश्रे अपुर्व सत्कारिलें ॥ ५१ ॥ श्रध्दाळू पत्नी शचिदेवीं साक्षात अन्नपुर्णा देवीं भाव भक्ति देवि । अतृप्त भिक्षा ज हली ॥ ५२ ॥ त्याचा पुत्र विश्वरूप । गुणसंपन्न भाग्य स्वरूप । जयाची विरक्ति अनुप यौवनीं घेई संन्यास ॥ ५३ ॥ ज्ञानी असोनी विरक्ति । परिव्राज वाढवी भक्ति । विचींत्र दैवगती । संन्यासि राहि अर्पव्दय ॥ ५४ ॥ तयाचा भाव पांडुरंगीं तेणें केला तनु त्याग । चंद्रभागातीरी सुभग । समाधि भाग्य लाभले ॥ ५५ ॥ घेतला चतुर्थाश्रम । शंकरारण्य घेंतलें नाम । सात्विक भाव कांतीं रविसम । योगी अपुर्व भासला ॥ ५६ ॥ ऐकूनि सारा वृतांत । अश्रु बिंदु येंति नेंत्रात कंठ सदगदित । होई चैतन्य बोलती ॥५७॥ महाभाग शंकरारण्य । ममजेष्ट बंधु जाणा । पुरीं देतीं आलिंगना स्तुति करीतीं

प्रभुंचि ॥ ५८ ॥ तुम्हीं दोघे संन्यासि । होवोनि जाहला वनवासि । धन्य तुमच्या भाग्यासि । सींमानसे ॥ ५९ ॥ सारे वृत्त केले कथन । पुरिंचे जाहलें समाधान कुल पवित्र धन्य माता पिता ॥ ६० ॥ वास्तव्य केले तीन दिन । चाले परमार्थ मंथन । स्वामिचा निरोप घेऊन । पुढति होती मार्गस्थ ॥ ६१ ॥ कृष्णा वेण्णा संगम । कऱ्हाड क्षेत्र पवित्र परम । शोभा अद्भूत रम्य पाहता तोष वटला ॥ ६२ ॥ संगमी करोनि स्नान । अपुर्व सन्यासी देखुन । नवल करिती विप्रगण । प्रभुस भिक्षा करविली ॥ ६३॥ विप्र बिल्व मगलकृत । श्रीकृष्णा करणामृत ग्रंथ । दिधला जाहले कृतकृत्य । रसमय ग्रंथ ॥ ६४ ॥ यात्रा करित जेंजुरीस । येती खंडोबा देव वसे । श्री शिवे अवतार घेतलासे । दुष्ट निर्दलाया । ६५ ॥ खंडोबाचे भव्य मंदीर । मुर्ती असे भव्य सुंदर । अश्ववाहन श्वानसहचर । खड्ग भाला शस्त्र करा ॥ ६६॥ घेतले देवदर्शन । वाटे चिंता समाधान । देव दासी प्रथा पाहुन । दया उपजे ॥ ६७ ॥ अविवाहित कन्यका । देवासी अर्पण करिती लोक । देवदासी म्हणती देखा । भाबिकपण ॥ ६८ ॥ पतिता नारी पाहुन । प्रभुंनि केले अवलोकन । त्यासीं बोलतीं वचन देवीनो धन्य तुम्ही ॥ ६९ ॥ अन्य स्त्रियाचे पती । अस्थि मांस पुतळे असती । तुमचा साक्षात पति । उमाकांत खंडोबा ॥ १७० ॥ तुम्ही करा हरी कीर्तन । अखंड मुखी चिंतीं ध्यान । नित्य करा स्मरण । पतित पावण देव हा ॥ ७१ ॥ जो त्यासी जाई शरण त्याचे होय पाप क्षालन । ऐसी अद्भुत शक्तिपुर्ण । नामी वसे ॥ ७२॥ ऐसे वंदोनि संकीर्तन । करू लागले बाहूउभारोन उच्च स्वरे अश्रूपूर्ण नयन । तनु रोमांचित ॥ ७३ ॥ हरिनाम गजर धर्म सुटे तनू वरो । गाती कंठे सुस्वर । सप्रमे देवदासीं ॥ ७४ ॥ तयामाजी प्रधानदासी । इंदीरा नाम तीयेसी । लोळन घेई चरणासी । पाप क्षालना ॥ ७५ ॥ वदे दिन वचन । व्यभिचारें नासले तन । मि पापी चरणी शरण । उध्दरा मज प्रभुराय ॥ ७६ ॥ तियेसी धैर्य देवून केले पुर्ण समाधान । श्रीकृष्ण चरणी ठेवा मन । दयाघन तुम्हा तारील ॥ ७७॥ प्रभुं आज्ञा शिरीं ठेउन । सर्वस्व दीना करी दान । स्वयें भिकारी बनुंन । कृष्ण कीर्तनी रतेसदा ७८ नगरी मागें भिक्षान्न । त्यावरें निर्वाह करून । प्रभुवाक्य प्रमाण । मानी तोषे ॥ ७९ ॥ काले साक्षात्कार । झाला प्रसन्न श्रीहरी । सकल देवदासी उध्दार । पवित्र नामे जाहला ॥१८०॥ यापरी देऊनि वरदान । प्रभु निघाले तेथून । चोरा नंदी लागे वन । वस्तीस्थान डाकुंचे ।८१। यापरी चैतन्य

दयाघन । करिती भक्तावरी दयापूर्ण उध्दरती । अज्ञ सुज्ञ सज्जन पापी दुष्ट तेचेचि ॥ ८२ ॥ प्रभु अवतार कारण । जनांचा उध्दार कारण । तीर्थ यात्रा मिषे भ्रमण । संकिर्तन प्रेम दाविले ॥ ८३ ॥ चै. वि. ग्रंथ रसाळ । मध्य लीला सोज्वळ । व्यंकट चरित कृष्णदास उध्दार मंगळ । गणिका परिवर्तन ॥ ८४ ॥ श्रीराम भक्त शंका समाधान । पंढरी कन्हाड क्षेत्र पावन । मध्वाचार्य मीलन । खंडोबा दर्शन बाविसाविया । १८५ ॥ श्री. चै. वि ग्रंथ मध्य प्रसंग व्यंकटेश चरित्र. कृष्ण दास उध्दरण, गणिका चित्त परिवर्तन, श्रीरामभक्त शंकानिवारण, पंढरीक्षेत्र विश्वरुप वृत्त श्रवण, कहराट जंजुरी क्षेत्र दर्शन । देवदासी उध्दरण मध्वाचार्य मीलन, आदिकथा कथन नाम अध्याय २२ वा समाप्त ओ सं १८५ ए सं २७६९ दि ९-७- ६४ गुरूवार जेष्ट



## अध्याय २३ वा

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्री गुरुभ्योनमः ॥ श्रीकृष्ण चैतन्यायनमः ॥ डाकूचा प्रमुख दलपति नौरोजी नामे क्रूर अति । विशेष हिंसा प्रवृति । भीती वाटे सकळीका ॥ १ ॥ व्दींतीय नाम आतंक । त्यासींवाहती सकलीक । आतंक अर्थ भय दुःख । तैसें वर्तन तयाचे ॥ २ ॥ प्रभु जावया निघाले वनी । अतिवंध केला सकलानी हिंसक क्रुर डाकुनी । व्याप्त वन ॥ ३ ॥ भाविक जन वचन । न मानीतां जाती तेथून । मी भिकारी अकिचन॥ भय मज कशाचे ॥ ४ ॥ माझा घेतला प्राण । कामना तयाचि हो पूर्ण । तनु माझी समजेन । कारणी लागे ॥ ५ ॥ प्रभु प्रवेशति वनात । श्रीहरींगुण गात । वृक्षातळी झाले आसनस्थ । नाम गाती ॥ ६ ॥ मधुर गान पडे श्रवणीं । डाकुसंगे

संन्यासी चैतन्य । वृक्षातळी ठीक असे ॥ ८ ॥ भिक्षा माझा आधार । तियेचा करीन स्वीकार । येऊनिया येथवर निवेदिले ॥ ९ ॥ प्रभु आज्ञा मानून । सामग्री आणाया धाडी गण । श्रीकृष्ण भजनी विभोर मन । देहभान हारपले ॥ १० ॥ चैतन्यदशा पाहून । डाकूचे पाझरें मन । क्रौर्य गेले वितळून । चित्त शुध्द जाहले ॥ ११ ॥ गाढ धरीं प्रभु चरण माझेंवरी घातले मोहन । करिता मंत्र उच्चारण । कथन करा मज लागी ॥ १२ ॥ निवृत्त जाहलो हिंसेपासुन केलें कृत्य अति दारुण । आपुलिया चरणी शरण । उध्दरा पापिया ॥१३। चित्तशुध्द झालीया जाण । अरि मित्रासमान व्याघ्र न खाई जाणून दंश न करीं सर्प तया ॥१४। तेंथ डाकू काय करी । वृत्ति वनें निर्विकारी । प्रभुप्रार्थना परोपरी करी मंत्र द्या मज १५ विप्र वंशी माझा जन्म । नित्य केलें कुकर्म । आपुलियां दर्शने परम । भाग्य उदेलें ॥१६॥ न तोडी आपुलें चरण । आपुला आनंद मजलागून । द्या, होई पाप क्षालन । दुष्टकर्माचें ॥ १७ ॥ ऐकूनियां आर्तवचन । नौरोजीबा तु धन्य । वृद्धपणें तुझें मन । पश्चातापे पोळलें । ॥ १९ ॥ संसारी कृष्ण कीर्तन । हेंचि सार असें जाण । नश्वर सारे धन, रत्न शाश्वत एक हरिनाम ॥ १९ ॥ भगवंताचे ऐक वचन । दुष्ट, दुराचांरी होय पूर्ण । परी माझे करी भजन । तो सज्जन साधुगणी ॥ २० ॥ दयाळू श्रीहरि वचन । मानी बाबा तू प्रमाण । नित्य करीं नाम कीर्तन । मंत्रदीक्षा दिधली तया ॥ २१ ॥ उठोनियां प्रातःकाळीं । मेळविली मंडळीं । शस्त्रास्त्रें सारी फेकिली । नौरोजी वदे मित्रासी ॥ २२ ॥ बाबानो ! आजवरी केलें पाप । तें जाहले अमाप । नामाचा कळला प्रताप । यास्तव निवृत्त जाहलों ॥ २३ ॥ म्या गाजविला अधिकार । करविलें कर्म घोर । मज पस्तावा तयाचा थोर । होत असे ॥ २४ ॥ तरी मातें क्षमा करा त्यजिली हिंसा, सारा पसारा । बनलों मी भिकारी । श्रीहरीस्तव ॥ २५ ॥ बाल्यापासूनि येथवर । केले कुकर्म घोर धन, लोकिकास्तव शरीर । संसारी वेचियले ॥ २६ ॥ जाहला महापुरुष लाभ । तेणें चित्ती होय क्षोभ । हरिपदी वृत्ति सुलभ । जडलीं आतां ॥ २७ ॥ नरजन्म कर्तव्य थोरीं । मनीं चितावा श्रीहरी । बळकटं आयुष्य दोरी । तोवरी विवेक करावा ॥ २८ ॥ आयु सरे जाय प्राणी । मढें काय गायीं गाणीं । याचा विवेक करूनी । भजनी लागलों ॥ २९ ॥ ऐकुनि नौरोजीचे बोल । सवंगडी होती विव्हळ । नेंत्रीं वाहे अश्रुजल । सकलांच्या ॥ ३० ॥ धन्य बारे नौरोजी । हरिची तुजवरी मर्जी । सत्संगें मति तुझीं निर्मळ जाहलीं ॥ ३१ ॥ आम्हीं न करु आजपासोन । धंदा डाकुगिरी जाण

तुझें सह हरिभजन । करूनि जीवन घालवूं ॥ ३२ ॥ सकल अनुतप्त पाहोनी । घेतले प्रभु सन्निधानी । भाग्य उदेले तत्संगी । सत्संग लाभला ॥ ३३ ॥ प्रभु पातले खंडाळा ग्रामी । जनता मानी भाग्य परम । सत्कार केला अनुपम । आशीर्वाद दिधला ॥३४॥ गोदातटी जनस्थान रामप्रभुचें निवास स्थान । गौतमीचे पवित्र स्नान । पावन तीर्थ ॥३५॥ पुराणीं दंडकारण्य । वनवासी राम वस्तीस्थान । शूर्पनखेचें नाक कान । लक्ष्मणें कापिले ॥ ३६ ॥ भूमीसी असुरभार । म्हणोनी असुर संहार । निर्भय ऋषिवर । यज्ञ करिती ॥३७॥ गोदातीरी कपालेश्वर । तैसे अंबा, मुरलीधर । बालाजी, श्रीराम उमा महेश्वर । गंगे सन्निध राहती ॥ ३८ ॥ आचार्य पीठ पंचवटी । नारो शंकर गोदातटीं । तपोवनी वृक्षांची दाटी । पवित्र संगम गोदेचा ॥ ३९ ॥ ऐसे पवित्र जनस्थान । नाशिक क्षेत्र संज्ञा । प्रभु पातले सहगण । तीर्थ दर्शन व्हावया ॥ ४० ॥ गोदातीरीं राममंदीर । श्रीराम मूर्ति अतिसुंदर । नृत्य, कीर्तन करिती प्रभुवर । आनंदेमग्न ॥ ४१ ॥ अहो रात्र नृत्य कीर्तन । धर्मे आर्द्र होई तनु ! तीं पुसावी नौरोजीनें । वारंवार ॥ ४२ ॥ चतुःसंप्रदाय स्थान । आखाडा नामाभिदान । तेथ श्रीरामा पुढती नर्तन । प्रतिदिन होतसे ॥ ४३ ॥ तेथील तपस्वी महंत । त्यांनी देखिले कीर्तन नृत्य । तेही देहभान विस्मृत । होऊनि नाचू लागले ॥ ४४ ॥ प्रभू नृत्ये आखाडा पवित्र । स्थान महात्म्य वाढें क्षेत्रीं । वर्तमान अखंड कीर्तन सत्र । स्थिर असे ॥ ४५ ॥ विद्यमान महंत दीन बंधु । परंपरा चालविती शुद्ध । आल्या साधूचा घेती शोध । चैतन्य निष्ठा अपार ॥ ४६ ॥ प्रभु वास्तव्य कांही दिन । वटोदरा नगरी गेले तेथून । राजा भक्त सुजाण । भव्य मंदिर तयाचे ॥ ४७ ॥ संताचा आदर करी । पाचारूनि कृष्णमंदिरी । ठेवि पातले गौरहरि । दर्शनार्थ ॥४८॥ प्रभुचे अद्भुत नृत्य । अलौकिक प्रेमभक्ती । राये सत्कारिले तयाप्रति । द्रव्य अपार समर्पिलें ॥ ४९ ॥ यतिधर्मानुसार केला मुष्टी भिक्षा स्वीकार । राजास वाटे आश्चर्य थोर । विरक्त यति देखूनि ॥ ५० ॥ राजा गेला शरण । केला तयावयी अनुग्रहपूर्ण । तेथूनि ठेविलें प्रस्तान । पुढती जावया ॥ ५१ ॥ होय एक अद्भुत घटना । नौरोजीचे भाग्य जाणा । महाप्रभु सन्निधाना । तनु नश्वर त्यागिली ॥ ५२ ॥ नौरौजीत्यागीं शरीर । प्रभु तेव्हीं अश्रुपूर । स्वहस्ते केला संस्कार । वैष्णव थोर म्हणोनि ॥ ५३ ॥ आपुल्या हस्तें समाधि । देऊनि, वारी जन्म संबंध । दुष्ट डाकू, पापबुद्धी ।

॥ ५५ ॥ बडोद्याहूनि कर्णावति । शीघ्र येती द्वारकेप्रती । कृष्ण भगवंताची मूर्ति । न्याहाळीली ॥ ५६ ॥ द्वारकाधीश आराध्य दैवत । मंदिरी केले कीर्तन नृत्य । आनंद भोगीती मनसोक्त । पुढती प्रस्थान ठेविले ॥ ५७ ॥ सौराष्ट्री केले गमण प्रभासी सोमनाथ दर्शन । प्राची, सरस्वति, संगमतीर्थ वदन । विद्यानगरी परतले ॥ ५८ ॥ रायासी कळे वृत्तांत । भेटाया धावला त्वरीत । आलींगनीं केला कृतार्थ । राया तोषला ॥ ५९ ॥ श्री ब्रम्हसंहिता ग्रंथ । तैसा श्रीकृष्ण कर्णामृत । दोन्ही ग्रंथ रायासी त्वरीत । प्रदान केले ॥ ६० ॥ तेथुनिया आलालनाथ । पुन्हा पुरुषोत्तम नगरित । जगन्नाथ पुरी ख्यात देव चैतण्य पातले । प्रभु आगमण समाचार । कळतां आले भट्टाचार्य । तैसें गोपीनाथाचार्य । केला साष्टांग प्रणाम ॥ ६२ ॥ सकलासीं कळे वृतांत । दर्शनार्थ येती भक्त । तयाचा परिचय यथार्थ । भट्टाचार्य करविला ॥ ६३ ॥ राजाप्रतापरुद्र पुरोहित । काशिनाथ भिश्र पंडीत । निर्जनस्थान एकांत ।वास केला विप्रगृही ॥६४॥ प्रभु सेवक कृष्णदास । त्यास धाडिले व्दीपास । संगे देवूनि प्रसाद । वृत्तमातेस कळाया ॥६५॥ नाथ मंदीर सेवक । त्यांचा परिचय दिलासम्यक । तुम्ही भगवंताचे पाईक खरे असा ॥ ६६ ॥ व्दिपीचें सारें भक्त दर्शनार्थ येतीं पुरीत । परमानंद पुरी येत । दर्शनाशी ॥ ६७ ॥ यात्रा करुनि समाप्त । प्रभु येतीं पुरीत स्वरुपासी कळे वृत्तात । भटाया यतीं ॥ ६८ ॥ नाम दामोधर स्वरुप । प्रभु चरणीं लोलूप । प्रभुचे असे सारुप व्दितीय विग्रह मानिले ॥ ६९ ॥ एकांतावरी प्रीती । प्रभु सन्निध नित्य असतीं । ज्ञानी परि मौन वृत्ती । सेवा करिती निरंतर ॥७०॥ प्रभु विरहावस्थेत । आसता वेशुध्द होत । राधा भावे व्याकुळीत । अंकी ठविती मस्तक ॥ ७१ ॥ विरह वेदने व्याकुळ प्रभु होत शोकाकुल । रुदन करिती पडुनि गळा । अर्हनिश ॥ ७२ ॥ स्वरुपांचा प्रभुवरी भाव । प्रेम प्रणयमय सदैव लाभली दैनंदीनी सुदैव । व्दादशवर्षाची ॥ ७३ ॥ त्या दैनंदिनीतून । कळलें प्रभु वर्तमान । स्वरुप न होता सन्निधानी । अज्ञात वृत्त राहते ॥ ७४ ॥ महाप्रभु मनोगत । सहवासे तेचि जाणत । त्यांना होय संमत । ते कार्य पुढतीं ॥७५॥ महाक बिचंडिदास । विद्यापति ठाकुरदास । गीत गोविंद काव्यास । सुरस गाती ॥ ७६ ॥ तेणें प्रभु तृप्त होत । ऐसे स्वरुपएकनिष्ट भक्त । प्रभु जिवन समस्त । स्वाधिन होय ॥७७ ॥ ऐसे स्वरुप दामोधर । त्यांचा थोर अधिकार तयासी लाभे भाग्य थोर । सेवेचें ॥ ७८ ॥ प्रभुचे मंत्रगुरु । स्वामीं श्री ईश्वरपुरी । त्याचा असे सेवेकरी । गोविंदनामे

॥ ७९ ॥ गुरुआज्ञेवरुनि । सेवेचा धरुनि हेत मनीं । गोविंद यें प्रभुचरणीं । वृत्त कथी ॥ ८० ॥ गुरुआज्ञा मानूनि प्रमाण । राहविले सेवे कारण । सारे अडतसे त्याविन । शरिर सेवा नित्याची ॥ ८१ ॥वक्षस्थलीं प्रभु चरण । ठेवूनि गोविंद करी शयन । सेवा करी अति कठीण । प्राणापरी जपतसे ॥ ८२ ॥ विविद खादयवस्तु यति । गोविंद संमती विन प्रभुप्रति । न मिळतीं व्यवहार कठिण अति । तयाविण ॥ ८३॥ एसा एकनिष्ट अत्यंत । गोविंद सेवी सतत । प्रभ कारणें कष्टत । वात्सल्य दास्य भावे ॥८४॥ गुरू केशव भारती । गुरू बंधू ब्रम्हानद भारती । प्रभु भेटीस्तव यंती ।ईश स्वरुप मानूनि ॥ ८५॥ प्रभुस केला नमस्कार ।साक्षात गमता ईश्वर । गौरवदती आपण गुरुवर । अधिकारी थोर ॥ ८६ ॥ परस्परे करिती स्तुती । तयासीं ठेविले संगतीं । ईश्वर पुरीचे शिष्य येती । काशी यत्रेंहुनि । ८७ ॥ तयाची सांगाते ठेवून । भक्ता सवे नाथदर्शन । मंदिरी नृत्य किर्तन । अहर्निश ॥८८॥ सारे भक्त झाले गोळा । व्दिपी-हुनि येई मेळा । चाले किर्तन सोहळा । नाथ मंदीरी ॥८९॥ भटकाधिप महाराज प्रताप रुद्र राजा । जयाची सतुष्ट प्रजा धर्मात्मा विद्याव्यासंगी ॥ ९० ॥ राजा बहूश्रध्दावान । साधू सज्जनी नित्य मन । तोषे ब्राम्हण संतर्पण । दिन हीन तृप्त करी ॥ ९१ ॥ भट्टाचार्य सार्वभौम । त्यांनी कथिला प्रभु महिमा । चित्तीं उपज प्रेमा । दर्शनाचा ॥ ९२ ॥ संत सज्जनीं मन । राजे पणाचा राहो अभिमान । यावे स्वयें भवना । ऐंसें वाटे ॥ ९३॥ राजा साधुचा कैवारी । परी मन रते संसारी । अहंकारादि विकारीं । सापडला ॥९४ ॥ विषयी रमावे चित्त । हा राजेंपणासीं वरदहस्त तयातुनि राया कैचा मुक्त । होई चित्त निर्मळ ॥ ९५ ॥ मनी असे सत्यवृत्तो प्रभुन यावे गृहाप्रतीं । चित्तीं दर्शनाची आर्ती जडलेलीं ।९६। राये कथियले आचार्यास । मज भटवा चैतन्यास । व्हावया अनुग्रहास । ऐसा उपाय योजावा ॥९७॥ प्रभु भेटींत गुंतले मन । विषयाचें तुट अनुसंधान । तळमळ लाग अनुदिन । दर्शन व्हावे ॥ ९८ ॥ कथिती संत तुलसीदास । जेथ विषय आस । रामाचा नसें वास । त्या स्थानी ॥ ९९ ॥ अंतरी असे निर्मळ । वाचे राम नाम रसाळ । तेथ कौसल्येचा बाळ । वास करी ॥ १०० ॥ सूर्य आणि रजनी । कैसीं वसती एके स्थानी । काम राम तैसे दोन्ही । नांदगे न घडे ॥ १ ॥

दोहा – जहाँ राम तहँ काम नहिं, जहाँ काम नहिं राम । तुलसी कैसे रह सके रवि रजनी इक ठाम

ईश्वरचरणी अनुसंधान । गळे तो तो अभिमान । तैसा राजा अनुदित । गर्व शुन्य हो ॥ २ ॥ भट्टाचार्य सार्वभौम प्रभु भक्त परम । त्याचे करवीं भेट सुगम पत्र व्दारे विनविले ॥ ३ ॥ भट्टाचार्य कथिले प्रभुसि । राजा आतुर मानसि भेटिस्तव दिन निशीं । तळमळे ॥ ४ ॥ त्यासि दर्शन ययार्थ । देऊनि कराजी कृतार्थ । हा माझा मतितार्थ । जाणा उत्कंठित राजया ॥ ५ ॥ दोन्ही कर ठेवती कर्णी । विष्णु विष्णु मुखि वाणी । तुम्ही पंडित ज्ञानीं । धर्म हीन बोलता ॥ ६ ॥ राजयाचे दर्शन । संन्यासिया पाप जाण । मीं धर्महिन होऊन । रक्षण कैचे धर्माचे ॥ ७ ॥ मीं विरक्त संन्यासी । काय मागणे रायापासी । द्रव्य सन्मान भोजनासि रूचि नसे मानसी ॥ ८ ॥

श्लोक– निष्किचनस्य भगवज्जनोन्मुखस्य ।। पारंपार जिगमिषोर्भव सागरस्य ॥

संदर्शन विषयिणामथ योविताच ॥ हा हन्त! हन्त! विषभक्षण तोप्यासाधु ॥

जो असे अकिंचन । नित्य करी भगवभ्दजन । भवसागर जावा तरुण । इच्छा करीं । मानसीं ॥ ९ ॥ ऐसा ईश्वर विषी भाविक । तयासी विषयीं जनाचे मुख । अथवा स्त्रीदर्शन सुख । विषभक्षणा परिस ॥ १० ॥ विषभक्षणे देह नष्ट

विषयी, स्त्रीसंगती स्पष्ट । इह पर हो भ्रष्ट अमंगल ॥ ११ ॥

श्लोक– आकारदपिभेतव्यं: स्त्रीणां विषविणांमवि ॥ यथा ऽ हेर्मनस क्षोभ: तथा तस्याकृतेरपि ॥

व्दयांचा दिसे आकार । तोहि जाणावा भीतीकर चित्त क्षोभ प्रकार । तेथ होय ॥ १२ ॥ सर्पाकृति दृष्टि गवसली क्षोभ प्रवृति उमटली । उभय संसर्ग हा घाली । गर्तेमाजी ॥ १३ ॥ ऐसे प्रभु उत्तर । आचार्य होत निरूत्तर । काहि दिवस गेली यावर । रामानंद आले पुरित । १४ ॥ राय विद्यानगराहून । राजकार्य निमीत्त करूनि । मानसि प्रभु दर्शनी । आकांक्षा ठेवी ॥ १५ ॥ रायाचा भक्ति भाव । प्रतापरूद्रास विशेष होय । वास्तव मुक्तता सदैव । देई प्रभु सेवेशी ॥ १६ ॥ देखूनिया रामानंद । प्रभुसि वाटे आनंद । रामासहित आनंद । प्राप्त होई मजलागी ॥ १७ ॥ रायावरी प्रभु प्रेम । भक्ता तोष वाटे परम । भाग्य तयाचें असीम । ऐसे वदती ॥ १८ ॥ राजाचा भक्तिभाव । रायें निवेदिला सर्वथैव । राजा परमवैष्णव । जाणविलें ॥ १९ ॥ वृत्तित होई परिवर्तन । प्रभुसि जाहले समाधान राय घ्यावया दर्शन । मंदिरी ये ॥ २० ॥ ते समयी प्रतापरूद्र । पाहण्या येई । रथयात्रा । भेटि वृत्तांत कळे सार।

खिन्न होई ॥ २१ ॥ मजसी द्यावया दर्शन । प्रभुचे कचरावे मन । अधर्मी पापी अज्ञान । कवण तरावया उपाय ॥ २२ ॥ पृच्छा करिता सार्वभौम । वदले राजा तू भक्त परम । तुझे विषयीचा भ्रम । राये घालविला ॥ २३ ॥ यात्रा समयी प्रभु नृत्य । समयी राही उपस्थित । साधा वेष भक्तियुत । श्लोक गाई सन्निध ॥ २४ ॥ श्रवणे राजा संतुष्ट गमण करीतीं भट्ट । तृतिय दिनी पाहि वाट । रथ यात्रेची ॥ २५ ॥ पातला स्नान यात्रा दिवस । प्रभु मंदिरी करितीं प्रवेश । स्नान समयी भावावेश किर्तनीहो ॥ २६ ॥ विस्मृत होती देहभान । न करवें तयाचे वर्णन । भोवती भक्तजन । नृत्य करिती ॥ २७ ॥ स्नानयात्रा पडे पार । देव गेले अंत:पूरी । तेथुनियापक्षभरी । दर्शन न होय ॥ २८ प्रभुसि असह्य वियोग । नावरे गोपी भावावेग । अलालनाथी लागवेगी । जाती एकाकी ॥ २९ ॥ प्रभू त्यागिती पुरीला । भक्तजन दुखावला । व्दिपीचे जन दर्शनाला । येती त्वरे ॥ ३० ॥ सार्वभौम निताई अव्दैत । सत्वर येति अलालनाथीं । करूनिया विनति । प्रभुसि परतविले ॥३१॥ व्दिपीचे गौरभक्त । असतीं दोन शत । वास्तव्य भोजनाची त्वरीत । व्यवस्था राये करविली ॥ ३२ ॥ जाहला गौरभक्त परिचय । राजा प्रसन्न अतिशय । प्रभु चरणी दृढनिश्चय पाहूनि राय संतोषें ॥ ३३ ॥ भक्ताची व्हावीं भेटि । म्हणोनि प्रभु होती कष्टी । भक्तगण पडे दृष्टी । तोपले प्रभु ॥ ३४ ॥ तयात न दिसे प्रिय हरिदास । प्रभु करिती वास्तपुस । भक्त पत्करी । एकांतवास । कळले तया ॥ ३५ ॥ एकांताचे काय कारण । पुसता बोले भक्ति भाजन । मी असे जातीहींन । पदस्पर्श न हो राजपथी ॥ ३९ ॥ मार्गी माझा अपवित्र स्पर्श । भक्तांना होई त्रास । तेणे दु:ख चित्तास । असह्य होय ॥ ३७ ॥ माझा सांगावा प्रणाम । मंदिर समीप येण्या अक्षम माते करावीं क्षमा येथेचि वरा ॥ ३८ ॥ प्रभूसि निवेदिला वृत्तांत । हरिदास थोर भक्त । त्याचें शील, अमानी चरित । स्तविती प्रभु ॥ ३९ ॥ ऐकाजी भक्त-जन । आपणास मानी तुच्छतुण । तोचि अधिकारी जाणा । श्रीकृष्ण संकीर्तनाचा ॥ १४० ॥ मंदिर समीप पुष्पोद्यान तेथ दिधली कुटी बांधोन । हरिदासा दिधलें स्थान । नामस्मरणी आज्ञापिलें ॥ ४१ ॥ एकांती करी बा वास । भजन करी सावकाश । महाप्रसाद भक्षावयास । मिळे तुज ॥ ४२ ॥ भगवंताचें चक्रदर्शन । नित्य करी बा दुरुन । मनीं [illegible] ध्यान । समाधान चित्तासी ॥ ४३ ॥ समुद्र स्नान करुन । येतां तुजसी देई दर्शन । प्रभु आज्ञा मानून ।

हरिदास राहिला ।। ४४ ।। करूनि सागर स्नान । करिती प्रभु देव दर्शन । भक्तासह प्रसाद ग्रहण । पुढती विश्राम अल्पसा ।। ४५ ।। भक्तासह मंदिरी । संकीर्तन गजरीं । नृत्य लीला नानापरी । करिता भान हारपे ।। ४६ ।। प्रदक्षीणा पुष्पांजली, स्तोत्रपाठ । माला, चंदन, प्रसाद चोखट । नित्य आनंदाची लयलूट । पुरींत चाले ।। ४७ ।। करूनि तीर्थ यात्रा भ्रमण । भक्तांचे केले उद्धरण । पुरींत वास करिती चैतन्य । नृत्यानंद लुटाया ।। ४८ ।। पुढील अध्यायीं कथन राजपुत्रा प्रेमदान । तें प्रेम वृत्त श्रवण । करा आनंदे ।। ४९ ।। भक्त प्रेमळ शचिनंदन । जे चैतन्य चिद्घन । त्यांची कृपा संपादून । कथितो लीला ।। ५० ।। प्रभु कृपे वाचून । मज काय असे सम्यक्ज्ञान । मी अज्ञान दीन । करी कथा भगवत्कृपे ।। ५१ ।। प्रभु आज्ञाप्रमान । करी कथा चैतन्य सेवा व्हावया पूर्ण । संत सेवक विनवी ।। ५२ ।। चै, वि, ग्रंथ रसाळ । मध्यलीला सोज्वळ । नौरोजी डाकू उद्धार, जन्मस्थान दर्शन मंगल । तीर्थ भ्रमण अध्याय मीलन तेविसाविया ।। ५३ ।। श्रीं चै. च. ग्रंथ मध्यलीला प्रसंग, नौरोजी डाकू उद्धरण जन्मस्थान दर्शन, तीर्थ भ्रमण प्रतापरूद्र राजा मिलन । प्रसंग कथा कथन नाम अध्याय तेविसावा (२३) समाप्त

ओवी संख्या १५३ एकूण संख्या २९२२ दि- १०-७-६४ शुक्रवार आषाढ शु १-१८८६

# अध्याय समाप्त

# अध्याय २४ वा

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीसरस्वत्यैय नमः ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥ श्रीकृष्णचैतन्याय नमः ॥ जय जया पुरुषोत्तमा । वाढविसी भक्त महिमा । भक्त काम कल्पद्रुमा । पादपद्मी मन हें ॥ १ ॥ विष्णू भक्त कल्पद्रुम । कामनेचे असती परम । करुणासागर, प्रेमधाम । उपशम हो दुःखाचा ॥ २ ॥ पतितासी करिती पवित्र । भगवभ्दावें पाहती चराचर । त्या विष्णुभक्ता नमस्कार ॥ निरंतर ॥ ३ ॥ त्याभक्तां सवे घेंऊन । मंदिरी करिसी श्रमदान । तें चरित्र कथन । अध्यायी करितसे ॥ ४ ॥ भक्तासाठीं करिसी श्रम । हाचि मानिसी परम धर्म । जगा दाविसी अनुपम । भक्त प्रेम उदारा ॥ ५ ॥ जनी सवे दळन । चोख्याची ढोरे ओढून । सांवत्याची भाजी खुडून । देवपण दाविसी ॥ ५ ॥ देव भक्त अभेद । ऐसा भाव दाविसी विशद । भक्तसवे, कीर्तना स्वाद । चाखिसी ॥ ७ ॥ तेंचि केले गुंडीचा मंदीरी । श्रमदान शिकवन सारी । भक्ति लक्षण भारी । प्रत्यक्ष दाविसी ॥ ८ ॥ श्रम आणि भजन । हेचि भक्ति लक्षण । सेवे विण भक्ती जाण । न मानी देव कदाही ॥ ९ ॥ तेंचि अध्यायी कथन । सविस्तर केले वर्णन । त्याचे करुनि श्रवण । तुष्ट व्हावे ॥ १० ॥ प्रभु भेटीची आतुरता । प्रताप राजासी व्याकुळता । निताई राजया करिता । विनविती प्रभुसी । ११ ॥ रायासि न करा मनाई । भेटोत्सव व्याकुळ होई । आपुलीया चरणाचे ठाई । भाव तयाचा ॥ १२ ॥ मी असे संन्यासी । मनाई राज दर्शनासी । शास्त्र निष्ठा माझी ऐसी । तुष्ट हो जगन्नाथ ॥ १३ ॥ प्रभु वचन केले श्रवण । देता न आले दर्शन । तरी अंगीचे वस्त्र जीर्ण । प्रसाद द्यावा ॥ १४ ॥ ऐकूनि विनय वचन । मान्य केले निताई भाषण । सार्वभौम हाती देऊन । बहिर्वस्त्र भेजिलें ॥ १५ ॥ मिळें प्रसाद वस्त्र । राजा संतुष्ट अपार । जतन कर प्राणापार । कृपेची पाखर समजोनी ॥ १६ ॥ रामानंद बोलें वचन । राज पुत्रा द्यावी अनुज्ञा । राजास होय समाधान आपुल्या आज्ञे ॥ १७ ॥ राजयासी प्रतिबंध । पुत्राचा काय संबंध । दर्शनासी निषेध । कवणा नसे ॥ १८ ॥ परी दृष्टी सबोर । अभिमानी येई सत्वर । तोचि भाव अंतर । विकृत करी ॥ १९ ॥ राज दरबार निषिद्ध । तदर्थ असे शास्त्र सिद्ध । मान सन्मान वृद्धि । तमोगुण उपजवी ॥ २० ॥ राजपुत्र असे सरळ

सकळिक । पुत्रा सजवी, राजया तोख । सुख व्हावें नेंत्रासीं ।। २२ ।। साक्षात् सुत दिसे शाम सुंदर । प्रेमे आलिंगिती
पुत्र । कृष्ण भावे कलेंवर । नृत्य करी बालक ।२३। बालक बोले कृष्ण कृष्ण । कृतार्थ केले । तयालागून । पुन्हा घ्यावें
दर्शन । म्हणवोनि पुत्रां बोलविले ।। २४ ।। राजाराणीस हो संतोष । उभयतांचे तृप्त मानस । बाल नित्य दर्शन ।
प्रभु सन्निध जातसे । जाहला अंतरंग भक्त । भाग्य तयाचें पूर्वसंचित । गौरहर सांगात । राजपुत्रां लाभला ।। २६ ।।
ऐसें प्रेम प्रदान । केलें राजतुत्रालागून । तुष्ट करावे आर्तजन । स्वभाव थोर संतांचा ।। २७ ।। प्रिय भक्त संगति ।
प्रभू नित्य क्रीडति । भजन संकीर्तनी रति । नित्य वाढे भक्तांची ।। २८ ।। अर्धमासाचा एकांत । सरला देवाचा लक्ष्मी
सहित नेंत्रोत्सव प्रतिक्षा करित । भक्त सारे ।। २९ प्रथम ।। देवदर्शन दिन । तोचि नेत्रोत्सव जाण । वासा जाती
रथी बैसोन । उद्यान मंदिरी ।। ३० ।। नाथ मंदिरापासोनीं दुर । एककोस उद्यान मंदिर । श्रीगूंडिचा संज्ञा मान्यवर
नवरात्र उत्सवनाथाचा ।। ३१ ।। नवरात्र उत्सव झालियावरीं । तेथून रथयात्रा निघे भरी । हींच महत्वाची खरीं
लोटती अपार दर्शना ।३२। नेंत्रोत्सव पुर्व । प्रभु करितीं अपूर्व । गूंडिचा मंदिर सर्व थैव । भक्तासवे केलें निर्मळ ।।३३
प्रतिबंध करी कारभारी । न करी हीन परिचारी । राहावें सकिर्तनी गजरी । योग्य नसे तुम्हासीं ।। ३४ ।। प्रभु वदले
ईश्वर सेवा तेथ दुजाभाव न धरावा । हिन वा उच्च मानावा । भाग्यलाभ सेवेचा ।। ३५ ।। म्हणोनि जमविलें भक्त
स्वच्छतेसि निघाले त्वरीत । साधन सामग्री एकत्रित्र । घेऊनि आलें मंदिरी ।। ३६ ।। पडे पाला पाचोळा । सकलानि
गोळा केला । त्यावरीं झाडु मारीला । स्वच्छ केला परिसर ।। ३७ ।। कोणाची झाडती सुस्ती । कवणाची देतीं पुस्ती
ऐसी प्रभु रीती सेवेची असे ।। ३८ ।। भक्त उत्साह देखोनी । आनंदलें प्रभु मनी । वरीवरी स्तुति करोनि । रिझविती
।। ३९ ।। स्वच्छ केले मंदिर । साफ केला परिसर । जले निर्मळ देवघर । आकार सारा सिंचिला ।। ४० ।। स्वच्छ
जाहले मंदिर । येणे रिती शिकवीती प्रभुवर । निर्मळ व्हावे हृदय मंदिर । वास करी श्रीहरि ।। ४१ ।। चित्तउजळल्या
विण देव न राहि एक क्षण । ईश्वर प्रसन्न तेचे लक्षण । ऐसें असे ।। ४२ ।। भक्त श्रध्दे आणि घडा भरोन । चरणी
घाली करी पुजन । भावे पादोदक प्राशन । केले तीर्थ म्हणोनि ।। ४३ ।। भक्ते घेतले पादोदक । प्रभु रुष्टले एकाएक
कैसा असशी अविवेकि । अन्याय करिशी ।। ४४ ।। असता ईश्वर सन्निधान । जीवाचे धुवावे चरण । अथवा सेवाग्रहण

अनुचित हे ॥ ४५ ॥ हा ईश्वर दरबार । तोचि श्रेष्ठ खरोखर । तेथे मानव नसेथोर । सेवे कारणे ॥ ४६ ॥ आपुला प्रतिष्ठा थोरपण वाढवी दावी दंभपुर्ण । देवासी निमीत्त करुन । करवीं आपणा उपचार ॥ ४७॥ देवमंदिर प्रतिष्ठा । भोळया करवी वाढवीं स्पष्ट । प्रतिमा छायाचित्र पडे दृष्टी । ऐसा रिती लाविती ॥ ४८ ॥ याचे करावे संयमन । तैसेचि इंद्रिय दमन । सेवा करावी अर्पण । मानावे हीन आपणा ॥ ४९ ॥ ऐसा रीती जो राहि । ईश्वर वसे त्याचे न्हदयी । त्यासी शांती लाभ होई । निर्मळ चित्त म्हणोनि ॥ ५० ॥ ऐसे ऐकोनी वचन । भक्ताचे जाहले समाधान दामोदरे त्यासी समजावुन । मंदिराबाहेंर घालविले ॥ ५१ ॥ भक्त जाहले प्रसन्न । प्रभु करिती संकिर्तन । मंदिर स्वच्छ पाहून । आनंदले ॥ ५२ ॥ करूनिया शीतस्नान । श्रमाचें जाहले परिहरण । सरोवरी जलक्रिडन । वर्षाव जलाचा प्रभुवरी ॥ ५३ ॥ मंदिरीं नृसिंह दर्शन । घेऊनि केला प्रसाद ग्रहण । यापरी सेवेचे शिक्षण । दिधले सकला ॥ ५४ ॥ देव व्दारी हिनसेवा । हा परम लाभ जाणावा । मानापमान दूर सारावा । चित्त शुध्द व्हावया ॥ ५५ ॥ नित्य केलिया श्रमदान । भक्तिने करी ईश्वर ग्रहण । त्यावाचूनि उपासन । निष्फळ होय ॥ ५६ ॥ चरण प्रक्षाळी भक्त तयासि बाहेरी घालविला त्वरीत । शरण येई अनुतप्त । प्रभु विवश जाहले ॥ ५७ ॥ कपोली केले ताडन ऐसे कर्म न करी फिरुन । कृतार्थ केले तया लागून । भक्तासमाधान अंतरी ॥ ५८ ॥ येणे परी सफाई करुन भक्त करिती किर्तन । सवे होय नर्तन । देहभान हारपे ॥ ५९ ॥ अव्दैत पुत्र गोविंद । नृत्य करी होय प्रेमानंद । मुर्छा येता केलें बंध नृत्यादिक ॥ ६० ॥ करिती विविध उपचार । मुर्छनेंत राहि कलेंवर । वाटे मृत्युचा अवसर । दुःख भार होय ॥ ६१॥ अव्दैतास पुत्र शोक । झाला पाहूनि पूण्यश्लोक । हलके करावया दुःख । न्हदय स्पर्श करितसें ॥६२॥ बाहती, उठी बा गोविंदा । मग्न अससी स्वात्मानंदा । महानिद्रेंत मानिसी आनंदा । दुःखद होसी आम्हासी ॥ ६३ । वक्षस्थलीं हस्त ठेविला । उठी बा उशीर जाहला । तुजविणें सकलाला । युगापरी दिन हो । ६४ ॥ स्नानास्तव भक्त जन । प्रतिक्षा करिती तुजलागून । तोशवी बा सकलजन । राही सन्निध ॥६५॥ ऐकूनि चैतन्य बोल । जागृत झाहला गोविंदबाळ । बाचे हरिहरि प्रेमळ । नमन करी ॥ ६६ ॥ सकलासि होय आनंदु । माता, पिता, आप्त बंधु । स्नानास

परस्परें ॥ ६८ ॥ सकलांचें जाहले स्नान । घेती नृसिंह दर्शन । नाथ मंदिरी येऊन । जगमोहन स्थली बैसले ॥ ६९ ॥ जल क्रीडेचें श्रम । क्षुधार्त होती परम । राजयें धाडिला अनुपम । महाप्रसाद ॥ ७० ॥ भक्तें भक्षिला प्रसाद । त्याचा काय वर्णावा स्वाद । पंक्तीमाजी सकल निःशब्द । प्रभुसह जाहलें ॥ ७१ ॥ प्रभु सन्निध भोंजन । भाग्य मानिती भक्तजन । कंठी माळा, भाळी चंदन । लाविती प्रभु ॥ ७२ ॥ भजनाचा गदारोळ । दाटे प्रेम कल्लोळ । ऐशा प्रेमळ लीला सकळ । करूनि जातीं स्वस्थलीं ॥ ७३ ॥ ऐशा कथा रसाळ । भक्तालागी केवळ । करूनि तोषविले सकळ अलिप्त कमळ जलीं जैसे ॥ ७४ ॥ करुनियां श्रमदान । केलें मंदिर शोधन । भक्तीचे वर्म जाणून । भक्तगणा समजाविलें ॥ ७५ ॥ श्री चै. वि, गंथ रसाळ । मध्यलीला प्रसंग सोज्वळ । राजपुत्र प्रेमदान, गुंडीचा मंदिर शोधन मंगल । कथा चोविसादिया अध्यायीं ॥ ७६ ॥ श्री चै. वि च. ग्रंथ मध्य लींला प्रसंग राजपुत प्रेम दान गुंडीचा शोधन कथा कथन नाम अध्याय (२४) चोविसावा समाप्त ॥

ओवी संख्या ७६ एकूण संख्या २९९८ दि. १०-७-६४ शुक्रवार आ० शु० १-८६ सं. २०२०

# अध्याय समाप्त

# अध्याय २५ वा

जय जयाजी जगन्नाथ । तु असशी जगाचा नाथ तुझे निसत्ते चाले जगत जगच्चालक तुचि ।।१ ।। श्री गणेशाय नमः श्री सरस्वत्यै नमः । श्री गुरुभ्यो नमः । श्रीकृष्ण चैतन्याय नमः । जगत कार्य तु कारण । म्हणून त्याचे नश्वर पण । कार्यातुन शोधाचें कारण । श्रेष्ठ पण जिवाचे ।।२।। जीवाची जीवदशा । सुख दुःख भोगवी नित्यशः । परी त्या वेगळया ईशा बाधू न शके ।।३।। तो तु जगन्नाथ । तुझ्या यात्रेचे वृत्त । वर्णी येथ समस्त पुनित व्हावया ।।४।। तिर्थं क्षेत्रात जाणावे । मुखे नित्य वदावे । श्रवणी ऐकावे । कथा भाषे प्रेमळ ।।५।। यात्रेचे अभ्दुत वर्णन । महाप्रभु तेथ करिती गान । भक्ता सवे होय नर्तन । आनंद अवर्णनिय ।।६।।

श्लोक :- सजीयत् कृष्ण चैतन्य श्रीरथाग्रेननर्तय ।
यनासी ज्जगतां चित्रंन्नाथोऽपि विस्मित ।।

श्री रथासन्मुख नृत्य । केले लोक विख्यात । जयाने सकल जगत । जाहले विस्मित ।। ७ ।। तैसे जगन्नाथ । ह्या नृत्य पाहूनि विस्मित । ते चैतन्य भगवंत । नमि तयाचे जय असो ।।८।। उद्यान मंदार मार्जन । नेत्रोत्सव होई द्वितिय दिन तै जगन्नाथ दर्शन घेउनि श्रीमुख । नेत्र स्थिरावले एकटक । अश्रु वाहती हरिख मानस उत्फुलु प्रभुचे ।। १० ।। ओष्ट होत कंटक कंपायमान । बाट श्रीस करिती निवेदन मनीचें हितगुज कथन केले सकल ।।११।। जाहले वियोग दुख प्रेमे न्याहळती श्रीमुख । अनिमेष भावे लावूनिरक । पाहता काळ लोटला ।।१२।। परतुनियां वासस्थानी । प्रसाद केला ग्रहण चित्त लागे कथा कोर्तनी । ध्यानीं मनी जगन्नाथ ।।१३।। व्दितीय दिनीं जगन्नाथ । रथी बैसती गणा सहीत । तो समय जाहला प्राप्त । चित्तीं सकला संतोष ।।१४।। निशा संपे तो कीर्तन । भान हारपे करिती नर्तन । तोषं हरि जागरण । सुख भक्ता व्हावया ।।१५।। जाहला प्रभात समय । दर्शनार्थं पांडु विजय । निघाले संगती समुदाय । भक्तजनांचा ।।१६ ।। प्रारंभ जेष्ट पौर्णिमेस शेवट आषाढ आमावस्या । लक्ष्मी भगवंत वास दीड मास हो एकांती ।।१७ ।। पुढती प्रतीपदा दिनीं । नेत्रोत्सव तयाते संज्ञा होई भगवतदर्शन । भक्तोत्सव ।१८। तदनंतर व्दितीया दीनी । अथवा तृतिय दीनी ।

निरयाचा ॥ २० ॥ तो प्रस्थान महोत्सव । रथ यात्रा अपूर्व । रथ गेल्यावरी वास्तव्य । सुंदराचली ॥२१॥ विश्राम झाली यावरी । रथ लोटे माघारी । येई जगन्नाथ मंद री । उलटी रथ यात्रा जाणें तो ॥२२॥ रथ यात्रेचे तीन रथ । आघाडीवरी जगन्नाथ सुभद्रा, बलराम पश्चात । एसी रथ योजना ॥ २३ ॥ संपूर्ण रथ सुंदर मंडीत । विशाल भासे पर्वत । घंटा, किंकिनी घुंगरु सहित । उत्तुंग छत्र विराजे ॥ २४॥ फडकतीं ध्वजा पताका । शोभती प्रकारे अनेका । रथाचे विशालत्व देखा । लघुसे भासे नगर ॥ २५ ॥ रथावरी असंख्य लोक । आरोहण करिती भाविक चवऱ्या टाकिती अनेंक । आनंदाने ॥२६॥ रथाची सौंदर्य शोभा । वर्णूं न शके शेष जिभा । भाविक गुंतले लोभा । रज्जु खेचाया ॥ २७ ॥ भक्त ओढितीं रथ । बैसले श्रीजगन्नाथ । गुंडीचा भवन पर्यंत । खेचून नेंतीं ॥२८॥ प्रातकाल होता रथ । उभा राहि सिंहव्दारात । दयितागण वसवीं रथात । जगन्नाथाची ॥२९॥ सिंहासना वरुनि रथात । बसविणे कीया समस्त पांडु विजय नामे ख्यात । असे की ॥ ३० ॥ दयिता गणांचा अधिकार । त्या सारे करितीं सत्वर । जातिहींन परी पवित्र । असतीं सेवक नाथाच्या ॥३१॥ असती जातिहींन । सेवा कर्म तया लागुंन । अधिकार मानी जन सम्मानिती तयांना ॥ ३२ ॥ देवास अर्पिती बालभोग । करिती औषधी प्रयोग । देव अनु मानुनि रोगी । जपती तया ॥ ३३ ॥ जो प्रकृति पलिकडे । तयाची प्रकृति कैसी बिघडे । नाहि नाव ना रूपडे । ब्रम्ह पोखडे निर्मळ ॥ ३४ ॥ परि भक्त भक्तिस्तव । प्रभु करून घेई सर्व । भक्तास्तव हें लाघव । भक्ताधीन । ब्रीद हें ॥ ३५ ॥ अहं भक्त पराधींन ऐसे बोलीले वचन । याची साक्ष येतसे पुर्ण । चरित्र गाता संताचे ॥ ३६ ॥ करूनि स्नान स्नान दिनी । रथ परते स्वस्थानी याकाली नाथ सेवनी । विशेषाधिकार दयितांचा ॥ ३७ ॥ सेवक दयिता गण । सेवेत असे दक्षपुर्ण । ऐसे रथयात्रा वर्णन श्रवण होय संतोष ॥३८॥ पुढती चैतन्य वृत । पांडू विजय दर्शन सहभक्त येती प्रताप राजात्वरीत व्यवस्था करी ॥३९॥ जगन्नाथ दर्शन । घेती चित्तीं समाधान रथ परते स्वस्थानीं । असंख्य यात्री समेत ॥ ४० ॥ दीन तैसे श्रीमंत । करिती जयध्वनी गगनांत । प्रताप राजा सेवेंत । रममाण होई ॥ ४१ ॥ हातीं लक्ष्मीं मुष्टी सुवर्ण । झाडोनी, करी जल सिंचन । चंदन युत, निर्मळ निष्ठान । भद्रयानी क्षुद्रसेवें ॥ ४२ ॥ ज्याते सेविती ब्रह्मादिक । इंद्र, मनु देवतादिक सेवे तयाच्या भाग्य विशेख । तुच्छ हो संसार ॥ ४३ ॥ मान, प्रतिष्ठा, कीर्ति । यश, महिमा सारी गति । ईश्वर चरण

प्रीति । जडल्या तुच्छ होतसे ।। ४४ ।। कीर्ति, यश उगम स्थान । असती श्री हरिचरण । भावें करितां भजन । न्यून कांही नसेचि ।। ४५ ।। हरि भावाचा भुकेला । हाचि दुष्काळ तयाला । भावे हृदयस्थ केला । त्याचा अंकिला हरि हो ।। ४६ ।। प्रभुचे दर्शन झाल्यावर । रथ निघाला सत्वर । करीं रज्जू, नारी नर । सज्ज होती ।। ४७ ।। जय जयजीं जगन्नाथ । दीर्घस्वरें भक्त गर्जंत । घंटा, मृदंग, टाळासहित । घोष दुमदुमे ।। ४८ ।। प्रथम श्री जगन्नाथ । पश्चात् बलभद्र । रथ । संगे सुभद्रा रथ । संथ चालें ।। ४९ ।। वालुकामय पथ । उत्तुंग नारिकेल वृक्ष असत । अंतरें रक्षक सेंना समस्त । भासे जणु ।। ५० ।। कै सरळ चाले रथ । अडखळे न जाई पुढती । प्रयत्न करिती बळें भक्त । न ढळे परी अल्पही ।। ५१ ।। व्यर्थ होई खटाटोप । तदा गाली प्रदान अमाप । देता चाले अपाप । हरिमाया बळयिसी ।।५२।। भक्तांची प्रेमळ लाखोली । देवा कैसी पावली । केवळ भक्ती भोळी । म्हणोनिया ।। ५.३ ।। रथा पुढती करिती नृत्य महाप्रभु भक्त समेत । भक्त गळा माळा लेववीत । चंदन मस्तकीं ।। ५४ ।। भक्तांचे सात विभाग । करूनि नेमिले गायक योग्य । पहिले विभागी गौरांग । प्रधान गायक ।। ५५ ।। करिती सहाय पांचजण । स्वरूप दामोदर, नारायण । गोविंद दत्त, राघव तज्ञ ।। गोविंदानंद ।। ५६ ।। नृत्य प्रमुख अद्वैत ।। वृद्धपरी, कीर्तनीं रत ।। युवकापरी होय नृत्य । जणू शिव तांडव ।। ५७ ।। दुसरें विभागी गायक । श्रीवास पंडित प्रमुख । नित्यानंदजी नर्तक । शुभानंद श्रीराम ।। ५८ ।। गंगादास, हरिदास । श्रीमान्, सहाय्यास । मधूर करिती नृत्यास । देहभान विस्मृत ।। ५९ ।। तृतीय विभागी मुकुंद दत्त ।गंधर्वावतार पंडित । प्रधान गायक सर्वश्रुत । कीर्तीजयांची ।। ६० ।। वासुदेवजी, गोपीनाथ । सहाय्यक मुरारी गुप्त । वल्लभसेन श्रीकांत । प्रधान नर्तक हरिदास ।। ६१ ।। चतूर्थ विभागी गोविंद घोष । प्रधान गायक विशब । हरीदास, राघब, विष्णुदास । माधव वासुदेव, साहाया ।।६२।। नर्तक व क्रेश्वर पंडित । अपुर्व त्यांचे नृत्य । वक्तगती नृत्य ख्यात । नाविन्य भासे ।। ६३ ।। कुलीन ग्रामीचे जन । त्याचे विभागी गायक प्रधान । रामानंदजी सुजन । सत्दराज नृत्य करीं ।।६४।। शांती पुरीचे भक्तजन । त्याचे । विभागी गायक प्रधान । अच्युतानंद, अव्दैत नंदन । गाती नाचती ।। ६५ ।। खंडवासी सांप्रदायीक नरहरी प्रधान [illegible] ।। ६६ ।। संप्रदाय ऐसे सात । त्यांचे संकीर्तन सम्मीलीत ।

रथाभोवते पृथक होत । गाती मोदे नाचतां ॥ ६७ ॥ संकीर्तनीं मत्त संप्रदाय । मधुर उच्च घोष रव । वाद्यांचे विविध लाघव देहभान विसरवीं ॥ ६८ ॥ नृत्याचा अपुर्व थाट । विसरती सारे जात गोत । वाद्यांचा घडघडाट । जयघोष होई सर्वत्र ॥ ६९ ॥ देखता प्रभुचे नृत्य । सहज होय तद्रुप चित्त । एक टक प्रभुसि न्याहाळीत । आश्चर्य करिती ॥७०॥ अदभुत चैतन्य नृत्य । कधी न देखिले बोलत । मुग्ध होती सारे भक्त । मुखे गाती हरिबोल ॥ ७१ ॥ संकिर्तनी होती उन्मत्त तैसारिती सारे भक्त । प्रभुसी साथ देत । नाम गर्जती ॥ ७२ ॥ महाप्रभु करिती विचार । सप्तमंडळाचे भान्यवर । करूनिया एकत्र । नृत्य करावे ॥७३॥ श्रीवास, रमाई, रघुनाथ । गोविंद, मुकुंद हरिदास भक्त । माधवादि गायन प्रथित । स्वये प्रभु ॥ ७४ ॥ चौदाखोलांचा ध्वनी गंभिर भेदी गगनी । नृत्यी हृदय उचंबळोनी । येतसे ॥७५। महाप्रभुचे उन्मादि नृत्य । सकल आश्चर्य चकित । चित्रापरी तटस्थ होवोनी पाहती ७६ नभी कोलाहल जाहला देव समुह पातला । प्रभु नृत्य देखावे डोळां । म्हणोनिया ॥ ७७ ॥ भक्तें घेरुनि प्रभुस । देहभान विसरुनि नृत्यास । केले मनसोक्त तृप्तीस । लोटे काळ ॥ ७८ ॥ वाद्य जाहला बंद । जनता जाहली स्तब्ध । कंठ होई सद्गद । स्तुति करितीं ॥ ७९ ॥ कोकिल कुजित कंठ । कारुण्य तयातुनि उमटे । हृद्द केले प्रकट । साथ देती भक्तही ॥ ८० ॥

श्लोक-- जयति जयति देवो देवकिनन्दनो सौ ॥ जयति जयति कृष्णो वृष्णिवंश प्रदीपः ॥
जयति जयति मेघः शामलः कोमलाङ्गो ॥ जयति जयति पृथ्वी भारहारो मुकुंदः ॥

प्रभु करू लागती स्तवन । जय हे ! देवकिनंदन । तु स्वयंपूर्ण भगवान । जयजयजी जगन्नाथ ॥ ८१ ॥ वृष्णिवंश प्रदिप मेघ शामल तवरूप । कोमलांग कांती अनुप । जयजयजी जगन्नाथ ॥ ८२॥ पृथ्वीचा हरावा भार । ऐसा मनी निर्धार । घेसी मुकुंद अवतार । जयजयाजी जगन्नाथ ॥ ८३ ॥

श्लोक-- ना हं विप्रो नच नरपतिर्नापि वैश्योन शुद्रो ॥ ना हं वर्णी नच गृहपतिर्नो वनस्थो यतिर्वा ॥
किंतु प्रोद्यान्निखिल परमानंद पूर्णामृताब्धे: ॥ गोपीभर्तुः पदकमलयोर्दास दासानुदासः ॥

नाविप्र ना क्षत्रिय । न शुद्र ना मी वैश्य । नाप्रथम आश्रमीय । ब्रम्हचारीं मी ॥ ८४ ॥ न तो गृहस्थ वानप्रस्थ । न संन्यासि । सरवस्थ । न मी बध्द वा मुक्त । जयजयाजी जगन्नाथ ॥ ८५ ॥ परी मी आहे कोण ।

ते स्वये करी कथन । निखिल परमानंदपुर्ण । प्रकाशरूप श्रीकृष्ण ॥ ८६ ॥ जो अमृताचा सागर । गोपीनाथ दया सागर कृष्णचरण कमलीं स्थिर । दासानुदासाचा दास मी ॥ ८७ ॥ प्रार्थना श्लोक झालींयावरी । वाद्य वाजती भरो वरी । रथ चाले पंथ भरी । घरघरध्वनी होतसे ८८ पुन्हां करिती सारे नृन्य । अष्टसात्विकभाव युक्त । शरीरीं रोमांच स्थित । स्वरभंग होऊं लागे ॥ ८९ ॥ नेत्री वाहती अश्रुधारा । धर्मबिंदु शरीरां । नृन्याचा उदंड पसारा । पाहोनि रथ स्थिरावे ॥ ९० ॥ प्रभु अवस्था पाहून । भयें कंपित भक्त जन । दर्शनार्थी पडती तुटोन । नृत्य पहावया । ९१ । प्रभु भोवते वर्तुळ । करिती भक्त सकळ । राजा धाडी रक्षक दळ । वर्तुळा भोंवतीं ॥ ९२ ॥ महाराज प्रताप रूद्र नृत्य अवलोकी पवित्र । तेथ सान थोर एकत्र । भेद नसे ॥ ९३ ॥ नृत्य करितां भावावेश । झाला प्रभुसि विशेष । शुद्धि हरे निःशेष । श्रम होतीं शरीरीं ॥९४॥ विश्रांतीस्तव अल्पकाळ । राहतीं स्थिर गौरहर । होतां श्रम परिहार । जाती रथा सन्निध ।९५। प्रभुसि होई राधाभाव । भावांत भान ऐसें व्हावें । फारा दिसां कृष्णराव । भेटावयायेती मज ॥९६ । बहुत दिवसाचा वियोग । परी पातला भाग्ययोग । प्रेमभावाचा प्रयोग । हरतें दाविती । नृत्यांत करिती नाना हातवारे । नाना भाव दाविती करे । जणु कृष्ण भेटले त्वरें । ऐशा मीलनीं सुखनसे ॥९८॥ वृंदावनीचें मीलन । आठवे यमुना पुलिन । कुंजातील आनंद पूर्ण । अपूर्व वाटें मीलन ॥ ९९ ॥ नसे तेथील आनंद । चित्ता वाटे म्हणोनि खेद । त्याची स्मृति विशद । श्लोकीं होय ॥१००। त्या श्लोकाचा मतितार्थ । विवरीं प्राकृत भाषेत । व्हावा आनंद चित्तात । विशद करी ॥१॥ नायिका पुनर्मिलन समय । कथन करी श्लोक द्वय । प्रभु मुखे त्याचा भाव ये । श्रवण करा ॥२॥

श्लोक – यः कौमारहरः स एवहि वरस्ता एवचैत्रक्षपास्ते चोन्मलितमालती सुरभयः प्रौढाः कदम्बा निलाः ॥
साचैवास्मि तथापि तत्र सुरत व्यापार लीला विधौरेपारोधासि वेतसी तरूतलें चेतः समुत्कण्ठते ॥ का,प्रकाश १ । ४

बोले नायिका कौमारकाल । रेवानदी तीर विशाल । तटीं चित्त जेणें हरिलें । तेंचि पती समयीं या ॥ ३ ॥ तोचि मधुमास ती रजनी । अत्यंत मनोहारिणी । तीच मालती सुगंधदायिनीं । मस्तकरी मनास ॥ ४ ॥ कदंब काननीं स्पर्शुन । वायु वाहे सुगंधून । पति समेत क्रीडन । करी नायिका मीच ती ॥ ५ ॥ मनाचें करिती हरण । तेचि नायक

। झाले असे माझे चित्त । ऐसे बोलोनि विरह व्यथित । हाय रे ! तू धन्य की ॥ ७ ॥ हा श्लोकाचा भावार्थ दामोदर जाणे सत्य । इतरां न कळे मतितार्थ । प्रभुभाव मनोगत ॥ ८ ॥ स्वरूप जाणे प्रभुभावा । तो श्लोक करूनि ठेवावा । तत्काळ करूनिया काव्या । प्रभु पुढती ठेविला ॥ ९ ॥ श्लोक केला श्रवण । तृप्त जाहले गौरमन । आश्चर्ये प्रेमालिंगन । स्वरूपा दिधले ॥ १०॥ मी करीत असतां नृत्य । तेच राधाभाव प्रकटे सत्य । कैसा जाणला उचित ।रचिलें श्लोकां ॥ ११ ॥ ममभाव प्रतिबींब श्लोकीं उमटले अविलंब । साधे भाव, प्रतिभा । धन्य तूं ॥ १२ ॥ जाहला स्वरुप लज्जित । संकोचे बोलें त्वरित । श्री कृपेचें त्वरित फल लाभे ॥ १३ ॥ आपुलिया कृपेविण । कैसा समजे भावपूर्ण । मी पामर अज्ञान । किंकर आपुला ॥१४॥ वारंवार करिती स्तुति । काव्य प्रतिभा प्रशस्ति । भाव पराकाष्ठा निश्चित । वदती मुखें ॥ १५ ॥ तदीय श्लोक भाव । स्पष्ट करी सर्वथैव । हाही प्रभुकृपा प्रभाव । मी तों अज्ञ बापुडा ॥ १६ ॥

श्लोक – प्रिय: सोयंकृष्ण: सहचरि कुरुक्षेत्र मिलित: । तथाहं सा राधा तदिदमुभयो :सङ्गम सुखम् ॥
तथाप्यन्त: खेळन्मधुर मुरली पञ्चमजुषे । मनो मे कालिंदी पुलिन विपिनाय स्पृहयति ॥

कुरुक्षेत्रीं झाली भेट । कृष्ण राधिका आले निकट । तै राधिका बोले स्पष्ट । भावार्थ तयाचा ॥ १७ ॥ माझा तोचि प्राणनाथ हृदयरमण नंदसुत । भेटीचे स्थान कुरूक्षेत्र । सखे ! तुज कथी है ॥ १८ ॥ मी ही वृषभानुसुता । किर्ती असे मम माता । तीच मी राधा तत्वता । सुख सर्वस्व प्राप्त हां॥ १९ ॥ परि हे प्रिय सखी काय सांगु ? मीं दु:खी । हृदयीची मात अनोखी । सत्य कथीं तुजलागी ॥ २० ॥ ज्यावनी मुरली मनोहर मुरलींचा काढी पंचमस्वर । ताना निघती भरदार । मन तत्काल मोही हें ॥ २१ ॥ त्या यमुना तीरी । तेथील वना भीतरी मन माझे वावरी । लालची होई प्रतिक्षण ॥ २२ ॥ हा राधा भाव प्रकार । श्लोकबध्द होई सुंदर । तो प्रकटविती प्रभुवर नृत्य करितीं सन्मुख ॥ २३ ॥ प्रताप राजा भक्त । नृत्य करिता येती निकट । नृपेचरण स्पर्श त्वरीत । करिता बाह्यज्ञान हो ॥ २४ ॥ नृपे हे काय केले । आपुले जीवन धि:कारिले । राजापासोन दुरावले राजा चित्ती क्षोभला ॥ २५ ॥ आपण केला अपराध । राजास वाटे दु:खद । मनास कष्टप्रद । म्हणोनि शोधी उपाय॥ २६ ॥ समजाविती सार्वभौम । प्रभुकृपा असीम । तुज जाहली अनुपम । व्यर्थ क्षोभ कासया ॥ २७ ॥ पातले प्रभु सन्निध । तव कारणे न हो क्षुब्ध । जाहलें अंतरशुध्द

राजा तोषला ॥ २८ ॥ ठायी ठायी करिती नृत्य । नाथ रथासमेत । बलगंडि स्थानी त्वरीत । रथ उभा राहिला ॥ २९ ॥ भगवंता द्यावा भोग । तयारी करिती सकल लोग । श्रध्दे आचरीं कर्ममार्ग । तोषे जगन्नाथ ॥ ३० ॥ बलगंडि नामक स्थान । तेथ वास्तव्य भोजन । प्रभूचे होई भक्तजण । भोग चढविती ॥ ३१ ॥ नाना खाद्य प्रकार । षड्रस युक्त रुचिर । पक्वान्नाचा सभार । भोगास्तव येतसे ॥ ३२ ॥ राजा अथवा रंक । दीन अथवा धनिक । स्त्रिया वा पुरूष भोग लाविती ॥ ३३ ॥ आपुलाले शक्त्यनूसार । भावे पुजिती परमेश्वर । ऐसा भक्ति प्रकार शेकडा चालें ॥ ३४ ॥ नैवेद्य करिती समर्पण चित्ती अत्यंत आनंदून । प्रसाद करितीं ग्रहण । श्रम परिहार व्हावया ॥ ३५ ॥ प्रभुसि झाले बहूश्रम । त्यांनी करावया विश्राम । देखिली बाग उत्तम निद्रेलागी ॥ ३६ ॥ शीतल वृक्षछाया । पाहोनी बैसले त्याठायी निद्रा लागे त्यासमया । चैतन्यासी ॥ ३७ ॥ रथयात्रेचे महिमान । श्रोतया केलें कथन । मनीचा भाव जाणून न्युन पुर्ण करावे ॥ ३८ ॥ मजलागी काव्य स्फुर्ति । ही प्रभु कृपेची संपत्ती प्रारब्ध योगे प्राप्त होती करी करवी जगन्नाथ ॥ ३९ ॥ मी तो पामरदीन । मज कशाचे ? काव्य स्फुरण वृथा । कासया अभिमान । थोरासन्निध ॥ ४० ॥ परि एक मनी धरिलें । संतचरित आरंभिलें । तदर्थ महत्व आलें । संत महिमा म्हणोनी ॥ ४१॥ गोक्षीर पात्रीं भरले । ते कास्य पात्र असलें । अथवा सुवर्णाचें झालें । गोडी तरी तीच की ॥ ४२ ॥ पात्रा पात्रा भेद दुग्धास कासया करणें खेद । तृषितासि द्यावा स्वाद । हेंचि जाणें दुग्धकीं ॥४३॥ तैसें माझे हें काव्य । न्यून म्हणोनि असेव्य । संत गुण गाणें सेव्य । होई सकलां ॥ ४४ ॥ ऐसा धरोनिया भाव । मज शांति लाभ अपूर्व । तेणें काव्य शक्ति दुणावे । चरित्र गावाय संतांचें ॥४५॥ प्रभुपदी जाऊनि शरण । करीन पुढती कथन । करावे जी श्रवण । चित्त निर्मळ करोनी ॥४६॥ चै. वि. ग्रंथ रसाळ । म. ली. प्रसंग गोज्वळ । रथयात्रा, गौर नृत्यलीला मंगळ । पंचवीस अध्यायीं कथियले ॥ ४७॥

श्री चै. वि. ग्रंथ म. ली. प्रसंग रथयात्रा वर्णन चैतन्य लीला लाघव कथा कथन अध्याय २५ समाप्त

ओ- सं. १४७ एकुण सं. ३१४५ दि- ११–७–६४ शनिवार आ. शु २–८६ सं २०२०

अध्याय समाप्त

# अध्याय २६ वा

श्री गणेशायनमः ।। श्रीं सरस्वत्यैय नम ।। श्री गुरुभ्यो नम ।। श्रीकृष्ण चैतण्याय नम । नमन माझे मनमोहना । गोपीजन मानस हरणा भक्त चित्तरंजना । सख्या पार्थां तुष्टविसी ।।१।। अर्जून तुझा सखा । द्रौपदीचा पुरविला हेका । भगिनी संकटीं मारी हाका । धावला त्वरित ।।२ ।। प्रल्हादास्तव प्रगटे स्थंभो । ध्रुवास्तव ।। काननीं मूर्तीउभी । दह्या दुग्धाचा अती लोभी । मेळवी गोपाळ गोकुळी ।।३ । गवळणी अत्यंत त्रासल्या । गाऱ्हाणी करिती येशोदेला । बाल्यीं खाई मृत्तिकेला । माता करी शिक्षेला । विश्वरुप दाविले तिला । परी तेथ आपल्या स्वरुपाला । प्रकटवा ।।४।। ऐसे स्वरुप भक्तजना । चैंतण्य रुपे सकलांना । दाविले करि उध्दरणा । अर्हनिश ।। ६ ।। प्रतापरुद्र मुखामाजी ।।५।। ऐसे स्वरुप भक्तजना । चैतण्य रुपे सकलांना । दाविले करि उध्दरणा । अर्हनिश ।। ६ ।। प्रमादान । भक्ताचें शंकासमाधान । दिन भक्त उपदेशुन । स्वस्था बोलविले ।।७।। ती कथा पावन । करी येथ कथन । अवधान देऊन । श्रवण करा ।।८।। विनवीं भक्ता चरणा । संत सेवा मज अज्ञाना । चैतण्य कवना द्यावे स्फुरण ।९। धन मान प्रतिष्ठा पद प्रतिष्टा मान । पांडित्य पुरुषार्थ आभिमान । दृष्टीस व्हावे धन । कृपाधन कैचावले ।।१०।। निष्काचन हरसी ।।११।। प्रेम रसाचे चाखणे । तैसा मान त्यागुन । नित्य व्हावे हरि स्मरण । तो आवडे भक्तजन । ही राहणें । दोन खग्ड एक्याम्याने । कबीर म्हणे अशक्य ।।१२।।

दोहा :- चाखा चाहे प्रेम रस, राखा चाहे मान ।
एक म्यान मे दोखग्ड देखी सुनी न कान ।।

प्रतापरुद्र महाराज । अभिमाने करी राज्य । प्रभुसीं जाहला त्याज्य । अहंकारी म्हणोणी ।।१३।। बलगंडीची पुष्पवाटिका । प्रभु घेती विश्राम सुख । संगती भक्त अनेक । राहिले ।।१४।। नृत्ये तनु भागली । अंग प्रत्यंग शिथील । अर्ध निद्रीत अवस्था शीतल वायुस्पर्शे ।।१५।। परमानंदानुभव । घेती भक्त सर्व । कटकाधिपराव । येई दर्शना ।।१६।। भट्टाचार्य सकेत । मानुनिया साबचित्त । प्रभु पहुडलें जेथ । उत्कंठीत राम पातला ।।१७।। काढुनि ठेवीं राजवस्त्रे । चवरी मुकुट छत्र । येई दर्शना साध्यावस्त्रें । पादत्राण विरहित ।।१८।। राजास जाहाले प्रभू दर्शन । सन्निध जाई धौर भजन । करी पाद सुवाहन । गोपी गीत गाइले ।।१९।। भागवत स्कंध दशम । गोपी गीत मनोरम । प्रथम जयति

तेधिकम । श्लोक संख्या एकोणीस ॥२०॥ राजा गाई गीत गान । चैतण्य करिती श्रवण । प्रेम समाधी लागे तूर्ण । प्रसन्न मन जाहले ॥२१॥ मुक्त कंठे स्तवु लागती । वाहवा शब्द मूखी येती । पुनारपि गावे इच्छिती करिती आज्ञा ॥ २२॥ एकोनीस श्लोकी गोपी गीत । रासक्रीडे माजी प्राथित । कृष्ण वियोगे दुःखीत । गोपी जाहल्या ॥२३॥ रास क्रीडे माझारी । अंतर्धात पावे कंसारी । वियोग दुःख गोपी नारी । विलपती ॥२४॥ पृच्छा पशु पक्षास । तैसे चिलता कुंजारु । कोठे गेला मानस हंस । दावा आम्हा ॥२५॥ श्रीकृष्ण वियोगे प्राण । जाती निघून देहातून । सांगा कोठे रमारमण । जेणे जीव संतोष ॥२६॥ ऐशाच रीती गोपी गीत । राजा असे श्लोक गात । एक श्लोक मतितार्थ । श्रवण करा सप्रेमे ॥२७॥

श्लोक :- तव कथामृतं तप्त जीवनं कवीभीरीडीत कल्मषापदम् ।
श्रवण मंगलं श्रीमदाततं भुविगृनती तें भूरिदाजनः ॥

देवा! तुझें कथामृत । त्रि विधताप हरित । जीवदान देई त्वरित । दुःखित जिवां ॥ २८ ॥ ब्रम्हादिक तुजगाती तुझेनि पापे हरती । श्रवण माझे प्रचिती । मंगलप्रद सकलाथे ॥२९ ॥ सवव्यापक पुरुषोत्तम । असशी देवा निरुपम तव कथामृव उत्तम । कथन भुवरी करी जो ॥ ३० ॥ तो जाणावा भाग्य पुरुष । तैसा उदार वहूवस । कथामृतपान निःशेष करि सदा ॥ ३१ ॥ जाणूनि श्लोक भाव । उठोनि बैसले कृपार्णव आलिंगिला प्रतापराव । भाग्य उदेले ॥ ३२ ॥ धन्य बा ! कटकराया । प्रेमामृत पाजिले सखया । कृतकृत्य ममकाया । कैसा हाऊ ऋणमुक्त ॥ ३३ ॥ गोपी गीतीं अमुल्य रत्न । ते त्वा केले प्रदान । प्रतिदान प्रेमालिंगन । याविण अन्य नसे की ॥ ३४ ॥ ते मी तुज करीं प्रदान घेई वा गोड मानुन । अहै तुकी कृपा करीसी कोण । सांगे मजलागी ॥ ३५ ॥ प्रभो मी दासानुदास । व्हावेकांक्षा मजसी प्राप्त झालो सर्वस्वास । प्रेमालिंगन दिधलें कीं ॥ ३६ ॥ मम भाग्यां नाहीं पार । तुच्छ वाटे संसार । जन्म साफल्य प्रभुवर । आपूल्या कृपे जाहलें । ३७ । केली जगन्नाथ सेवा । म्हणोनि प्रात्प जाहला मेवा । पुढती ईश्वर मागोवा घ्यावा वाटे ॥ ३८ ॥ आपुल्या चरणाची प्रीती । सदा राहो मम चित्ती । हृदय संदुकी स्मृति । राहो भीक मागतो

राजाचे भाग्य वर्णन । करितीसारें भक्तजन । भगवत प्रसाद तुर्ण । राये धाडिला ॥ ४१ ॥ प्रसादाचे अनंत प्रकार पाहूनि वाटे आश्चर्य । बहुविध वस्तु भरपूर । वाणिनाथ हस्ते धाडिला ॥ ४२ ॥ हापुस आंबे सुकीं केळी । संत्री नारिंगी नारि केली । अंजिर अननस रसाळ असती ॥ ४३ ॥ चिक्कु फणस डाळिंब । पपई सफरचंद मोसंबी किसमिस अक्रोड बदाम बीं । काजु पिस्ते चिरौंजी ॥ ४४ ॥ ऐसें खाद्य पदार्थ नाना । पेय सरबत प्राशना । न को म्हणता सकल ना आग्रह होई ॥ ४५ ॥ विश्राम जाहला सुखाचा । समय पातला रथाचा । रथाकर्षणी लाविती कैचा । मुखेगर्जती जयहो ॥ ४६ ॥ गुंटिच्या भवनी आला रथ । मंदिरी ठेविले भगवंत । भोग आरती त्वरीत । उपचारिती ॥ ४७ ॥ नव दिनोत्सव । प्रभु तेथ करिती वास्तव्य । भक्तासवें भक्तिभाव । व्यक्त होय किर्तनी ॥ ४८ ॥ श्रवण करा सज्जन करि आनंद विध्वंसन । राक्षसि चिंता दारुण । करी नष्ट उल्हास ॥ ४९ ॥ विचित्र घोर संसार । चितेचें असे माहेर घर तिचे अनेक प्रकार । वर्णावे किती ॥ ५० ॥ धनचिंता मानचिंता । प्रतिष्ठेची तशी अहंता । स्त्रीपुत्रादिक चिंता जडली असे ॥ ५१ ॥ या चितेचिया पोटी । आनंदास लागे ओहोटि । विपत्ति लागे पाठी । गणती न करवे ॥ ५२ ॥ संसारी भोग संग्रह । करण्या चिंता लागे दुःसह । तेथ सुखाचा निर्भह कैचा चालें ॥ ५३ ॥ त्यासि कैचा आनंद कैचा मिळे सुखास्वाद । भोग रहित परमानंद । विरक्त हरिभक्त जाणतीं ॥ ५४ ॥ आनंद भोग विरहित । त्याचि काक्ष करी विरक्त । तेणें परमार्थ पथ । सूगम होई ॥ ५५ ॥ म्हणून परमार्थी जन । विषय भोग त्यजुन । तीर्थ पुण्य पावन वास्तव्य करिती ॥ ५६ ॥ पुण्य तीर्थ प्रभाव । संसारी जना वाटे अपुर्व । आपुलिया सुखास्तव । आनंद लुटितीं ॥ ५७ ॥ करिती स्नान, पुण्यस्मरण । नित्य देवता दर्शन । भेटी संत सज्जन । भक्ति रस चाखिती ॥ ५८ ॥ संत भेटीचा आनंद । तीर्थी मिळे सुखद । संसारी होई प्रतिबंध । सुख दुरावे ॥ ५९ ॥ म्हणोनि संसारी पुरुषें । वर्षांतूनि एकमास । करावा तीर्थ क्षेत्रवास । प्रसन्नतेस्तव ॥ ६० ॥ तीर्थी जें जें घडे । ते गृहीं न सापडे । तेणें सहाय्यता जोडे । परमार्थासीं ॥ ६१ ॥ ऐसा सुलभ विचार । गौडिय भक्त करिती साचार । प्रभु चरण सहवास थोर । चातुर्यमास्यीं ॥ ६२ ॥ संसाराचा विचार न करितीं क्षणभर । उदासीन वरचेवर । तत्पर चैतन्य सेवेसीं ॥ ६३ ॥ चैतन्य सहवास सौभाग्यें । भक्त आनंद उपभोगें । क्रीडती नाना प्रयोगें । अवधी वाटे अल्पसा ॥ ६४ ॥ रथ यात्रेच्या पश्चात । तिथी पंचमी येत

पंचमीं दिनीं महालक्ष्मीं । शोधीं भगवंत, अंतर्यामी । नाथ वास्तव्य गुंटिचा हेरा पंचमीं नाम प्राप्त । तियेस ।। ६५ ।। पंचमीं दिनीं महालक्ष्मीं । नाथ मंदिर नीलाचल । गुंटिचा उद्यान सुंदराचल । उत्सव चालें, सुमंगल धामीं । नीलाचलीं उत्सव हो ।। ६६ ।। नाथ मंदिर नीलाचल । गुंटिचा उद्यान सुंदराचल । उत्सव चालें, सुमंगल । काशीं मिश्र पंडिता । उत्सवीं न पडो न्यूनता । सजवीं नाथमंदिर । ६८। पंचमींस ।। ६७ ।। राजाज्ञा कुल पुरोहितां । काशीं मिश्र पंडिता । उत्सवीं न पडो न्यूनता । सजवीं नाथमंदिर । ६८। राजाज्ञा मानीं प्रमाण । प्रभु प्रबंध करि दर्शन । भक्तांसवें सुंदराचलाहून । येतीं चैतन्य विजयोत्सवां ६९ ।। चैतन्य प्रभु आगमन । होतां दिधले उच्चासन । भोवतीं बैसले भक्तगण । उत्सव मुर्ति पहावया ।। ७० ।। तदा पातली त्यास्थानी । नाथा शोधित भवानी । महालक्ष्मी दासीगण । मेण्यामाजीं बैसोनीं ।। ७१ ।। तनीं बहूमोल अलंकार । वाद्ये वाजती गंभीर । देवदासी नृत्य मनोहर । करिती सेवा श्रींचीं ।। ७२ ।। श्री सेवक लक्ष्मीं सन्मुख । करुनि बंधन भारिती नावेक । दासी रागाविर्भाव देख । आणुनि करिती कृत्यांते ।। ७३ ।। देखोनी दासी कौतुका प्रभु पुसती स्वरुप भजका । लक्ष्मी इतकी कोपली का काय वार्ता असेही ।। ७४ ।। तदा प्रभुस सविस्तर । कथीं स्वरूप दामोदर । प्राणेश्वर विरह दुस्तर । दुःखद जाहला तियेसि ।। ७५ ।। प्रभृ पुसती वा स्वरूपा । जाणूइच्छितों खरे खरूप । भगवानएकाकी गुपचुप । किमर्थ जाती वृंदावनीं ।। ७६ ।। गुपचुप व्यवहार चोराचा । हा कां ? असे ईश्वराचा । याची करू पाहें चर्चा । कारण सांगे ।। ७७ ।। लक्ष्मीस येथ सोडुनि देव जाति वृंदावनीं । व्रज गोपीकांचा अधिकार । रासलीला क्रीडनी केवळ ।। ७८ ।। तेथ लक्ष्मीचे भाग्य । नसे तीसी सौभाग्य सुख । हेंचि कायण योग्य । वृंदावन गमनाचे ।। ७९ ।। ऐसा चाले प्रेम संवाद । स्वरूप प्रभुत सुखद । श्रीवासही प्रतिवाद । करूं लागती ।। ८० ।। नाथ सेवका बंधन । त्यांनी दिधलें कीं वचन । स्वामींची तुम्हां भेट घडवून । आणितों सत्वर ।। ८१ ।। ऐसें करितां वचन श्रवण । सेवक करिती मुक्त बंधन । लक्ष्मी येई परतोन आपुल्या स्थानी ।। ८२ ।। घेऊनि लक्ष्मीचा प्रसाद । प्रभुजी निघाले जलद । सुंदराचली सुखद । वास्तव्य केले ।। ८३ ।। करूनि संध्या वंदन । घेतले श्रींचें दर्शन । आनंदे संकीर्तन गान भक्तासवें ।। ८४ ।। यापरी प्रभु अष्टदिन । विश्राम भक्तासवे [illegible] ।। ८५ ।। तेथ इंद्रद्युम्न सरोवर निर्मल जल सुंदर । भक्तासह

चैतन्य ॥ ८७ ॥ अष्टदिन उत्सव । सरे, यात्रा उलटे अपूर्व । सुंदराचलाहूनि वास्तव्य । नाथ येती निलाचली ॥ ८८ ॥ तीसीं 'उलटी रथ यात्रा संज्ञा । असे पांडू विजय अभिधान । रथा रोहण पुजन । श्रीचे होई ॥ ८९ ॥ रथ जाई नाथ मंदिरी । प्रभु, भक्तगण कीर्तन करी । नाथ स्वस्थानी वास करी । घेती सकल दर्शना ॥ ९० ॥ प्रभु स्वथानीं जाऊन करिती प्रसाद ग्रहण । वरिती शयन । विश्राम स्थानीं ॥ ९१ ॥ गौडीय भक्त परिवार । प्रभु भिक्षेसी घरोघर । श्रावणी जन्माष्टमी पवित्र । उत्सव येई ॥ ९२ ॥ त्याजन्माष्टमी दिनीं । नंदोत्सव लीला करूनि । उत्सवी विविध प्रकारांनी आनंद लुटिती ॥ ९३ ॥ नंतर येई विजयोत्सव । प्रभु भक्तासवें सर्व । आणोनि हनुमान अविभाव । विजयार्थ प्रभु निघाले ॥ ९४ ॥ रावणाचा करावा पराभव । सवें घेती भक्त सर्व । हनुमान भाव । प्रकटविती ॥ ९५ ॥ यापरि भक्ता सांगाती । घेऊनि प्रभु उत्सव करिती । रासयात्रा देवोस्थानादि प्रीती । दीपावली लीला होतसे ॥ ९६ ॥ जगन्नाथ यात्रानंद । भोगी सप्रेम भक्तवृंद । काल लोटे गति जलद । न कळे कीं ॥ ९७ ॥ भक्तां जावया घरोवर । आज्ञा देती गौरहर । भक्तां होई दुःख भार । अतिशय ॥ ९८ ॥ सोडूनि संसार संभार । प्रभु सांगाते आनंद थोर । लुटिला, विरह दुस्तर । होई गमे भक्तासी ॥ ९९ ॥ प्रभु एकाकी एकांतीं । भक्तासि भेटी पृथक् देती । स्नेहें कुरवाळिती । घेती हृद्गत जाणून ॥ १०८ ॥ देऊनि प्रेमालिंगन । हस्तें प्रसाद करिती भक्षण । आपुले हातीचा मुखीं घालून । सांत्वन करिती भक्ताचे ॥ १ ॥ भक्तास वाटे प्रभुवर । प्रेम करिती अपार । ऐसा अभिमान थोर । चित्तीं होई सर्वत्र ॥ २ ॥ हेंचि प्रभूचें थोरपण । काय जाणें जीव अज्ञान । आत्मवत् सर्व प्रभुनि । भावे प्रेम दुणावे ॥ ३ ॥ जीवाची आत्मभावना । स्वरूप दाखवी प्रिय नयना । तेच शोक मोह, ये ना । शुद्ध प्रेमानंद दिसे ॥ ४ ॥ प्रेमी संदेह नसे । ईर्ष्या, द्वेष ना दिसे । सान थोर भाव नासे । संसर्गे संतांच्या । ५ ॥ कुटिल वृत्तीचा त्याग । होई निश्चत सत्संगें । प्रेमाच्या शुद्ध उपभोगें । मस्त राहती सर्वही ॥ ६ ॥ प्रथम निताई भक्त त्यासी प्रभुचा एकांत । भगवन्नाम प्रकार हेत । सांगुनि आज्ञापिले । वास स्थान गौड देश । तेथील जन अज्ञान वश । नामाचा भाव विशेष । प्रकट करावा ॥ ८ ॥ रामदास, गदाधर । आदि घेऊन भक्तवर । जावे तुम्हीं हरप्रकारें । सहयोग देती ॥९॥ मंगलमय भगवान् । तुमचे करी कल्याण । गुप्तरुपे सन्निध राहून । साह्य करीन तुम्हासी ॥११०॥

ऐसीं आज्ञा करून । पाचारिले आचार्य गुरूजन । आपण नित्य संकीर्तन । करून ईश भाव वाढवा १ श्रेष्ठमान्य पूज्यवर आपण अद्वैताचार्य । भक्तजना आधार । आपुलाचि ॥ १२ ॥ हरिभक्ती लागून । विमुख न हो भक्तगण । ऐसें ठेवावे धोरण । अज्ञानीं लावा भक्तीचे ॥ १३ ॥ आज्ञापिले आचार्यास । पाचारिला श्रीवास । तुमचे ऋण अतिशयेंसी । आम्हावरी ॥ १४ ॥ तें न फिटे कदाकाळीं । म्हणोनि काया खरी दिलीं । ऐसा अधिकार यावेळीं । तुम्हालागीं प्राप्त हो ॥ १५ ॥ आपुलीयें आंगणीं । होई संकीर्तन । तेथ गुप्तरुपे येऊन । नृत्य करीत सप्रेमें ॥ १६ ॥ नेत्र झाले अश्रुपूर्ण । मातेचे जाहले स्मरण । पंडिता स्वयें जाऊन । प्रणाम सांगा तियेसी ॥ १७ ॥ माझिये अपराध कोटी ऽ तेणें जाहलो हिंपुटी । तिची न घेतां भेटी । त्यास केला ॥ १८ ॥ म्यां कष्ट दिले मातेंसीं । तें शल्य बोचे हृदयासीं । मातेंचियां योग्यतेसी । तुळितां तुलना न होय ॥ १९ ॥ पित्याच्या सहस्त्रपटिनें । मातेची योग्यता असे जाण । असे शास्त्र वचन । असत्य न घडे ॥ २० ॥ कुपुत्र जरी जाहला माता प्रेमे प्रतिपाळी त्याला । मातेच्या निर्मळ प्रेमाला । हेतु नसे ॥ २१ ॥ पुत्राचे सहस्त्र अपराध । माता न मानी तयाचा खेद । तियेचि योग्यता विशद । नवर्णवे ॥ २२ ॥ माते सरिस दैवत । जगीं अन्य ना हे ख्यात । पुंडलिक सेवें रत पांडुरंग भेटिचे ॥ २३ ॥ यास्तव वा श्रीवासा । मम आज्ञा परियेसि । माझियास्तव मातेसी । करीं क्षमायाचना ॥ २४ ॥ तींयेसीं सांगे जाऊन । नैवद्यार्थ ठेविसीं बनवुन । तवहातीचा प्रसाद ग्रहण । नित्य करितसे ॥ २५ ॥ जे त्यौहारी स्मृति करिसी अश्रुपात हो तव नेत्रासी । तें दिनी मी तुझे पाशीं । येऊनि पदार्थ भक्षिले ॥ २६ ॥ म्हणोनि करी सात्वन । कळवी कूशल वर्तमान । येऊनि घ्यावे चरणदर्शन । संकल्प असें मानसी ॥ २७ ॥ ऐसा निरोप सांगुन जगन्नाथ प्रसाद वसन । बहूमूल्य सत्वरी देऊनि बोलविले ॥ २८ ॥ श्रीशिवानंद सेन भागवत । त्यासी प्रभु पाचारित वदलें स्नेहभरे हृग्दत । गृहि असोनि विरागी ॥ २९ ॥ साधुसेवा युक्त । संसारी असोनी विरक्त । हे अनुचित तूम्हाप्रत प्रपंचि लक्ष असावे ॥ ३० ॥ संचय करावा धन । येति त्यांचा राखीं मान । आतिथ्य रीती सन्मान । करणे कर्तव्य तुम्हासि ॥ ३१ ॥ ऐसि देऊनि शिकवण । सेनाचीं केलीं बोळवण । । कर्तव्य जागृती देऊन । भक्तजना ॥ ३२ ॥

यावें 'पट्टडोरी' सहित । प्रतिवर्षी निश्चित । तुम्हालागीं ।। ३४ ।। मालाधर बसूसीं । बोलती अतिप्रेमेसीं तुम्हां शारदा सुतासीं । किती वर्णावे ३५ तुम्ही आहां कवीश्वर । काव्य प्रतिभा सुन्दर । श्रीकृष्ण विजय काव्य थोर । श्रवण केले म्यां प्रेमें ।। ३६ ।। पद्यरचना मनोहर । नंद नंदन कृष्ण मोर । प्राणनाथ, रुचिर । मजलागीं मोहिले ।। ३७ ।। पद्याचीं संपूर्ण रचना । श्रवण करावीं, भावना । स्वरूपा, पूर्ण करीं कामना । मनीं ओढ लागलीसे । ३८ ।। तदा स्वरुप दामोदर । पद्य गाती धीर, गभीर । पद्य भाव मनोहर । भुलवी प्रभुसीं ।। ३९ ।।

( एकभावें बद्ध हरी जोडकर हात । नंदनंदग कृष्णसोर प्राणनाथ । )

पद श्रवण झालियां पुढती । कुलीन ग्रामस्थांची करुनि स्तुति । परम भक्त आहाति । मधूर नाम गातसा ।। १४० ।। तूमचियां ग्रामींचा श्वान । तो मज वाटे पावन । म्हणोनि माझे वंदन । सकलासीं ।।४१ ।। आपलें चरण दास्यत्व । हेचि आमुचें कर्तव्य । त्यावाचूनि श्रेष्ठत्व । आम्हा कैचें ।। ४२ ।। आमुचा असें एकप्रश्न । करावें आमुचें समाधान । ऐसे असें कथन । प्रभु चरणीं ।। ४३ ।। आम्ही गृहस्थ संसारी रत । कैसा होई उद्धार निश्चित । कर्तव्य काय त्वरित । जाणावें ही भावना ।। ४४ ।। तदा साधक भक्ता । प्रभु करितीं उपदेश । तुह्मासवें गुप्त नसे । जाणतां तुह्मी ।। ४५ ।। पाळावा गृहस्थ धर्म । भजन पूजनादि कर्म । कळे सुखाचें वर्म सकलही ।। ४६ ।। गृहस्थासीं तीन गोष्टीं । कथितो त्या स्पस्ट । तेणें न होती कष्ट । पावतो हरी ।। ४७ ।। श्रद्धे भगवत्पूजन । मुखीं सदा नामस्मरण । गृहीं अतिथीं पूजन यथाशक्ति करावें ।। ४८ ।। साधु, महात्मे, वैष्णव । तयांच्या चरणी भाव । करावा नित्य गौरव । मनीषा ऐसी । ४९ । यापरी कर्तव्य करून । राही तो भागवत जाण । होय हरीसीं समाधान । संसारीं हे ।। १५० ।। सत्यराज प्रश्न करीत वैष्णव ओळखण निश्चिंत । कल्पना द्यावी हा हेत । तुह्मांकरवी ।। ५१।। उत्तरी वैष्णव चिन्ह । दाविले आनंदुन । मुखी एकवार कृष्ण कृष्ण । ह्मणें वैष्णव तो खरा ।। ५२ ।। ऐशापरीं सांत्वन । करुनि केली बोळवण । वाहिले, खंडग्रामस्थ जन । उपदेशाया ।। ५३ ।। ग्रामवासियां तिघेजण । मुकुंद दत्त, रघुनंदन । नरहरि हे प्रधान । भक्तजन प्रभुचें ।।५४।। मुकुंद सुत रघुनंदन । भगवद्भक्त वैष्णव पूर्ण । त्याचेनि योगें भवित साधन । लाभे मुकुद दत्तासी । ५५ ।। हे हृदयी जागून । गौरें कलें हास्य वदन । तुह्मां दोघांत पिता कोण । पुत्र कोण मज सांगा ।। ५३ ।। प्रभु करिती प्रश्न । मुंकुंद

गंभीर होऊन । मान प्रतिष्ठा गुंडाळून । उत्तरती प्रभुसी ।। ५७ ।। यथार्थ कथी रघुनंदन पिता । श्रींकृष्ण भक्ति तत्वता कळावया कारण सुत । पुनर्जन्म मम होय ।। ५८ ।। यास्तव मम सुत पिता । तोचि उद्धार कर्ता । मी केवळ जन्मदाता पिता असे ।। ५९ ।। ऐशा नम्र उत्तरे । प्रभू प्रसन्न प्रेमभरें । तुझियाविण कोण उत्तरे । ऐसियापरी ।। १६० ।। जो करी भक्ति प्रदान । तया ठायी असो भावना । हींच अनदिन कारण । महापुरुषचे ।। ६१ ।। असला अवस्थेनें महान । कुल जातीं विद्या मान । सबंध दृष्टींने होन्यून । परीं तो श्रेष्ठचि ।। ६२ ।। प्रभुत्रे ऐसे वचन श्रवणी धाले भक्तजन । मुकुंददत्त महिमान । स्वये कथिती ।। ६३ ।। मुकुंदाची कृष्णभक्ति । ती अपुर्व सांगु किती परंपरेचि संपत्ती । प्राप्त झाली ।। ६४ ।। यवन राज दरबारीं । राज वैद्य नोकरी । परी गोविंद अंतरी । नित्य वसें ।। ६५ ।। एके दिनी दरबारी । बैसले राजा शजारीं । मयुरपिच्छे व्यजन करी । ताप निवारीं सेवक ।। ६६ ।। मयूर पिच्छाचे स्मरण । होता जाहले मुकुट स्मरण । जो देवाचे माथा जाण । शोभूनि दिसे ।। ६७ ।। तैं प्रेंम विवष होई मुच्छीत भूमीस । पडे करिती उपचारास । सावध व्हावया ।। ६८ ।। सावध जाहलीयावरीं । राजा बोले सत्वरी मान्यवरा कष्टि भारी । जाहले वाटें ।। ६९ ।। मुकुंद बदले रायास । काशाचे कष्ट त्रास । गुप्त भाव न कळाला कोणास । उत्तर वरीवरी ।।१७०।। मजमृगीचा रोग । म्हणुनी प्राप्त होई भोग । त्या रोगाचा आवेग । न साहवे ।७१।। म्हणोनी येई मुर्छांना । गुप्त ठेवी राखून । राजा अत्यंत सूज्ञ । मनी सारे उमगला ।।७२।। परी राया न करी प्रकट । मनी ठेवी गुप्त गोष्ट । मुकुंद । अधिकारी श्रेष्ठ । जानुनि सन्मानिला ।।७३।। श्रविली प्रभु प्रशस्ति । मुकुंद जाहला लज्जित वदले महत्वाचो मात । चैतण्य देव ।।७४।। आपण मिळवा विपुल धन । परी सूत रघुनंदन । तयासी करू द्या कृष्ण भजन । भक्त जन्मापासुनि ।। ७५ ।। न करीं त्या प्रतींबंध । तुटों नयें भक्तिसंबंध । अंतरी वाटे विषाद । ऐसे न करीं ।।७६।। शीतकाळ घोर । पुष्करिनीत स्नान करी । कंदब पुष्पे विविध पत्रीं । भगवंत पुजी ।। ७७ ।। करी कुलांचा उध्दार । हेचि तुमचें भाग्य थोर । कुलदिपक पुत्र पवित्र । तारी ऐसा ।।७८।। ऐसा पुत्र रघुनंदन । त्याचे चरित्र श्रवण । करु निघाले भक्तजन । मुकुंदासह ।। ७९ ।। प्रभुनि करावे स्तवन । ऐसा भाग्यवान कोण । अधिकारी

तैसे सार्वभौम प्रती । वरी विद्यावाचस्पती । दोघा निवेदिली कृष्ण भक्ति । छंद जना लावावा ॥ ८२ ॥ श्री वासुदेव दत्त । भक्त अतिविरिक्त । त्यांची स्तुति करित । वदले मर्म भक्तांना ॥ ८३ ॥ दत्तासस्ति दहाविस । भक्त होती एकत्रित । तेणें जगदोध्दार होत । न तुरे तिळमात्र संदेह ८४। स्तुति श्रवणे दत्त । वासुदेव जाहले लज्जित दिनभावे विनीत । श्री ते प्रार्थिती ॥ ८५ ॥ दयाळू बा गौरहर । परिसा विनती सत्वर । जीवाचे दुःख घोर । पाहता फाटे हृदय ॥ ८६ ॥ जीवाचे पाप संपुर्ण । मम तनु वरी यावे तुर्ण । सकलाचे दुःख पूर्ण । मिळो भोगाया मजलागी ॥ ८७ ॥ एसे द्यावे आशिर्वचन । कांक्षा कराजी पुर्ण । श्रीचरणीं करी कथन । भक्ति भावे ॥ ८८ ॥ प्रभुसन्निध राहु इच्छित । महाभाग मुकुंद दत्त । त्यासी टोटा गोपीनाथ । सेवेची आज्ञा जाहली ॥ ८९ ॥ यमेश्वरी करिती वास घऊनिया क्षेत्र संन्यास । सेवापुजा बहूवस । किर्तनी रत ॥ ९० ॥ सकला दिधले अलिंगन । भक्त करिती रुदन । प्रभु विरहे अश्रुपुर्ण । नेत्र जाहले ॥ ९१ ॥ गौडदेशी परतोन । स्वस्थली जाती सारेजण । त्याचीं केलां बोळवण । सप्रेमे ॥ ९२ ॥ पुरी भारती जगदानंद । स्वरूप दामोधर गोविंद । काशिश्वर देती साद । वास केला प्रभुसवे ॥ ९३ ॥ घडता सत सहवास । कुणा वाटे तयाचा त्रास । विषयी जीवन भकास । सत्समागम न रुचे ॥ ९४ ॥ श्रीकृष्णचंद्र अवतार । साक्षात गौरहर । तया सन्निध अपार आनंद सागर हेलावे ॥ ९५॥ पदरि असले पुर्वपुण्य । तरीच भेटे संतजन ना तरी प्रारब्धहीन । विषय कदंबी पहूडला । ९६॥ हृदयीं ठेविला गौरहर । तेणें संतोषे गौरिहर । हृदयस्थ ज्याच्या मं तावर । न्युन नसे तयासी ॥ ९७ ॥ मी तव अभागी दीन । करी प्रार्थना तुज लागून । ग्रंथ लेखनी आसपुर्ण व्हावी तवकृपे ॥ ९८ ॥ माझिया काव्यी न्युन । भावे करी संतवर्णन । संत आज्ञा प्रमाण । मानी रची कथेते ॥ ९९ चै. वि. ग्रंथ रसाळ । म ली, प्रसंग सोज्वळ । प्रताप रुद्र प्रेमदान मंगळ । शंका निरसन उपदेश प्रदान सव्वीसाविया २००। कथन नाम अध्याय सव्वीसावा समाप्त ओ. सं २०० एकुण ३३४५ दि-१३-७-६४ सोमवार- मि आषाढ शु ५ शके १८८६

## अध्याय समाप्त

# अध्याय २७ वा

श्रीं गणेशाय नम: ।। श्री सरस्वत्यै नम: ।। श्री गुरुभ्यो नम: ।। श्रीकृष्ण चैतन्याय नम: ।। नमन माझें श्री मुकुंदा । मुक्तींचियां परमानंदा । योगी, मुनि मानसवृंदा । जगदानंदा गोविंदा ।। १ ।। रामावतारी धनुष्यबाण । कृष्णावतारी सुदर्शन । घेऊनि केले दीनरक्षण । परित्राण साधूंचे ।। २ ।। दुष्कृत्यांचा केला नाश । दुष्टास दंडिले नि:शेष । आर्तांचें भवपाश । तोडूनि दिधले मुक्तीला ।। ३ ।। तुझिया नामे पाषाण तरलें । नामें दुष्ट उद्धरिले नामसंकीर्तने केलें । दोष मुक्त ।। ४ ।। नामाचा अपार महिमा । गणवेना, नोहे सीमा । तव विश्वरुप पुरुषोत्तमा । भक्तोत्तमा दाविलें ।। ५ ।। त्याच मिषें घेसी अवतार । नवद्वीपी जाहले गौर । वासासीं जगन्नाथपुर । भक्तकार्य करावया ।। ६ ।। केला अमोघ उद्धार । त्याचे चरित्र पवित्र । अध्यायी कथिलें सविस्तर । श्रोतेंजनां ।। ७ ।। एके दिनीं भट्टाचार्य । स्वगृही भिक्षार्थ गौरहर । पाचारिती एक मासभर । वास करावा मनीषा ही ।। ८ ।। करावें मम गृह पवित्र । आपण करुणाकर । करावे पूर्ण हार्द्र । तोषवायां ।। ९ ।। श्रवणें केले हास्य । ममदीक्षा असे संन्यास । वास करावा तिन दिवस । यतिस्तव शास्त्र असें की ।। १० ।। आपुलीं इच्छा एक मास । तेणें होय उपहास । मम वास्तव्य आस । शास्त्र बाह्य होंय ।। ११।। तरी मी तुम्हां कारण । वासास देई पांचदिन । आपुले गृही भीक्षा करीन । विश्राम होय स्वस्थानी ।। १२ ।। आचार्य सुत चंदनेश्वर । सुताषाठी रुप सुंदर । त्याच ग्रामी गृह श्वशुर । वास्तव्य असे शेजारीं ।। १३ ।। पतींचें नाम अमोघ । नास्तिक, विषयी दीर्घ । पाप वृत्तीचा ओघ । नित्य चालें ।। १४ ।। हिऱ्यापोटी गारगोटीं । तैसा अमोघ जनदृष्टि । आचार्य वनिता कष्टी । स्वमनीं होती ।। १५ ।। आचार्यें भिक्षार्थ प्रभूसि । पाचारिले जे दिवशी । निमित्त करुनि जावयास । बाहेरी घालविलें ।। १६ ।। नानापरी प्रकार । षड्रसयुत अन्न पवित्र भोजना केलें रूचिर । व्हावे संतुष्ट चैतन्य ।। १७ ।। एकांती बैसलें भिक्षेंस । पात्री विविध जिन्नस । वाढिलें पाहोंनि संतोष । चैतन्यां जाहला ।। १८ ।। वींस माणसाचें भरें पोट । ऐंसे पदार्थ केलें चोखट । पन्नास खाद्य वस्तु स्पष्ट । सणिकें, कर्ते ।। १९ ।। प्रभूचें चाले भोजन । तो पातके अमोघ स्तन । भोजन प्रकार पाहीन । हास्य करी ।। २० ।।

वैराग्य । रसनेंद्रिय उपभोग । घेऊनि साधी योग । दिसें आगळे साधुत्व ।२२। बोले निंदा वचन । आले आचार्य धावुन । प्रभुसि केले क्षमा याचन । जामात अज्ञानी असे हा ।।२३ ।। प्रभु वदले आचार्यवर । अमोघ बोले सत्य, बरे । भक्षणीं इतुके खाद्य रूचिर । सदाचार कैचा तेथ ।। २४ ।। रस विषयाचे लाघव । इतर विषयां उपद्रव । रसे जिते जितं सर्व । शास्त्रीं कथिले । २५ ।। रसनेद्रियाचा प्रभाव । इतर इंद्रियां आणि लघुत्व । तेथ कैचे राही प्रभुत्व । वैराग्याचे ।२६। म्हणोनि जिकावी रसमा । इंद्रिय शांति होय जाणा । ऐसा संत वचना । सत्य मानावे ।। २७ ।। अमोघ सत्य वचन माझे करी समाधान । न करावें प्रतारण । तयाचे मज दुःख ना । २८ ।। तुम्ही न मानावा खेद । त्यासी न वदा एक शब्द । तेणें मज होय दुःखद । वदुनि आले स्वस्थानी ।। २९ ।। प्रभु गेलें भिक्षा घेऊन । पतिपत्नी जाहले दुःखित मन वर्ज केले अन्नपान । अमोघ क्रोध वचे ताडिला ।। ३० ।। करूनि प्रभु अपमान । काय लाभले भलेपण । दावूनि शहाणपण । छळिले तुवां ।। ३१ ।। आचार्य सुता षाडीदेवि । आपुल्या भाग्यासि दूषवी । मम पति दुर्दैवी । संतद्रोही जन्मला । ३२ । त्याची होऊनिया पत्नी । जयें केली मनुष्यत्व हानीं पतिहीन होऊनि जनीं । राहते खेद न राहता ।३३। अथवा माझा देहांत । मज नेता जरी कृतांत । त्याची नसती खंत । ममनां ।। ३४ ।। साधु द्रोही पती । मानसी शल्य अति । चित्तीं होई अशांति । मृत्यु बरा वाटतसे ।। ३५ ।। ऐसा सुतेचा शोक । माता पितया जाहलें दुःख । अन्न त्यागिती सकळिक । विषण्ण मनीं ।। ३६ ।। श्वशुराचा पाहोनि क्रोध । अमोघा कळला प्रमाद । परी नये मना बोध गृहांतूनि जाई त्वरें ।। ३७ ।। अमोघाची दुष्टकरणी । त्याचे फळ मिळे तत्क्षणी । तत्काळ द्वितीय दिनीं । विषूचिका रोगें पीडिला ।। ३८ ।। रोगाचें आगमन । पाहूनि आचार्य प्रसन्न । अत्युत्कट पाप पुण्य । फल मिळे तात्काळ ।। ३९ ।। उग्र पाप पुण्य फल इहलोकीं । मिळे तात्काळ । नाही तेथ काळवेळ । शास्त्र वचन ।। ४० ।। अमोघें केला अपराध । प्रायश्चित मिळे शुद्ध । मनीं व्हावया प्रबोध सत निंदेचा ।। ४१ ।। श्वशुर गृहीं आणिला जामात । योग्यवेळी मिळे प्रचीत । त्यासी बहू कष्ट होत । क्षणक्षणां मूर्छित हो ।। ४२ ।। प्रभुसि कळला वृत्तांत । गोपिनाथ द्वारा समस्त । आचार्य गृहीं आलें त्वरित । भेटावयां ।। ४३ ।। अमोघ रोगें व्याप्त । पलंगी पहुडे मुर्छित । जीवनाशा होय व्यर्थ । ऐशी दशा प्राप्त हो ।। ४४ ।। जाती पलंगा सन्निध । घेती प्रभु त्वरे शोध । अहा ! अंतर किती विशुद्ध । अमोघाचे

॥ ४५ ॥ असतां कुलीन ब्राह्मण । निर्मल अंत:करण । तांचे प्रभु निवास स्थान । असें कीं ॥ ४६ ॥ न जाणों, रिपु मत्सर । त्यां राक्षसे व्यापिले शरीर । तेणें अमोघ जर्जर । जाहला ॥ ४३ ॥ निघोनि जाई, बा ! मत्सरा । त्यजि आचार्य मंदिरां । पुन्हां न यावे माघारा । आज्ञा तुज ॥ ४८ ॥ अमोघा वदले वचन । गेला चांडाळ हृदयांतून । मत्सर न ये परतोन । वचन सत्य ॥ ४९ ॥ आतां झडकरी उठोन । करी श्रीकृष्ण नामस्मरण । तुझे अपार कल्याण तयांत ॥ ५० ॥ अमोघ बैसला उठोन । रोग, भोग जाई पळोन । मुखें श्रीकृष्ण भजन । करूं लागे ॥ ५१ ॥ संत कृपेचे फळ । अमोघास मिळे तत्काळ । चित्त जाहले निर्मळ । नास्तिक्य पार मावळले ॥ ५२ ॥ श्रीकृष्ण गोविंद हरे मुरारे । हे नाथ नारायण वासुदेव निर्धारे । गाई उच्चस्वरें । नृत्यकरी ॥ ५३ ॥ अद्भुत परिवर्तन । पाहोनी, चकित होती जन । प्रभु प्रताप जाणोन । संत प्रसाद मानिती ॥ ५४ ॥ करुनि साष्टांग नमन । अमोघ बोले वचन । अपराध क्षमून कृतार्थ करा ॥ ५५ ॥ देऊनिया आलिंगन । कृतार्थ केला दुष्कृति दीन । पश्चातापे दग्ध तन । जाहले ॥ ५६ ॥ काही काळ भजनी लोटत । परम वैष्णव भागवत । प्रभु अंतरंग भक्तांत । अमोघ गणिला ॥ ५७ ॥ आज्ञापिले गोपिनाथे शीघ्र जाई आचार्य गृहाते । भोजनाच्या सिद्धते । शीघ्र करावे वांछा कथी ॥ ५८ ॥ करुनि षड्रसान्न भोजन । प्रभुचे होई समाधान । सार्वभौम तेंणें संतोषोन । जामात क्षमिला ॥ ५९ ॥ संताचें हे संतपण । दुर्जना बनविती सुजन । काक तत्काळ पिक होऊन । जाई बक हंसकीं ॥ ६० ॥ ऐसे हे संत वचन । गोस्वामी कृत रामायण । तेथ संतकृपा महिमान कथियलें ॥ ६१ ॥ यास्तव संतचरण प्रीति । तेणें होय उत्तम गति । तीच द्यावी मति । नर्मदा सुतां ॥ ६२ ॥ मी तो मंदमतिदीन । मज नये करणे कवन। प्रभुचरित वर्णन । करी तयाचा कृपे ॥ ६३ ॥ ऐसे हे चरित्र सार । जयात अमोघ उध्दार । त्याचे वर्णन सविस्तर । कथियले ॥ ६४ ॥ नित्यानंद ईशभक्त । प्रभुपदी गाढप्रीत । प्राणापरिस प्रिय मानीत । सर्वस्त्र गौर ॥ ६५ ॥ निताईचा बालस्वभाव । निर्मळ करी शद्बपारव । संतोषतीं अतिव महाप्रभु ॥ ६६ ॥ बालकासवे खेळ । वाचे नित्य गौरहरी बोल । नामाचा एकचि कल्लोळ । बालात उठविती ॥ ६७ ॥ निताईस करुन पाचारण प्रभु वदती वचन । माझा लोभ पुर्ण । आपणावरी ॥ ६८ ॥ आपुले मज सान्निध्य । मजसी होय परमानंद आपुला विरह दुखद । मजलागी ॥ ६९ ॥ परी जीव दु:खि पाहुन । मन होई विषण्ण । तया दु:खाचे परिहरण आपुले

हाती ॥ ७० ॥ गौडीय अज्ञजन । नास्तिक भाव हीन । शुष्क विद्याभिमान । पंडिता ठायी ॥ ७१ ॥ पडे श्रवणी किर्तन घृणा करिती दुर्जन । त्याचे करावया उध्दरण । आपणयोग्य ॥ ७२ ॥ भगवन्नाम सकिर्तन । करा गौडदेशी जावून सर्वत्र हरिभक्तिचे लोण । पोहचवावे ॥ ७३ ॥ भेदभाव सारा विसरुन । उपदेशावे अज्ञजन । त्याचें अधिकारी पुर्ण आपणच की ॥ ७४ ॥ ऐकूनि प्रभुवचन । अश्रुपुर्ण निताई नयन । कंठसदगद होऊन । शब्द मुखातुन उमटे ॥ ७५ ॥ केले प्रभुसि नमन । मज आपणापासोन । न त्यजावे ऐकावचन । सन्निध असावें मनि असे ॥ ७६ ॥ प्रभु करितीं कथन गौडि करावें गमन । समयी द्यावे दर्शन । यावे नाथ भेटीसी ॥ ७७ ॥ आज्ञा मानूनि प्रमाण । नित्यनंदे ठेविले प्रस्थान सवे चारभक्त जन घेऊनि कष्टे निघाले ॥ ७८ ॥ प्रभुचें होते आश्वासन । मी तुमच्या संगे असेन । तेचि सत्य मानुन निर्भय राहती ॥ ७९ ॥ गावो गावी सकिर्तन । भक्तासवे नर्तन । नित्य गौरहर स्मरण । जींवाचे कल्याण हेतुहा ॥ ८० ॥ गौडि केला प्रवेश । मधुरवचे विवश । जनता होंई विशेष निताईच्या ॥ ८१ ॥ शरीरी दिव्य तेज । प्रभावी वाणीं युक्त ओज । विरक्ति बालभाव सहज जन आकर्षि ॥ ८२ ॥ ब्राम्हण, शुद्र, अत्यंज । उपदेश भावना दुजा येणे लोक का जा भरते आले ॥ ८३ ॥ गौड देशी पानिहट । ग्रामी राघव पंडित । गृहि भक्तासहित वास्तव्य गौरांचे ॥ ८४ ॥ नित्यानंद अनुगामी । प्रचारक रितीं विविध ग्रामी । श्रीकृष्ण किर्तन प्रेमी जनता होय ॥ ८५ ॥ मार्गी अंबिका नगर । केला सकिर्तन प्रचार । सुर्यदास पंडित प्रवर । निताईसी सत्कारी ॥८६॥ अल्पवास्तव्य केले परिवारे बहुत सेविले । श्रध्दायुक्त मानस जाहले । थोर संत निताई ॥ ८७ ॥ एडदह ग्रामी प्रचार । खडदही आले सत्वर चैतन्य दास पुरंदर । पंडित सत्कारिले ॥८८ ॥ तेथुनि वास सप्तग्रामी । येती निताई महामहिम । सुवर्ण वणिक जाती अधम वसती तयाची ॥ ८९ ॥ अस्पुश्य गणोनी दूर । होते त्याचे दिधला आधार । जाती श्रीमंत भरपुर । नित्यानंदे देखिलें ॥ ९० ॥ परमार्थ पंथ सुगम । हिनतेनें झाला दुर्गम । त्यासी उद्धरती मद्महिम । भक्ति उपदेशिती ॥ ९१॥ हरि भक्तिचे मिळे अमृत । समाज होई जागृत । दोष निरास त्वरीत । होय निर्मळ समाज ॥ ९२ ॥ भक्तिचा करवी स्वीकार सुधारिला आचार विचार । हीनत्वाचा कलंक दुर । केला सकल जातीने ॥ ९३ ॥ उच्चसमाजी खळबळ झाली निताई भक्त धिःकारती । परि शांती नाहि ढळली । आरोप साहिलें ॥ ९४ ॥ नित्यानंद कर्म पवित्र । कळे

सकला इतरत्र निर्भयता सत्य ईशवरनिष्ठा एकत्र । तेणें विश्वास दुणावे ॥ ९५ ॥ जनास वाटे हा ईश्वर । करावया आमुचा उध्दार । ऐसा हेतु पवित्र । ग्रामी पातला ॥ ९६ ॥ हीन जाती उध्दार । करूनि निघालें सत्वर । भोवती नामप्रचार शांतीपुरी येती निताई ॥ ९७ ॥ भक्त ज्ञानी अव्दैताचार्य । गृहिं आले सत्वर । प्रभु भक्त निताई थोर आलेंगिला ॥ ९८ ॥ दोघे ही महापुरूष । भक्ति प्रेमे होती विवश । वदले आचार्य निताईस । प्रभु मनोगत जानता ॥९९॥ तुम्हापासी तुमचे शरीर । प्रभुरूपे प्राण बाहेर । ऐसा असे अधिकार । ज्ञात मज ॥ १००॥ गृही करावा वास । अल्पकाल हें मानस । मानिले आचार्य वचास । नाम प्रचार चालीला ॥ १०१ ॥ पुढतीं गाठले नवव्दीप । येतीं शचि माते समीप । साष्टांग नमने, असाप । माता आनंदलीं ॥ २ ॥ मजला त्यजी निमाई शुध्दी राखिसि निताई । पुत्रव्दयाचें दू:ख होई । विस्मृत तुज देखता ॥ ३ ॥ येथ करीवा! वास्तव्य अन्यत्र गमन श्रमवाव नकरी आज्ञा सर्व थैव । मानी तू ॥ ४ ॥ मजसन्निध असावे माझे समाधान करावे वृध्दपणी मज द्यावे हेचि मागे ॥ ५ ॥ मातेची आज्ञा प्रमाण । मानूनि चित्तीं प्रसन्न । हिरण्य पंडित सदन । वास्तव्यां योजिलें ॥ ६ ॥ नित्य चाले संकीर्तन नृत्य करिती भक्तजन । प्रभूचें मनोगत पूर्ण । होऊं लागती ॥ ७ ॥ जनतेंत वाढे प्रभाव । राहणी बदले, पेहराव खाण पानादिकीं सर्व । प्रकार विविध जाहले ॥ ८ ॥ जेणें भक्तिभावें वंदिले । तयें बहुमुखें निंदिलें । जनीं सर्वत्र नियम चाले । मुखें तितुके प्रलाप ॥ ९ ॥ कार्यार्थी धीर पुरूष । निंदा, स्तुति मानी त्रास । कार्याची आंच लागे मनास तेणें कार्य दुणावें ॥ ११० ॥ निंदा उन्नतीची औपधी । तीसी न मानावी उपाधी । तेथ दंभाची बुद्धि । कार्य नाश करी ॥ ११ ॥ यास्तव योग्य प्रयत्न करावा । श्रेष्ठ मार्ग अनुसरावा । सत्य मार्ग न संडावा । ध्यानीं धरावा गुरूमंत्र ॥१२॥ महापुरुषाचें जीवन । स्वयें ब्रह्मस्वरुप जाण । परीं धर्मवाह्य वर्तन । सामान्यास दिसे ॥ १३ ॥ यास्तव ऋषी वचन । असे वेदलास्त्रप्रमाण । त्यानीं बोधिला शिष्यगण । त्याचें ऐसें लक्षण ॥ १४ ॥ जीं जीं आमुचीं संच्चरितें । ती ती उपासावी निरूते । नाचरावें निषिद्ध तें । जयानें अश्रद्धा दुणावें ॥ १५ ॥ सत्पुरुषांची कार्य निंदा । आपुल्या यशास बाधा । उल्लंघिता शास्त्र मर्यादा । पापभाक् होई सर्वथा । १६ ॥ सद्गुणांचा सदा गौरव । करणें नित्य कर्तव्य । [illegible]

रत्न परिक्षावया ॥ १८ ॥ नित्यानंदाचा विरुद्ध आचार । प्रभुसि निवेदिला सत्वर । निंदक जन तत्पर । असत्य प्रभुसि वाटे हे ॥ १९ ॥ येई रथयात्रा समय । भक्त निघालें गौंडदेशीय । प्रभुदर्शन मनोदय । निलाचली ॥ १२० ॥ घेऊनिया प्रभु दर्शन । नितांई वृत्त केलें कथन । श्रीवास पंडितें दूषण । दिधलें तयां ॥ २१ ॥ नित्यानंद होते लहान ते वेळी अबोध पूर्ण । संन्यास दीक्षा अजाणपणें । घेतली तेणें ॥ २२ ॥ परेच्छे घेतला संन्यास । तेथ इंद्रिय न्यास । कैचें विषयीं जनास । साध्य हो ॥ २३ ॥ ऐकतां व्यंग वचन । करिती श्रीवास कथन । विधि निषेध बंधन । निताईसी नसे ॥ २४ ॥ प्रभुनीं दिधला निर्वाळा । जणु अंजन घातले डोळां । आचार दिसे वेगळा । तरी बंधन नसेचि ॥ २५ ॥ निंदेचा होय कहर । नित्यानंदा त्रास फार । संन्यासि असोनी संसार मांडिला कीं ॥ २६ ॥ करीता संन्यास विटंबना काय साधे विषयीजना आपणा मन आवरेना । दंभ कासया ॥ २७ ॥ विविध जन वचन । ऐकता विटे मन निताईस क्षोभ होऊनि मातेस व्यथा कथियली ॥ २८ ॥ माता बोले वचन निलाचली जाऊन । कथन करी व्यथा दारुण निमाईस ॥ २९ ॥ तुज करी मार्गदर्शन । होय चित्तीं समाधान । दुःखाचे परिमार्जन । निश्चित होय ॥ ३० ॥ संगे प्रिय भक्तजन । निलाचली जातीं घेऊन । सन्मुख जावया मन । लज्जित जाहले ॥ ३१ ॥ पुष्प वाटिके आसन अनुतापे अश्रु नयनी । वृत कळता चैतन्य पातलें त्यास्थाना ॥ ३२ ॥ करूनि निताई स्तवन । करिती भोवती प्रदक्षिण देखोनि साष्टांग नमन । करिती प्रभुसी ॥ ३३ ॥ नमन करिता येई मुर्च्छा । निताईस प्रेमावेश । चरण धुली मस्तकास लाविती प्रभु ॥ ३४ ॥ प्रभुनी केला चरण स्पर्श देखता निताई प्रेमवश । उभया होई आवेश विस्मृत हो बाह्यदशा ॥ ३५ ॥ होऊनिया सावधान । पुरित ठेविले दासस्थान यमेश्वर मंदिर निर्जन । गदाधर सन्निध ॥ ३६ ॥ नित्यानंद गदाधर । दोघे राहती एकत्र । गदाधर संन्यासी क्षेत्र । अंतरग भक्त प्रभुचा ॥ ३७ ॥ गदाधरे सुग्रास भोजन केलें हो प्रभु स्मरण । प्रभु तत्काल येति धावून । भक्तिप्रेमार्थ भोजन ॥ ३८ ॥ प्रभुसह भक्तजन । करू लागलें भोजन सुरु जाहलें वर्णन । सुग्रास अन्नाचे ॥ ३९ ॥ भगवंताचा प्रसाद । तृप्त होतीं घेता आस्वाद । तयात गौरसन्निध । भक्ति प्रेमा दृढावे ॥ ४० ॥ एकांती बाहिलें नित्यानंद । प्रभु वदलें श्रीपाद । आपूलियास्तव विधी निषेध । गौण असती ॥ ४१ ॥ व्रजवासीं गोपालक । गोप कृष्णाचे उपासक । तुम्हास नसे बाधक । विधी निशेध ॥ ४२ ॥ मम मनीं असे

आस । आपण करावे गार्हस्थास । करुनि विवाहास । आदर्श हो जनासी ॥ ४३ ॥ निताई नेत्रीं अश्रु आणून । गद्गद बोले प्रभुलागून । विष्णुप्रिया संतान हीन । त्यजून बनला यति ॥४४॥ मी असोनि संन्यासी । पुन्हां आचरावे गार्हस्थासीं । ऐसा उपदेश मजसी । नवल वाटे ॥४५॥ आपुली लीला अगाध । न कळे कोणा विशद । मी असे अप्रबुद्ध । मज थांग नसेचि ॥४६॥ प्रभु वदले श्रीपाद । माझे पागलपण प्रसिद्ध । गृहस्थ धर्मीं व्हावे बद्ध । ऐसी कामना मुळीं नसे ।४७। आपण पाळावा गृहस्थ धर्म । तेने होय कार्य सुगम । गौडीप्रचार कर्म । सुलभ होई ॥ ४८ ॥ श्रीपाद वदले प्रभुस । आपुलियें आज्ञे लोक निंदेस । अथवा शास्त्र मर्यादेस । नगणी ॥ ४९ ॥ जाणूनि भक्त अंतरग । तयास कथिती यथायोग । विरक्ता वैराग्य भोग्यां भोग । आज्ञापिती ॥ १५० ॥ नित्यानंदास संसार । कराया लाविती गौरहर । आज्ञा मानूनि शिघार्य । पुरी सोडिली ॥ ५१ ॥ पानीं हाटीं राघव पंडीत । प्रभुभक्त विख्यात । निवासा आले तेथ । आनंदले सकळीक ॥ ५२ ॥ नित्यानंदाचा देह । गौरहर व्दितीय विग्रह । मानिती आधिक स्नेह संकीर्तनी दुणावे ॥५३॥ मागील कथेचा ठाव । घेवूनि कथितो वृत्त सर्व । अंबिका नगरीं वास्तव्य । सूर्यदास पंडित भक्ताचे ॥५४॥ नित्यानंदाचे परम भक्त । यास्तव यास्तव्य केले तेथ । स्वगृहिचे अभ्यागत । सुर्यदासे आदरिले ॥५५॥ त्यासी असती दोन कन्या । वसुधा, जान्हवी नामा । सुशिळा सकळा मान्या । असती उपवर ॥ ५६ ॥ तयांचा विवाह करावा । वर मिळावा बरवा । चिंता माय बाप जीवा । शोधिती सर्वत्र ॥ ५७ ॥ गृहिचे अतिथी नित्यानंद । पाहून वाटे आनंद । कन्या अर्पूनि विवाहबध्द । केलें राघव पंडिते ॥ ५८ ॥ दोघींचे पाणिग्रहण । नित्यानंदाशी होऊनि । मायबापे चिंतेतून । मुक्त जाहले ॥ ५९ ॥ विवाह जाहलियावरी । नित्यानंद भागिरथीतीरी । बडदाग्रामा भीतरी । वास्तव्यार्थ राहिले ॥६०॥ कालेकरुनि कुमार । वसुधेसि नाम वीरचंद्र । संप्रदाय प्रवर्तक वैष्णव वर । लोकी जाहला ॥ ६१ ॥ नित्यानंदाचा तिरोभाव । होई पश्चात वीरचंद्र वैष्णव । स्वतंत्र स्थापी सप्रदाव । परंपरा वाढली ॥६२॥ व्दितीय पत्नी जान्हवी । पवित्र सच्छील साध्वी । पतिपश्चात वाढवी । भक्तिपंथ ॥ ६३ ॥ लोकनिंदा केली श्रवण केले गृहस्थधर्म पालन । अलिप्त भावे भजन । आदर्श ठेवी ॥ ६४ ॥ गृहस्थ होवोनी उदासीन । प्रवृत्तीत निवृत्ति दर्शन दोन्ही धर्म आचरण । समन्वयाचा जोडली ॥६५॥ निताईचे आचरण । लोक निंदेस कारण । प्रभुकृपे निवारण ।

जाहले मांन्यजणी ॥ ६६ ॥ ऐसासंत महिमा वर्णिता नाही सीमा । दिनोध्दार गरिमा । अंगी वसे ॥ ६७ ॥ तयासी
करुनि नमन । चरणी ठेवी अनुसंधान । करावया चित्तशोधन । कृपा करोत ॥ ६८ ॥ संतकृपेचे फळ विनायास मिळे
तत्काळ । तेथ संसाराचा गदारोळ । नासोनी जाय ।६९। नारद अगस्ति वालिमक । महिमा तयांचा अलौकीक । संतकृपे
हिन पण नावेक । न राही वंद्यतें ॥ १७० ॥ एसे संतमहिमा । करावया वर्णन । वाणीची शक्ति होयेंक्षीण । चरणी
मस्तक ठेवितो ॥ ७१ ॥ दुष्ट आमोद्याम तारिले । नित्यानंदे उपदेशिले । गार्हस्थां आज्ञाशिले चैतण्ये ॥ ७२ ॥ पुढील
अध्यायी कथामधुर । श्रोतया सविस्तर निवेदी संत किकंट । नर्मदासुत ॥ ७३ ॥ चै. वि. ग्रंथ रसाळ । म. ली प्रसंग
सोज्जळ । अमोघ उध्दार । नित्यानंद गार्हस्थ मंगळ । उपदेश सत्ताविसायां ॥ ७४ ॥

॥ कथा कथन नाम अध्याय ( २७ ) सत्ताविसावा समाप्त ॥

ओवी संख्या १७४ एकूण संख्या ३५१९ दि. १५–७–६४ बुधवार आ० व० ७–८६

## अध्याय समाप्त

# अध्याय २८ वा

श्री गणेंशानमः ॥ श्री सरस्वत्यैनमः ॥ श्री गुरुभ्योनमः ॥ श्रीकृष्णचैतन्यायनमः ॥

नमन माझे गौरिनंदना । एकदंता गजवदना । विघ्ननाशना । शारदा रमणा धुम्रवर्णा विनायका ॥ १ ॥ तुझिये कृपे लाभे बुद्धि । तैसी ऋद्धि सिद्धि । भक्तिचे निजडधी । मेधावी होय ॥ २ ॥ विनवी तुजलागुन । द्यावे जी बुद्धि ज्ञान । जेणें होय काव्य स्फुरण । तुझिये कृपे ॥ ३ ॥ मेघःशाम, राजीव नयन । योगी, संताचें आयतन । भक्तिचेनि समाधान पावतीं चित्तीं ॥४॥ तुझिया नामांचा आनंद । संतासीं परमानंद । तुच्छ वाटे संसार छंद । आनंदकंद सेविता ।५। सकल संसार व्यथा । पळे दुर सर्वथा । भावे तव नाम घेंतां । संतोष होये ।६। यास्तव संतचरित्र गान । गौरांग प्रभु चैतन्य करिता प्रकटे चैतन्य । शरीरी ।७। नीलाचलीं प्रभु वास्तव्य । सकला जाहलें हितावह । गौडीय भक्त सर्व । आनंदले ।८। महाप्रभु भंगवंत ऐसी भावना ठेविती सतत । गाती नाचती प्रेमांत । कीर्तनीं अग्रणी अद्वैत ।९। कीर्तनीं गौर संकीर्तन । त्यावरी पद्य करून कीर्तन समयीं गान । होत असे ।१०। मधुर कीर्तन ध्वनि । श्रवणीं ये त्यास्थानीं । येती गौर आनंदूनि माघारा ११ आपुल्या नामाचे किर्तन । प्रभुसि कैसे होई मान्य । श्रीवास पंडिता लागून । क्रोधे वदले ॥ १२ ॥ किर्तनिय श्रीहरि व्यर्थ शिणविता वैखरी । मम अपकिर्ती भारी । होई जनी ॥ १३ ॥ भगवदगुण किर्तन । हेचि खरे अधिष्टान । जित्या मानवाचे स्तवन । कारण पतना ॥ १४॥ या श्लोकी अपयश । परस्त्री पाप भागी विशेष । पारखा होयईश । मजलागी ॥ १५ ॥ तै येती गौडिय भक्त । धरूनि प्रभुदर्शन हेत । चैतन्य नामे जय करित । घोष नाथासहित हो ॥ १६ ॥ तै बोले श्रीवास । आपुली आज्ञा मानु खास । परि जगाचे मुखास । स्तब्ध कैसे करावे ॥१७॥ श्रीवास ऐसे वदता । प्रभु स्विकारिती स्तब्धता । निताई गौर नामे जनता । किर्तन करि ॥ १८ ॥ कोणाचा ईश्वर भाव । कोणाचा पितृभाव । ऐसा भक्त स्वभाव । पूज्यमानी ॥१९ ॥ शचिमाता रेवेरत दामोदर पंडीत । एके समयीं पुरीत । भेटावया गौराते ॥२०॥ मातेचा कुशल समाचार । पुशिला वदले गौर । कृष्ण भक्तीत विभोर । माता राही कैसी वेदा ॥ २१ ॥ श्रवणी क्रुध्द पंडीत । स्पष्ट वदले गौरांगप्रत । आपले कथन आनुचित । माते विषयी ॥ २२॥ आपुलें ठाईं कृष्ण भक्ति

मातृ प्रेमाचे स्मरण करिता । होती सद्गद ॥ २४ ॥ गौरहर वचन । आपुलें सत्य कथन मातृ भक्तिचें ज्ञान । कळणे अशक्य ईतरा ॥२५॥ आपण मातेसी यथार्थ । जानलें असे निश्चित । माझीयें कृष्ण भक्ति अंकुरित । मातेचेनी ॥२६॥ ऐसी प्रेममय जननी । त्यजलें आलो या स्थानी । वदुनी अश्रु नयनीं । घळघळा येती ॥ २७ ॥ कठिन दामोधर वचन । नमानुनिया गौण । प्रशंसिति तयालागून । निर्मळ मन गौराचे ॥ २८ ॥ जयासीं सचल जगन्नाथ । मानूनि पुजितीं भक्त । त्यासी कठोर वदे पंडित शांती न ढळे ॥ २९ ॥ सार्वभौम भट्टाचार्य । विव्दत्ते गाढ प्रचुर । पंडिता माजी गौरवपात्र । अध्यापनीं कुशल ॥ ३० ॥ प्रकाशानंद सरस्वति । काशिपुरी वास करीतीं । वेदानी उत्तम गती । प्रकांडपंडित ॥३१॥ सार्वभौम भट्टाचार्य अलौलिक प्रतिभा पंडितवर । गौर चरणाधार । मानुनि भाविती ॥ ३२ ॥ गौर साक्षात ईश्वर । मानींती स्वये आचार्य प्रकाशनंदा कळें प्रकार । कुतुहल वाटले ॥ ३३ ॥ अवस्था युवक संन्यासि । चित्त तनु दिले तयासि । वेंदांत ज्ञान निष्ठेसि तुच्छ मानिले ॥ ३४ ॥ याचे मानुनि कुतुहल । वृत्तित उठला कल्लोळ । कौतुकवशे श्लोक सरळ भक्तासवे धाडिला ॥ ३२ ॥

श्लोक– यत्रास्ते मणिकर्णिका मलहरी स्वर्दिविका दीर्घीका ॥ रत्नं तारकमोक्षदं मृततनौ शंभु स्वयं यच्छति ॥

एतत्वब्दुतमेव यत सुरपुरान्निर्वाण मार्गास्थितान ॥ मुढोज्यत्र मरीचिकासु पशुवत प्रत्याशया धावती ॥

या श्लोकीं ज्ञान प्राधान्य । मोक्ष, पुरुषार्थ प्राप्तव्य लक्षण । प्राप्ति तयाची ध्येय जाणून । प्रयत्न करी, संकेत हा ॥३३॥ जेथ कुंड मणिकर्णिका । पवित्र भागीरथी स्वर्दीधिका । पापताप हरण ठेका । घेतला जीवाचा ॥ ३७ ॥ मृत्युसमयीं मंत्र तारक । स्वये शूलपाणी देई देख । मृत तनूचा उद्धार चोख । जन्म घेणें टळे पुन्हां ॥ ३८ ॥ ऐसे परम पावन काशीक्षेत्र । मोक्ष मार्गी असे स्थिर । त्यजूनि पुण्य देवनगर । भ्रमण करिती अन्यत्र ॥ ३९ ॥ त्यासी म्हणावें मूढजन भूवरी भ्रमती पशुसमान । दुर्गतीचें ऐसें चिन्ह । तया ठायीं ॥४०॥ श्लोकबद्ध पत्र घेऊन । प्रभूसि देतीं भक्तजन । यती नांवें पत्र देखून । प्रसन्नले ॥४१॥ केलें पत्रक वाचन । आशय मनी जाणून । स्मित हास्य वदन । जिज्ञासा वाढवी ॥४२॥ पत्राचें केलें स्पष्टीकरण । केलें स्वामीचे स्तवन । उत्तरार्थ श्लोक रचून । भक्तासवें धाडिला ॥ ४३ ॥

श्लोक धर्माम्भो मनकर्णिका भगवतः पादाम्बु भागिरथी । काशीनाम्पतिरर्द्ध मेव भजते श्रीविश्वनाथः स्वयम् ॥

एतस्यैव हि नाम शंभुनगरे निरस्तारकं तारकं । तस्मात्कृष्ण पदाम्बुजं भज सखे ! श्रीपादनिर्वाणदम् ।।

भजती विस्वनाथ जयां ।४४।। धर्मापासूनि मणिकर्णिका । पादाबुपासोनि गंगा देखा । काशीपति अर्धांग स्वाभाविक । समर्थ होई जीव हा ।। ४५ ।। ऐसा मोक्ष जयाचें नाम काशीपुरींत । तारक असे निश्चित । भवसागरी करी मुक्त । ऐशा श्लोकबद्ध पत्रासी दायक कृष्णचंद्र । तयाचा चरणाधार । असतां चिंतन विचार । कां न होई तुम्हाते ।। ४६ ।। दिधले काशीत यतीसी । पत्र पठने अवस्था कैसी । झाली, जाणें एकला ।। ४७ ।। पुन्हां यति करी विचार । एक श्लोकीं धाडिले उत्तर । भर्तृहरि शतक शृंगार । श्लोक लिहिला ।। ४८ ।।

श्लोक :– विश्वमित्र पराशरप्रभृतयो वाता मयुमर्णाशिना स्तेऽपि स्त्रिमुख पक्ङजं सुललित दृष्टैव मोह गता: ।।
शाल्यन्न सघृत पयोदाधियुत भुग्जन्तिबे मानवा : तेषमिंद्रीय निग्रहो यदी भवेद विन्ध्यस्तरेत सागरम: ।।

नित्य कथि श्लोक भावार्थ । विश्वमित्र प ाशरादिख्यात । वाताबु पर्णाशन युक्त । श्रीमुख दर्शनें मोहिले ।। ४९ ।। प्रभुचे प्रेमी जीवन करिती सुग्रास भोजन । त्याची इद्रिये स्वाधिन । विंध्याद्रि समुद्र तरण । संभव जाणावा ।। ५० ।। यतिधर्मोलंघन । प्रसाद भक्षणी होय भक्ति भाव पुर्ण । प्रसाद भक्षण गोडि जाणून । कठिणोत्तर योजिले।। ५१ ।। प्रभुसंबद्ध जाणून । ऐसे प्रेशिले यतिने । पत्रोत्तर ।। ५२ ।। उत्तम पदार्थ भक्षण । इंद्रिय निग्रह असंभव जाणून । विरक्त भावे गौर देती दुष्ट अनुमान । अजाणता केले ।। ५३ ।। पत्र वाचिले सविस्तर । लज्जा वाट निर्विकार । वदलें गौर पत्र स्वरुपासी ।। ५४ ।। क्रुध्द स्वरुप वदे वचन । याचे उत्तर तत्काळ देईन । उत्तराचे नसे कारण । सरळ ।। ५५ ।। गाळीस गाळीप्रदान । टाळीती विवेकी सज्जन । गाळी प्रदानाचे श्रवण । तेथ मौन असावे ।। ५६ ।। भावे वचन । श्रवणे स्वस्थ भक्तजन । परी पाठविला श्लोक लिहून प्रभु । अपरोक्ष ।। ५७ ।।

श्लोक– सिंहोबली व्दिरदशुकरमास भोजी सवत्सरेण कुरुते रतिमेकवारम् ।।
पारावतस्तृण शिखाकण म त्र भोगी कामी भवेदनुदिन वद कोऽत्रहेतु ।।

करुनि करी मास भक्षण । वनराज राही सयमपुर्ण । वर्षाती एकदा विषयसेवन । खाद्यबाधा तया नसे ।। ५८ ।। याचें [illegible] परी नित्य कामचिंतन । कामी अन्य नसे तुजा ।। ५९ ।। [illegible]

भक्षण कारण । समयी नसे जाण । अवश्य विवेक ज्ञान । सयमी सर्वथा ॥ ६० ॥ श्लोक षाडिका अर्थपुर्ण । यति हो लज्जायमान । पुनरपि पत्रकारण नरेचि ॥ ६१ ॥ ऐसा निर्मळ स्वभाव । प्रभुचा असे सदैव । भक्ताचे अंतर सर्व जाणोनि करिती ॥ ६२ ॥ दक्षिण यात्रा झालयावरी । वास्तव्य पुरी माझारी । करिती वर्षे चत्वारीं । गौरहर ।६३॥ प्रतिवर्षी वृंदावनी । जावे हा विचार मनी । आराध्य देवतेस भेटोनी सेवनी काल घालवावा ॥ ६४ ॥ सार्वभौम रामानंद यांनी केले प्रेमबध्द । प्रभु राहती स्तब्ध । भक्त प्रेमे रुंधले ॥६३ ॥ मनी उबळे वासना । जावे त्वरे वृंदावना मिळे भक्तानुज्ञा । संतोषले ॥ ६६ ॥ विजयादशमो शुभदिन । प्रभाति समुद्र स्नान । करूनि नाथ दर्शन । माला प्रसाद घेतला ॥ ६७ ॥ भगवदाज्ञा घेऊन । केले भोवती प्रदक्षिण । कटकमार्गे जाती निघोन । भक्तासमेत ॥ ६८ ॥ गौडिय उडिया भावतजन । प्रभुसवे करिती गमन । नेत्र अश्रुपुर्ण । सात्वन करिती भक्ताचे ॥ ६९ ॥ भक्तास देती आलिंगन । मार्ग क्रमिला मज लागून । जावे आता परतोन । भेटि देई पुढती तुम्हा ॥ ७० ॥ प्रभु वियोग जन्यदुःख स्मरता वाटे तिख । रोदन करिती भाविक । सकलाहि ॥ ७१ ॥ मार्ग क्रमिता भवानी पुरी केला निवास विचार रामानंद वाणिनाथ बंधुवर । आणिती सेवेप्रसाद ॥ ७२ ॥ भक्तासवे प्रसाद ग्रहण । केला तेथ केले शयन प्रभाती मार्गी क्षेत्रपावन । भुवनेश्वरीं ॥ ७३ ॥ दर्शन घेऊनि चैतन्य । जाती करटीं गोपाल भगवान । मंदिरी केले संकिर्तन भक्तासवे ॥ ७४ ॥ स्वप्नेश्वर व्दिज सदनी । भक्तासवे भिक्षा स्वीकारुन । बकुळ वृक्षातळीं आसनी । पहूडले । ७५ । कटक रावा कळे वृत । दर्शना पातला त्वरीत । सेवके केला सांगात । सत्काराया ॥ ७६ ॥ प्रतापरुद्र हर्षे दर्शन घेई अश्रुपुर्ण नयन । चैतन्मे दिधले मान्यवर । कुशल तोषविले ॥ ७७ ॥ पुढिल यात्रेचे मुक्काम । प्रभुचे व्हावे सुगम भोजनादि साहित्य प्रकाम । राय योजिले ॥ ७८ ॥ चैतन्य व्हावे सिमापार । मंत्रिवश्य दिधले मान्यवर । आज्ञा घेऊनि नृपवर । नगरा पातला ॥ ७९ ॥ प्रशांत निशासमय । चंद्र प्रकाश निरामय । यासमयी यात्रा निश्चय । केला मार्ग क्रमिला ॥ ८० ॥ संगे चाले भक्तगण । व्हावया प्रभु दर्शन । राजपत्न्या सर्व गमन । वैभवे करिती ॥ ८१ ॥ गाठीती चित्रोत्पला नईतीर । झाले सरिता पार । ग्रामीं येति चतुरव्दार । रजनी तेथ घालविली ॥ ८२ ॥ ज्यास्थानाहुनि पैलपार । जाहले गौरहर । स्तुप बांधिला मनोहर स्मृति चिन्ह त्यास्थानी ॥ ८३ ॥ सरिता तटी बांधिला घाट जाहले

तीर्थ चोखट । स्नानादि कर्म बोभाट । यात्रस्थ करिती ॥ ८४ ॥ गदाधर पंडित नामक । क्षेत्र संन्यासि प्रभुसेवक गोपीनाथ मंदिरी पुजन । प्रभु आज्ञे राहिला ॥८५॥ क्षेत्र संन्यासी म्हणजे कोण । त्याचे स्पष्ट विवरण गृहसंसारत्यजून निवास राहि क्षेत्रात ॥८६॥ काहि करुनि प्रतिज्ञा । नित्य नियम पालन तो क्षेत्र संन्यासी जाण ।शास्त्री निरपिला ॥ ८७ ॥ या संकल्पे करूनि । पुरुषोत्तम क्षेत्रीं राहुनि । पंडित गदाधर सेवनीं । असती रत ॥ ८८ ॥ पुरीहूनि गौंरहर यात्रार्थ निघाले दुरवर । जाणवे विरह थोर । गदाधरां ॥ ८९ ॥ सर्वसंग परित्याग । करुनि धरी यात्रा मार्ग । प्रभुचरणीं अनुराग म्हणोनियां ॥ ९० ॥ चैतन्यें समजाविलें बहुत । ते न मानी पंडित रोष वदे प्रेम जनित प्रभुसी पंडीत ।९१॥ मज का करिता विवश । आपण जावे यात्रेस । मी न राही संगतीस । मातेस भेटाया जातसें ॥ ९२ ॥ माझा मार्ग गमानाचां । प्रतिबंध कोण करी कैचा ऐसे ।वदूनि यात्रेचा । मार्ग क्रमिला स्वतंत्र ९३। कटक ग्रामी होई संधी । प्रेमें गौरहर बोधी । कैची ऐसी तव बुद्धि । मम आज्ञा उल्लंघिसी ॥९४॥ तुझियागमनाचीं पापे । त्याचीं ऐक स्वरुपे । देवपूजा राही आपोआप । दुजयां प्रतिज्ञा भंग हो ।९५। यास्तव फिरावे माघारा । मी शीघ्र परते गदाधरा । बोल मानी अंतरा । दुःख न हो ॥ ९६॥ नयनीं प्रेमाश्रु पुर । वाहे बोले गदाधर । सर्वस्व त्यजी चरणावर । प्रतिज्ञा भंग कैचा तै ॥९७॥ आपुल्या साठीं प्रतिज्ञा केलीं । निलाचल, जैं तनु आपुली । मज पृथकत्व कदाकाळी । बाधा न पवे ॥ ९८ ॥ प्रभु वदले वचन तू दोष मुक्त जाण । पापाचें भारी वजन । मम मस्तकीं यें ॥ ९९ ॥ मी दोषी पापी बनावें । तुज वाटे हे बरवे । तरी मज सांगाते यावें । अथवा परतावें पुरीसी ॥ १०० ॥ गदाधर बोले वचन । सारे पाप मस्तकीं साहीन । परी वियोग न होई सहन । उपाय काय ॥ १ ॥ गौराचें कठोंर वचन । माझें मन व्हावें प्रसन्न । तरी शीघ्र जावे परतोन । नातरी कष्ट अपार ॥ २ ॥ इतुके झालिया संभाषण । गाढ प्रेमें आलिंगन । देता पडे मृच्छा येऊन । गदाधर ॥ ३ ॥ समय जाणूनि गौर । वदले हो भट्टाचार्य । सांगाते न्यावा गदाधर । श्रीपुरी ॥ ४ ॥ अत्यंत दुःखें वचन । मानुनि धरिलें श्रीचरण । प्रेमें देऊनि आलिंगन । मार्गस्थ जाहले ॥ ५ ॥ त्वरें पातलें या पुरां । परतविलें कटक मंत्रिवरा । निशीं कीर्तन पहारा । ग्रामीं जाहला ॥ ६ ॥ तेथूनि रेमुणा ग्रामीं वास । आज्ञा आत्मानंदा परतावयास । तेणें दुःख

प्रताप रायाची आज्ञा । प्रतिस्थानीं सकल योजना । ना यें सत्कारी उणेपणा । आज्ञा सेंवकां ॥ ९ ॥ भक्तासवें गौरहर करिती कीर्तन प्रचार । मातेचिया दर्शनेच्छा अपार । उपजे मनीं ॥ १० ॥ मातेचा दुःखद विचार । मनीं येई निरंतर तेणें चित्तीं दुःख थोर । होय आतुरता भेंटीची ॥ ११ ॥ मातृ दर्शनीं विव्हळ । चैतन्य प्रभु प्रेमळ । जाती सवे भक्त मंडळ । नवद्वीपीं ॥ १२ ॥ ते चरित्र रसाळ । पुटील अध्यायीं सोज्वळ । अवधान द्याजी सकळ । मजलागीं ॥ १३ ॥ चै. वि. ग्रंथ रसाळ । म. लीं प्रसंग सोंज्वळ । प्रकाशानंद पत्र व्यवहार मंगळ । वृंदावन यात्राकथन अठ्ठावीसाविया ॥

इति श्री कथन नाम अध्याय अठ्ठावीसावा (२८) समाप्त

ओ. सं. ११४ एकुण सं. ३६३३ दि-१७--७--६४ शुक्रवार

# अध्याय समाप्त

# अध्याय २९ वा

श्रीं गणेशाय नमः ॥ श्री सरस्वत्यै नमः ॥ श्री गुरुभ्यो नमः ॥ श्रीकृष्ण चैतन्याय नमः ॥ नमन माझें जगज्जनी । तू शिवाची अर्धांगिनी । लक्ष्मी, सीता, रूख्मिणी, । गौरविती ॥ १ ॥ तु असे ईश शक्ति । तुझेंचेनि अहंस्फूर्ति । तेणें जगदोत्पत्ति । निश्चयेंसी ॥ २ ॥ तुझिये सहाय्येविण । न होई जगत् निर्माण । म्हणोनि जगताचे कारण । आदिशक्ति ॥ ३ ॥ प्रकृतिविण पुरुष । मायेविण ईश । शिवाविण महेश । जगतसुत्र न चले ॥ ४ ॥ म्हणोनि हे जननीं । तुझिया कृपेवाचोनी । न राही अनुदिनीं । याचितों ॥ ५ ॥ तू धरोनियां चालवीं हातीं । तरीच मज होय गति । यास्तव तुजप्रति । माते ! नमितो ॥ ६ ॥ चैतन्य चरित्र गान । करी मति मजलागून । द्यावी तैंचि होय कवण जननी गे ॥ ७ ॥

श्लो० – जननी जन्मभूमिश्च जान्हवीच जनार्दनः जनकः पंचमश्चैव । जकाराः पंचदुर्लभाः ॥ सु-र-भा १६३।१७० तुम्ही श्रोते सज्जन । ऐका मातेचे महिमान । मातृसेवने जनार्दन । संतुष्ट होय ॥ ८ ॥ जनक आणि जननी । जन्म भूमि, जन्हुनंदिनी । पचम जवार्दन जनीं । दुर्लभ असे ॥ ९ । तयांत मातेचें महिमान । काय करावें वर्णन । न फिटे जन्मदेचें ऋण । जन्मोजन्मीं शास्त्र हे ॥ १० ॥ बाळा पाळीं उदरीं । कष्टें सांभाळीं जन्मवरीं । सुख दुःख चिताकरी । निरपेक्ष ॥ ११ ॥ स्वीकारिला यति धर्म । पाळितां सारे नियम । माते चेऋण अनुपम । शास्त्रीं श्रेष्ठ मानिलें ॥ १२ ॥ मातेचें होतां स्मरण । विव्हळ होती चैतन्य । घ्यावया जावें दर्शन । भक्तासी कथिलें ॥ १७ ॥ प्रेममय मातृदर्शन । वरी हो गंगास्नान । जन्म भू पुण्यपावन । भक्त भेटी ॥ १४ ॥ ओरिसाप्रांत अंत्य सीमा । गंगा सकळ पापोपशमा । मानसी भक्ति अनुपमा । दर्शनें मूर्च्छा जाहली ॥ १५ ॥ गंगे ! गंगे वदोनि रूदन । केले निर्मल स्नान । करूनि गंगेचें आचमन । कंठ होय गद्गद ॥ १६ ॥ तया प्रांताचा अधिकारी । प्रभूसि योग्य सत्कारीं । राजाज्ञे सकल प्रबंध करी । श्रद्धेने ॥ १७ ॥ सेवकें केला नमस्कार । हस्त फिरविला तनुवर । आशीर्वचने सकल नोकर । हरिबोल गर्जती ॥ १८ ॥ प्रभु स्पर्श उन्मत्त । करूं लागले सकल नृत्य । ऐशी दशा झाली प्राप्त । सकल सेवकां ॥१९॥ संकीर्तन प्रभ समाचार । प्र.सवामी नार्गीनर । दर्शना पातले सत्वर । जान्हवीतीरीं ॥ २० ॥ गंगातटीं प्रशस्त घाट ।

तेथ नृत्य होय चोखट । हरिनाम ध्वनि दाट । नभीं उमटे ॥ २१ ॥ गंगापार गौड देश । सीमा तयाची निःशेष । तेथीचा यवन नरेश । तेणें गुप्तचर धाडिला ॥ २२ ॥ औरिसा, गौड देश । भिन्नराज्ज माजे द्वेष । युद्ध धोका उभयांस मार्ग सकल रोखिलें । ॥ २३ ॥ देशीं जावया मार्ग तीन । ते सारे धरिले रोखून । भयाचें मुख्यकारण । प्रतिबंध होई जावया ॥ २४ ॥ यवनराज गुप्तचर । वर्तमान कळण्या गंगापार । येतां दर्शने अपार । आनंदे नृत्य करी ॥ २५ ॥ अल्पकाळ लोटल्यावरी । हेर फिरे माघारी । प्रसन्न पाहोनि अधिकारी पृच्छा करी २६ झाला कंठ सद्गद . वाणीने नुमटे शब्द । दर्शन प्रेमस्वाद । वाचे न कळे ॥ २७ ॥ बोलू लागे गुप्तचर । क्या कहूंजी सरकार । मैंने न कभी देखा सौंदर्यावतार । पुरूषवर ऐसा था । . २८ ॥ त्याचें देखिलें शरीर मज वाटे आश्चर्य । भान गेलें अनावर । झालों शुद्धि नुरेचि । . २९ ॥ तयाच्या नेत्री जादू । वाणींत रस उन्मादु । हास्यांत मादकतेचा सिंधु । उसळे सदा ॥ ३० ॥ एकवार घ्यावे दर्शन । मानसी होय समाधान । शरीरशुद्धि संपूर्ण । जाई, चरणीं लीन हो ॥ ३ ॥ ऐसे हेर वचन । श्रवणें तुष्टला यवन । व्हावया प्रभु दर्शन । विश्वासु अमात्य धाडिला ॥ ३२ ॥ ओरीसाप्रांताधिकारी । अमात्य आला सत्वरी प्रभूसि देखोनि भरावरी । सात्विक तोष पावला ॥ ३३ ॥ तेणें कथिला समाचार । संतोषे उडिसा नरवर । तो प्रभुचा भक्त थोर । प्रशंसा करी ॥ ३४ ॥ प्रभुचें व्हावया दर्शन । यवन नृप उत्सुक जाणून । तुम्हासि देतो आश्वासन । दर्शन होई प्रभुचें ॥ ३५ ॥ घ्यावया प्रभु दर्शन । यावें एकाकी अल्पजन परी न यावे ससैन्य । मान्य व्हावे वचन हें ॥ ३६ ॥ अमात्ये मानिलें वचन । रायास कथीं जाऊन । हिंदू पोंशाख करून । राया सन्निध पातला ॥ ३७ ॥ केले चरण वंदन । न देखिलें हा यवन । दिधलें आलिंगन । भाग्य थोर रायाचें ॥ ३८ ॥ केला यथोचित सत्कार । मैत्रीचा राखिला व्यवहार । कृतार्थ मानी नृपवर । आज्ञा घेतली ॥ ३९ ॥ तै वदे मुकुंददत्त । गंगापार होणें प्रभुसी त्वरित । कांहीं प्रबंध करणें समुचित । मान्य केले सत्वरीं ॥ ४० ॥ द्वितीय दिनी नौकेतून । पार केले अमात्याने । सेवका देती प्रेमाश्वासन । पुढती मार्ग क्रमिला । ४१ ॥ नौकेमाजी संकीर्तन । मंत्रेश्वर नाल्यापार होऊन । पिछलदह ग्रामी येऊन सेवकां परतविलें ॥ ४२ ॥ सेवकां देऊनि प्रसाद । जातां वाटे बहु दुःखद । प्रभु वियोग खेद । परि प्रसादे तोषले ॥४३॥ नाव गाठं पानिहाट । गंगातटीं प्रशस्त घाट । भक्तासह विनाकष्ट । उतरले प्रभु ॥ ४४ ॥ प्रभु आगमन समाचार

श्रवणें धावलें नारीनर । मुखीं घोष गौरहर । उमटे ध्वणी नभांत ॥ ४५ ॥ निवासा राघव सदन । वास्तव्य, तेथ एक दिन । करूनि, कुमारहाटी तेथून । श्रीवास गृहीं पातलें ॥ ४६ ॥ बालका जाहला आनंद । तयें धरिले चरणारविंद परिवारां वाटें सुखद । प्रसन्नले ॥ ४७ ॥ कांचनपाडी शिवानंद । तयाचें गृही देती आनंद । वासुदेव, बंधू मुकुंद । गृह करिती पावन ॥ ४८ ॥ शांतिपुरीं अद्वैतांचार्य । तेथे येती गौरहर । श्रवणीं प्रभु समाचार । दर्शना येती भाविक ॥ ४९ ॥ आचार्य पुत्र अच्युत । करिती साष्टांग दंडवत । आलिंगिलें अद्वैत । मस्तकी कर सुताच्या ॥ ५० ॥ मातेसी कळे समाचार । आला सुत गौरहर । भेटावे सुतां सत्वर । मनिषा होय ॥ ५१ ॥ आपुलिया बैसोनि मंदिरीं । विष्णुप्रिया विचार करी । मनोवेदना होतभारी तिजलागी ५२ विरह व्यथे व्याकुळ । चित्ती उठे कल्लोळ । सारे चित्र नेत्रीं सोज्वळ दिसों लागलें ।५३। कोठें बैसणें, कैसें बोलणें । मृदु हास्य, सौम्य देखणे । दिसती वस्त्र प्रावर्णे । तंद्री लागे स्मृतीनें ।५४। जावयाची सिध्दता । करूनि निघे शचिमाता । स्नुषेसि सांगावे त्वरीत । मंदिरी ये ॥ ५५ ॥ विष्णु प्रियेसि देखून माता जाई घाबरुन । नेंत्री हालचाल बंदपुर्ण । दुःख वेदना स्पष्ट दिसे ॥ ५६ ॥ शरीर होय जडवत । जीवन चिन्ह न हो व्यक्त । माता हो भयभित । पाचारी तियेते ॥ ५७ ॥ बेटा विष्णु प्रिया । कोठे जाशी मज त्यजुनिया । योग्य वाटे यासमया । तुजलागी ॥ ५८ ॥ तो ती गेली मूर्छना । प्रिया हो सावधान । हाय ! मज गेला त्यजून । प्राणनाथ कैसे हो ॥ ५९ ॥ सत्य मज गेला त्यजून । सर्वस्व होय हरण । नाहि पीतांबर वस्त्रप्रावर्ण । मूर्छा येई ॥६० ॥ हाताचा देऊनि आधार । माता स्नुषेसी सावरी । काय झाले तुज बावरी । मी जाई शांतीपुरा । ६१ ॥ स्नुषेच्या जाणूनि वेदना स्त्रीं दुःख कळे स्त्रियांना । सावध बोले वचना । भाव गुप्त राखोनी ॥ ६२ ॥ माते मज निद्रा आली । नधरी चित्ती स्वप्नी बोलीली । भाग्य वेला पातली भेटावे तया ॥ ६३ ॥ माझें भाग्य थोर । पतिदर्शन घेती असंख्य नर । ऐसा थोर अधिकार । भार्या त्याची जाहलें ॥ ६४ ॥ चिंता न करा घ्या दर्शन । मज वाटे समाधान । ऐकूनि स्नुषा वचन विदीर्ण ह्यदय मातेचे ॥ ६३ ॥ प्रिया दुःखि पाहता । पालखी माजी बैसे माता । तियेचि अंतरव्यथा । जाणवे मनी ॥६६॥ नित्यानंद वासुदेव । चंद्रशेखर आचार्य देव । पालखी समेत भक्त सर्व । सकिर्तन करिती ॥ ६७ ॥ मातेचे कळे [illegible] चरणी मस्तक ठेविले ॥ ६८ ॥ प्रेमे दिधले अलिंगन । मस्तक केले

अवघ्राण । मुखे न ये वचन । सदगद कंठ जाहला ।६९। माते स्तविती गौरहर । तुझा अधिकार थोर । मजलागी क्षमा करी त्यजिले तुजला ।।७०।। पूत्राचे सहस्र अपराध । माता न मानी तयाचा खेद । माझे यतिपण तुज दुःखद । जाहलें ।। ७१ । मातेवरी निःसिम प्रेम । मातेसी संतोष परम । सकला मिळे भोम । प्रभु दर्शनें ।। ७२ ।। मातापूत्र समिलन माता घाली स्वये भोजन । रात्रौ जाहले संकिर्तन भक्तासह ।७३। व्दितीय दिनी मातेसी । विदा केले सकलासी । गृहि यावें कांक्षा ऐसी । माता वदे ।। ७४ ।। वचन दिधले गृहिभेटी । दूःखाची जाहली तुटी । सत्संग लाभे उठाउठी सकलाशी ।।७५।। ऐकाजी श्रोते जन । कथि तुम्हा शास्त्र वचन । शास्त्रज्ञा मानिती प्रमाण । भवार्णत तरावया ।। ७६ ।। शास्त्राचा ऐसा सिध्दांत । जे जे दिसे दृश्य जगत । ऐकांतिक तपी संत महंत । पुण्ये प्रभावीत असें हे ।।७७।। पतिव्रतांचे पातिव्रत्य । तेणें संसार राहे स्थित । तैशा धर्माधिष्ठाने सत्यं । स्थिर होय संसार ।। ७८ ।। काया वाचा मन । करी पातिव्रत्य पालन । परम धर्म तो जाणून । विषय त्यजि ।। ७९ ।। तपस्वी ईच्छि मान । ईश भक्ति प्रसिध्दी लागून परि पातिव्रत्य रक्षण । सति करि निरपेक्ष ।। ८० ।। पतिव्रते भ्रतार प्रमाण । संता असे नारायण । पुण्य पुरूषाचेपुण्य जग चालवी ।। ८१ ।। पातिव्रत्याची थोरी । पति हिन रोगी दुराचारी । ईश्वर मानी सेवा करीं । न गणवें पूण्य ।।८२ भारती सीता सावित्री । द्रौपदि अहिल्या मंदोदरी । कौशिक भार्या प्रतिष्ठान नगरीं । कुष्ठपति उध्दरी ।। ८३।। भारत कथानक अवश्य देखा अलौकिक । कुष्ठी व्यसनी अभाविक । पति सेवा करी सति ।। ८४ ।। रूग्णावस्थे कामवासना पुरवी देखना सुंदरांगणा । पत्नीसी करी आज्ञा । मतिहिन ।। ८५ ।। तयाचा न करी विचार पतिस डोई नेई दुर जेथ वारांगणेंचे घर । द्रव्य घेई सांगाते ।। ८६ ।। सुळी देति समजोनि चोर । श्रीमांडव्य ऋषिवर । परी ते योगी थोर । सुळी राहती स्वस्थचि ।। ८७ ।। सति पतिस घेऊनी जाई । त्याचि मार्गांनी काळीकुट्ट रजनी । डोळा काहि दिसेना ।। ८८ ।। स्पर्श होता कापे अंग । क्रोधे शापी लागवेंग । प्रभाति मृत्युयोग । स्पर्शकाचा ।। ८९।। ऋषिचें शाप वचन अनुतप्त जाहले व्दिजमन । जावे भार्य परतोन स्वगृहि ।।९०।। त्वरे नेंला पति आगारी । सति शुचिर्भूत पुजाकरी संकट घाली भास्करावरीं । प्रभाती न येई उदया ।। ९१ ।। मी सत्य पतिव्रता असेन । मनी अन्य पुरूष वांछिला न याचे उदया जाणुन प्रार्थी तुज ।। ९२ ।। ऐसा सतिचा महिम ।। आदित्य जाई विश्राम । व्रताचि अपार सीमा । रवी

बंधनि घातला ॥ ९३ ॥ सर्वत्र हो हाहाकार । उदया न ये भास्कर । देव करितीं विचार आश्चर्याचा ॥ ९४ ॥ पातिव्रत्य महिमा जाणुन । धाडिले अनुसये लागून आपुला पूण्य प्रभाव दावून सतीसी समजावी ॥ ९५ ॥ सतीनें प्रतिज्ञा सारिली । त्वरे प्रभात जाहली तदा मृत्यु घाला घालीं व्दिजावरीं ॥ ९६ ॥ पातिव्रत्य प्रभाव पूर्ण । अणूसया उठवि व्दिजा तूर्ण । सकल रोग हो चूर्ण । सौदर्य लाभे शरीरी ॥ ९७ ॥ देव संकट केले दुर । तेणें अनसूयें पोटी अवतार । जाहले दत्तप्रभुवर । सति प्रभावे ॥९८॥ भारती ऐशा थोर सति । कीती करावी गणती । तैसी विष्णु प्रिया पवित्र अति । सद्गुणें होय ॥ ९९ ॥ सौदर्य तैसे तारुण्य । तयावरी पति जाई त्यजून । विरह व्यथा दारुण । पतिव्रता धर्म रक्षिला ॥ १००॥ गौर भक्तांचे भगवान । करिती असंख्य जीवोध्दरण । भक्तासी साक्षात नारायण । हृदय रमन पत्नीसी । १॥ सन्निध नसे स्थूल शरिर हृदयी विराजे मूर्ती रुचिर । पतिविण अन्य विचार न करी प्रिया ॥ २ ॥ आपुले आराध दैवत । एकवार भटावे ईप्सित परी ऐसे हृग्दत । प्रगट न करी ॥ ३ ॥ अखंड मनी चिंतन । करुनि राख समाधान । माझे सत्य प्रेमजाणून । दर्शन देती सत्वर ॥४॥ ऐसे मनीं चिंतन । ब्रम्हस्वरुप शचिनंदन । जाणती सति मन । द्यावे दर्शन पत्नीसी ॥५ ॥ ऐसा करुनिया विचार । प्रभु निघाले सत्वर । शांतीपूराहुनि विद्या नगर । वाचस्पती गृही पातले ॥६॥ सार्वभौम भट्टाचार्य तयांचे वाचस्पती बंधुवर्य । भक्तांची भीड अपार । दर्शना येती ॥ ७ ॥ जनतेच्या कोलाहाले । प्रभु अति उबगले । प्रछन्नपणें । निघाले कुलियासी ।८। कुलियाग्रामीं गमन । करिता येती भक्तजन । चैतण्य देती दर्शन । सकलासी ॥९॥ पुर्वाश्रमीचे दुजन । प्रभुसी येती शरण । पश्चातापे दग्धमन । क्षमायाचिती ॥११०॥ विरोधकाचा विरोध । दुर्जनांचा तैसा क्रोध । नासे संन्यास बोध । चैतन्यांच्या ॥११॥ महाप्रभुचा त्याग । निर्मान करी प्रेमयोग । प्रभुकृपे दुर्जन मार्ग । निष्फळ जाहला ॥१२ ॥ द्रोही भागवती पंडीत । नगरी वास करित । देवानंद नामे ख्यात । शरण येथा प्रभुसी ॥ १३ ॥ तये याचिले वरदान । दिधले तयासी वचन । पुर्वापराध क्षमायाचन । करी तया कृतार्थ करी ॥१४॥ शुध्द प्रभु अंतकरण । तया कैचें अपराध स्मरण लोकोक आचरण । करिती संसारी विषेश ॥ १६ ॥ गिता माऊली वचन ।

श्लोक :– सदृश चेष्टते स्वस्याः । प्रकृतेर्ज्ञानवान पि ॥

अलिंगने अपराध क्षालन । देवानंद करी आत्मसमर्पन । ग्रामवासियां दर्शन । सप्त दिन केला निवास ॥ १७ ॥ परि एक महा सति । चिंतन करित एकांती । बैसली चित्ती प्रभु चित्ती । आर्त होय ॥ १८ ॥ पुरवावे भक्त मनोरथ । कुलियाहुनि बिदा येत । भक्त शुक्लांबर कुटोत वास्तव्य केले ॥ १९ ॥ माता येई सत्वर । देखुनि केला नमस्कार । पाहूनि मातेचा गहिवर । त्वरे गृहां निघाले ॥ १२० ॥ वृत्त आठवे स्मृती नुतन हरि बोल धून गातीजन । भक्तांनीं भरले अंगन । गौर स्थिर जाहले ॥ २१ ॥ विष्णु प्रिया प्रेममग्न । दर्शन घेई । झरोक्यांतुन । स्पर्शावे पतिचरण । मानसः हे ॥२२ ॥ सोडुनिया लोक लाज । नुरे संसार काज । सर्वस्व पतिचरण समज । मनि धरी ॥ २३ ॥ सदा राही मुक्तकेशा । भूषणे त्यागिली निशेष । घेई विरक्त वेष । आहार अल्प ॥२४॥ नित्य प्रभु चरण ध्यान । काया जाहली क्षीन । तनुवरी धवल वसन । चरणी पहूडली ॥२५॥ अधोवदन उभ चैतण्य । शीस देखिले स्पर्शे चरण । दुर सरती भयभितमन । अधर्मी तव ॥२६॥ प्रियाकरी रोदन । वदले प्रभु - तु कोन ? । करुणा स्वरे बोले वचन । दासी चरणाची ॥ २७ ॥ स्थब्ध जाहले सकलजन । पुनरपि करिती प्रश्न । हे स्त्रियें करी कथन । काय अपेक्षा तुजलागी ॥ २८ ॥ मज द्यावे कृपादान । हेच माझे वाछिमन अपुलिया । चरणाविण । अन्य व्यर्थ गमे मज ॥ २९ ॥ प्रभु करिती कथन । तुझे नाम विष्णु प्रिया जाण । नामासी सार्थकरून जिवन सफल करावे ॥ १३० ॥ संसारीं थोर विष्णु भक्ति । तीसी सार तिचि गती ॥ याविण नसे अन्यमुक्ति । सफल जिवनां ॥ ३१ ॥ प्रिया वदे वचन । आपुल्याविण विष्णु अन्य । न जाने तया लागुन । इप्सित नसे मानसी ॥ ३२ ॥ माझा विष्णु हर कृष्ण । आपुलेचि असती चरण । अश्रय नसे त्याविण । स्मरण नित्य तयाचे ॥ ३३ ॥ ऐसें ऐकुनिया वचन । सकल हृदये झाली विदीर्ण । अश्रुपुर्ण नयन । धन्य जाहली विष्णु प्रिया ॥ ३४ ॥ पुनरपि बोले वचन । म्या ऐकीले अनुदिन । आपण जगोध्दरण । करिता वृत्त सत्य हे ॥ ३५ ॥ मीच झाले अभागिनी । जगावेगळी राही अजुनी । ममउध्दार ना ये मनी ॥ कारण न कळे की ॥३६॥ प्रभु वदले तियेसी । तूं काय मज इच्छिसीं । माते जिवन घालवायासी । आधार असावा ॥ ३७ ॥ माझी ऐसी असे भीक । दरिद्री मी आपले सन्मुख । माझा पुरवा आभिलाख । संतोष व्हाया ॥ ३८ ॥ पुरवावया भक्त आस । प्रभु

सिध्द व्हावावयास । चरण पादुका प्रियेस । देवूनि केले कृतार्थ ॥ ३९ ॥ घेवूनि चरण पादुका । ठेंव नित्य सन्मुख । तेण लाभे जिवन सुख । निरंतर बोधयले ॥ १४० ॥ मस्तकी पादुका ठेवून । प्रिया निघाली तेथुन । करित चालें रुदन पूर लोटे करुनेचा ॥ ४१ ॥ समस्त करितीं स्तवन । विष्णु प्रिया भाग्यवान । पातिव्रत्य धर्म जानुन तियेस केलें कृतार्थ ॥४२ ॥ त्वरें तेथुनि चैतन्य । जावया निघति वृंदाबना । मागे धावती भक्तजन समागमे ॥ ४३ ॥ केला पत्निचा उध्दार । मातेंस विरह अपार । सन्यासधर्म निष्ठुर । तोडवी सकळ बंध ॥४४॥ यति धर्मी त्याग घोर । माया मोहसारा पसारा । सोडुनि जावे लागेपार । यति धर्मांचे फळमिळे ॥ ४५ ॥ न चाले दंभ मान । स्विकारिता वेषवस्त्र कौंपीन । परिचिती वासना अनूदिन । व्यर्थ होय ॥४६॥ जपजाप्य चितन व्हावे योगसाधन । प्रामायाम आसन । चित्त स्थिर व्हावया ॥४७॥ यतीचे नित्य सत्कर्म । तयांसी न हो पुनर्जन्म मुक्त संगे भ्रमे । प्रपचां सोहळा ॥ ४८ ॥ श्रेष्ठ तपस्वि संन्यासी । एकांकी उध्दरी जगासी । अभ्दुत शक्ति राही त्यासी । अध्यात्म योगे ॥ ४९ ॥ आचार विचार एककार । करु पाहती देशोध्दार । तो कैंचा होई सुकर । सुखालागीं ॥१५०॥ न करी तप नसे ज्ञान । श्रमाविणा मिळो धन ऐसी सर्वत्र । वासना । सत्य धर्म लोपले ॥५१॥ सत्य धर्मांचा संन्यास । अन्यायाचा हव्यास । ऐसा जनता बहुवस । सर्वत्र असे ॥५२॥ तयाचा व्हावा परिहार । भजेनित्य परमेश्वर । तोचि घवूनि अवतार । सोज्जवळ करी रसेसी ॥ ५३ ॥ मातेंसी दिधलें दर्शन । पत्निसी कृतार्थ करून । यात्रा मार्गे वृंदावन ॥ पंथे निघाले ॥५४॥ पुढिलें अध्यायी कथन श्रोती असावे सावधान । कथे व्हावे अणुसंधान । विनवी संत सेवक ॥ ५५ ॥ चै वि. ग्रंथ रसाळ । म. ली. प्रसंग सोंज्वळ । मातृ दर्शन, पत्नि उध्दार मंगळ । कथन एकूणतीससाविया ॥ ५६ ॥ कथानाम अध्याय एकुणतीसवां समाप्त ओवीं सं. १५६ एकूण सं. ३७८९ दि. २९ ७-६४ मि आषाढ शु. १० । ८६

## अध्याय समाप्त

## अध्याय 30 वा

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरूभ्योनमः श्रीकृष्ण चैतन्यायनमः । नमन माझें देवकीनंदना । भागवती कथिले वास स्थाना । तव स्वरूपे असती नाना । एकादशी वर्णिले ॥१॥ अग्नि, वैष्णव ब्राम्हण सुर्य गोमाता पंचभूते प्राणिमात्र । ही विशेष पूजना पात्र । असती कीं ॥ २ ॥ तैशापरी तीर्थ क्षेत्र । तुझिया वास्तव्ये पवित्र दर्शनिय स्थाने सर्वत्र । भारती असती ॥ ३ ॥ व्दादशी ज्योति लिंगे चारींधाम । असंख्य तीर्थे भारती परम अमरनाथ जगन्नाथ श्रीराम जनस्थनीं ॥ ४ ॥ गोकर्ण व्दारका महाबळेश्वर । सोमनाथ अयोध्या गंगासागर । मदुरा मींनाक्षी कोल्हापूर । गिरीं बालाजीं ॥ ५ ॥ पैठण सज्जनगड पंढरपूर । आळंदि जेजुरीं मातापूर । सप्तशृंग वाडीं गाणगापुर औदुंबर कृष्णातीं ॥ ६ ॥ नर्मदा तटाकी गरूडेंश्वर । शिवकांचीं विष्णुकांची पवित्र मानस प्रयाग नेपाळेश्वर । पुष्कर पितृगया चित्रकुड ॥ ७ ॥ अैशा अनंत तीर्थ स्थान कृष्ण धाम वृंदावना जावे मनकामना । चैतन्यां जाहली ॥ ८ ॥ तीर्थदर्शने समाधान । संसारी जीवा वाटे म्हणून । जाती प्रपंच सांडून । अल्पकाल ॥ ९ ॥ प्रभुचे संन्यास ग्रहण चित्तीं विरक्त पूर्ण तयासी नसे बंधन । भगवत प्रेम माणती ॥ १० ॥ आपुले ईष्ट दर्शना । जाती संगे भक्तजन त्याकथे सीं करा श्रवणा । द्यावे अवधाना सत्वरी ॥ ११ ॥ गावोगावी भिक्षान्न । ग्रामवासिया भक्ति प्रदान पावन करोनीं सकलजन । मार्ग क्रमिती ॥ १२ ॥ ऐके दिनीं घेतलें भिक्षान्न । प्रभुसि मुख शुध्दि लागे जाणून केला कर पुढतीं पाहून हरितकीं दिधली ॥ १३ ॥ गोविंदे दिधली हरितकीं । प्रभु घालतीं मुखी । शेष सन्निध रांखी । सेवक निज ॥१४॥ भिक्षान्न घेती व्दितीय दिनी । हस्त पूढे केला प्रभुनि । वस्त्रात ठेविली घोषांनी । दिधली हरितकी प्रभुसि ॥१५॥ वदले तदा शचिनंद । कोठूनि मेळविसी हो गोविंद । शेषहोती सन्निध । सेवक वदे १६ हरितकी मुखी न घालितां । दाखवूनियां गंभीरता संग्रह करितां तत्वता । साधुत्व ओसरे १७ गृहस्थासीं संग्रह भूषण । साधूसि होय दुषण । यास्तव सहवास युक्त न । वास करी येथेचि १८ तुझी संग्रह वासना । साधुत्वीं राही जाण । यास्तव स्वीकारी गृहस्थपण । अनासक्त भावें सेवक हो १९ श्रवणीं कठोर प्रभु वचन । गोविंद करी रूदन । पुष्ठीं हस्त फिरवून । दिधला आशी, भावावत हो ॥ २० ॥ स्नेहें होऊनि वशीभूत । केलेस संग्रह कृत्य । ते जाणतों सत्य । तयाची चिंता न करी ॥ २१ ॥ तुझा जाणोनि अधिकार ।

आज्ञा केली सत्वर । श्रीगोपिनाथ । सेवा करी । त्वरें व्हावें चतुर्भुज ।। २२ ।। स्वामी आज्ञा शिरीं धरी । कुटी बनवी गंगा किनारीं । विवाह केला सत्वरीं । भगवत् सेवा करांया ।। २३ ।। एक पुत्र जाहल्यावर । पत्नी सोडी कलेंवर । काले करूनि ता कुमर । प्राण त्यजि ।२४। पत्नि पुत्रशोक झाला । तेणें गोविंद दुखावला । आत्महत्येचा विचार केला । अन्न, कर्म त्यागिले ।। २५ ।। तयासी पडे स्वप्न ।। स्वप्नाभीतरीं भगवान । व्यर्थ स्वीकारिसी सेवापूजन । त्याविण राहणें मज घडे ।। २६ ।। पिता पुत्राचें करी पालन । प्रीत त्याची सर्वांसमान । मी एकलकोंडा पुत्र जाण । द्वितीय बंधू नरूचे ।। २७ ।। एक पुत्राचा पिता । तयाचा पुत्र निश्चित । द्वितीय बंधू मज नापसंत । असे तूही इच्छीना ।। २८ ।। तव पुत्र जाहला मृत । मी त्याचीं पंथे जावे त्वरित । ऐसे असेल तव वांछित । पूर्ण करी हेंतू तव ।। २९ ।। तुजे श्राद्ध पिंडदान । करावे आपुल्या हातुन । ऐसे भाविले मनीं । द्वितीय पुत्र म्हणोनी ।। ३० ।। निद्रेमाजी पडे स्वप्न । गोविंदा जाहलें समाधान । करूं लागे सेवा पूजन । भक्तिभावें ।। ३१ ।। कालें करूनि घांष । प्राण ठेवि भाग्य पुरुष । पुत्र रूपे गोपीनाथ ईश । श्राद्ध करी संतोषें ।। ३२ ।। भक्तवत्सल भगवान । जयाचें भक्तिकारण । पुत्र रूप स्वयें घेऊन श्राद्ध करीं ।। ३३ ।। उज्वल गोविंद चरित्र । म्यां दिधलें विस्तृत । राम केलीं नगरा निकट । प्रभु पातले ।। ३४ ।। पाहोनि भक्त समुदाय । आनंदला सकल गांव । ध्वनीं उमठे नभीं अतीव । भक्त नृत्य भजनाचा ।। ३५ ।। गौडदेशीचा बादशहा । नामेहुसेनशाह । हिंदुराजा सुबुद्धिराया । पदच्युत केलें ।। ३६ ।। स्वयें बैसे गादीवर । दुष्ट करी दुराचार । अविश्वासे हिंदूवर । वृत्ति ऐसीं ।। ३७ । होई हरिनाम गजर । राजया कर्णी पडे मधुर । मानसी करी विचार । शत्रु हल्ला असे हा ।। ३८ ।। यास्तव मंत्रीं पाचारिला । केशवसिंह नामे भला । जमावाचे कारण तयाला विचारिलें ।। ३९ ।। राजयाचें शंकित मन । तेणें केशव उदाशीन । करी समग्र निवेदन । बादशहासी ।। ४० ।। राजया वदला मंत्री । मनीं भय ना धरी । साधु वास्तव्य असे पुरीं । वृंदावना निघाले ।। ४१ ।। करिती वास दोनदिन । यात्रार्थ करिती प्रयाण । राज नीति प्रयोजन । विरक्तां मुळी नसे ।। ४२ ।। तयें त्यजिलें घरदार । भिक्षेंसी दारोदार । तयांचा न करा विचार । यात्रेकरु असती ते ।।४३ ।। मंत्र्याचे हे कथन । राजया न रुचे म्हणुन । पाचारी मंत्री यवन । विश्वासू जे ।। ४४ ।। शाकिर मल्लीक दबीर खास । करवी, करीं तपास । केशवसिंहें प्रभुस । गुप्त वृत्त कळविलें ।४५।

यवन नृप विश्वास । धरितां, होई कार्यनाश । त्वरें करावें देशांतरास । येदर्थी संदेह नसे ॥ ४६ ॥ विश्वासू मंत्री यवन । हिंदु धर्मासि विसरुन । गेले धर्मांतर करुन । त्रास देतीं आपणां ॥ ४७ ॥ शोध करीं दबीर खास । करी त्वरें वास्तपूस । तेणें कथिले राजयास । द्वीपीचें असती गौरांग ॥ ४८ ॥ त्यांनी घेतला संन्यास । धर्म स्तापनेचा हव्यास अवतार साक्षात ईश । आशीर्वचें होय कल्याण ॥ ४९ ॥ नृप संतोषे करी स्तुतीस । मंत्री येती गृहास । नृप मति पालटे, येता शंकेस । सन्निध येती प्रभुच्या ॥ ५० ॥ मंत्री द्वय प्रेमी बंधु । प्रभुसि निकट संबंधू । एकांत भक्त सुहृदु । शिष्य, सेवक असती ते ॥ ५१ ॥ वैष्णव समाजी रूप सनातन । ख्यात नाम दोघेजण । त्यांचा अधिकार समजून । घ्यावया कथन केले हे ॥ ५२ ॥ जे का महाधैर्य धार । भक्ति विषयीं शूर । प्रेम पीयूष पात्र । सद्भक्तीचे ॥ ५३ ॥ ते श्रीरुप सनातन । बंधू द्वय वैष्णवजन । कर्नाटकी वास स्थान । प्रपितामह पद्मनाभ ॥ ५४ ॥ कारण विशषे तेथून । नवहाठी केलें सदन । पंच पुत्र, अठरा कन्या । कनिष्ठ सुत मुकुंद ॥ ५५ ॥ मुकुंददेव सत्पूत्र । कुमारदेव सत्पात्र । वैश्यवृत्ति, उदीम व्यापार । फतेहाबादी होतसे ॥ ५६ ॥ यशोहर प्रांती फिरें सदैव । चालें तेथे बहु वेवसाव । जातीय विरोधे अतीव । सोडीं नवहट्ट कुमारदेव ॥ ५७ ॥ सोडी नवहट्ट फतेहाबादी । वस्तीस करी सुखद । हरिनारायण विशारद । मथाईपुर निवाशी ॥ ५८ ॥ तयाची कन्या रेवती । तियेसी विवाह होय पुढती । तीन सुतांची पुत्रवती । माता जाहली ॥ ५९ ॥ अमर, अनूप, संतोष । तिघे पुत्र होती विशेष । रूप सनातन ख्यातीस । येतीं वल्लभ तृतीय ॥ ६० ॥ तिघही संस्कृत पंडित । अरबी, फारशी भाषे समेत । तीव्र मेधेची प्रचीत । बाल्यीं येई सकलजनां ॥ ६१ ॥ मालाधर वसुराज मंत्री । नृप दरबारी असती । कवि, व गुणग्राही ख्याति । वंगदेशीं ॥ ६२ ॥ श्रीकृष्ण विजय ग्रंथ । रचिला बंग भाषेत । नंदनंदन कृष्णमोर प्राणनाथ । रुचे पद्म चैतन्यां ॥ ६३ ॥ ऐसे मंत्री मालाधरें । जाणूनियां पंडित प्रवर । परिचय करुनि सत्वर । दरबारी नोकर राखिलें ॥ ६४ । कुशाग्र मेधाप्रत्युत्पन्न मति । तैसी कार्यपाटव शक्ति । दरबारी विशेष ख्याति । कृपापात्र नृपाचे ॥ ६५ ॥ हुसेनशाह हो प्रसन्न । बनवी मुख्य प्रधान । सत्ता वैभव दोन । अवस्था प्राप्त जाहल्या ॥ ६६ ॥ हिंदुधर्माची तीव्रता । संसर्गेजाई ये न्यूनता । खानपानी तैशीं वेषभूषाही ॥ ६७ ॥ ब्राह्मण धर्मस्मृति । न राही ऐशीं स्थिति । नामांतही पुढतीं । रुपांतर जाहलें ॥ ६८ ॥

रूप, सनातन दोघास । शाकर मलीक दबीर खास । ऐशा ठेवी नामास । तेंचि ख्यात जाहलें ॥ ६९ ॥ गौडसमीप रामकेली नामक । नगर वसविलें सुबक । बनविले महाल सुरेख । करितीं वास बंधु द्वय ॥ ७० ॥ आचरण असे मलिन । परी वैष्णवां साधु सन्मान । पंडित, वा विद्वज्जन । गौरविती ॥ ७१ ॥ रामकेली ग्रामासन्नीध । कन्हाई नाटय शाला प्रसिद्ध । कृष्णलीला संबंध । मूर्तिरुपे दृश्य असे ॥ ७२ ॥ साधुसंग, शास्त्र चिंतन । तेणें विरक्त होय मन । द्यावे वैभव सोडून । वाटे बंधुद्वयास ॥ ७३ ॥ संपूर्ण वैभव असतां । चित्ती नसे स्वस्थता । संतपदीं देह अर्पितां । शांति लाभें, गमे मनीं ॥ ७४ ॥ ऐहिक वैभवीं तुष्ट मन । कासया कष्टती संतजन । कायावाचा मनें । ईशा सेविती ॥ ७५ ॥ ऐसा करिती विचार । धर्म प्रवृति वाढे भरपुर । ते समयी गौरहर । होतीं संकिर्तने प्रख्यात ॥७६॥ प्रभु संकीर्तन ख्याति । दुर्जनांहीं साधुत्व प्रचीती । परि समाज बंधन त्याजितीं । उद्धरण करावे तयांचें ॥७७॥ ऐशा शकेसि उत्तर । 'अपिचे त्सुदुराचारः' । या गीता वचने उद्धार । होय तयाचा ॥ ७८ ॥ अत्यंत पापीं असला । स्वींकारी अनन्य भावाला । भजे भावें भगवंताला । साधु होंय ॥ ७९ ॥ ऐसा गौरहर स्वभाव । मनं उपजे सदभाव । सर्वभूत हितकारी सदैव । जावे शरण तयासी ॥ ८० ॥ कृतकर्म प्रायचित्त । घ्यावें चित्त अनुतप्त व्दिपीं धाडिले गुप्तखत । पतितोध्दार कैसा हो ।८१। प्रभूनि देखिले पत्र । वाचुनि पाहिले समग्र त्याचे धाडिलें उत्तर । बंधूद्वया ।८२

श्लोक – परव्यसनीनारी व्यग्रापि गृहकर्मसु ॥ तमेवास्वाद यत्यना नंवसंग रसायनम ।

परपुरूष व्यसन । व्यभिचारी स्त्रीसि जाण । गृहकार्या व्यग्रमन । अतरौ चिंतन जाराचे ॥ ८३ ॥ तैसे बाहेरी राजकाज मनी न धरा लोभ लाज । परी अंतरी अधोक्षज । अखंड चित्ती ॥ ८४ ॥ ऐसा श्लोकी उपदेश । वाढे दर्शन लालसा प्रभुनी घतला संन्यास । केले वास्तव्य पुरीशी ॥ ८५ ॥ कळे परम व्याकुळ । भेटिचा समय केधवा येईल चिंतेनें मनी कल्लोळ । उठे तदा ॥ ८६ ॥ राजयाचा विश्वास त्यावर । सर्वत्र वाहती युध्द वारे । प्रांती प्रसंग दुर्धर । कदा येई न कळे ॥८७॥ ऐसा प्रसंग विकड । पुरिस जाता होय बोभाट । अशक्य होय प्रभु भेट मनी तळमळ लागली ।८८। तोचि प्रभु वृंदावनी । भक्तजन सवे घेऊनि । यात्रेस्तव जातीं येथूनीं । वृत कळले ॥ ८९ ॥ मागील कथा भागी वृत । कथन [illegible] ॥ ९० ॥ [illegible] प्रभुदर्शन । ऐसा विचार करून अंधारात

समय जाणून छंदवेशे निघाले ।९१। निद्रेंमाजी भक्तजन । बंधु येति त्यास्थानी । दाती तृण धरोनी । दिन झाले ।९२। नित्यानंद हरिदास । जागृत केले उभयास दिधलें करूनि परिचयास । प्रसन्न जाहलें बंधुभाव ।। ९३ ।। प्रभुसन्निध येत तन जाहलें पुलकित । कथिले समस्त वृत । केला प्रणिपात साष्टांग ।। ९४ ।। करिती दोघे रुदन । करावे त्वरे उध्दरण । आम्हीं हृ न दीन । आश्वाशिले बंधूना ।। ९५ ।। तुमचे श्रवणीं रूदन । हृदय होय विदीर्ण । तुम्ही भागवत सुजाण । । सुहृद जन्मोज मीचे ।। ९६ ।। व्हावया व्दयाचे दर्शन । माझे व्याकुळलें मन । येथ येण्याचे हेचि कारण अन्य अभिप्राय नसे ।। ९७ ।। आज तुमचा नुतन जन्म । जाहला त्यजा यवन नाम रुप सनातन परम । भागवतोत्तम आता तुम्ही ।।९८।। प्रभु वचनें संतोष । दोघे करिती स्तुतिस । मागील कथानुसंधानास । जोडितो येथ ।।९९।। प्रभुचा देखोनी प्रभाव । हूसेन शहा ठेवी सदभाव । कष्टापासून व्हावा बचाव मार्गी प्रबध राखिला ।। १०० ।। नृपाची भाव भावभक्ति । परि विश्वास नसे लेंच्छाप्रति । पुढति काय हो गति । जाणूनि बोलती । १ । प्रभो त्वरे जावे अन्यस्थाना निष्कंटक मार्ग असेना । युध्दवार्ता येती नाना । निर्विघ्यात्रा न होय ।। २ ।। यादुर्धर समयासी । वृंदावन यात्रामानसी अनुचित वाटें मजसी । कारण कथितो ।। ३ ।। वृंदावन यात्रा रीत । ही नसे अफाट जन सांगात । यात्रा न हो सफलीत अयुक्त वाटे मजलागीं । ।। ४ ।। तत्कालीन राष्ट्रीय स्थिती । सनातन सत्य कथिती । प्रभुसेवे तप्पर अति चिंता मनी लागली ।। ५ ।। ईकडे काय चमत्कार । कुलिया ग्रामी भक्त थोर । वृंदावना यात्रा समाचार । नृसिहानंदे ऐकिला । ६ । वृंदावन मार्ग दुष्कर । कंटकमय मार्गी कंकर । व्हावया सुकर । नकळ केले भक्ताने ।। ७ ।। प्रभुलागी लाविले ध्यान नृसिहानंद झालें मग्न । मानसव्दारा मार्ग तुर्ण बनवु लागे ।। ८ ।।ध्यानी काढिलें कंकर । कटक झुडपे अपार । काढुनि मार्ग केला सुकर । सुलभ व्हावया ।। ९ ।। पदतळी न व्हावा त्रास । मार्ग कोमल पूष्पा सरिस । बनवु लागे मानसि नृसिहजी ।। १० ।। सुर्य रश्मीचा न हो त्रास । यास्तव वृक्ष दो बाजुस । सुगंधी पुष्प सुवास । दरवळे ।। ११ ।। तुष्णा लागे श्रमांनी । उद्यानी बांधी पुष्करणीं । सुंदर जल देखोनी । संतोष व्हावा ।। १२ ।। यापरी कुलीया पासोनीं । मार्ग करी भक्तध्यानी । कानाई नाटयशाला सन्निधानीं । मार्ग त्वनें ।। १३ ।। पूढतीं सुटे भक्तजन । तो बोलें भविष्यवाणी प्रभु न जातीं वृंदावनीं । नाटयशालीं भेटि हो । १४ । कानाई पासोनीं माघारा । फीरतीं भक्तहो ध्यानीं धरा । याचा

प्रत्यय येई पुरा । मम वाणीं सत्य असे ।। १५ ।।बंधुव्दय बोलतीं उचित । भक्त सेवा वत्सलता । नृसिहवच व्हावया सत्य । लींला करितीं गौरतीं ।। १६ ।। वृंदावन मार्गी नाटचशाला । तेथ कृष्ण विलास लींला । मूर्तिरुपे पाहु न सकला त्यजिला मार्ग यात्रेचा ।। १७ ।। शांतीपुरी अव्दैत । तेथ वास्तव्य दिनसात । उपरी निलाचली त्वरींत । येंति सत्वर चैतन्य ।। १८ ।। प्रेमळ भक्तभावासाठी प्रभु करिती सत्य गोष्टी । यात्रा निश्चय शेवटीं त्यजियला ।। १९ ।। ध्यानी धरीं जों हेत । तो प्रत्यक्ष होय सत्य । ऐसा अपुर्व गौरभक्त । जगी नायकिला ।। २० ।। भक्ति सहिमा सत्य त्याची येंई प्रचित । पुढिल कथा सावचित । श्रवण करा भक्त हो । २१ । गोंविद घोषरुप सनातन । यांचे चरित केले कथन धन्य धन्य भक्तजन । प्रभुकृपा यतन जाहलें ।। २२ ।। चै. वि. ग्रंथ रसाळ म. ली, प्रसंग सोज्वळ । गोंविद रूप मना तन कथा मंगळ । कथिली अध्याय तीसाविया ।। २३ ।। सनातन कथा कथन नाम अध्याय तीसावा समाप्त

ओळी संख्या १२३ एकुण ३९१२ दि २१-७-६४ मंगळवार

अध्याय समाप्त

## अध्याय ३१ वा

श्री गणेशाय नम : । श्री सरस्वत्यै नमः । श्री गुरुभ्यो नमः । श्रीकृष्ण चैतन्याय नमः । जय जयाजीकृष्णनाथा सकलासी बुध्दीदाता ।। सर्वसाक्षी समर्था दीनानाथा नमन तुज ।। १ ।। तुझिये कृपे सामर्थ्य । ते अर्जून जानले प्राप्त तैसे जिनेंद्रियत्व । अलिप्त विषयां जाहला ।।२।। शिवास्तव केले तप । पाशुपत लाभे आपोआप । पितृ गृही स्वर्गाधिप । मोह दाविती अर्जूना । कृष्ण कृपे पृथानंदना । कामना । स्वप्नी न शिवे गमन केले ।।३।। तेथींचिया देवांगना । तयासी मोहावा हेतु धरुन । देवांगना पातल्या ।।५।। ईश्वराची ।।४ । धृव बालक अज्ञान । त्यासी नसे विषय ज्ञान । भक्तासी ।।६।। दुष्टाचे कर्म कठिण । वारांगना असता पाठी । दुष्ट विषय काय करिती । अप्सरा कैशा भुलविती । की छत्रपती शिवराज । समर्थ कृपा लाभे प्रेषिती तुकयालागुन । चित्ती हरी साठवण । माता म्हणोनी गौरवी ।। ७ ।। सहज । शत्रु जिंकी मकरध्वज । यवन माज हरविला ।।८ ।। देवा ! तवकृपा फळ । भक्तास मिळे केवळ । इतर विषयो वरळ । काय जाणे ।। ९ ।। तिचि कथा श्रवण । श्रोतया करी कथन । रघुनाथा प्रभु दर्शन कैसे चाहले ।।१०।।

श्लोक :- कान्ताकटाक्षविशिखा न लुनन्ति यस्त । चित्तं न निर्दहती कोपकृशानुरागः।
कर्षन्ति भुरिविषयाश्च न लोभपाशैः । लोकमय जयति कृत्स्नामिद सधीरः । भु. र. भां ८।१।१२

स्त्रियाचा नेत्र कटाक्ष । चित्ती न व्यथी बाटे रुक्ष । भगवंत जें अंतर्साक्ष । विषयबाधा न होय ।। ११ ।। प्रखर क्रोधाग्नितताप । चित्त न करी समाप । ईश्वर प्रेम अमूप । अंतरी जयां ।।१०।। दृढ विषय लोभ पाश । त्यासी न करी विवश । संसारी भाग तुल्य विष । मानी तृणवत ।।१३।। ऐसा जो धीर पुरुष । सत्य जिंकी त्रैलोक्यास । भगवंताचा वास । चित्ताजया ।। १४ ।। ऐसा भाग्य पुरुष । महात्मा रघुनाथ दास । काम क्रोध केले वश । जय चरित परिसाते ।। १५ ।। हुगळी जिल्हांतर्गत तिस विघा । स्थानका लगन । सरस्वती तीरी वसत सप्त ग्राम । नामजें ।।१६।। सप्त ग्राम नगरांतर्गत । श्रीकृष्ण ग्राम विख्यात । बंधुद्वय वास करित । हिरण्य गोवर्धनदास हे ।। १७ ।। कार्यस्थळ कुलो जन्न । मुजुमदार उपनाम धनाढ्य दोघे परम लौकरीं गाजे सर्वत्र ।। १८ ।। ईश्वर भाव सात्विक वृत्ति । सत्कारी अभ्यागत अतिथी ।। ज्ञानी वैदीक अश्चित असती । संन्निधी ।। १९ ।। धनिक पुरोहित बलराम । सदनी हरिदास

महात्मा । यति गौरभक्त परम । वास्तव्यासी ॥ २० । हिरण्य संतती हीन । गोवर्धना एक संतान । रघुनाथ नामाभिधान । विरक्त पुत्र जन्मला ॥ २१ ॥ बालक तेजस्वी बुध्दीमान । पिता चुलत्याचा प्राण । पुरोहित गृही अध्ययना आदिती सस्कृत विद्येच्या ॥ २२ ॥ ते समया हरिदास । चातुर्मास्यत्वे येती वास्तव्यास । बलराम गृही बालकास । सहवास होई संताचा ॥ २३ ॥ हरिदासाचे सकीर्तन । अखंड जप प्रभुगुण । पडती बालक श्रवणी । व्याकुळ होई दर्शना ॥ २४ ॥ पिता अत्यंत श्रीमान । कुबेर एश्वर्य सपुर्ण । पुत्र एकला विरक्त जाणून । चिंता पितया लागली ॥ २५ ॥ पुत्रास वाटे पुरीस जावे प्रभु दर्शन घ्यावे । गुप्तपणे मार्गस्थ व्हावे । यत्न करि किति कदा ॥ २६ ॥ पिता करी विरोध । त्यासी नरूचे करी खद । सुता केला विवाह बध्द । रुपवती कन्या बघोनि ॥ २६ ॥ संसारी असोनी रघुनाथ । सदाराही विरक्त तेणें पितयाचें चित्त दुखित होय ॥ २८ ॥ वृंदावन यात्रा मार्गात । शांतीपुरा गृही अव्दैत । सप्तदिन प्रभु व्यास्त व्यार्थ यती ऐसे ऐकीले ॥ २९ ॥ पित्राज्ञा त्वरे घेवून । रघुनाथ निघे दर्शना । सत्वर येई परतोन । कथिले तयासी ॥ ३० ॥ पुत्र घेई संन्यास । याचें भय पितयास । संगे भेजी दहावीस । हितकारी ॥ ३१ ॥ प्रभु दर्शने आनंदून । केले सांष्टांग नमन । चित्ता होय समाधान । कृपणा ठेवा सांपडे ॥ ३२ ॥ रघुनाथ तुझे वेडेपण । बाधा करी तुजलागून । गृहीं जाई स्थिर होऊन । बंधन न मनीं तयाचें ॥ ३३ ॥ दुःखद वाटे संसार । अनासक्तीने व्हावे पार । मर्कट वैराग्य करी बेजार । करीं नित्य हरिस्मरण ॥ ३४ ॥ लौकिक व्यवहार करून । अंतरी अनासक्त राहून परमार्थी दृढ मन । सतत असावें ॥ ३५ ॥ जोंवरी राही ममत्व । तोंवरी संसारी वाटें सत्व । तो व्हावा पूर्ण निःसत्व । विरक्त असावें अंतरीं ॥ ३६ ॥ ममत्व तेथ दुःख । ते त्यागितां होय सुख । धन स्त्री कुटुंब लौकिक । देहात्मभाव विसरावा ॥ ३७ ॥ मर्कट वैराग्य प्रकार । दुःख होतां मन अस्थिर । क्षणिक विरक्ति नसे स्थिर । निषेध होई सर्वत्र ॥ ३८ ॥ म्हणोनि वैराग्य स्थिर । हृदयीं धरी विश्वंभर । भक्ति तपे हो विषय दूर । स्वीकारीं बा गृहाश्रम ॥ ३९ ॥ मी जाईन वृंदावनी । पुन्हा येईन परतोनी । पुरीस भेटी तैंदिनी । वचन मानी सत्य हें ॥ ४० ॥ प्रभुवाक्य करोनीं श्रवण । शांतिपुरी राही सात दिन । प्रभू सेवा करून । सप्तग्रामी परतला ॥ ४१ ॥ माधवेंद्रपुरी पुण्यतिथ । प्रभुसि राहविती अद्वैत । नवदिन पर्यन्त । शांतिपुरी राहिलें ॥ ४२ ॥ शचिमाता भेटे पुत्रासी । आपुल्या हस्ते भिक्षेसी ।

करीत असे गौरासी । भक्त घेती दर्शन ॥ ४३ ॥ गौरीदास पंडित । कालना गांवीं वसत । महान प्रभुभक्त । येई भेटाया ॥ ४४ ॥ प्रभु भेटीत धरी चरण । मागें तयां वरदान । निताई, निमाई बंधू दोन । वास करी ममगृही ॥ ४५ ॥ प्रभु वदले वचना । प्रतिमारूपे तव सदना । राही निश्चित जाण । गौरी पावे संतोष ॥ ४६ ॥ तेणें प्रतिमा दोन्हीं । स्थापिल्या आपुले सदनीं । आदिमूर्ति मानिती जनीं । नित्यानंद, गौरांग ॥ ४७ ॥ परतले शांतिपुरा । बोळविलें भक्तवरां । जावया नाथपुरा । सत्वर निघालें ॥ ४८ ॥ प्रेमी भक्त रघुनाथ । प्रपंची असोनि विरक्त । तयाचे श्राविता चरित । विरक्ति ये ॥ ४९ ॥ शांतिपुराहूनि जगन्नाथ । पुरींत येती दर्शन घेत । कंठ होय सद्‌गदित । प्रेमे स्तविती ॥ ५० ॥ नाथ प्रसाद घेऊन । प्रभु पातलें स्वस्थानीं । दर्शना येती भक्तजन । कुशळ वृत्त कथियलें ॥ ५१ ॥ यात्रेविण आगमन । प्रभुवदले विनोद वचन । गदाधर शांपतीक्ष्ण । मजलागीं जाहला ॥ ५२ ॥ त्यजिले त्यासी केले गमन । यावे लागे परतोन । गदाधर बोलें, वचन । कारण काय यात्रेचे ॥ ५३ ॥ आसन तेथ वृंदावन । मनीं हेतू लोकशिक्षण लीलेस्तस भ्रमण । करिता भक्त भावार्थ ॥ ५४ ॥ प्रभु कथिती वर्तमान । श्रीरूप सनातन । बंधु द्वय वैष्णव सुजन प्रेम भाजन ईशाचे ॥ ५५ ॥ करीत असतां राजकाज । ईश्वरी प्रेम सहज । भक्ती करिती निर्लज्ज । उदासीन संसारी ॥ ५६ ॥ ते करिती सत्य कथना । एकाकी जावे वृंदावना । संगे मेळावा उचितना । यातना अपार यात्रेत ॥ ५७ ॥ तेंचि म्या धरिले मनी । एकले जावे वृंदावनी । तै राय रामानंदानीं । प्रभुसी विनविले ॥ ५८ ॥ वर्षाकाल सन्निधी । रथ यात्रेसी नसे अवधी । सारूनि चातुर्मास्य उपाधीं । सहज साधे हे । ५९ ॥ साथ देती भक्तजन । प्रभुसी जाहले मान्य । पुढती गाठी वृंदावन । पर्जन्य काल लोटतां ॥ ६० ॥ सरला पर्जन्य काल । यात्रा महोत्सव जाहला । शरदाचा आनंद पातला । सृष्टिदेवी प्रसन्नली ॥ ६१ ॥ प्रभु निघाले एकाकी । संगे न घेती भक्तापैकी । ऐका स्वामी गोष्ट निकी । स्वरूप बोलें सद्‌गद ॥ ६२ ॥ एकाकी जाणें वृंदावनीं । हें असत्य होय मनीं । आम्हां संगे घेऊनि । जावे, मान्य होईना ॥ ६३ ॥ परी यांतून निवडा एक । आपुला होई सेवक । सकल सेवा करी नावेक । संतोष वाटे आम्हांसी ॥ ६४ ॥ होता भक्त नूतन । प्रेमळ ब्राह्मण कुलीन । प्रभुचरणी अनुदिन । ठेंवी मन बलभद्र ॥ ६५ ॥ तयासी केलें निश्चित । त्यानें करावा सांगात । सारे प्रसन्न चित्त । चिंता वारली म्हणोनी ॥ ६६ ॥ रात्रीचा प्रशांत

समय । गाढ निद्रे समुदाय । दर्शन घेऊन चैतन्य । अनुज्ञा घेती यात्रेसी ॥ ६७ ॥ संगे घेऊनि भट्टाचार्य । उषःकाळी
निघाले गौरहर । निद्रेत भक्त इतर । त्वरें मार्ग धरियेला ॥ ६८ ॥ जेथ जेथ जैसा आहार । तो तो घेती गौरहर
भिक्षान्न कदान्न फलाहार । मार्गी मिळे ॥ ६९ ॥ हरीतकीच्या तुकडयासाठी । संग्रहाचीं घडे गोष्टी भक्त गोपीनाथ
कष्टी । मार्गी त्यजिला ॥ ७० ॥ परी येंथ वलभद्र । क्वचित अन्न संग्रह करी । अयुक्त न मानिती गौर । लोक
विलक्षण परी हा ॥ ७१ ॥ लोकोत्तर पुरूष चित्त । लोक विलक्षण असे सत्य । जाणावया मनोगत । समर्थ कोण असे
जगीं ॥ ७२ ॥ सुलभ मार्ग त्यजून । प्रभु वरिती कानग । इतर खंडवन गहन । जाती तेथून उभयता ॥ ७३ ॥
विद्यमान, आटगढ, ठेकानळ । संबलपूर, लहारा, अंगुळ । छोटा नागपूर, संथाळी । सरगुजा पहाड झारखंड ॥ ७४ ॥
श्रीकृष्ण नामे उन्मत । गहन कानन आक्रमित । हिंस्त्र पशु मार्गांत । भावावेशात नकळे ॥ ७५ ॥ भट्टाचार्य मनी भेव
मार्गी न होई उपद्रव । मार्ग सोडूनि जाती सर्व । आपुल्या स्थानी ॥ ७६ ॥ भयानक व्याघ्र मार्गात । सुखें होता
निद्रिस्त । त्यावर पाय पडे अकस्मात् । भयभीत हो वळभद्र ॥ ७७ ॥ भावावेशे कृष्ण कृष्ण । मुखें चाले भजन ।
व्याघ्र नाचे क्रौर्य सोडून । बोले कृष्ण कृष्ण मुखें ॥ ७८ ॥ जलाशयीं करिती स्नान । गजयूथ करि जलपान । कृष्ण
बोला म्हणून । सिंचिलें जल तयावरी ॥ ७९ ॥ बलभद्रे दृश्य पाहून । गजमुखीं कृष्ण कृष्ण । नाचती समयीं प्रेमानें ।
चकित जाहला ॥ ८० ॥ मार्गी जाता संकीर्तनीं । मधुरध्वनी पडे कर्णी । मृगांगनां सन्निधानीं । धावत येती सप्रेमें
मृग शरीरी हस्त । फिरविती तेणें आनंदित । हिंसा वृत्ती त्यजी समस्त । सवें चाले पशुगण ॥ ८२ ॥ तें समयी श्लोक
भागवत । मार्गी मुखे बोलत । वृंदावन स्मृति उद्दीपित्त । होई गौर प्रभुसि ॥ ८३ ॥ बोला हो कृष्ण कृष्ण । पशु
करिती नर्तन । परस्पर वेती आलिंगन । मुख चुंबिती सप्रेमें ॥ ८४ ॥ ईश्वर नाम प्रभाव । पशु विस्मरे द्वेषभाव ।
दृश्य पाहूनि जन समुदाय । आश्चर्य करी ॥ ८५ । वृक्षलता होती प्रफुल्लित । श्रवणीं पडें नामामृत । मयुरादि पक्षीं
समस्त । नृत्य करिती ॥ ८६ ॥ मनी करिती विचार । आम्हीं दुर्दैवी अपार । मुखीं भजन प्रकार । न ये कदां ॥ ८७ ॥
ऐसी ईश्वरकरणी । आम्हा न दिली तेणें वाणी । भगवंताच्या नामस्मरणी । वेचितो अनुदिन सानंदे ॥ ८८ ॥ पशु
[illegible] तैसा विचार । परी लोकीं भाग्यहीन नर । जो न करी संकीर्तन गजर । वाणी निर्भर असता ॥ ८९ ॥ संत

तुलसी वचन । जो नवरी भगवद्भजन । तयाची जीभ दर्दुर समान । शब्दसंधान निष्फळ ।९०। हरि कथा न पडे श्रवणी । अहिभवन कर्ण दोन्ही । भगवद्रूप न पाही नयनी ।। मयूर पंख नेत्र जाणावें ।। ९१ ।। देवासी न करी नमस्कार । ते जाणावे शव शरीर । व्यर्थ वाहिला उदरी भार । मातेनें ।। ९२ ।। समस्त झार खंड कानन । जड तैसें चेतन । आल्पवित होई गौर प्रेमानें । भक्तिमहात्म म्हणोनी ।। ९४ ।। स्थलोस्थली ग्रामवासी । प्रेमें करितीं आतिथ्यासी । प्रेम भक्ति देऊन तयासी । वैष्णव करिती ।। ९५ ।। संतमहिमा जाणून । होती तत्काळ वैष्णव जन । गौरहर दर्शन कारण होय ।। ९६ ।। झारखंड मार्गी जाता । होई प्रभुचीं भावावस्था । वन वृंदावन वाटे चिंतां ।। पर्वत भासे गोवर्धन ।। ९७ ।। नदी भासे यमुना । करावे वाटे स्नाना । सर्वत्र कृष्ण भोग्य उपकरणा । पाहूनि, व्रजभावे उद्दीपित ।। ९८ ।। पथी शाक मूळ, फल चयन । करूनि बलभद्र वन्य व्यंजन । तयार करी घाली भोजन । शचिनंदन तृप्त होत ।। ९९ ।। पथीं त्रिकाळ स्नान । अग्निद्वारां शीत निवारण । संगे अल्पसे अन्न । करूनि घेई सेवक ।। १०० ।। पहाड मार्ग दुष्कर । प्रभुसवे एक बळभद्र । ईश्वर नामाचा सततधार । निर्भय होती ।। १ ।। मार्गी असतां जात । गावोगांवी जना उद्धारित । अविमुक्त क्षेत्र वाराणशीत । गौरहर पातले ।। २ ।। मनकर्णिका घाटीं स्नान । बैसले स्वस्थ आसनी तों तपनमिश्र त्यास्थानीं । अवचित ये ।। २ ।। मागील वृत्त स्मरण । मार्गी भेटला ब्राह्मण । त्यासी नामोपदेशून । काशीक्षेत्रीं घाडिला ।। ३ ।। तो द्विज मिश्रतपन । त्यानें देखिले प्रभुचरण । संन्यास दिक्षा पाहून । चरण वंदिलें ।। ४ ।। करूं लागे रुदन । दिधले तया आलिंगन । केले कुशल प्रश्न । सांत्वन केले तयाचें ।। ५ ।। गद्‌गद कंठे बोले द्विज । प्रभो कृतार्थ केले मज । भाग्य माझे उदेले सहज । देव दुर्लभ दर्शनें ।। ६ ।। कृपा करा मजवर । पावन करा माझें घर निवास करा वांछा तोंवर । प्रार्थी निरंतर चरणासी ।। ७ ।। आपण भक्तवत्सल । मी दीन दास कंगाल । आपुलोया प्रसादे कुल । धन्य होय ।। प्रार्थना मान्य करून । द्विजासवें केले गमन । प्रथम घेतलें दर्शन । विश्वनाथाचें ९ भो भो काशी विश्वनाथा । या पुरीचा तूंचि नियंता । वैष्णवाग्रणी तूं तत्त्वता । नमो तुज सांष्टांग ।। १० ।। जन्ममृत्यू आवा गमन । तुझेनि मिटे हे प्रमाण । तारक मंत्राचे श्रवण । मृत्यू समयीं कर्णी पडे ।। ११ ।। काशीक्षेत्रीं मृत्यू येता जन्ममृत्यू, कैची वार्ता । तारक मंत्र श्रवणी पडता मुक्तता जीव जंतूसी ।। १२ ।। उत्पत्ति स्थिति संहार । कारण

तूंचि विश्वेश्वर । तुझेनि सिद्ध योगेश्वर । ईप्सित फल पावतो ॥ १३ ॥ तुझा वेष अमंगल । परी तूं सदाचा मंगल । दास्यत्व करी तुझे काल ॥ जगन्नाथ तूंचि ॥ १४ ॥ तूं योगियांचे मूळपीठ । तुझेनि योगमार्ग चोखट । आकळती करूनि कष्ट । अष्टांग साधने ॥ १५ ॥ तूं योग्यासी योगगम्य । ज्ञानियां ज्ञानगम्य । प्रपक्षासी सुगम । भक्तालागीं आशुतोष ॥ १६ ॥ तूं असासी योगीश्वर । रामनाम तुजसी आधार । जें सदाचें विषहर । समाधान दे ॥ १७ ॥ कलीमाजी रामनाम । सकलासीं होय सुगम । धालती चित्त संभ्रम । जीवा अनुपम मुक्तोसी ॥ १८ ॥ रामनाम महामंत्र । जपतां सुखी सकलत्र । नामीं शक्ति अद्भुत । तुझेनि जगा फावली ॥ १९ ॥ रामनामे कंठ शीतल । उमेसी कथिला महिमा सकल । संशय निवृत्ती, चित्त निर्मळ । होई पार्वतींचे ॥ १२० ॥ नमिला प्रार्थूनि विश्वनाथ । जो सांब भोलानाथ । बिंदु माधव दर्शन त्वरित । घेंऊनि आले सदनासी ॥ २१ ॥ अर्घ्यपाद्यादि पूजन । धूप, दीप नैवेद्य समर्पण । भावे करी मिश्रतपन । समाधान पावे ॥ २२ ॥ तीर्थं चरणीचें सिंचन । पवित्र करीं सदन । करूनि प्रसाद भक्षण । करी पाद संवाहन ॥ २३ ॥ तपनमिश्र सुपुत । नामे रघुनाथ । सेवा करि अहोरात । मनो-भावित जाणोनि ॥ २४ ॥ वंगीय चंद्रशेखर । वैद्य, तैसा ग्रंथकार । जीवन निर्वाह त्यावर । नित्य चालवी ॥ २५ ॥ द्वीपी प्रभु दर्शन । जाहलें होते काले करुन । त्याचें होई स्मरण । प्रशंसी, मिश्रासी ॥ २६ ॥ तेणें घेऊनि गौरदर्शन । भिक्षेसी दिधले आमंत्रण । यापरी क्षेत्री दशदिन । भक्तां तोषविलें ॥ २७ ॥ क्षेत्रीं महाराष्ट्रीय ब्राह्मण । नित्या घेंई प्रभु दर्शन । प्रभुभाव, संकीर्तन । निवेदी प्रकाशानंद यतीसी ॥ २८ ॥ यति विषयी सद्भाव । म्हणोनी कथी नृत्य अदभूत भाव । उपेक्षा करी यतिराव । अव्दैत वादी म्हणोनी ॥ २९ ॥ प्रभु नृत्य संकिर्तन । माया लीलेसी कारण मायावादी दोषारोपण । करिती सर्व विषयी ॥ ३० ॥ प्रभु भक्ती भाव जाणून । त्याचे करिती उपेक्षण । वरी होती उदासीन । श्रेष्ट यति गुरु म्हणोंनिया ॥ ३१ ॥ भक्तास वाटे अनुचित । प्रभुसि कथिला वृतांत । प्रभु तयासी समजावीत । वारंवार तेधवा ॥ ३२ ॥ श्रीकृष्ण चरणापराध । करिती मायावादी प्रसिध्द कृष्णनामे वाणी सद्गद मुळी न होय तयाची ॥ ३३ ॥ त्याकारणे ब्रम्ह आत्मा चैतन्य । इत्यादि शद्ब उच्चारण । करिती अव्दैत अनुदिन । नाम रूप वस्तुतः एकचि ॥ ३४ ॥ संसारी प्रकृति भिन्न भिन्न । विविध वृत्तीचे जन । ईश्वर कृपा जयापूर्ण । प्रभु प्रेम प्राप्ती

तयासी ॥ ३५ ॥ आपणास अन्याचे कारण । नसे कांहि करोत आचरण । आपण करावा प्रयत्न । प्रभु प्रसाद व्हावया ॥ ३६ ॥ मार्ग श्रेयकर परम । न करी तयासि दुर्गम । आपण करावा नित्य नेम । जीवन सार्थक व्हावया ॥ ३७ ॥ यापरी कथिले स्पष्ट । भक्त जाहला संतुष्ट । कृतार्थ केला स्थली ईष्ट । जावया निघाले ॥ ३८ ॥ क्षेत्री आले प्रयागराज । जो भारताचा तीर्थराज । स्नानें देह पावन सहज । महातम जयाचे ॥ ३९ ॥ बिंदु माधव त्रिवेणी संगम । भरव्दाजमुनी आश्रम । अक्षयवर श्रेष्ट परम । जन्म मृत्यु चुकती ॥४० ॥ तेथ वास तीन दिन । सकलाचे घेती दर्शन । कालिंदी देखोनि अवधान । सुटले तदा ॥ ४१ ॥ कालिंदी वर्ण कृष्ण । ते स्वरूप भासे कृष्ण । भाववेशे व्याकुळ होऊन । उडी घेता ॥ ४२ ॥ त्वरे प्रवेशीं बलभद्र । प्रभुंसि काढि जलाबाहेर । गग्दद कंठे वदती स्तोत्र । शुद्धी येई त्यावेळा ॥ ४३ ॥ श्रीकृष्ण प्रेम वितरण । कृतार्थ केले सकल जन । करूनि लोकोध्दरण । मथुरा क्षत्री पातलें ॥ ४४ ॥ श्रीधाम मथुरेसी नमन । केले विश्राम घाटी स्नान । व्रजभूचे पावन रजकण । देखता प्रेमाविष्ट जाहलें ॥ ४५ ॥ आर्द्रवस्त्रे करिती नृत्य । जनास वाटे अदभूत । मंत्रमुग्ध आश्चय चकीत । निरखिती एकटक ॥ ४६ ॥ जमलें तेथ सकल जन । मुखे बोलती कृष्ण कृष्ण । विसरूनिया देहभान । उन्मत होती नृत्यात ॥ ४७ ॥ यया अध्यायी कथन । रघुनाथा दिधलें दर्शन । काशीक्षेत्री मिश्रतपन । उध्दरण केलें तयाचे ॥ ४८ ॥ स्वये असता शुद्ध चित्त । तिर्थग योगी निर्मळ होत । वैर विसरे परस्परांत । केलें ग्रथित कथांतरी ।४९। पुढील अध्यायी कथन । करी यात्रा वृदावन । उन्नत दशा होऊन । कृष्ण कृष्ण वेड लागें तया ॥ ५० ॥ श्री चैतन्य वि ग्रंथ म ली प्रसंग सोज्वळ । रघुनाथ चरित तपन उध्दरण मंगळ । यात्रा भ्रमण । एकतिसाविया ॥ १५१ ॥ समाप्त ओ. सं १५१ दि २२-७-६४

# अध्याय समाप्त

# अध्याय ३२ वा

श्री गणेशाय नमः ।। श्री सरस्वत्यै नमः ।। श्री गुरूभ्योनमः ।। श्री कृष्णचैतन्याय नमः ।। जयजय वा कृष्णनाथा । तव अवतार परी अनंता । तीर्थ, क्षेत्र, ग्रंथ संता । रूपे अवतरसी ।। १ ।। तीर्थमिषें भगवद्भाव वाढे लौकीकीं सदैव । ग्रथ, संत, लीला लाघव । करिसी निरवयव असोनी ।। २ ।। संत मिषें हो अवतार । तेणें ग्रंथ संभार । भगवद्गुण लीला अपार । उद्धरिती जनां ।। ३ ।। संत करिती दीनोद्धार । ग्रंथ देती भक्तिसार । तरूणी नेई ससार । निष्ठेचिय ।। ४ ।। ज्ञानबोध व्हावा ग्रंथ । भक्ति प्रचारार्थ पंथ । हेंचि ईश्वर मनोगत । अवतार कार्यी । ५ । असतां सप्रदाय बधन । निष्ठा वाढवी अधिक जाण । परी तेथ होतां अभिमान । अवमान ईशाचा ।। ६ ।। संप्रदाय परम पावन । निष्ठे करावे ईश सेवन । तनु भगवदार्पण । तेणें जनार्दन तुष्ट हो ।। ७ ।। वल्लभ संप्रदायाचार्य । त्यांचें चरित कथी सत्वर । प्रेम लक्षण भक्तिथोर । भक्तां दावियली ।। ८ ।। त्याचें चरित कथन । करी जना पावन । श्रोते करा श्रवण । अवधान देऊनि ।। ९ ।। मागील अध्यायी कथन । जनांचे चाले कीर्तन । वैष्णव द्विज देहभान । विस्मरे, नृत्य करी तदा ।। १० ।। रोमांचित जाहलें शरीर । अष्टसात्त्विक भाव तींव्र । उदय पावती तनुवर । जाहले गौर प्रसन्न ।। ११ ।। तयासवें करिती नर्तन । उभया होय समाधान । समाप्त झालिया संकीर्तन । पृच्छा केली द्विजासी ।। १२ ।। ऐसा प्रेमनिधी अद्भुत । महाभाव कोठे जाहला प्राप्त । दीनभानें द्विज कथित । सविस्तर ।। १३ ।। जगन्नाथ प्रेमावतार । माधवेंद्रपुरी महाराज थोर । त्यांचिये कृपे सविस्तर । मंत्र दीक्षा मज मिळे ।। १४ ।। तेचि माझे दीक्षा गुरू । त्यांचिया कृपे माझा उद्धारू । अल्प प्रेमाचा मीं किंकरू । फल लाभलो ।। १५ ।। तो सनोढिया विप्रवर त्यासी करिती नमस्कार । भय कंपित वदे, अनर्थकर । कृत्य अनुचित वाटे कीं ।। १६ ।। आपण असतां संन्यासी । मज प्रणाम चरणासी । तेणें अधिकारीं पापासी । कासया करिता ।। १७ ।। गृहस्थासी पूजनीय । चतुर्थाश्रमी यतिवर्य । वंदनीय, माननीय । आश्रम गुरू गृहस्थाचे ।। १८ ।। गद्गद कंठें गौरहर । वदले हे विप्रवर । संकीर्तनीं ऐसा प्रेमभर । संभवे महाराज विख्यात ।। १९ ।। भक्तीचें उगमस्थान । असतीं माधवेंद्र भगवान । त्यांच्या शिष्याचा शिष्य जाणा ।

करवूनि गौरवी ॥ २१ ॥ भजन दोषे तो पतित । यति न घेती भोजन तेथ । सनोढिया कुळ पाळीत । होतें त्यासमयाला ॥ २२ ॥ परी श्रीमाधवेंद्रपुरीचा । शिष्य जाहला प्रेमाचा । तयें बनविल्या अन्नाचा । स्वीकार केला २३ पुरी करीती जेथ भोजन । तो पुरुष असाधारण । जाति कुल बंधन । भक्तां न शिवे ॥ २४ ॥ त्याचें करुनि अनुकरण प्रभु करिती भोजन । महापुरुष, गुरुजन । मानावे सभान्य तयासीं ॥ २५ ॥ सत्पुरूष व्यवहार । तो जाणावा सदाचार हा वैष्णवांच आचार । कृतीनें बोधिला ॥ २६ ॥ जो वैष्णव प्रखर । विरक्त, भक्ति प्रेम अपार । व्यवहारीं निरपेक्ष विचार । पारमार्थीक दृष्ट चा ॥ २७ ॥ परी न सोडी धर्म बंधन । करी सदाचार ग्रहण । श्रुतिस्मृति मानी प्रमाण । मार्ग दावी जनासी ॥ २८ ॥ प्रभुवचनें जाहला संतुष्ट । संतसेवा केली यथेष्ट । संगे घेतला मार्गात । प्रसन्न चित्त व्दित हो ॥ २९ ॥ श्रीकृष्ण जन्म स्थान । घेति आदि केशव दर्शन । चोविस घाटीं केले स्नान । नामाभिधानें परियेसा ॥ ३० ॥ अविमुक्त, अधिरुढ घाट । गुप्त तीर्थ धृवघाट । प्रयाग तीर्थ गोकर्ण घाट । कनखल तीर्थ । तिंदुक ॥३१॥ वटस्वामी, सुर्यतीर्थ, । ऋषि तीर्थ मोक्षतीर्थ । कृष्णगंगा, बोधतीर्थ । चतु:सामुद्री कुप तो ॥ ३२ ॥ वैकुंठ घाट, असिकुंड, रंगस्थल । याज्ञिक विप्रस्थान, अकूट, मंचस्थल । कुन्जाकूप द्रशाश्वमेध विमल । मल्लयुध्द स्यलचोवीस ॥ ३३ ॥ चोवीस घाटीं करूनि स्नान । स्वयंभु विश्राम घाट स्थान । दिर्घ विष्णु भुतेश्वर गोकर्ण । महाविद्या दर्शन तीर्थाचे ॥ ३४ ॥ व्रतमंडलाची व्दादशवनें । तेथ विप्रासवे भ्रमणें । केली कृष्णलीला स्थायी दर्शने घेऊनि संतुष्ट जाहलें ॥३६ ॥ मथुरेहूनि मधुवन । तालवन, कुमुदवर । वहुला वनादिवन । सकल देखिलें ॥ ३७ ॥ प्रभुचें लीलास्थान । नामे वृंदावन जें स्थान त्रैलोक्य पावन । शचीनंदन आले सानंदे ॥ ३८ ॥ पवित्र व्रज भूमि परिसर । देखतां तुष्टले गौरहर । व्रजधूलि लाविती अंगभर । परमानंद सुख पावले ॥ ३९ ॥ व्रजभूंतील पावन तीर्थे । काले करुनि होती लुप्त । प्रकट व्हावे ऐसा हेंत । धरुनि भक्त पाठविले ॥ ४० ॥ भूगर्भ, पंडित, लोकनाथ । गोस्वामी, येतौ व्रजभूंत । क्षेत्र तीर्थ । जीर्णोद्धारार्थ । द्वीपाहुनि येतीं ॥ ४१ ॥ घेतीं प्रभु संन्यास । कळे नृत्तांत भक्तास । दर्शनार्थ दर्शनार्थ दक्षिणेस । व्रजभूस त्यजूनि निघालें । ४२ ॥ गौरहर आले वृंदाबनी । भक्त नसती व्रजस्थानी । स्वये तीर्थे प्रकटवोनि । उद्धरणीं तत्पर जाहले व्रजभूत नंदनंद । करी अरिष्टासुराचा वध । तेचि आरिठ ग्राम प्रसिद्ध । करिती तेथ गमनातें ॥ ४४ ॥ पुराणीं

राधाकुंड तीर्थ । वसे व्रजभूमींत । जनतेसी पृच्छा करित । शोध न लागे तयाचा ॥ ४५ ॥ चैतन्य होतीं ध्यानमग्न । ध्यानीं राधाकुंड शोधन । करुनियां तेथ स्नान । माहात्म्य स्वयें वर्णिले ॥ ४६ ॥ तैं पासूनि राधाकुंड तीर्थ । तैसें, शामकुंड विख्यात । गौरहरे केले पुनीत । प्रकट केले ते स्थान ॥ ४७ ॥ तेथूनि कुसुम सरोवर । गोवर्धन गिरिवर । पाहतां पुलकित शरीर । साष्टांग नमिलें ॥ ४८ ॥ शास्त्रीं गोवर्धन पर्वत । श्रीकृष्णाचा देह समस्त । अभिन्न तनु जाणून त्याते । श्रीहरिदेव दर्शन घेतले ॥ ४९ ॥ ब्रह्मकुंडो केलें स्नान । तेथ घेतलें भिक्षान्न । श्री गोपाल दर्शन घ्यावे मनी भाविले ॥ ५० ॥ श्री गोवर्धन पर्वतावर । गोपाल भगवान मंदिर । स्थापित पुरी माधवेंद्र । व्हावे दर्शन मानसीं ॥ ५१ ॥ श्रीकृष्ण विग्रह गोवर्धन । त्यावरी जावे घ्यावे दर्शन । न होई प्रभु मन । कारण विग्रह कृष्णाचा । ॥ ५२ ॥ परी दर्शनी तळमळ । भक्तास्तव देव गोपाळ । प्रेमें गाठी भूतल । कारण यवनांचा उत्पात ॥ ५३ ॥ दुष्ट, विध्वंसक तुर्क सेना । तेथ येई मुर्तिभंजना । भयहो व्रजवासी जनां । सवें नेती गोपाळ ॥ ५४ ॥ अन्नकुट ग्रामाहून । म्लेछ भय करूनि बहाणा । गाठौली ग्रामीं नंदनंदन । यती, अर्चन गुप्त हो ॥ ५५ ॥ गोवर्धन पर्वतातळीं । ग्राम वसे गाठौली । घेऊनि व्रजवासी गोवळी । गोपाळास राहिलें ॥ ५६ ॥ मजसी द्यावया दर्शन । गोपाल आले पर्वत उतरुन । प्रभु जाती आनंदून । घेती दर्शन सप्रेमे ॥ ५७ ॥ प्रभातीं मानसीं गंगास्नान । गोवर्धनासी प्रदक्षिणा । सप्तकोश परिभ्रमणा । पुर्ण केली ॥ ५८ ॥ बलभद्र, साधु ब्राह्मण । त्यांचेसह शचिनंदन । गोविंद कुंडी आले श्रमून । विश्राम केला ॥ ५९ ॥ गाठौलीत मनमोहन । दर्शन, नृत्य स्तोत्रें स्तवन । करिती वास तीन दिन । सानंदे ॥ ६० ॥ शेषशायो नंदीश्वर । लक्ष्मी पावन सरोवर । खेलातीर्थ वन भांडीर । भद्रवन गोकुळीं पातले ॥ ६१ ॥ लोहवन, महावन । कृष्ण लीला स्थल दर्शन । घेऊनि, मथुरेसी प्रयाण । केले, वास द्विजगृहीं ॥ ६२ ॥ अल्प दिन केला वास । जनांचा न व्हावा त्रास । शकुर घाटीं निवास । एकांत सेविला ॥ ६३ ॥ दर्शना जाती विविधस्थली । चीरघाटी इमली वृक्षातळीं । जप संख्या पूर्ण माध्यान्ह काळीं । होई कीर्तन सतत ॥ ६४ ॥ वृंदावनीं प्रस्कंधक्षेत्र । द्वादशादित्य, कालीह्रद, कोशीतीर्थ । रासस्थली पुण्यतीर्थं । दर्शन घेती ॥ ६५ ॥ अक्रुरतीर्थीं एकातवास । कीर्तन चाले अहर्निश । रजपुत क्षत्रिय कृष्णदास गृही उदास प्रपंची ॥ ६६ ॥ तेणें त्यागिले सदन । गौरास येई शरण । त्यावरी केलें कृपादान । प्रभुसन्निध राहिला

॥ ६७ ॥ निशा समयी एकेदिनी । वार्ता पसरे वृंदावनी । कृष्ण कालियां डोही प्रकटोनी । मस्तकीं नृत्य करी ॥ ६८ ॥ ऐसी पसरे लोकवार्ता । त्याचि पंथे धावे जनता । परी तेथ धीवर होता । भक्ष शोधीत ॥ ६९ ॥ कालिया डोहीं नौकेवरी । दीप ठेवूनि मत्सा धरी । ते दृश्य दिसे दुरवरी । नागफणीं कृष्ण नाचे ॥ ७० ॥ नाव कालिया नाग । शिरी दीप, मणि उरग । कृष्ण धीवर वाटे सांग । ग्रामवासी भ्रमांत ॥ ७१ ॥ वार्ता सारी भ्रमयुक्त । परी त्यांत एक सत्य । कृष्ण रूप आविर्भूत । गौरहर जाहले ॥ ७२ ॥ कलियुगीं कैचे पुण्य । प्रभु हेचि जाणतीं कृष्ण । तयाते ओळखावया ज्ञान । भक्तिविना कैचें । ७३ ॥ कृष्ण पहावया धावे जन । आपण जावे पहावा कृष्ण । ऐसें बलभद्रे इच्छून । कळवीं प्रभुतें ॥ ७४ ॥ मजला द्यावी आज्ञा । कृष्ण पहावा वाटे मना । तयाची दृढ भावना । वदले तया ७५ बलभद्र तूं महापंडित । तुज कैसें वाटे सत्य । मुर्खत्व पडे पदरों अवचित । चित्त भ्रम दूर करी ॥ ७६ ॥ हा करील कलिकाल । भेकस दृश्य जन सकळ । कुपीं उडीं घेई तत्काळ । एकां मागून एकसरी ॥ ७७ ॥ कलिकाळीं ईश दर्शन ही नार्ता नसे साधारण । सकलांस दिसे भगवान । हे कठिण जाणिजे ॥ ७८ ॥ जो करी ईश्वर भजन । तन, मन प्रभुसि अर्पण । तोचि हो भाग्यवान । ईश कृपा पूर्ण तयासी ॥ ७९ ॥ तयां भगवदर्शन लाभ । नित्य करी जप सुलभ चित्ती ईश्वराविण क्षोभ । होई तोचि अधिकारी ॥ ८० ॥ ऐकूनि चैतन्य बोध । बलभद्र जाहला स्तब्ध । जावयाचा सोडी छंद । वार्ता परिसा ॥ ८१ ॥ निशा समयीं देखिला प्रकार । ह्रदीं होता धीवर । तेथ न दिसे मुरहर । तेणें निराशा जाहली ॥ ८२ ॥ प्रभातीं सकळ वृत्तांत । निवेदिला यथोचित । होता तेजस्वी पंडीत । कथन करी चैतन्या ॥ ८३ ॥ वदलें तयालागून । आपणास जाहले कृष्ण दर्शन । पंडित करी नमन । विनम्र बोले ॥ ८४ ॥ जाहलें सृष्टि दर्शन । परी येथ साक्षात भगवान । सन्यास वेषे आम्हालागुन । उद्धाराया पातला ॥ ८५ ॥ सन्निध तयाचे आसन जाणतो आम्हीं हाचि कृष्ण । बोल करितां श्रवण । चरणीं लागती चैतन्य ॥ ८६ ॥ सप्रेमे करिती रोदन । महानुभाव आपण । चराचरीं देखतां भगवान । निष्ठापूर्ण दिसतसा ॥ ८७ ॥ आपुली निष्ठा अद्भुत । ईश प्राप्ती जाहली निश्चित । तेंणें विश्वीं भगवंत । देखतां ॥ ८८ ॥ द्विजाची करूनि स्तुति । प्रभु तत्व बोलती । ईश्वर, जीव, तत्व जगतीं । कदा न होय एक ॥ ८९ ॥ ईश्वर तत्त्व ज्वलंत अन्न । जीव तत्त्व अग्निकण । ईश्वर जीव एक जाण ।

ईश्वर जीव एक मानिता । अपराध होय तत्वतां । अपराध फल ये हातां । निश्चित पावे मूढपण अंगा ये ॥ ९० ॥ द्विजाचें करुनि समाधांन । सारुनि स्नान जपाध्यान । अक्रुर तीर्थी घेंती भिक्षान्न । नित्यकर्में ॥ ९२ ॥ यमदंड ॥ ९१ ॥ बलभद्र गौरहर भावावेश । यमुना जळीं करवी प्रवेश । अक्रुर कथा जाणूनि निःशेष । भद्र चित्ती आशंका ये ॥ ९३ ॥ बोले प्रभुस । येथ नसे एकांत वास । पाचारि जन भिक्षेंस । दर्शना येती यात्रेपरी ॥ ९४ ॥ आपुली दशा हो विचित्र । म्हणतो यास्तव जावे दूर । माघ संक्रांति, स्नान मकर । वाटें प्रयागी करावें ॥ ९५ ॥ गौर देती उत्तर । महाशय भट्टाचार्य । आपुल्या कृपें आजवर । पुण्य स्थलें देखिली ॥ ९६ ॥ पवित्र वृंदावन परिसर । म्यां देखिला भरपुर । जन्म सार्थक खरोखर तनु ही तुमची असे ॥ ९७ । तुम्हीं मज जिकडे न्यावे । म्या आपुले इच्छे जावें । हेचि कर्म आले स्वभावे । भक्तिभावे आपुल्या ॥ ९८ ॥ ऐसी सम्मति जाणून । बलभद्र झाला प्रसन्न । रजपूत ठाकूर, साधु ब्राह्मण । यासह निघाले प्रयागीं । ९९ ॥ मथुरेहूनि यमुनापार । होता दुःखी गौरहर । शोक विव्हळ भूवर । मुछित जाहलें ॥ १०० ॥ सावध जाहलियावरी । मार्ग क्रमिला निर्धारी । प्रयागराज तीर्थावरी सत्वर येऊ लागले ॥ १ ॥ मलयाचल सुगंध । चंदन करी इंधन सबंध । तैसा सज्जन संसर्गें अबुध । दुर्जन होय सज्जन ॥ २ ॥ येणें रीति गौर चरित । विस्तारें कथितों येथ । प्रभु अनिच्छे यमुना पार होत । अपार कष्ट मानसी ॥ ३ ॥ मार्गी जाता वृक्ष सघन विश्रामा उत्तमस्थान । देखोनि बैसले चैतन्य । अपूर्व वन शोभा दिसे ॥ ४ ॥ व्रज मंडल गोमाता । त्यापरिसरीं चरता । गोपाळ क्रीडा करितां । कृष्णलीला गाती सुस्वर ॥ ५ ॥ कोणी बासरी वाजविती । कर उभारुनि भोंवतीं । वर्तूळाकार गोप फिरती । मस्तक हालविती तालस्वरें ॥ ६ ॥ वंशीचा मधुरध्वनि । गौरहराच्या पडे कर्णी । गोपालांची क्रीडा नयनीं । पाहतां भाव जाहला ॥ ७ ॥ कंठ जाहला प्रेमें सद्गद । देहाची हरली शुद्ध बुध । व्रजलीला स्मृति उद्दीप्त । मूर्छित जाहले ते वेळा ॥ ८ ॥ तें समयीं घोडेस्वार पठाण । अवचित आले दशजन । प्रभुसि मूर्छित पाहून । संदेह जाहला मानसीं ॥ ९ ॥ साधुजवळी असे धन । त्याचे कराया अपहरण । धोतरा खावया घालून । मूर्छित केला ॥ ११० ॥ अद्भुत रुप लावण्य । आकर्षित होती पठाण । त्यांनी बंदी केले तिघेजन । कत्तल करावी म्हणोनि ॥ ११ ॥ भद्र झाले कंपायमान । यवना वदे साधु ब्राह्मण । संदेह व्यर्थ आम्हा लागून । वास्तव्य आमुचे मथुरेसी ॥ १२ ॥

ऐकूनि द्विज वचन । संतुष्ट न होती पठाण । कृष्णदास कोधून । उच्चस्वरे वदे यवना ॥ १३ ॥ तुम्हां नसे आमुची ओळख । येथीचें क्षत्रिय रजपूत लोक । शस्त्र धारी आमुचा लौकिक । युद्ध कर्म आमुचें ॥ १४ ॥ मी उठवीन आवाज योद्धे धावती सहज । प्रचित दावितो आज । श्रवणें भयभीत जाहले ॥ १५ ॥ पठाण प्रमुख बिजलीखान । त्यासवे होता मौलाना पृच्छा केली शांतमने । यति मूर्छित कासया ।१६। कृष्णदास बोले तयाप्रति । हे आमुचे गुरु असतीं । मूर्छा रोग तेणें स्थिती । जाहली ऐसी ॥ १७ ॥ प्रभु जाहले सावधान । प्रेमे करिती नर्तन । बिजलीखां वदे तयालागून । मूर्छित कैसे जाहला ॥ १८ ॥ तुमचेपाशी असले धन । त्वरे शोधावे आपण । साथी नेती हिरावून । दंड देईन त्याजला ॥ १९ ॥ गौर बोलती तयाप्रति । बाबानो ! हे माझे साथी । माझी द्वितीय तनु असतीं । ययाकारणें यात्रा घडे ।२०। व्रजमंडळ दर्शन । तैसे मथुरा वृंदावन । समस्त तीर्थ भ्रमण । यांचेनि योगे होतसे ॥ २१ ॥ मी तो भिक्षुक संन्यासी । कामिनी काचन स्पर्श मजसी । नसे, धतुरा व्यर्थ कायसी । लाभ होय ॥ २२ ॥ मज रोग कारणा । मार्गी येई मूर्छना ऐकूनि केले वंधना । पासूनि मुक्त सकल ॥ २३ ॥ पठाण मौलाना धर्म गुरू । धार्मिक संवाद लागे करूं । तयां शास्त्र चर्चा विचारू । केला, तेणें संप्तुष्ट हो ॥ २४ ॥ कुराण शरीफ आधार । क्षंतीं एक असे ईश्वर । तोचि ईश कृष्ण कलेवर । म्हणोनी भक्ति कृष्णाची ॥ २५ ॥ प्रेमपुर्ण संभाषण । संतुष्ट होय मौलाना । गेला प्रभु चरणी शरण । तेज अलौकिक पाहुनी ॥ २६ ॥ आपण साक्षात नारायण । आपुलेनि शांति पूर्ण । करा माझे उद्धरण । उपाय सांगा मजलागीं ।२७। पीरपणाचा मिथ्माभिमान । स्वस्वरुपगेलो भुलून । भव सागरी घुडे म्हणून । करा त्वरें उद्धार ॥ २८ ॥ कैसा भेंटे ईश्वर । मार्ग दावा सुकर । तुम्हावाचूनि महिवर । अन्य कोणीं नसे ॥ २९ ॥ प्रभुचे तात्त्विक वचन । हृदय शुद्ध मान शून्य । तेचि रामाचे निवास स्थान । सत्य जाणें ॥ १३० ॥ अंतर्यामीं भगवान । सकलांचे हार्द्र जाणें न ठेवी कोणी भाव छपून । नामोच्चारें प्रसन्न हो ॥ ३१ ॥ संसारी जी नामे रुपे । तीच त्याची स्वरुपे प्रचीत यावया, सोपे । दास्य भावे भजावे ॥ ३२ ॥ ऐशा बोधें, करिती संस्कार । मौलाना, नामें रामदास सत्वर । जाहला, कृष्णनाम स्मरे । बिजली खां चकित होई तै ॥ ३३ ॥ धर्म गुरू परिवर्तन । पाहूनि, खां गेला शरण । प्रेमालिंगने नर्तन । करि चित्त शुद्ध जाहलें ।३४॥ स्वधर्म त्यजूनि झाला वैष्णव । सत्संगे, कीर्तन करी सदैव । पठाणांचा उपजे भाव । सारे

वैष्णव शुद्धमति ।। ३५ ।। नामे पठाण वैष्णव होत । जाहले सर्वत्र विख्यात । बिजली खां महाभागवत । निर्मल चित्ते, ख्यात हो । ३६ । पठाणा देती प्रेमदान । सूकर क्षेत्री चौघेजण । येऊनि करिती गंगास्नान । प्रयागक्षेत्री पातले । ३७ । घेती त्रिवेणी दर्शन । उन्मत्त होती करिती किर्तन । संगे भावे येति जन । भक्ति सुधारस प्यावया ।। ३८ ।। श्रीकृष्ण गोविंद हरे मुरारे स्वरीं । हे नाथ नारायण वासुदेव वैखरी । आनंदित नरनारीं । नाचती सप्रेमे ।। ३९ ।। मागील कथानुसंधान । रामकेली ग्रामी रूप सनातन । प्रभु दर्शने विरक्तपूर्ण । जाहलें मंत्री द्वय तदा ।। १४० ।। प्रतिष्ठा, धन तिरस्कार । तुच्छ परिवार, व्यर्थ संसार । मंत्रीपद बंध घोर । वाटे, संबंध सोडिती ।। ४१ ।। रुप धाडी धन चीज वस्तूसी । भृत्यासवे फतेहाबादेसी । अर्ध धन दे द्विजासी । अल्प देई परिवारां ।। ४२ ।। दरिद्रीया वाटीं धन । दश सहस्र मोदी दुकानीं । दूत भेजी पुरीं लागून । शोध घ्याया चैतन्यां ।। ४३ ।। सनातन अवस्था दारुण । राजधानीस येई परतोन । परमार्थी राही मन । प्रपंच, राजकाज, सोडिलें ।। ४४ ।। सनातन होई अवस्थ । राजयाजा विश्वास अत्यंत । त्याग पत्र द्यावे त्वरित । नृप न स्वीकारी कदाही ।। ४५ ।। करुनि रुग्ण वहाणा । रजेची करी याचना । नृप वैद्यधाडी परीक्षणा । रुग्ण चिन्ह कांहीं न दिसे ।। ४६ ।। मनाचें रोग निदान । वैद्या कैचे कळे अनुपान हास्य करीं सनातन । उत्तर न देई वैद्यासी ।। ४७ ।। वैद्ये कथिले रायास । कांही न होय प्रकृतिस । भागवत कथा श्रवणास । बैसे मंत्री सुस्थिर ।। ४८ ।। नृप यई त्यास्थानीं । सनातन बैसला सुखासनीं । पाहू न आश्चर्य मनीं : भागवत श्रवणीं बैसला। ।।४९।। नृपाचा करुनि सत्कार । आसनीं केले तया स्थिर । चित्ता युक्त नृपवर । आजार पुसता जाहला । ५० । विमनस्क भावे सनातन । बोले नृपालागून । राजकाजी अनुत्साही मन । तेणें असमर्थ असे मी ।।५१।। मनाचे असमर्थपण । तयाचे काय कारण । कथी मज सनातना । नृपति वदे ।। ५२ ।। मी राजकाजी असमर्थ । इतुकेचि नृपा जाण सत्य । अधिक सांगणें उचित । नोहे मजलागी ।। ५३ ।। श्रवणीं ये निर्भिड उत्तर । राजा क्रोधे वदे सत्वर । तुम्हा दोघा बंधूवर । विश्वास सपूर्ण ठेविला ।। ५४ ।। सन्निध ये युद्ध प्रसंग । धोका देणें वाटे योग्य । विश्वास घात रोग । जाहला तुम्हासी ।। ५५ ।। तरीं सांभाळा आपुले काज । मी देतसे समज । रूप जाई सोडूनि मज । लोक लाज स्वर्जि तो ।। ५६ ।। नृपा करी सदा हितचिंतन । आपुले व्हावया कल्याण । वृंदावन मार्गी, अवश मन । जाई तेणें

असमर्थ ॥ ५७ ॥ निभिड उत्तरें कोधे अस्वस्थ । मजसवें येई युद्धांत । अंकित असतां काजी चित्त । नसतां बधनी कोंडीन ॥ ५८ ॥ राजया वदे सनातन । ईश्वर चरणी माझें मन । ऐकतां, नावेक वंदी करुन । त्वरे युद्धार्थ नृप निघे ॥ ५९ ॥ सनातन शरीरीं बंधन । प्रभुचरणी लागें मन । भेटी पहावे श्रीचरण । चित्त तळमळे ॥ १६० ॥ रूप मंत्र्याचा समाचार । कथितों श्रोतया सविस्तर । वृत्त कळाया गौरहर । नोकर पुरीत धाडिला ॥ ६१ ॥ त्याने आणिला वृत्तात प्रभु असती वृंदावनात । सनातन पडे वंदींत । धाडिले खत तयाप्रति ॥ ६२ ॥ भ्रांता अनूप संगे घेंवूनि । रूप जावया निघे वृंदावनीं । तें समयीं लखोटा लिहूनि । सनातनास धाडिला ॥ ६३ ॥ श्री चैतन्य प्रभु शोधास । जातसे वृंदावनास चिंता न करी मनास । मांगल्य हो प्रभु कृपे ।६४। चैतन्य कृपेचे महिमान । सुटे कारावास बंधन । संसारपाश परिपुर्ण तुटे निश्चये ॥ ६५ ॥ मोदि वाणियां दुकानीं । तुजसाठीं ठेविले धन । तयाचा उपयोग करुन । मुक्त व्हावे, यावे वृंदावनी ॥ ६६ ॥ गुप्त रुपे धाडी पत्र । मंगल करी गौरहर । लखोटा पाहता मंत्रिवर । मुक्त व्हाया धडपडे ॥ ६७ ॥ लखोटा धाडी गुप्तरूपे । संगे येई बंधू अनूप । काशीक्षेत्री जाई श्रीरुप । प्रभु दर्शन घ्यावया ॥ ६८ ॥ काशींहुनि प्रयागास । येतां, वार्ता प्रभु क्षेत्रास । जाती बिंदुमाधव दर्शनास । मेळा असंख्य जमलासे ॥ ६९ ॥ प्रभु दर्शन जाहल्यावर । गृहीं येती भिक्षे दक्षिणी विप्र । सन्निध, उद्यानी, एकांती गौर । पाहूनि बंधू द्वय भेटलें ॥ ७० ॥ करिता नमन, कृपा याचन । उभयास देती आलिंगन । श्लोकद्वारे रूप स्तवन । करी, भावपूर्ण देतसे ॥ ७१ ॥

श्लोक – नमो महावदान्याय कृष्ण प्रेमप्रदायते । कृष्णाय कृष्ण चैतन्यनाम्ने गौरत्विये नमः ॥

दाता शिरोमणी तु जाण । कृष्ण प्रेम करिसी प्रदान । गोर कान्ति श्रीकृष्ण चैतन्य । नाम, कृष्णा तुज नमीं ॥ ७२ ॥ अनुपाचा करुनि परिचय । वृत्त सनातन, कारागृही निर्भय । कथिलें, वदले चैतन्य । बंध मुक्ता बंधन नसे ॥ ७३ ॥ तुमच्या होई मीलनास । सनिध दिधाला वास । भद्र घाली भोजनास । संतोष वाटें बंधु द्वया ॥ ७४ ॥ केला पुष्टि मार्ग प्रचार । गोप वंशी म्हणूनि महिवर । प्रकटले वल्लभाचार्य । सांष्टांग नमन तयासी ॥ ७५ ॥ चैतन्य समकालिन वल्लभ संप्रदाय संस्थापन । केला, भगवद्भक्त अनन्य । प्रवर्तन केलें भक्तीचे ॥ ७६ ॥ भारद्वाज गोत्री तैत्तीरीय शारवीन । यजुर्वेदी, दक्षिणी ब्राह्मण । पूर्वज भट्ट उपाधीधारीं जाण । वेलनाट नामे कुली असे ॥ ७७ ॥ पितयाचे

नाम लक्ष्मण । माता यल्लमागारु म्हणून । आंध्रदेशी वास्तव्य स्थान । काकडवाड ग्रामाते ॥ ७८ ॥ व्योमस्तंभ पर्वत सन्निध कृष्णा नदी वाहात । तियेचे दक्षिण कुली वसत । काकुंभकर सज्ञा जया ॥ ७९ ॥ तेंचि काकरवाड नगर । वास्तव्य त्यजूनि अग्रहार । ग्रामी येती सत्वर । वासां लक्ष्मण भट्ट तें ॥ ८० ॥ सपत्निक भट्ट लक्ष्मण । यात्रेस्तव काशी गमन । हनुमान घाटी वस्ती करून । अल्पकाल ते राहिले ॥ ८१ ॥ यात्रा करुनि स्वदेशांत । भट्टसपत्निक यावया निघत । चंपारण्यी चतुर्भद्रपुरात । पत्नी प्रसूत जाहलीं ॥ ८२ ॥ पुत्राचा जातकर्म संस्कार । करुनि वसतीस काशीक्षेत्र । वैशाख कृष्ण एकादशी रात्र । जन्मशक चौदाशें ॥ ८३ ॥ नाम ठेविलें वल्लभ । जो भक्तिमार्ग दावी सुलभ संप्रदाय स्थापी स्वयंभ । ज्ञानगर्भ आचार्य जाहले ॥ ८४ ॥ पंचवर्षा अवस्थेत वल्लभ केला उपनीत । वेदशास्त्र, शिक्षण देत । वर्ष एकादश जाहले ॥ ८५ ॥ पिता होई स्वर्गस्थ । मातेसह वल्लभ स्वदेशांत । कांहीं छात्र समवेत स्वगृहीं केलें वास्तव्य ॥ ८६ ॥ विद्यानगरीं राजमभेत । पंडितासवे केला शास्त्रार्थ । आचार्य पदवी विजये प्राप्त । नृप सभें सन्मानिले पांडित्ये जाहले विख्यात । भारती निघाले यात्रार्थ । कन्या कुमारी, पंढरी क्षेत्र । सवें छात्र घेऊनि नाशिक त्र्यंबक नर्मदातट । ओंकार, उज्जैनीं सिद्धवर । महिष्मति, चैद्यपूर ग्वालेरात । अजिंक्य पत्रे मेळविली । ८९ । राजसभेमाजीं सन्मान । मथुरा, गोकुळ, वृंदावन । भक्तिमार्ग प्रकटन । केले ईश्वरानुज्ञया ॥ १९० ॥ स्वप्नीं येती भगवान । मंत्रोपदेश देती तयालागून । जयाचेनि जीव ब्रह्मपूर्ण । संबंध जोडे ॥ ९१ ॥ भगवदाज्ञेकरुन । संप्रदाय केला स्थापन । आर्त भक्त यती शरण । दीक्षा देती तयासी ॥ ९२ ॥ यात्रार्थ फिरता भारतांत । सौराष्ट्र, सिंध गुजराथ । उत्तर दक्षिणयात्रा धाम करीत । अग्रहार ग्रामी परतले ॥ ९३ ॥ अल्पकाल ग्रामीं वास । येती पंढरीक्षेत्रास । भगवदाज्ञें त्यजिले प्रथमाश्रमास । गृहस्थधर्म स्वीकारिला ॥ ९४ ॥ दीना भक्तिदान करीत । पुष्कराहूनि व्रजांत । गोवर्धनीं गोपाल मुरारी । होत प्रकट तदा ॥ ९५ ॥ त्यांची सेवा, व्हावे पूजन । माधवेंद्रपुरीं भार ठेवून । श्रीनाथ प्रेरणें मंदिर उभारुन । पुरणमल निमित्त करविला ॥ ९६ ॥ देवभट्ट नामे ब्राह्मण । लक्ष्मीकन्या सुलक्षण । तिशी पाणिग्रहण करुन । अल्पकाळ काशीत राहीले ॥ ९७ ॥ पुनरपि उत्तर यात्रा । करींत, प्रयाग संगमी यमुनातीरा । अडैल ग्रामाभीतरी । वास्तव्य केलें ॥ ९८ ॥ काशींत तीस सहस्र द्विज भोजने । घातली मातेचिये आज्ञेने । गोपाल

मंदिर गोवर्धनी । पुर्ण करी ठाकूर ॥ ९९ ॥ तयाची करुनि प्राणप्रतिष्ठा । पाचारिले संतश्रेष्ठा । प्रयागीं ज्योतिष्टोम वरिष्ठ । यज्ञ करविला ॥ २०० ॥ अलैरग्रामी जाहला गोपिनाथ । द्वितीय सुत विठ्ठलनाथ । जाहलिया प्रपंच त्यजिला समस्त । काशींत संन्यस्त जाहले ॥ १ ॥ सर्वस्वाचा केला त्याग । विरक्त जाहले टाकिलें भोग । संकीर्तनी यथासांग सत्संगीं काल घालविला ॥ २ ॥ आपुल्या शिष्य प्रशिष्यास । दाविला जीवन आदर्श । आषाढ शुक्ल तृतीयेस वैकुंठवासीं जाहले ॥ ३ ॥ महाप्रभु वल्लभ चार्य । काशी, गोकुळ, अरैल, चुनार । वास विशेष स्थाने चार । सांप्रदाय पीठे जाहली ॥ ४ ॥ आचार्य पुत्र विठ्ठलनाथ । त्यांची परंपरा विख्यात । संप्रदाय गाथा सप्त । परंपरा विद्यमान असे ॥ ५ ॥ वल्लभ संप्रदाय लक्षण । श्रीकृष्ण सेवा प्रधान । जीव ब्रह्म संबंध पुर्ण । व्हावया मंत्र उपदेशिती ॥ ६ ॥ त्या मंत्राचे तात्पर्य । अल्प करी विस्तार । श्रोतेहो मान्यवर । श्रवण करा सादर ॥ ७ ॥ गुरू सन्निध मंत्र ग्रहण । शिष्य करी श्रद्धापूर्ण । माझा रक्षक श्रीकृष्ण । आहे ऐसी भावना ॥ ८ ॥ तयाचा वियोग सहस्र वर्षे । त्रिविध तापे झालो वश । आनंदाचा पूर्ण नाश । अवस्था माझीं जाहली ॥ ९ ॥ मी गोपीजन वल्लभास्तव । देहेंद्रिय प्राणावयव । अंतःकरणाचे धर्म सर्व । स्त्री, पुत्र, गृह, कुटुंबादिक ॥ २१० ॥ वित्त आत्मा समर्पण । करितों कृष्णा तुजसीं जाण । मी तव दास संपूर्ण । ऐसा मंत्र भावार्थ ॥ ११ ॥ येणें जीव ब्रह्मसंबंध । समर्पण योगें होती बद्ध । तेणें अंतर व्हावे शुद्ध । हेतु ऐसा विशुद्ध हा ॥ १२ ॥ यास्तव अन्न, जल, वस्त्रभूषण । स्त्री धनादि वाहन । सर्वस्व करिती कृष्णार्पण । त्यावीण क्रिया न घडे ॥ १३ ॥ सर्वस्व करिती अर्पण । भगवत्प्रसाद तो जाणून । उपरा करिती ग्रहण । तात्पर्य विधान पंथाचे ॥ १४ ॥ आपणा करावे लागे ग्रहण । ते करणें भगवदर्पण । अत्यंत श्रेष्ठ भावपूर्ण । जीवन कल्याणमय होतसे ॥ १५ ॥ वल्लभ संप्रदाय कथन । अल्प केले येथं जाण । आचार्ये ग्रथ निर्मून । भक्ति तत्व समजाविलें ॥ १२ ॥ भक्ति तत्व ग्रंथ अनुपम । त्यांचेसार श्लोकीं पंचम । सिद्धांताचा अल्प उगम । चित्ती होई भाविका ॥ १७ ॥ श्रीवल्लभाचा पुष्टी संप्रदाय । निवृत्ति प्रवृत्ति मार्ग द्वय । निवृत्ति मार्ग श्रेष्ठ कष्टसय । म्हणोनीं प्रवृत्ती बोलीला ॥ १८ ॥ वर्णाश्रमानुष्टान । कर्म करावे कृष्णार्पण । हे पुष्टिमार्ग विदान आचार्य वर्णिलें ॥ १९ ॥ निवृत्ती मार्गीं संन्यास । ज्ञानी, होत परमहंस । बालोन्मत्त पिशाच्य व्यक्तीस । धारण करिती ॥ २२० ॥ चार आश्रम

क्रम साधुन । ज्ञान पुर्वक, कर्म कृष्णार्पण । करुनि प्रवृत्ति मार्गाचरण । केलें संन्यास गहण आचार्यें ॥ २१ ॥ पुष्टि संप्रदाय प्रमुख । भक्ती प्रकरणी पांचश्लोक । श्रेष्ट मानिती गौरव पूर्वक । करिती उल्लेख तयांचा ॥ २२ ॥

श्लोक :- गृहं सर्वातमनात्याजं । तच्चे त्यक्तु न शक्यते । कृष्णार्थ तत्प्रयुंजीत कृष्णोऽनर्थस्थमोचक: ॥ १ ॥

सर्वोत्तम हाचि सिद्धांत । गृह त्याग की जे त्वरित । पूर्वजन्म संस्कारे असमर्थ । वास करावा स्वगृही ॥ २३ ॥ कर्म करावे श्रीकृष्ण निमित्त । उपासनाहीं तत्प्रीत्यर्थ । कर्मे घडे पापसंचीत । नष्ट होई त्यायोगे ॥ २४ ॥ पापकर्मी घडे अनर्थ । त्यातें श्रीकृष्ण निवारी त्वरींत । अनर्थ मोचक कृष्ण सत्य । प्रथम श्लोकी विदित ॥ २५ ॥

श्लोक :- संग: सर्वांतमना त्याज्य: सचेत्तनक्तुंन शक्यते । ससभ्दि: सहकर्तव्य: संत: संगस्य भेंजम् ॥ २ ॥

सर्वोत्तम सिध्दांत । संग त्यागें शांति प्राप्त । कुटुंबी, बांधव आप्त, गोत । यांचा संवध त्यजावा ॥ २६ ॥ अनेंक जन्म संस्करण । जीव स्वभाव सहवास जन्य । त्याचा परित्याग संपूर्ण । अज्ञान जीवा केंवी घडे ॥ २७ ॥ म्हणोनी करावा संत सहवास । संगीं काम उपजे बहुवस । त्याचा सतसंगे निरास । भेंवज संगास संत हे ॥ २८ ॥

श्लोक - भार्या दिर नुकूलेंश्वरयेत भगवत्क्रिया ॥ उदासीनें स्वयंकुर्यात प्रतिकूले गृह त्यजेत ॥

॥ तत्यागे दूषण ना स्ति यतो विष्णु पराऽमुख ॥

गृहस्थाचा कैसा व्यवहार । त्याचा ऐसा व्यवहार । स्त्रीपुत्रादि परिवार । संसारी अनुकूल ॥२९॥ असता भगवतपरायण सेवा पुजा घ्यावीं करवून । प्रतिकूल कर्मी उदासीन । आज्ञानायके ॥ ३० ॥ आपण करावे ईशसेवन । तयासी परिवार प्रतिकुल जाण । करूनि गृहवर्जन । एकांती उपासना करावीं ॥ ३१ ॥ ज्यासी वैदेही राम अनिप । तया संबंध काज काय । तो स्नेहि बंधु आप्तवर्म । कोटी वैरी सम त्यजावा । ३२ । जोविष्णु परामुख असे । त्यास त्यजिता दुषण नसे संसार संबंध पिसे । न लानी आपणा कदाही ॥ ३३ ॥

श्लोक: - अनुकूलस्य संकलप प्रतिकूल विसर्जनम ॥ रक्षिष्यती तिविश्वासो भर्तृत्वे वरण यथा

आत्मनैवेद्य कार्पण्ये षडविधा शरणागति ॥ ४ ॥

... प्रतिकूल । त्याग करावा तयाचा ॥ ३४ ॥ जैसे पति

व्रतेचे विश्वासुमन । जये केले अग्निसन्मुख पाणिग्रहण । तोचि करीं संरक्षण । ऐसें मानी ।। ३५ ।। तेसे श्रीकृष्णपदी ठेविता मन । तयावरी भरवसा पुर्ण । तो अवश्य करी रक्षण । ऐसे चिंतन नित्याचें ।। ३६ ।। अंती आत्मनिवेदन । ।। भगवंतास आत्मसमर्पण । करोनी दीनता करावीं धारण । षर्डविध शरणागतीही ।३७। षडविध शरणागति विवरण त्याचें तात्पर्य ऐसे जाण । त्याचें करी भावे श्रवण । श्रध्दायुक्त चित्तें ।। ३८ ।। गृहत्याग सर्वोत्तम । असमर्थ झालीया गृही कर्म । श्रीकृष्ण प्रीत्यर्थ सेवाधर्म । आचरावा प्रथम शरणागति ।। ३९ ।। सर्वसंग परित्याग । असमर्थ होता सत्संग । तेणें शांति लाभ अभंग । व्दितीय प्रकार ऐसा हा ।। ४० ।। भगवत सेवेशी अनुकूल । भाव पदार्थ करी ग्रहण केवळ । त्यागावे प्रतिकूल । तृतिय प्रकार बोलीला ।। ४१ ।। अनुकूल असें परिवार । तयात राहोनी सेवी ईश्वर । विरुध्द त्यागावे सत्वर । एकांती सेवन चतुर्थ ।४२। पंचम प्रभु पदी दृढविश्वास आत्मनिवेदन प्रभुस । गुण दीनता धा ण विशेष । प्रकार निवेदिला ।४३ ।। अपुर्व उच्चतम सिध्दांत । सकल शास्त्र संमत पुष्टीमार्ग हेत संप्रदाय भक्ति वाढवी ।। ४४ ।। गोकुळी आचार्य वास्तव्य स्थान । बाळकृष्ण पुजा पध्दती कथन । संप्रदायी झाले जन प्रचार चाले सर्वत्र ।। ४५ ।। वल्लभाचार्य वृत कथन । करुनि सेविलें संतजन । कृष्णभक्ति महिमान । वाढविले सर्वत्र ।।४६। मागील अध्यायीं चरित्र कथन । प्रयाग तीर्थी आगमन । शिष्यासह करीती चैतन्य । पावन होती नरनारी ।। ४७ ।। केलें तीर्थ यात्रा वर्णन । वर्णिली तीर्थें वृंदावन । पठाणासी प्रेमदान । केले पावन करावया ।। ४८ ।। रूप सनातन चरित्र कथन । पुष्टीमार्गी वल्लभाचार्य महान । विशाल तत्वानुसारण । करण्या जना शिकविती ।।४९।। या अध्यायी विशद केले व्हावया सुखद । संत कृपे व्हावा साद । चरित्र गावया ।। ५० ।। श्री चैतन्य वि. ग्रंथ रसाळ । म. ली प्रसंग सोंज्वळ । रूप सनातन वल्लभ चरित मंगल । कथिले अध्यायी बत्तिसावा ।। ५१ ।। कथन नाम अध्याय बत्तीस समाप्त ओ, सं. २५१ एकूण सं ४३१४ दि २६-७-६४ रविवार

## अध्याय समाप्त

# अध्याय 33 वा

श्री गणेशाय नमः ॥ श्री सरस्वत्यैयनमः ॥ श्री गुरुभ्योनमः ॥ श्रीकृष्ण चैतण्याय नमः ॥ जय जयाजी भगवंता । तुजनमीं ठेवूनिमाथा । आज्ञान तिमींर आदीत्या । तूंचि त्राता ॥ १ ॥ संताचे संतपण । तुझिया आश्रये राही जाग । अन्यथा होय तुजविण । ऐसी भावना भक्ताची ॥ २ ॥ चित्ती नित्य भगवंत । मुखीं नाम सदोदित । परोपकारी तनुरथ । ऐशी रीत संताची । ३ । करिती सुखसंवाद । भक्ति प्रेमविशद । क्षण न विसंबिती गोविंद । देती आनंद भाविक ॥ ४॥ तोची संवाद कथन । वल्लभाचार्य चैतण्य । तैसे श्रीरुप भक्तजन । शिक्षा संप्रदाय कथिला । ५ ॥ प्रयागी संकीर्तनी गौर । राव रंक करितीं गजर । यति यौवनावस्थे नृत्य मनोहर । करी आचार्ये ऐकिले । ६ ॥ येती दर्शना, आतुरमन । नमिता, दिधले आलिंगन । प्रभु करिती पांडित्य स्तवन । रुपानुप वृतकथियलें ।७ आचार्य द्याया जाती अलिंगन । बंधूद्वय गेले संकोचून । द्विज आम्ही सेवें यवन । बनलों विनती स्पर्शाविना ॥ ८ ॥ आचारे यवन, स्पर्शा अपात्र । आपण कुलीन श्रेष्ठ सत्पात्र । विनये केले प्रेमपात्र । आलिंगने बंधूते ॥ ९ ॥ वल्लभचार्य देती निमंत्रण । भिक्षामिषे करा गृहपावन । स्विकार करिती चैतण्य । अरैल ग्रामी सत्कारीले ॥ १० ॥ प्रभु बैसविले नौकेवरी । आचार्य राहती शेजारी । शाम कालिंदी अभ्यंतरी । पाहाता भाव प्रकटला । ११ ॥ करु लागले नर्तन । नौका होय कंपायमान । भयभित भक्तजन । भावावेशे नाटोपती ॥ १२ ॥ नृत्य चाले प्रेमे उन्मत । त्यजिला देह यमुनेत । वाहती प्रवाहात । हा हा कार जाहला ॥ १३ ॥ उडी घालीती पोहणार । प्रभुसी आणिती नौकेवर । समस्त झाले पैल पार । ग्रामी येतीं ॥१४ ॥ करोनी प्रभु सत्कार । भोजनीं तुष्टविलें गौर । प्रसाद भक्षणें तुष्ट भक्तवर । आचार्ये चरण सेवाहिले ॥ १५ ॥ त्याकमे प्रभु लज्जीत आपण वृद्ध पितृवत । कां करिता हा अनर्थ । मनि संकोच वाटतो । १६ ॥ आचार्य वदले भगवन । केला संन्यास ग्रहण आश्रम गुरु, अतिथी सन्मान । करणे असे कर्तव्य ॥ १७ ॥ । अतिथी असे नारायण । करावे पुजाविधान । आपण स्वयें नारायण । संवाहने मानी कृतकृत्य ॥ १८ ॥ प्रभुवदले आचार्य देव । ममभाग्य अपूर्व । ईश प्रसादे चित्त सदैव समाधान पावे ॥ १९ ॥ केले अतिथ्य ग्रहण । मानी सौभाग्य लक्षण । तिर्थ फल विलक्षण । प्राप्त जाहले ॥ २० ॥ तैसे सत्पुरुष दर्शन । आपुला कृपा लाभ पुर्ण । परस्परें स्तुतीस्तवण । संकिर्तनी रत जाहलें ॥ २१ ॥ ते समयीं मिथिला निवासी ।

रघुपती उपाध्याय दर्शनासी । येती नमिलें प्रभुसी । विनये सन्निध बैसले ।२२। प्रभु वदलें पंडित कवि । आपुली कविता काय वर्णावी । श्रीकृष्ण लीला थोरवी । भावे वर्नीली ।। २३ ।। कृष्ण चरित्र कवन । स्वरचित करावे श्रवण । पंडीत विनम्र बोलें वचन । कवन माझे सामाण्य ।। २४ ।। रुचे नरुचे शंकीत मन । वदले प्रभु कृष्ण कृपापुर्ण । स्वरयुक्त करा गायन । आज्ञे करिती काव्याते ।। २५ ।।

श्लोक :– श्रुतिमपरे स्मृतीमितरे भारतमन्ये भजन्तु भवभिता: । अहमिह नन्दंवन्दे यस्यालींदे परब्रह्म ।। १ ।।
भवसागरी भयभित चित्त । अज्ञानी जिव बहुत । श्रुति स्मृती आश्रये घेंत । येती दुःख मुक्त व्हावया । २६ । महाभारत आधार घेत । कित्येक होती भयमुक्त । ऐंसे करणारे करोत । मम निर्धार ऐंसाकी २७ महाभाग्यवान । त्या नंदजीचें वंदी चरण । जयाच्या द्वारी पुर्ण सनातन । ब्रह्म करी नर्तन ।।२८।। श्लोकाची करुनि स्तुती । वदले प्रभु पंडिता प्रति । श्लोक ऐकवावे पुढती । तोषावया ।। २९ ।।

श्लोक:– कम्प्रति कथयी तुमिषे संप्रतिको वा प्रतितिमायातु । गोपति तनयाकुन्जें गोपवधूरी विरं ब्रह्म ।। २ ।।
कवणासी सांगावे जावून । कोनासही कथिलें आवर्जून । तरी यासमयी विश्वास पूर्ण । कोण करी ।। ३० ।। सूर्यकथा कालींदी तटीं । गोपांगणेसी राही लंपट । तेचि परब्रह्म चोखट । कुंजात ।। ३१ ।। ऐकुनि काव्य मनोहर । प्रसन्न होतीं गौरहर । स्तविला कवि वारंवार । पृछा करिती कविसी ।। ३२ ।। सांगारुपीं श्रेष्ठ परम । कोन असे उत्तमोत्तम । । सावळा कृष्ण मेघ: शाम । उत्तरे कवि ।। ३३ ।। वासस्थांत श्रेस्ठ परम । स्थान कोनते उत्तमोत्तम । मधुपुरी मधुमयीं धाम ।पवित्र विश्राम मजवाटे ।। ३४ ।। भगवद वस्थातीन । बाल पौगड, किशोर यातून । श्रेष्ट कोण मजलागुन । सांगा कविराज सत्वर ।३६। प्रभो सर्व कौमार्य । अवस्थामानी शीरोधार्य . त्याचे ध्यानी चित्तचतुष्टय । आनंद सागरी विवहे ।। ३६ ।। प्रभुउत्तरी प्रसन्न । रस्तमध्ये श्रेष्ट कोन । शृंगार रस श्रेष्ठ मानी । अनुभव गम्य । सर्वश्रेष्ठ शृंगाररस । जयासी संज्ञा आद्यरस । रघुपती वदे अन्यरस । रस नसे याहुनी ।। ३८ ।।

श्लोक :– शाममेव पररुप पुरी मधुपुरी वरा । वय कैशोरकं ध्येय माद्य एव परोरस ।। ४ ।।
श्याम हेचि रुप परम । पुरीं मधुपुरी उंत्तम । वय किशोर ध्यानासी । अनुपम । आद्यरस शृंगारहा ।। ३९ ।। यापरी

जाहली प्रश्नोत्तरें। श्रवणें प्रसन्न गौरहर। तैसेचि भक्तवर। संतुष्ट होती ॥ ४० ॥ प्रश्नोत्तर जाहलीयावर। आज्ञा मागुनी सत्वर। प्रयागी येती गौरहर। आचार्य धन्य जाहले ॥ ४१ ॥ ऐसी संत कथा मधुर। गावया परमानंद हो फार। सुगम परमार्थ विचार। अंगी वाणें ॥ ४२ ॥ प्रयागी वास्तव्य दशदिन। दशाश्वमेध घाटी निर्जन। त्याठायीं वास्तव्य करुन। भक्तजन सन्निध राहती ॥४३॥ तेथ शक्ति संचार पुर्वक। समस्त भक्तिरस तत्वदेख। सूत्ररुप शिक्षा अलौकीक। दिधली रुपा एकांती ॥४४॥ त्या सुत्राचे करी अवलंबन। भक्तिरसामृत सिंधु ग्रंथपुर्ण। रचना करी आदेश देऊन। कृतार्थ केले तयासी ॥ ४५ ॥ श्रीकृष्ण मानी चैतन्य। त्यांचे चरणीं भाव ठेऊन। अभेद भावे ग्रंथलिखन। केले रसाळ श्रीरुपे ॥ ४६ ॥ श्रीरुप शिक्षा तात्पर्यार्थ। संक्षेपे देतसे यथ। ते परिसावे साद्यन। चित्त संतोषे ॥ ४७ ॥ प्रभु विरक्तिचा उपदेश। करिती, संसारी भोग विशेष। जिव होय कासाविस। भोगिता दुःख अपार ॥ ४८ ॥ पदप्रतिष्ठा धन, पुत्र। प्रिय पदार्थ परिवार। याची चिंता निरंतर। जिवनाधार समजोनी ॥ ४९ ॥ कामिनी, कांचन, कीर्ती। या रज्जु जिवास बांधिती। होई विकल स्थिती। मूक्ति नसे जिवासी ॥ ५० ॥ या तिहींचा घडे त्याग। तया प्रभुप्राप्ती सापडे मार्ग। अनुभव सुख योग। ठाईपडे ॥ ५१ ॥ सुंदर कामिनी देह तेथ धरी सुखाग्राह। आनद नसे शांतीं संदेह। निश्चित होय मानसी ॥ ५२। कामिनीचें विषयसुख। आनंद छाया देख। मिळेब्रह्मानंद चोख। विषय पारखा झालीया ॥ ५३ ॥ कांचने होय सुख। ते कांचन पीतमृतिका चे.ख। तेणें तृष्णा वाढे विशेख। हरिख न होय कदाही ॥ ५४ ॥ या कांचनाचियासाठा। मृत्यूची होय आटापीटी। तदर्थ जिवन शेवटीं। अर्पिती लोभिष्ट संसारी ॥ ५५ ॥ जैसी तनूचि छाया। त्यापरी कांचन मानी सखया। धरितां हातीं नये तयां। त्यजिता मागुती पाठीलागे ॥ ५६ ॥ इछा करिता दूरीपळे। पाठी उदासी सोहळे। ऐसे कांचन वर्म आगळें सत्य हे ॥ ५७ ॥ म्हणोनी धनाशा त्यजावी। ईश पदी तनुसर्मपावी। तै सुख, शांती आघवीं घरासीये ॥ ५८ ॥ संपत्तीं श्रेष्ठ साधन। गुलामित भोगिला नृपसन्मान। कुल, शिल, धर्म, विव्दता त्येजून। दिनापरी सेवक जाहला ॥५९॥ तुम्हीं धर्मात्मे व्दिज पंडींत। असोनिया सच्चरित। आचार विचारे शुचिर्भुत। धना स्तव हीनपण सेविले ॥६०॥ यास्तव धनाचे श्रेष्ठपण। जिवाचा घालवी प्रतिष्ठामांन। तयासी त्यजिता संपूर्ण। सुखसपन्न होय तो ॥ ६१ ॥

श्लोक :- मनसिच परितुष्टे कोऽर्थवान को दरिद्रः ।। (भाग्यं फलति सर्वत्र न विद्या, नच पौरुषम ।।

मनी जाहला संतुष्ट । तो दरिद्री, ना धनी वरिष्ट । भागवत प्राप्ती मानी श्रेष्ठ । भक्ति श्रीमंत होतसे ।। ६२ ।। प्रतिष्ठेस्तव कीर्तीचा झाला दास । पुढती पळे न संपडे तयास । निरंतर राही उदास । पायाची दासी तयाची ।।६३।। प्रतिष्ठेस्तव प्रयत्न करुन । ती न मिळे कदा जाण । भाग्यें प्राप्त होत अनुदिन । ऐसे महिमान तियेंचे ।६४ ।। म्हणोनी कीर्ती पति श्रीहरी । त्यासीं न करीं दूरी तया सेवितां कीर्ति माघारी । फिरे, जीवा प्राप्त हो ।। ६५ ।। वाढविता श्रीहरिकीर्ति तयाचे कल्याण निश्चित । गृहीं तयाच्या सुख संपत्ती । वोसरोनि ये ।। ६६।। इतुके कथिले ध्यानी धरी । साधन तत्व अवधारी । या ब्रम्हांड भांडो दरीं । जीव अनंत बद्धपणें ।। ६७ ।। योनी चौऱ्याशी लाख । तेथ जीव भ्रमे हरिख । तयाच्या दोन श्रेणी विशेख । स्थावर जंगम ।। ६८ ।। जंगम जीन तीन प्रकार । जल, स्थल, नभचर । तयांत श्रेष्ट स्थलचर । श्रेष्ठ तर मानव ।। ६९ ।। मानवीं असभ्य आचरहीन । नास्तीक, पापी बहूजन । तयांत थोर, सदवृत्त, वेदज्ञ । तेही मुखर जाणिजें ।। ७० ।। धार्मिक असती कर्म प्रधान । तयांत कोटीं गुणे ज्ञानसंपन्न । ज्ञानियां मुक्तपूर्ण । कोटीत एखादा ।। ७१ ।। ऐशा कोटी मुक्त पुरुषांत । दुर्लभ, निष्काम कृष्णभक्त । कर्मी, ज्ञानी, योगियांत । शांति लाभ तया होय ।। ७२ ।।

श्लोक :- मुक्तानामपि सिध्दानां नरायण पारायणः । सुदुर्लभः प्रशांतात्मा कोटिश्वपि महामुनें ।। ६।१४।५ भाग

राजा परिक्षित प्रश्न । भागवतीं शुका सांगे सुजाण । प्राकृती त्याचे विवरण । ओवीबद्ध केले असे ।। ७३ ।। अनेक सिद्ध असती मुक्त । तयांत दुर्लभ नारायण भक्त । कोटी भक्तामाजीं हृदय शांत । भक्त अत्यंत दुर्लभ ।। ७४ ।। कर्मी योगी ज्ञानीं । मुक्ति वांछितीं निदानीं । म्हणोनि अशांति तया लागोनि । अनुसंधानि कृष्ण नसे ।। ७५ ।। म्हणोनियां कृष्ण भक्ति । करावीं, निष्काम प्रींति । सकल अर्पावे तया प्रति । अहैतुकीं भक्ति बोलिजे ।। ७६ ।। श्रीमद्भगवतीं कपिल भगवान । स्वमुखे करिती एवं कथन मदगुण श्रवण मात्रे करुन । गति मजकडें प्रमाण हे ।। ७७ ।।

श्लोक :- मदगुन श्रुतिमात्रेण मयि सर्व गुहाशये । मनोगति रविच्छिन्ना यथा गङाम्भसोऽम्बुंधौ ।। ३।२९।११ भाग

मी हृदय गुहे माझारीं । सर्वांतरे चराचरी । राही, गंगा प्रवाह सागरी । अविछिन्न गति मजकडे ।। ७८ ।। ऐसी

एकान्तिकीं अहैतुकी । भक्ति प्राप्त होतें निकी । भक्ता सन्निध कृष्ण एकाकी राहीं भक्त वत्सल ।। ७९।। जीव स्वरुप अतिसुक्ष्म जाण । तोचि जीव चित्कण । जीव शक्ति विशिष्ट ब्रम्हकण । जयां अणु बोलती ।। ८० ।। स्थूल सूक्ष्म देह जाण । ही जीवाची दोन आवरणें । नित्य जीव स्वरुप । तेणें बहिमुख जीव स्वरुप आवृत्त ।।८१ ।। या प्रकारे चर्तुदश ब्रह्मांडात । चौऱ्याशीं लाख योनीत । वारवार जींव भ्रमन । कष्टी होय ।। ८२ ।। भगवदिच्छें सुटावे बंधन । समय येई, पूर्वपुण्यें । सत्संग घडे तया लागून । सौभाग्य लाभे सेवेचे ।।८३ ।। तदाजीव भाग्यवान । लागे सद्गुरु अनुसंधान । भक्ति बीज अंकुरीत जाण । हृदयी पूर्ण होतसे ।।८४ ।। गुरुमुखे श्रीकृष्ण कीर्तन । निरंतर घडे श्रवण । वाढे भक्ति लक्षण । कृष्ण कृपा भाजन होय तो ।। ८५ ।। राही ब्रह्मांड परतर । विरजा चिन्मय नदी निरंतर । त्रिगुण द्वंद्व न राही तयावर । शांत भाव असे सकलांचा ।। ८६ ।। विरजे पार ब्रह्म लोक । निराकारां ध्याती जे लोक । भगत्विदेषी हरिनाशक । प्राप्त होती त्या ठायीं ।८७।। तयाचे वरी परमव्योम । संज्ञा वैकुंठधाम । तेंथ लक्ष्मीनारायण, सिताराम उपासक साक्षात सेविती ।। ८८ ।। त्याउपरी गोलोक वृंदावन । तेथ असती श्रीकृष्ण चरण । जे कल्पतरुसमान । नित्य वर्तमान राहती ।। ८९ ।। त्या कल्पतरुचा आश्रय घेऊन । भक्तिलत्ता राही आधारुन । तया प्रेम फळ येपुर्ण । सुखसंपुर्ण होतसे ।। ९० ।। भक्त न सोडी भजन किर्तन । श्रीकृष्ण सुखानुसंधान । चित्तीं ठेवी दिनानुदिन । भक्तिरस चाखी आनंदे ।। ९१ ।। ईश्वर प्राप्तीचें साधन । करिता येई दुर्देवे विघ्न । वैष्णवापराध तयालागुन । नामाभिधान असेन या ।। ९२ ।। वैष्णवापराध झालीया जान । भक्ति साधनी पडे न्यून । साधकें करावा प्रयत्न । सावधान नित्य असावे।९३। भक्तिचा बाह्य आचार । भजना दिसाधन प्रकार । तेणें लौकीक वाढे थोर । बाह्य अभिनय व्दारा कीं ।। ९४ ।। तया भक्ति माजी कामना । राही, भोग, मोक्ष वासना । शास्त्र निषिद्ध आचरणा । वाव मिळे ।। ९५ ।। छळ, कपट, जिवहींसा । स्त्री अर्थादी प्राप्तिपिसा । लौकीक, सन्मान, पूजा कांक्षा । उदयापावे कामते ।। ९६ ।। वासनेची झालीयावृद्धी । प्राप्त ना होय इष्ट सिद्धि । निष्काम ठेवूनि बुद्धि । मनः शुद्धि करावी ।। ९७ ।। तेणें गोलोक वृंदावन । प्राप्त होय श्रीकृष्ण चरण । परमात्मा आनंदघन । वश होई भक्तिने ।। ९८ ।। हेचि श्रीकृष्ण प्रेम साफल्य । चारी पुरुषार्थ तृण तुल्य । कामनिक पुर्ती देवता केंवळ । इच्छित भोग मोक्ष दे ।। ९९ ।। तयाचे न करी पुजन । लीला पुरुषोत्तम मानी कृष्ण ।

प्राप्त हो तयाचे सुखानुसंधान । भक्ति प्रयोजन जीवाचे ।। १०० ।। श्रीकृष्ण सुख वांछा । त्या विरहीत अभिलाषा । जीव स्वभाव, करी कांक्षा । त्याग करावा तयाचा ।१।। घडावे ब्रम्हता दास्म । चिंता तयाची लागे परम । अथवा ज्ञान सुगम । होय उपाय जीवकरी ।। २ ।। स्मृती वर्णीत आचार । नित्यनैमित्तीक कर्माचार । फल्गु वैराग्य विचार । एकी भुत व्हावया करी ।। ३ ।। योगादि सांख्यज्ञान । जे कृष्ण सुखानुसंधान । आवृत करी दिनानुदिन । तयाचा प्रयत्न त्यजावा ।।४ ।। त्याग करावा संपुर्ण । अनुराग पात्र कृष्ण चरण । प्रवृत्ती दृढ ठेऊन । करी ठेऊन आचरण यापरी ।। ५ ।। काया, वाचा मनें । व्यवहार करी या भावाने । भाव मय राहीं आनुशिलने । उत्तमाशुद्धा भक्ति जाणिजे ।। ६ ।। याशुद्धा भक्तिने प्रेम । उत्पन्न होई अनुपमा तेणें कृष्ण प्राप्ती सुगमा । विश्रामा कारण जीवासी ।। ७ ।। चित्ती वसे भोग, वांछा । अथवा राही मोक्षेच्छा । तेथ कृष्ण प्रेम प्राप्ती । आकांक्षा कोटी जन्म साधना पेक्षा ।। १०८ ।। म्हणोनी असावी शुद्ध भक्ति । तेणें कृष्ण प्रेम प्राप्ती । जीवासि तयाची निच्छीती । निःशंक असे ।। ९ ।। भक्तिच्या तीन अवस्था । साधनावस्था भावावस्था । तिसरी प्रेमावस्था । वाढवि भक्तिला । ।। १० ।। प्रेम भक्ति दिनानुदिन । वाढे त्याचे असे लक्षण । स्नेह, प्रणय, राग, मान । अनुराग भाव वाढवी ।। ११ ।। भाव महाभावापर्यंत । जीवावस्था होई उन्नत । कृष्ण प्रेम रस शाश्वत । नित्य चाखाया मिळे तया ।। १२ ।। यापरी शिक्षा अनुपम । वर्णिलें विविध रस तारतम्य । गाढ सेवा उपाय सुगम । श्रीरुपा कथियला ।। १३ ।। इतुके देऊनियां ज्ञान । तयाचें केले समाधान । जाई त्वरे वृंदावना । बोळवन केली ।। १४ ।। रुप, अनुप, माथुरी ब्राह्मण । कृष्णदासा करिती बोळवण । एकांत लाभावा म्हणून । मनीं भाविलें ।। १५ ।। प्रयागाहूनि काशीस । येंऊनि चैतन्ये केला बास चंद्रशेखर दैवें प्रभुस । नगराबाहेर भेटला ।। १६ ।। केले साष्टांग नमन । प्रभु देती अलिंगन । कळे आपुले आगमन । स्वप्नमाजीं ।। १७ ।। म्हणोनि असतां शोधनी । पातलो त्वरे या स्थानी । आनंद हो आपुल्या दर्शनी । मानी भाग्य उदेले ।। १८ ।। चलावे मम सदनी । हीच माझी विनवणीं । तये मान्य करोनी । सदनीं आले ।। १९ ।। तवन मिश्र पुत्र रघुनाथ । महाराष्ट्रीय द्विज भक्त । तया कळे वृत्तांत । दर्शना येतीं ।। २० ।। मिश्रे भिक्षार्थ केलीं विनवणी । भिक्षान्न घेतीं तया सदनी । मास द्वय एकांत स्थानी । वास करिती क्षेत्री तया ।।। २१ ।। एसे अद्भुत रसाळ । चरित्र

कथिले प्रेमळ । जणें भक्ति भाव सोज्वळ । मनीं वाढवी ॥ २२ ॥ यापरी रघुपति संवाद संपूर्ण । श्रीरुप शिक्षा कथन होय चित्र प्रसन्न । श्रवण करितां भक्तिचे ॥ २३ ॥ भाव व्हावा संपूर्ण । पुढील कथा वर्णन । करी द्या अवधान । विनवी संत सेवक ॥ २४ ॥ श्री चै. वि. ग्रंथ रसाळ । म. ली प्रसंग सोज्वळ । रघुपति संवाद वल्लभाचार्य भेटी मंगळ श्रीरुप शिक्षा कथन अध्याय । तेहतींसाविया ॥ २५ ॥ श्री. चै. वि. ग्रंथ म. ली प्रसंग रघुपति उपाध्याय संवाद तपन मिश्र सत्कार ग्रहण । वल्लभाचार्य भेट श्री रुप शिक्षा कथा कथन नाम अध्याय तेहतिसावा (३३) समाप्त

ओ. संख्या १२५ एकूण – ४४२९ दि. २७–७–६४ सोमवार आषाढ व, ३ शके १८८६ सं. २०२०

# अध्याय समाप्त

# अध्याय ३४ वा

श्री गणेशाय नमः ।। श्री सरस्वत्यैयनमः ।। श्री गुरुभ्योनमः ।। श्रीकृष्ण चैतन्याय नमः ।। नमन माझे संत सज्जना जे चुकविती भवयातना । शिणती परोप करणा । प्राण प्रिय हरिचे ।। १ ।। देऊनि शाश्वत धन । चुकविती जन्मस्मरण । दाविती सच्चीतानंद चरण । भक्तिनें । २ । भगवत्प्रेम आंगीं । ज्ञान दीप लाविती जगी । अज्ञान निरसे लागवेगी । आत्मचिंतनी योगी ते ।।३।। संसारी नसे आस । व्हावया मुक्त सकळ पाश । त्यजूनी राहती उदास । अलिप्त जैसे कमल ।। ४ ।। संसारीं असोनी विरक्त । हे अशक्य वाटे सांप्रत । ईश चरणी ठेवी चित्त । तोची मुक्ति परसार्थी । ऐसा सनातन भक्त । चैतण्य चरणी ठेवीं चित्त । तया कथितो चरित । परिसावे ।। ५ ।। तयासी केला उपदेश । जनाचे सुटावे बंध क्लेश । प्रभु निमित्त करुनि तयास शिक्षेस देती ।। ७ ।। श्रीरूप बंधु सनातन । त्याचे काय झाले वर्तमान । ईश्वर चरणी जयाचे मन । भक्त प्रिय प्रभुचा ।। ८ ।। गौडीय प्रधान सनातन । कारावासी भोगी यातना । अन्न, पान केलें वर्जन । निद्रा त्यजून चित्ती प्रभु ।। ९ ।। ऐसे लोटले बहुदिन । भेटावे त्वरें प्रभुचरण । हेचि ध्यान राही मनी । मुळें माजीं कै असे ।। १० ।। तो मिळे गुप्त खत । श्रीरूपे धाडिले त्वरित । दशसहस्त्र ठेवि वित्त । आपणा लागी ।। ११ ।। मनीं येई ऐसा विचार । सुटावया साधन थोर । द्रव्य लोभ राही अपार । संसारीं जीव त्यात बुडे ।। १२ ।। तें समयीं विचार करी । पाचारी प्रमुख कर्मचारी । जो प्रधान कारागारीं । अनियंत्रित सत्तेचा ।। १३ ।। बंधो ! मी असे कोण । माझी तुझसी ओळखण । माझिये बंदीचे कारण । जाणसी सत्य सांगे मज ।। १४ ।। माझा कोणता अपराध । नृप काय कारणें क्रुद्ध । मी शिक्षा भोग्यच्या सिद्ध । कासाया जाहलो ? ।। १५ ।। बोले, गौडींय प्रमुख प्रधान । ईश्वर भजनीं आपले मन । नृंपासी नरुचे, कारण । बंदिस्त जाहला ।। १६ ।। आपुलें कर्म सोज्वळ । मी नृप गुलाम केवळ । संसारी पडे मजभुरळ । वर्णनी असमर्थ असे मी ।।१७।। मोक्षा दे पुण्य कर्म । वरी ईश्वरप्रेम सुगम । ऐसा अधिकार परम । श्रेष्ठ असे आपुला ।। १८ ।। सनातन वदे तया वचन । पुण्य कर्मा सहाय्य देऊन । फल करावे संपादान । करी एवढें मजलागी ।।१९।। मंत्री असता सहाय्य केले । तें पाहिजे तुजसी आठवले । बंदीं तू नि करी मज मोकळे । कठिण समयीं माझीया ।। २० ।। श्रवणें कंपित कर्मचारीं । भ्याला तत्काळ अंतरी । अडखळे मुखीं वैखरी । चंचल भीतरीं

जाहला ॥ २१ ॥ आधिकारीं वदे कर्म कठिण । नृप घेई माझा प्राण । मज यातना दारुण । ससारी होती ॥ २२ ॥
सनातन वदे धीर देऊन । अल्प वेतनी करिसी गुजराण । माझे प्राप्त झालियाधन । प्रपंच होंई सुखमय ॥ २३ ॥
माझीयास्तव असत्य वचन । कैदीं करी गंगास्नान । केले त्वरें देहपतन । आत्म संतोषे ॥ २४ ॥ त्यासी धुंडितां बहुत
जन । तो नसांपडे आम्हा लागुन । ऐसे करी बा कथन । तत्काल त्यजि देश हा ॥ २५ ॥ धनांचें आमीष पुर्ण । तेणें
संतोषे प्रधान । तयासी रुचले वचन । सनातने धन मागविले ॥ २६ ॥ निशीं घोर अंधकार । मुक्त केला भक्तवर ।
गाठावया कानन घोर । गंगातीरी पातले ॥ २७ ॥ ईशान्य नामे सेवक । संगे घेतला विश्वासुक । गंगापार होवोनि
नावेक । नमन केलें गंगेसी ॥ २८ ॥ बंदी शाळेचा अधिकारी । सज्जन वृत्ती, नमन करी । सनातन धने संतुष्ट करीं ।
कृपा करोनी परतविला ॥२९॥ भेटावे काशी क्षेत्री प्रभुस । स्वीकारी गहन कंटक मार्गास । विख्यात डाकुचा जेथ वास
। पातडा पाहाडी पातले ॥ ३० ॥ मार्गी भक्त ईशान । सन्निध ठेंवि गुप्त धन । व्ययास्तव अष्टहोन । कळू नेंदी प्रभुसी
॥३१। पहाडी डाकु प्रमुख । ज्याचे सन्निध ज्योतीषी एक । नामांकी जयाचा लौकीक । कथन करी धन जवळींचे ।३२।
सनातन मार्गी असता । गणिती वदे भविष्य वार्ता । स्वामीसी धन न कळविता । सेवक राखी सन्निध ।३३॥ डाकूसी
आनंद हो फार । तये केला प्रभु सत्कार । भोजनी उत्तम प्रकार । वांछा मनी लुटींची ॥ ३४ ॥ भोजन झालीयावर ।
निद्रा केली घडीभर । मंत्रीं करी विचार । अतिथ्या पोटी रहस्य असे ॥ ३५ ॥ डाकू असोनि सत्कार । पांथस्थाचा
कृती थोर । देखिले न यकिले आजवर । मनीं शंका उपजली ॥ ३६ ॥ सनातनें पुसिले सेवकासी । काही द्रव्य आहे
तुजपासीं । ते सत्य सांगें मजसी । सत्वर बा ॥३७॥ सेवक हो भितीं ग्रस्त । जवळीं असती मोहोरा सप्त । कथन करी
स्वामीप्रत । गुप्त पणें एकराखिली ॥ ३८ ॥ क्रोधे वदे सनातन । व्यर्थ धनाचे लोधन । देऊनि टाकी सारे धन । डाकू
प्रमुख तयाला । सेवकें सप्त मोहरा । आणूनि ठेंविल्या डाकु पुढारा । डाकु वदे एक माघारा । कवण्या कारणें राखिली
॥ ४० ॥ आधीच मज सारे कळले । कशास धन राखिलें । तुझे स्वामी असती भले । प्रसन्न झालो तयावरी ॥ ४१ ॥
नेऊनि द्यावे तया धन । तोंचि पातले सनातन । माघारे दिधले धन पाहून । प्रधान वदे तयाला ॥ ४२ ॥ मी त्यजिला
धन, मान । ध्याचें सारें तूचि धन । मज पार पाववी कानन । प्रभु दर्शनी उतावळि ॥ ४३ ॥ डाकू सेवकां देई आज्ञा

अटवी पार होती सनातन । वदले सेवकां अल्पधन । आहे सन्निध । तुझिया ॥ ४४ ॥ सेवक वदे एक मोहोर । राखिली मार्गी आधार । सनातन देई उत्तर । जावे त्वरे माघारा ॥ ४५ ॥ मज नको तुझा सांगात । तव चित्त विषय व्याप्त । माघारा जाई त्वरीत । परमार्थ न घडे कदाही ॥ ४६ ॥ दुःखित जाहला ईशान । धरिले स्वामिचरण । नेंत्र होती अश्रु पुर्ण । कष्टे पाळी आज्ञेसी । ४७ ॥ सेवक गला परतोन । एकाकी मार्ग आक्रमण । करिसी साधक सनातन । हाजीपुरा ग्रामी आलें ॥४८॥ तेथ भगिनी पति श्रीकांत । तयासी भेटे आकस्मात । सनातन दरवेशींवेषात । पाहोनी विस्मींत जाहला ॥ ४९ ॥ समस्त कळे वृत्तांत । गृही ठेवी श्रीकांत । ते न मानूनि त्वरित । गमन केले सनातने ॥ ५० ॥ काही मार्ग व्यय धावा । सनातनाचा विरक्त भाव । ना करी तयाचे द्रव्य । भुतांनी कंबल राखिली ॥ ५१ ॥ काशीस आले सनातन । शेखर गृही बाहेंरी प्रतिक्षण । करी जाणूनि चैतन्ये । शेखरा बाहिले ॥ ५२ ॥ आंगणीं वैष्णवा पाचारी । शेखर देखे चित्त वेशधारी । हा साधू नसे निर्धारीं । यवन व्दारी बैसला ॥ ५३ ॥ ऐकतां हसे नावरे प्रभुसी । परम भागवत दरवेशी । प्रभु सन्निध नेता तयासी । प्राणिपाते शुद्धि हारविली ॥ ५४ ॥ प्रभु देती आलिंगन । तव बोले सनातन । मी असे कर्महिन । स्पर्शास्त योग्य नसें तनु ॥ ५५ ॥ प्रभु वदले सनातन । तुझ्या अंग स्पर्शा लागुन । आजि जाहलो पावन । श्रीकृष्ण प्रेम मिळे मज ॥ ५६ ॥ तुझिया स्पर्शे पापी पावन । हो कृष्ण पदीं अनुसंधान । प्रभुस मिळे वृत्त कथन । सन्निध त्यासी राहविले ॥ ५७ प्रयागी तवबंधु मिलन । झाले धाडिले वृंदावना । अल्पकाल वास करुन । द्यावी भेटी तयासी ।५८। श्रीरुप सनातन अतिविरक्त । सनातनाची ज्ञानगर्भ वृत्तीं। त्यागूनिया गृहासक्ति । वृक्षास्थळी राहती ।५९। एक्या स्थली लोभ उपजीवी । बंधूद्वये स्थाने टाळावी । नित्य मधुकरीं मागावी । सेवावया यमुनाजल ॥ ६० ॥मृतिकापात्र, चिंध्यावस्त्र । निर्वाह करिता जिवनपवित्र । प्रभुसी ज्ञात चरित्र । विरक्त बंधू द्वयांचे ॥ ६१ ॥ दरवेशासी अलींगन । प्रभु देती अतीप्रमाणें । शेखर चकित सन्मानें । जाहला चित्तीं तोषला ॥ ६२ ॥ वदले प्रभु चंद्रशेखर । तुज वाटे आश्चर्य फार । दरवेशी मंत्री थोर । गौडींय नाम सनातन ॥ ६३ ॥ महापंडित, भागवत । सर्वस्व त्यजि होई विरक्त । भजन करावे मनसोक्त । चित्ती बंधू वृंदावनी ॥ ६४ ॥ प्रभुवचने शेखर । नमनें अलिंगी भक्तवर । सनातनाचे करविले क्षौर । वैष्णव दिक्षा दिधली तया ॥ ६५ ॥ मिश्रगृहीं भीक्षान्न । घेतीं प्रभु प्रसाद सनातन । मिश्राचे घेती जीर्ण वसन

मधूकरीं नित्याचा ॥६६ ॥ बहुमोल कंबल त्यजून । जीर्ण चिर्धीचे केलें वसन । प्रभुसी कळतां समाधान । क्षुद्रवासना शिनाली ॥ ६७ ॥

श्लोक :– अथस्वस्थाय देवाय नित्या हत पाप्मनें । व्यक्त क्रम विभागाय चैतन्य ज्योतिषे नमः ॥ सु. रं. भां ११ १

जो असे आत्मस्थिर । जो नित्य निरंतर । जो पाप नाशि घोर । ऐसी अलौकीक देवता ॥ ६८ ॥ जयास्तव नसे विधि निषेध । अथवा अन्य कर्म सिद्ध । ज्यांचे ज्योतिः स्वरुप प्रसिद्ध । त्या चैतन्या प्रणाम । ६९ ॥ सनातनाचे विरक्तपण त्यावरी प्रभु कृपा संपुर्ण । काहीं ज्ञान व्हावें म्हणुन । गहन प्रश्न विचारी ॥ ७० ॥ तुजवरी ईशकृपा सनातना । तेथ कैची आशंका, करिती प्रश्ना । अज्ञान जन कल्याणा । हेतू, साधु मनोगत ॥ ७१ ॥ नम्रपणें करी प्रश्न । जीव असतीं विभिन्न । त्याचें काय कारण । कथन करावें ॥ ७२॥ बद्ध, मुमुक्षु, नित्य, मुक्त । जीवाचे भेद प्रथित । शास्त्री बोलीले विस्तृत । एंक विवरण तयाचे ।। ७३ ॥ सनकादि जीव मुक्त । संसार बंधन नसे नयाप्रत । प्रपंची नित्यवसत । अहर्निशरत संकीतनी ॥ ७४॥ जीवाचा द्वितीय नित्य भेद । तो करी विशद । मनु, प्रजापति, सप्तर्षी इंद्र । क्रियाशील राहता सुष्टी निमित्त ॥ ७५ ॥ अनित्य असे संसार । तया माजी भोग क्षण भंगुर । जाणूनि, सदानश्वर । त्याग करिती तयांचा ॥ ७६ ॥ प्रभुचरणाचा आधार । घ्यावा वाटें निरंतर । तो मुमुक्षु जीवाचा प्रकार । परमार्थ पथ पथीक तें ॥ ७७ ॥ या व्यतिरिक्त जीव । यांचा असा स्वभाव । जन्म मृत्यु हेंचि कर्तव्य । विवेक शुन्य बद्ध ते ॥ ७८ ॥ जे सदाचे विषयासक्त । त्यांची गणना बद्धांत । अज्ञानीं, पशुपक्षी, या श्रेणीत । साधन भजनी वृती नसे ॥ ७९ ॥ वहिर्मुख जीव । तयां जन्म मृत्यु सदैव । नाना योनी भ्रमे स्वभावें ईश्वर विमुख म्हणोनी ॥८०॥ मायेचें पडे बंधन । जीवासी नाचवी अनुदिन । माया पति आश्रय केल्या जाण । जीव बंधन मुक्त हो ॥ ८१ ॥ माया पतिसि शरण । जावे कैसे सांगा प्रश्न । त्याची आर्तता मज लागुन । राहिली ॥ ८२ ॥ येथ प्रधान असे कृपा । शास्त्र गुरुकृपा । तिसरी परमात्मकृपा । ढीलेपण ये बंधनी ।८३। मुंगींपासून ब्रम्हदेव । मायागुणें आवद्धजीव । अशांति नांदे सदैव । शांतिचे वास्तव्य ईश्वरीं ॥ ब्रम्ह करी सृष्टी उत्पन्न । परी त्यासी दुखदारुण । ईश्वर एक श्रीकृष्ण । शांती तोची, करी ॥ ८५ ॥ संपूर्ण ब्रम्हांडांचा ईश्वर । एक ब्रम्हदेव थोर । अैसे असंख्य कलेवर । ईश्वर निर्मिती प्रतिक्षणी ॥ ८६ ॥ त्याब्रम्हांडाची

रचना । तुज सांगतोस यातना । देइजे तु आवधाना । कथेसी ॥८७॥ पुण्यपावन सप्तपुरी । आसती भारता माझारी । तैशा असंख्यनगरी । आसती एकां खडांत ।८८। भारतवर्ष किन्नरवर्ष । हरिवर्ष कुरुवर्ष । हिरण्यमय वर्ष रम्यक वर्ष । ईलावृत वर्ष सातवे ॥८९॥ भद्राश्व वर्ष । केतुमाल वर्ष । ऐसे हे नऊवर्ष । खंड संज्ञा असे तयास । जंबुव्दीप एक तयाचे ॥९०॥ जंबुव्दिप व्दिगुणें ल्पक्षद्वीप । त्याच्या व्दिगुणे । शालमलीव्दिप । तैशाचरिती कुशव्दिप । कौंचव्दिप व्दिगुण ॥ ९१ ॥ शाक व्दिप पुष्कर व्दिप । व्दिगुणे असे सप्तव्दीं । पृथ्वीवरी असती अमुप । सप्तसमुद्र तैसेचीं ॥ ९२ ॥ कलियुगी वाटे कल्पना । असमर्थ जिव तत्व जाणण्या । एक जंबूद्विपींहीं नकळे त्याना । क्षार समुद्र जाणती ते ।९३। सप्तव्दिप सप्तसागर । सप्तलोक । सप्तलोकांचा संभार । पृथ्वी खाली असे की ॥ ९४ ॥ स्वर्गी असती असंख्य लोक । चंद्र, भौम, बुध सुर्यादीं असंख्य । भूलोकापरी जिव अनेंक । स्वयंप्रकाशित लोकते ॥९५॥ स्वर्गाउपपरी महर्लोक । जन, तप, सत्य, लोक । लहान मोठे स्वतंत्र लोक नरक असतींअसंख्य । ९६॥ ऐसें हें ब्रम्हाड सकळ । जन्म विष्णुचे नाभिकमळ । तो ब्रम्हदेव लोक पाळ । स्वामी तयाचा ॥ ९७ ॥ स्वामी एकराहीं ब्रम्हा । त्याची शत वरुषे सीमा । एसे अनेक होती ब्रम्हा । ईश्वर निर्मीं तयाते ॥९८॥ चौकडी एक युगे चार । ऐशा चौकड्या एकाहत्तर । एक होई मंन्वतर । त्याचे प्रमाण ऐकावे ॥९९॥ चौदा मंन्वतराचा एक दिन । ब्रम्हाचा ऐक असे जाण । रात्रीचे इतुके प्रमाण । या एक दिनी पालट चौदा इन्द्रधनु ॥ १०० ॥ पालट होय एकदिन । दिनासी संज्ञा कल्पजान ब्रम्हचाचे तिनसे साठदिन । ब्रम्ह वर्ष संज्ञा तयासी ॥ १ ॥ ऐसीं ब्रम्हवर्षे शंभर उपजी स्थितीं संहार ऐसा करी व्यापार । अंतीं महाप्रलय हो ॥२॥ तदाकरी ब्रम्हेश । भगवत्शरीरी प्रवेश । उत्पत्ति कालीं आवेश । होई नुतन ब्रम्हचाचा ॥ ३ ॥ ऐसी ब्रम्हांड रचना । ब्रम्हदेव आयुर्गना । परिसता आश्चर्य सनातन । विरक्ती उपजवीं ॥ ४ ॥ प्रभो जीवाचे आयुर्मान । अल्प आसता प्रमाण । गर्वताठा आभिमान । धरी मुर्ख पन खचीत ॥५ । माया प्रभावे जीवाचे मूर्खपण । संसार चक्रीं फिरवीं दारुन । कैसे तुटे बंधन । यथार्थ सांगा मजलागीं ॥ ६ । प्रभु वदले सनातन सुटावया भवबंधन । सेवावे श्रीकृष्ण चरण । अन्य साधन नसिचे ॥ ७ ॥ श्रीकृष्ण चरण सेवन । उपाय करावा कथन । जप, तप, दियोगे श्रीकृष्ण । ना कळे अनन्य भजावे ॥ ८ ॥ प्रेमभक्ती लक्षणें । प्राप्त होय नंदनंदन । जयासी दावी आपुले पण । गोपी, सखी भावे लीला करीं ॥ ९ ॥ सखीबनुनि करी क्रीडा । तयासी अनुभव रोकडा । आभिमान धरुनी

वापडा । क्रीडत सिसळे ॥११०॥ तो न पाहोचे कृष्ण पाशी । अनन्य दीन व्हावे तयासी । पुरुषार्थ त्यागूनि, आश्रयासी । अनन्य एक श्रीहरी ॥१११॥ तदा होई अधिकार प्राप्त । मार्ग सर्व सफळ । तोचि ईश्वर सन्निधात । जावया योग्य होतसे ॥ १२ ॥ प्रभो मज करा कथन । कैसे व्हावे अनन्य । भक्तिचा अंकुर हो उत्पन्न । कैसा हृदया माझारी ॥ १३ ॥ अनन्यता प्राप्त व्हावी म्हणुन । त्यांचे सर्वोत्तम उपायन । जडभरत उपदेशीं रहूगण पंचमस्कंधी ॥ १४ ॥

श्लोक :– रहूगणै तत्रपसा न यतिन चेज्यया निर्वपणात गृहाद्वा ।
नच्छन्दसा नैवजलाग्नि सुर्यैर्विना महात्पारदजोऽभिषेकम ॥ ५ १२।१२

जडभरत कथी रहुगणास । दृढ धरावे सत चरणास । त्यावाचूनि भगवत्कृपेस । पात्र नसे साधक ॥ १५ ॥ तप यज्ञ दान । त्यजिले सर्वस्व सदन । न,हो केल्यावेदाध्ययन । जलाग्नि सुर्य सेवने ॥ १६ ॥ श्रद्धेंने साधूचरण । सेवावे नि:शंक अनुदिन । रजमस्तकी करावी धारण । उपाय भगवत्कृपेचा ॥ १७ ॥ साधुसेवे वांचून । भगवत्कृपा जाण । करी वांछा जो अजान । नौकेविण सागर तरे की ॥ १८ ॥ हें त्रिकस्थ करुनि चित्ती । प्रल्हाद बोलें पित्याप्रति । जें कथिले भागवती तयाते परिसा ॥ १९ ॥

श्लोक :– नैषा मतिस्तावदुरुक्रमाङ्घ्रि स्पृशत्यनर्थापगमो यदर्थः ।
महीयसां पारजोभिषेक निष्किच नाना न वृनित यावत ॥ ७।५ ३२

प्रल्हाद वदे हेतात । जेणे विषय सारिले समस्त । चित्तसदा विकार रहीत । परमपुज्यनीय भक्त तें ॥ १२० ॥ त्यांचा चरण सेवे वाचून । वेदवाक्य पुरित बुद्धीजाण । असमर्थ होई करावया गमन । प्रभुचरणा सन्निध ॥ २१ ॥ संतसेवा परीपुर्ण । त्यासीं दिसती श्रीकृष्ण चरण । तत्वदर्शी ज्ञानाचे सेवन । करितां श्रद्धा भक्तिने ॥ २२ ॥ प्रे ठेवूनि चित्ती । सहज स्नेह वाढवी निश्चिती । भगवत्कथा श्रवण प्रीती । बने अधिकारी समर्थ तो ॥ २३ ॥ ये विषयीं भगवद्गी तीं । कृष्णें कथिले अर्जूनाप्राती । ज्ञानी तत्वदर्शी । उपदेशिती । महात्मे जाण तें ज्ञान ॥ २४ ॥ तेथ करणें प्राणिपात । घालावे साष्टाग दंडवत । प्रश्न कपट भाव रहित । सेवाद्वावी श्रद्धेनें ॥ २५ ॥ तोचि उपदेशाधिकारी । देव, द्विज, गुरु चित्ती धरी । भगवन्दवनावरी । श्रद्धा ठेवी असीम ॥ २६ ॥ त्यासी परमार्थ प्राप्ति । प्रभुकृपा होय निश्चिती । सिद्धांत

तत्व दावी तुजप्रति । ध्यानी ठेवी ।। २७ ।। तु मज केले प्रश्न । जीवाचे स्वरुप केले कथन । कर्तव्य तैसे प्रयोजन । सारगर्भित कथियले ।। २८ ।। या सनातन शिक्षेंत । चैतन्य देव प्रकटित । असती दार्शनिक सिद्धांत । तोचि प्रख्यात सर्वत्र ।।२९।। चैतन्य करिती विवरण । सनातना करीं श्रवण । अद्वय तत्व श्री भगवान । राही तयाच्या शक्तिसह ।।१३०। ती शक्ति आणि शक्ति परिणत । वस्तु भेदाभेद संबंध अचिंत्य । तोचि जाणिजे येथ सत्य । श्रवण करी ।३१। जिवत्मा जींव शक्ति विशिष्ट । श्रीकृष्णाचा दासनित्य । श्रीकृष्ण स्वरुप आदित्य । त्याचा किरणकण जिव हां ।।३२। किरण कण नसे आदित्य । परीकणा पासूनि ना विभक्त । तैसा जिव साक्षात । ब्रम्ह वा श्रीकृष्ण नसे ।। ३३ ।। परी तो ब्रम्ह, कृष्णा पासुन । जिव संपूर्ण नसे भिन्न । जिवासि अनादि कालापासून । विस्मरण कृष्णाचे ।। ३४ ।। जिवाचें ईशविस्मृती रुप छिद्र । पाहुनि माया तयावर । आवरण घाली सत्वर । बनवी विक्षीप्त । जिवासी ।। ३५ ।। त्या मायेचा पसारा । जीवा नाचवी संसारा । सुखदुःख अपारा । माया भोगवीं जिवासी ।। ३६ ।। कृष्णाशी अंतरंगा स्वरुपशक्ति । बहिरंगा मायाशक्ति । उभयतटी अवस्थित जिवशक्ति । तटस्थानाम तियेचे ।। ३७ ।। जीव पदार्थ अनुचेतन । चेतन स्वभावेचि पुर्ण । तयाचा स्वाभाविक धर्मजाण । स्वाधिनता, स्वतंत्रता ।। ३८ ।। चेतनांत राही ईछाशक्ति । चेतनांत वसे क्रियाशक्ति । आणिक राही ज्ञान शक्ति । हें अणुअंश पुर्णचेतनाचे ।।३९।। त्या अणुची स्वतंत्रता । अथवा जिवाची स्वतंत्रता । मर्यादित असे तत्वता । ईश्वरपूर्णतः चेतन ।।१४०।। त्याची स्वतंत्रता अमर्याद । मानवी कल्पनेस अबोध । ते स्वेच्छामय स्वराट सिद्ध । मायाबद्ध जिवा न कळे ।। ४१।। श्रीकृष्ण स्मृतिचे ज्ञान । मायाबद्ध जीवा नसे जाण । जिवा वरी व्हावी दया म्हणोन । साधू शास्त्र गुप्त प्रकटवी ।। ४२ ।। शास्त्र, संत, कृपायोगे । जिवास वांछा उपजोलागे । जाणावया लागवेगे । कृष्ण स्वरुप आगळे ।। ४३ ।। भुमिगत पैतृकधनासाठी । ज्योतिषाची घेती गाठी । काजळी लाविती । शेवटी गुप्त धनास्तव ।। ४४ ।। तैसे संत शास्त्र, गुरुद्वारा । प्राप्तवस्तु शोध करी । आपुले, स्वरुप, कर्तव्य विचारी । त्यानुसार वर्ते तो ।। ४५ ।। संत, गुरु शिक्षेनुसार । साधन करी अहो रात्र । श्रीकृष्ण, गुरु कृपापात्र । प्रेम धन मिळे तया । ४६ ।। परम तत्व श्रीकृष्णमुर्ती । ब्रम्ह तयाची अंग ज्योती । जैसा सूर्य ज्योतिर्मय दृष्टि । पडे देखता केवळ ।। ४७ ।। जे सूर्य लोकी करिती वास । सूर्या समिप सहवास । तेचि अवयव युक्त रवीस । जाणति ज्ञाते ।। ४८ ।।

त्यापरी असस्यक दर्शन । श्रीकृष्णाचे झालिया जाण ज्योतिर्मय भासे तन । धारणा तैसी होतसे ॥४९॥ योगी पाहती श्रीकृष्ण । परत्मा रुपे दर्शन । ते श्रीकृष्णाचें आंशिक - दर्शन । वैभव प्रदर्शन केवळ ॥ १५० ॥ कृष्णाची सहजशक्ति । स्वाभाविक अनंत जगति । त्या शक्तिची प्रचिती । प्रसिद्ध असे त्रिविध ॥५१ ॥ प्रथम बहिरंग अचित शक्ति । द्वितीय अंतरंगा चित शक्ति । तृतिय सिमास्थानीं जीवशक्ति । संधीस्थली दोन्हीं शक्तिच्या ॥ ५२ ॥ अचित म्हणजे माया-शक्ति । दृष्य, जड, निर्मी सहक्षती । अंतरंगा प्रभुचित शक्ति भगवद्धाम निर्मी ॥ ५३ ॥ वरी सेवकगण प्रकटती । चित शक्त्याधारें प्रवृत्तीं । जीव समूह निर्मी जिवशक्ति । तटस्थाशक्ति नामे जी ॥ ५४ ॥ ईश, जीव संबंध ज्ञान । त्यासी सज्ञा संमधज्ञान, । ईश 'संबंधी' तत्व जाण । म्हणोनीं । श्रेष्ठत्व तयासी ॥५५॥ ह्दयीं महत् कृपायोगें । नित्य सिद्धभाव प्रकटोलागे । ऐसे साधन करणें लागवेगें । तेचि अभिध्येय जाणिजे ॥५६॥ त्या साधनाचे अंतिमफळ । तेचि जीवाचें प्रयोजन सकळ । तीच प्राप्त वस्तु जाण तत्काळ । सांक्षेपें मिळे ॥ ५६ ॥ श्रीकृष्ण जीव संबंध । नित्य प्रभु सेवक पणें संबद्ध । कृष्ण सुखानुसंधान । सुखप्रद मुख्य अभिध्यय जीवाचें ॥ ५८ ॥ श्रीकृष्णांस सुखीपाहून । स्वयें सुखानुभव करीजाण । हेचि साधन फल पुर्ण । कृष्ण प्रेम प्रयोजन हे ॥ ५९॥ दोन प्रकारे साधन भक्ति । वैधी रागानुभक्ति । त्याचे विवरण । स्पष्ट रीति । परियसी ॥ १६० ॥ करिती शास्त्रानुगमन । कर्तव्य बुद्धि मनी ठेवुन । भगवत्सेस्तव साधन । करिती वैधी भक्ति ते ॥ ६१ ॥ व्रज गोपी गोपगण । श्रीनंद यशोदा जाण । श्रीदाम, सुदामादि सेवकगण । रुमक, चित्रक पत्रक ॥ ६२ ॥ आपुल्या स्वभाविक प्रीतीनें । माधुर्य विग्रह कृष्ण, प्रेमाने । सेविती मनोभावाने । रागतिमका साध्य भक्तिनीं ॥ ६२ ॥ या रागतिमका भक्तित । ज्याची स्वाभाविक प्रींत । अथवा ठेवूनि लोभ हेत । अणुगत होती व्रज वासियां ॥ ६४ ॥ सेवा करुनि कृष्ण । संतोषविती अनुदिन । तीच रागानुगा भक्ति जाण । भक्ति शास्त्री वर्णिली ।६५। प्रथम चित्ती श्रद्धोदय । पश्चात सत्सग हे ध्येय । ठेवूनि करितीं उपाय । चित्त शुध्दीचा ॥ ६६ ॥ सत्सगें हरिकथा श्रवण । कीर्तन भजन गुणानुगाण । करिता श्रद्धा ठेवून । शुध्द चित्त व्हावया ॥ ६७ ॥ तयाच्या कामना वासना । दुर्बलता अपराध नाना । स्वरुप भाति कल्पना । हे अनर्थ नाशिती ॥ ६८ ॥ या अवस्थेची स्थिती । तया नाम अनर्थ निर्वृत्ति । तर्थूनि निष्ठोत्पत्ति । सेवाभाव आम सातत्ये ॥६९॥ सहज सेवा रुचि होये । निरंतर सेवा सक्ति राहे । साधन

भक्ति हिच आहे । वर्णिली येथ ॥१७०॥ येथुनि प्रेमांकुर । भाव उपजे थोर । तोची परिपक्व क्रमवार । प्रेमरुपी प्रकटतसे ॥ ७१ ॥ भगवत्प्रेम प्राप्ति क्रम । हाचि असे अनुपम । ऐसे हे ज्ञान परम । सनातना कथिले ॥७२॥ग्रंथ श्रेष्ठ भागवत । प्रथम स्कंध आध्याय सप्त । दशम श्लोकी उपक्रमात । 'आत्मारामश्च, प्रारंभ ॥७३॥ त्याचा प्राकृती अनुवाद । करी यथा मति विशद । अज्ञान ग्रंथी संबंध । तुटे त्वरे ॥ ७४ ॥ असे आत्माराम मुनिगण । अ है तुकी भक्तिने भगवान । सेविती भावे अनुदिन । गुणखान म्हणोनी ॥७५॥ या श्लोकाचे एकसष्ठ प्रकार । विशद करिती गौरहर । करी ग्रंथ वैष्णवस्मृती शास्त्र । श्रीहरी भक्ति विलासत ॥ ७६ ॥ यापरि ग्रंथ रचना आदेश । देवूनि सुखविले भक्तास । पुनरपि अल्पोपदेश । करिते झाले ॥ ७७ ॥ म्या कथिला भक्ति सिद्धात । दृढ ठेवी हृदयांत तेंवि साधु महात्मे संत । चरणी अनुरक्त असावे ॥ ७१. वाचे निंदा न करी । ईश्वर भावे नम्रता धरी । सकल भुता नमस्कारी । कल्याण कारी तुज असे ॥ ७९ ॥ श्रीहरी भक्ति विलास । ग्रंथ करी हा आदेश । त्याचा सूत्ररुप निदेश । केला ध्यानी धरावा ॥ १८० ॥ ऐकुनि ज्ञान सनातन । देहभान गेला विसरुन । दृढधरी गौरचरण । रोमांच तनीं दाटले ॥ ८१ ॥ केला कृतार्थ भक्त । जो होता हीन मानीत । तया श्रेष्ठत्व जाहले प्राप्त । संतपण संताचे ॥ ८२ ॥ वास्तव्य ठेविला दोनमास । तत्त्वचर्चा चाले हा हव्यास । उद्धरिले सनातनास । श्रवणें हरे अज्ञान ॥ ८३ ॥ श्री. चै, वि ग्रंथरसाळ । म. ली प्रसंग सोज्वळ । सनातन चरित शिक्षा प्रदान मंगळ । कथिले अध्यायीं चौतिसाविया ॥ १८४ ॥ श्री. . वि, ग्रंथ म, ली. प्रसंग सनातन चरित्र शिक्षा प्रधान कथा कथन नाम अध्याय चौतीसावा ओ. सं. १८४ एकुण ४६१३ दि. २८-७-६४ मंगळवार संकष्टी आ. पा व ४।८६

# अध्याय समाप्त

# अध्याय ३५ वा

श्री गणेशायनमः ॥ श्री सरस्वत्यै नमः ॥ श्री गुरुभ्यो नमः ॥ श्रीकृष्ण चैतन्या नमः ॥ जय जयजी कृष्ण चैतन्य । वंदी तुमचे चरण । जेणे मानसीं समाधान । प्राप्त होय ॥ १ ॥ तुम्ही श्रीकृष्णावतार । नाम तुमचे गौरहरि । करावया आले दीनोद्धार । विनम्र स्वभाव नित्याचा ॥ २ ॥ तुम्हा नसे ज्ञानाभिमान । मत्सर दंभ, लोभ ही ना तुम्ही वाहयवृत्ति शुन्य । कृष्ण चरण सेविता । शिष्या व्हावया बोध यतिधर्म आचरिता । शुद्ध ग्रंथ करी विशद । बुद्ध मुक्त तुम्ही ॥ अवतार धारण कर्तव्य पालन । जनास्तव भगवत्सेवन । तुम्हा नसे धर्म बंधन । जनाप्रबोध आचरिता ॥ ५ ॥ तुकाराम संत वचन । तैसे जगी संतजन । अंगी कीया दविती करुन । हेंचि श्रेष्ठपण तयाचे ॥ ६ ॥ तोचि अध्यायीं कथन । केले श्रोतया लागून । यास्तव द्यावे अवधान । प्रार्थितों ॥ ७ ॥

श्लोक :– आराध्यो भगवान व्रजेशतनयस्तद्धाम वृंदावनं । रम्या काचिदुपासना व्रजवधूवर्गेण या कल्पिता ॥
श्रीमद्भागवत प्रमाण ममल प्रेमापुमर्थो महान । श्री चैतन्य महाप्रभोर्मतमिद तत्राग्रहो नावर ॥

पूजेसी योग्य भगवान । व्रजेशतनय, कृष्ण नंदन । त्याचे धाम वृंदावन । पावन करी जीवास ॥ ८ ॥ गोपिकांनीं जी कल्पित । तिचि रम्य उपासना उचित । प्रमाण भागवत ग्रंथ । निर्मळ प्रीत उजरी ॥ ९ ॥ श्री चैतन्य प्रभुमत । स्पष्ट असे लौकीकांत । इतर आग्रह व्यर्थ । निश्चित उद्धार जिवाचा ॥ १० ॥ चैतन्य संप्रदाय लक्षण । संबंध अभिधेय प्रयोजन । उपासना त्रिपुटी जाण । प्रेमानुसंधान वाढवी । ११ ॥ संबंध उपास्य भगवान । अभिधेय हेचि प्राप्तीसाधन । गोपी द्वारा आचरण भक्तिचे ॥१२॥ जाणिजे साध्य प्रयोजन । प्रेमप्राप्ति व्हावी तुर्ण । त्याचे प्रत्यक्ष प्रमाणे सनातने । आचारे दाविले ॥ १३ ॥ सनातनाचे अद्भुत चरित । भक्तिप्रेमामृते भरित । तो प्रसंग अल्पयेथ । वर्णिला ॥ १४ ॥ अंतरंग प्रभु भक्त । सिद्धांत भक्ति सहित । आचरणीं होत ख्यात । सनातन ॥१५॥ गोपीचें जैसे आचरण । तेचि साधन मनीं धरुन भगवत्प्रेम प्रयोजन । तैसे वर्तनी ॥ १६ ॥ भगवच्चरणीं भाव । सर्वस्व अर्पिती सदैव । प्रेमाधीन देवराव । गोपीभाव सर्वथा ॥१७॥ व्हावे जीवन सार्थक । प्रेमप्राप्ती अलौकीक । आधीन सदा यदुनायक । गोपीका मानिती वर्म हे ॥ १८ ॥ उपास्य गोपाळ कृष्ण । तयाची प्राप्ति सुलभ जाण । परिप्रेमानुदान । भाग्ये मिळे ॥ १९ ॥ भगवत्प्राप्ती सुलभ

परी प्रेमप्राप्ती दुर्लभ । गोपि प्रेम मणि कौस्तुभ । झाला लाभ सनातना ॥ २० ॥ मुखी वसावें भगवन्नाम । अंतरी दुणावे प्रेम । संसारी वाढे संभ्रम । नाम निर्मम करितसे ॥ २१ । भक्तिने मिळे भगवंत । तोडपास्थ दैवत । चित्तीं भक्ति प्रेमउपजवीत । साध्य तेचि भक्ताचे ॥ २२ ॥ सनातने प्रभु सन्निध । राहूनि केले इष्ट साध्य । भक्तिप्रेमे झाले सिद्ध । प्रबोधे कृपापात्र तेधवा ॥ २३ ॥ गुर्वाज्ञा मानिती प्रमाण । वृंदावनीं जाती सनातन । प्रेमास्पद गोपालकृष्ण । एकांतीं सेवितीं ॥ २४ ॥ मथुरा तेथूनि योजन । माधुकरी आणिती एकदिन । ते पवित्र अन्न । चारदिन सेविती ॥ २५ ॥ इंद्रिय निग्रह करावया । तप: सामर्थ्य वाढवावया । येण रीती रसनेंद्रीय । बासर सेवूनि कष्ट सेविती ॥२६॥ राजयाचा प्रधान । सेवि संतोषे भिक्षान्न । भक्तिप्रेमा वाढे अनुदिन । आचारण नित्याचे ॥ २७ ॥ मथुराग्रामी द्विजश्रेष्ठ । परशुराम चोभे निर्मळ । मदन मोहन सेवा प्रांजळ । भक्तिने करी ॥ २८ ॥ बाल स्वरुप करुनि धारण । मुलामाजी रमेकृष्ण । दरिद्री एकाकी पुत्र जाणुन । ब्राम्हण सुतापरी वागवी ॥२९॥ ऐसें लोटती कैक दिन । परधामी गेला ब्राम्हण । देहाचे सार्थक करुन । भगवत्प्रेम मेळविले ।३०। वैधव्य दुःख दारुण । श्री सेवीं मदन मोहन । चालवीं नित्य उपासन क्लेशनिरसन व्हावया ।।३१।। स्त्रीस वाट पोरका बालक । मुलात रमे अहैतुक । कृष्ण करी गृही कौतूक । न कळें जवळींक तयाची।३२। मुलास घाली भोजन । प्रेमे लालन पालन । ऐसे लोटती बहुतदिन । मदन मोहन भक्ति चालवी ॥ ३३ ॥ भिक्षेस येती सनातन । रमता दिसे बाळकृष्ण । ब्राम्होपदी गेले भुलून । समाधी जाहले ॥ ३४ ॥ उपास्त बाळकृष्ण । सन्निध पाही सनातन । पोरका बालक इतर जन । मानिती तया ॥ ३५ ॥ स्त्रीस न कळे देवादिदेव । मदन मोहनीं तिचा भाव । बालक रुपे रमे भव्य । अगाध लीला हरिची ॥ ३६ ॥ स्त्री नित्य देख भिक्षेकरी । उभा राही दिवसभरी । बालकें क्रीडती नानापरी । कौतुक पाही ॥ ३७॥ स्त्री मनी विचार करी । अपेक्षी तनय भिक्षकरी । आपणास ही उपाधी भारी द्यावा तयासी ॥ ३८ ॥ भिक्षेस आले सनातन । तयास स्त्री करी नमन । बाबाजी बालक अजाण । दिधला तुम्हाप्रति ॥ ३९ ॥ सुखे बाल ण्यावा सदनी । आम्हासी घोर म्हणूनि । मुक्त जाहलो ऋणांतुनि । कारण अजाण सत्य हें ।४०। म्हणोनि हस्ते दिधला बालक । तो काय घडलें कौतुक । बाल मूर्ति होऊनि देख । लीला दावी जनास ॥ ४१ ॥ तें मदन मोहन । निघोन गेले सदनातून । मूर्ति घेऊनि सनातन । कुटींत पातले ॥ ४२ ॥ मूर्तीची केली स्थापना । शुष्क

भिक्षा आणूनि सदना । बाटी करुनि निवेदना । भोग लाविती ॥४३॥ ऐसे लोटले बहूत । दिन देवे कथिले एक दिन । ऐके भक्त सनातन । क्लेश दारुनि मजसी हो ।४४। सुकी बाटी खावयासी । योग्य वाटे काय तुजसी । सवें अल्प लावणासी । देता त्यांसी रुचिये ॥४५॥ भक्ति प्रेम चित्ती पुर्ण । देवासी वदे सनातन । तुम्ही केलें निवेदन । मान्य नसे मजलागी ॥४६॥ आपणास नैवेद्य अर्पण । तोचि मजलागी खाणें । आपली मनिषा पुर्ण होणें । कठिण जाणा, मज स्त्री हे ॥ ४७ ॥ आज मागितले लवण । उदयी व्हावे मिष्ठान्न । भक्ति केंवि निग्रहाबिण । मज घडे ॥ ४८ ॥ निग्रहेंविन ईश भजन । ते केवळ बक ध्यान । मज न रुचे कालापहरण । भजण अंतरे ॥ ४९ ॥ निश्चयी भक्त वचन । स्वस्थ होती मोहन । सनातन करिती आराधन । पावन आदित्य टिलास्थली ॥ ५० ॥ यमुना पुण्यशिला । सन्निधीं आदित्य टिला । आराधन चाले सिध्द स्थला । वृत्तींशुन्य होती निरंतर ॥ ५१ ॥ मनामाजी आणि मोहण । तृण कुटीं राही सनातन । हे मज उचित न । नवल करी तेधवा ॥ ५२ ॥ नौका धनी वैश्य मुलतानी । रुधली न निघे यमुनेतुनि । नौकेसह माल बुडे भितीमनी । आक्रंदे कंगाल जाहलो ॥ ५३ ॥ सन्निध देखिलें सनातना । त्यासी करी प्रार्थना । माझी नौका बुडवि यमुना । वाचवा विनंती चरणासी ॥ ५४ ॥ तुम्ही समर्थ दिनानाथ । मी सर्वस्वी अनाथ । संसारीं ममता दुःख ग्रस्त । सत्पथ दाखवा ॥ ५५ ॥ ऐकुनि वैश्याचे दीनवचन । मी असे कीकर दिन । कुटीं भगवान करी याचना । करी पुर्ण इप्सित ॥ ५६ ॥ संतवचनें विश्वासूनि । ईशा प्रार्थी मुलतानी । चालवी नाव, रुधली यमुनी । या स्थानी मंदीर बांधीन ।५७। नौका सुरक्षित गाठी तीर । धन वेची करी उपचार । वचने अभ्दुत चमत्कार । नांव येयी अैलतीरी । धन रक्षिलें आनंदे अपार । भव्य उभारी मंदीर । वैभव ओतले अपरपार । अलंकारें मोहन शोभला ॥ ५९ ॥ तीन त्रिकाल होई पुजन । नैवद्यासी पंचपक्वान्न । दाटले अमित भक्तजन । संकीर्तन चाले सतत ॥ ६० ॥ भरला भक्त बाजार । विविध होत उपचार । तेणें वृत्ति अस्थिर । एकांत भंगे ॥ ६१ ॥ सनातनें त्यजिले स्थान । त्वरे गाठिले वृंदावन । सुरम्य द्वादशवन । चित्त प्रसन्न त्याठायीं ॥६२॥ केला एकांत वास । हो बाह्य वृत्ति निरास । चित्ती कोंडीले मोहनास मुखीं नाम घोष उच्च स्वरे ॥६३॥ ऐसे लोटता बहूत दिन । मंदिरी उवगेमदन मोहन । भक्ता सन्निध येवून प्रेमलिंगन दिधले त्या ॥ ६४॥ मजसी न रुचे पक्वान्न । बाटींत माधुर्य पुर्ण । भक्ती भावे करिसी अर्पण । तेणें समाधान होतसे

॥६५॥ मंदिरीं यावे ऐसी वासना । ऐके वा सनातना । पूर्ण ना हो भजन कामना । त्याविना प्रेमा कैचा मिळे ॥ ६६॥ भगवंत भक्तीनें मिळे । परीभगत्प्रेम आगळे । आश्चर्यास्तव भजन त्यजिले । प्रेम कैचें लाभेल ॥ ६७ ॥ देवापासाव प्रेमा श्रेष्ठ । हेचि सांप्रादय वैशिष्ठ । गुरुकृपे लाभले स्पष्ट । तेणें कष्ट चुकले कीं ॥ ६८ ॥ न रुचे मंदिर धन वैभव । तेणें तुटेल माझा भाव । संकटी न घाली सदैव । चित्ती वास्तव्य तुसेचि ॥ ६९ ॥ तु येथ वास्तव्य करिसी । तेथ कष्ट होती भक्तासी । तें दुःख होय मजसी । यास्तव सकलासी तोषवी ॥७०॥ प्रेमे मंदीरीं वसावे । भक्तजना तोषवावे । तेने मम प्रेमादुणावे । हेचि करि त्वरें वा ॥ ७१ ॥ भक्ताचें निस्पृह वचन । ऐकुनि तोषे मोहन । देवूनि प्रेमवरदान । गमन केले स्वस्थानीं ॥ ७२ ॥ ऐसा प्रेमभाव उत्कट । आचारे शिकवी जना स्पष्ट । संकीर्तन महिमा श्रेष्ठ । तेणें पापिष्ठ उध्दरे ॥ ७३ ॥ ऐसा सनातन कथा प्रसंग । भावे कथिला सांग । श्रवनें चुकवी लाग । कली काळाचा ॥ ७४ ॥ तैलंग देशी प्रथित । श्रीरंग क्षेत्र विख्यात । सन्निध बलगंडी ग्रामात । वेंकट भट्ट वास करी ॥७५॥ वैष्णव सांप्रादायी भक्त । दक्षीन यात्रा मार्गात । चारमास भट्ट सदनात । भक्तभावे केले वास्तव्य ॥ ७६ ॥ पुनीत केलें भट्टसदन । पुत्र गोपाल सेवी प्रभुचरण । सेवे तुष्टले चैतन्य । कृपा केली तयावरी ॥ ७७ । पितयाच्या मरनोत्तर । प्रभु आज्ञे वृंदावनी जाईसत्वर । राधारमण जीवण जन्मभर । मानी, सेवी सद्भावे ॥ ७८ ॥ गोपाल चुलते प्रकाशानंद यति । संन्यासीं पंडित ख्यात जगती । गोपाल भविष्य वर्तविती । विद्वत्त ख्याती जनी हो ॥ ७९ ॥ तेणें गोपालावरी यति प्रीत । स्वामीसीं कळे वृत्तांत । वंगीय साधूसंगती । वर्षकाल घालवी ॥ ८० ॥ त्यजिले पठण पाठण । कालाप हरणें, दुःखदारुण । वादकरावा सादु लागून । प्रकाशनंदा मनी ये ॥ ८१ ॥ साधु भुलवी गोपालास । त्यानेचि सार्वभौम झाले विवश । पंडित श्रेष्ठ मानिती ईश । जिज्ञासा वाढे भेटीची ॥ ८२ ॥ काशीं पुरीत सर्वमान्य । प्रकाशनंद पंडितमन्य । सन्यासी सकला सन्मान्य । यति श्रेष्ठ मानिती ॥ ८३ ॥ पांडित्य नाज्ञानी युवक चैतन्य । करिती हेय दीक्षा ग्रहण । अनोखा भेटतां उनेंपण । अहृता मनीं घरकरी ॥ ८४ ॥ जाणूनि श्रीपादाचे थोरपण । प्रभु संकोचे वाद आवर्जुन । टाळींती, न हो उभय मिलन बुद्धि पुरःसर ॥ ८५ ॥ सर्वज्ञत्वाचा न हो बहुवस । काशींत शेखर गृही निवास । वर्जिले भिक्षा, श्रमनास । विश्वनाथ दर्शन नित्याचे ८६ गंगा, स्नान, पान, भोजन । तपवनगृही सकीर्तन । जपचाले अनुदिन । भक्त जाणें प्रभुत्व प्रभुचें ८७

प्रकाशानंद करिती विचार । भेटी न दे असोनि अदूर । विलक्षण दिसेयतिवर । यति सभेसीं कदानये ॥ ८८ ॥ परीदेवा सम आकर्षण । जैसा भासे पुरुषोत्तम । मठा सन्निध मराठा ब्राम्हण । राही प्रभुभक्त भाविक ।८९। करी मठी प्रभुगुण गान । श्रवने क्रोधे उमळे स्वामीं मन । ब्राम्हण बोले हे स्वामीन । ईशप्रिती भाजन चैतन्याकीं ॥ ९० ॥ चैतन्यावाणी परम कारुण । दर्शने होय आकर्षक । करावी तनु अर्पण । संकीर्तनीं मुर्छना नित्य ये । ९१। तन्मय वृत्तिकृष्णा गाती । यतिरमे नाम स्मरणीं । ऐसा अधिकार त्रिभुवनीं । देखिला ना यकिला ॥ ९२ ॥ श्रवणीं पडतां प्रभुस्तवन । अहंभावे हो स्वामि भाषण । काशींत असामान्य विद्वजन । गान नर्तन चले कीं ॥ ९३ ॥ तत्वज्ञानाचा अवमान । क्षेत्री न चाले भजनगान । वेदांत चर्चा शास्त्र विवरण । ज्ञानेंविण येथ तगणें नसे ॥ ९४ ॥ श्रवणीं स्वामीचें ईर्षावचन । ब्राम्हण मनीं होय खिन्न संन्यास ग्रहणीं अभिमान । उणेपण लांछन वैराग्या ।९५। द्विजें केलें वृत्त कथन । परिप्रभुचे स्थिरमन । नच लेतयादुर्लक्षुन । वृति शुन्य होती ॥ ९६ ॥ शेखर तपना कळें वृत्त । प्रभुचें दावावे सामर्थ्य । द्विजें केलें निमंत्रित । सकल यतिस भोजनां ॥ ९७ ॥ प्रभुसि केले पाचारण । पवित्र करावे ममसदन । निमंत्रिले सारे यतिगण । आनुष्ठान पुर्ण व्हावया ॥ ९८ ॥ मानिले, केवळ भवत प्रेमी । सकल स्वामी पातले द्विजधामीं । सत्कारीलें प्रेमें संधीं । प्रकाशानंदासह ॥९९॥ शास्रार्थ करिती परस्पर । तत्काळ येतो गौरहर । पाद प्रक्षलेंले सत्वर । नमिले यतिवर संकोचें ॥ १०० ॥ तेजोमय श्रीकृष्ण चैतन्य । स्वरुप देखिले झालें धन्य । दिधले यतिवर्यें उत्थान । त्यजिले आसन सभ्दावें ॥ १ ॥ तेजस्वि यतीस देखून । स्वामी नंदजी गेले मोहुन । मध्यभागी देऊनि उच्चासन । शचि नंदन गौरविले ॥ २ ॥ सुकुमार तनु युवक यति । रुप लावन्य तेजस्वी कांती । नसे मानापमान खंतीं । शास भागवतीं बोलाविले ॥ ३ ॥ स्थानापन्न झालीयावर । प्रभुसी पुसतीं यतिवर । प्रकाशानंद तत्पर । गार्‍हाणे सत्वर मांडिले ॥ ४ ॥ प्रथम काशी वासास । आला प्रभु त्या समयास । मज न भेटता वृंदावनास । केला वास ते वेळा ॥५॥ साधूचे संग्रही साधू । असता मठाचा सबंधू । वास्तव्यास काय बाधु । केला विरोध तयाचा । ६ ॥ आम्हा न येता भेटावयास । गृहस्त गृही केला वास । मजविषीं आत्मीय तेस । बाध येई कासया ॥ ७ ॥ प्रभुजीचे नम्रवचन । आपण थोर गुरुजन । मी अल्पज्ञवरी सान । कैसे वदन दाखवू ॥ ८ ॥ श्रीपाद बोलती वचन । आपण संन्यासी अनोन । करिता कीर्तन नर्तन । शास्त्र बाह्य वाटतसे ॥ ९ ॥ करुनि भिक्षान्न भोजन ।

करावे चिंतन वेदांत श्रवण । प्रभाव देखता साक्षात नारायण । हीनपण कासया आठवे ।। ११० ।। मी अनधिकारी पुर्ण । माझिये पदरीं मुर्खपण । जाणूनि करितीं कथन । शासन केले गुरुदेवे ।। ११ ।। मंत्र दिधला श्रीकृष्ण । करावया हरी गुणगान । कलीयुगी नसे सुलभ साधन । भवनाशन करी सदा ।। १२ ।।

श्लोक :– हरेर्नाम हरेर्नाम हरेर्नामैव केवलंम । कलौनास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ।। १३ ।। नामे विन अनन्य गति । नसे संप्रती कली युगी । कलियुगी कृष्णनामे संसारी मुक्ति । नामे होय चरण प्राप्ति ।। १४ ।। सकल मंत्राचे सार । कृष्ण नाम असे अपार । हाचि धर्म निरंतर । शास्त्रमर्म नाम हें ।। १५ ।। धरी वेदान्ता भिमान । हरिनाम मानी सामान्य । तो अनधिकारी जाण । वेदान्त सार हरिनाम ।। १६ ।। वेदमंत्राचें आदिअंन्ती । प्रणव व्यवहार पडे दृष्टि । वेदांत सूत्रीं हीची रीती । शद्ब ब्रम्हराही प्रणव ।। १७ ।। वेदांताचे फल पाद । प्रथम सूत्र ‘उ’ विशद ‘आवृत्ति रसक्रदुप देशात ,। केला विस्तार तयाचा ।। १८ ।। वेदांतांचें फलपाद । अंतिम सुत्र ‘उं’ विशद । ‘अनावृत्ति शद्वात्’ । विस्तार केला तयाचा ।। १९ ।। रसशद्वे शद्वब्रम्ह । हेचि जाणा श्रीनान । निरंतर आवृंत्ति सुगम नेमे तयाची संसारी ।। १२० ।। नामद्वारा आवा गमन । मुक्ति हें अनावृत्ति लक्षण । हेचि सुत्राचे कथण । भवबंधन तुटे उपदेशें ।। २१ ।। मंत्रद्वारा संसार मोचन । नामद्वारा नंदनंदन । प्रेमप्राप्ति अनुदिन । जीवा बधन नसेचि ।। २२ ।। चैतन्य चरितामृत ग्रंथ । प्रेमास्पद कथि तेथ । जीवाचा परम पुरुषार्थ । श्रीकृष्ण प्रेम भक्त असे ।। २३ ।। असतां श्रीकृष्ण प्रेम भक्ति । चारि पुरुष.र्थांची नसे क्षिति । भक्त तृण सम मानिती । पंचमपुरुषार्थ सत्य तो ।। २४ ।। प्रेमानंद अमृत सिंधु । ब्रम्हानंदादि एक बिंदु । श्रीकृष्ण प्रेम भक्ति विशुध्दु । मोदु देतसे भक्त जना ।। पुढति प्रभुवचन । वेदांत संमत लक्षण । तेणें होय समाधान । यतिवर्पाचे ।। २६ ।। वेदांत शास्त्री ब्रम्हशद्व । सविषेस स्वरुप अर्थसिद्ध । भगवा न्निर्देश प्रसिद्ध । केला असे ब्रम्हाचा ।। २७ ।। ब्रम्ह स्वरुप भगवद्वाचक । जीव तत्व शक्तिसचूक । कृष्ण तत्व शक्तिमान बोधक । अतिसूक्ष्म स्वरुप जीवाचे ।। २८ ।। आग्निपासूनि ठिनगी जैसी । अति सूक्ष्म पडे दृष्टिसी । जीव स्वरुप स्थिती तैसी । पराकाष्ठा सूक्ष्माची ।। २९ ।। भगवन्नाम रुप गुण । लीला धाम प्राकृत सगुण । मानी हे व्यावहारिक पण । जाण निश्चित नास्तिक तो ।। १३० ।। शक्ति परिणाम वाद वेदांतीं । स्वीकृत केला निश्चिती ।

देऊनिया दृष्टान्ती । श्रोतया सत्य उमजे ॥ ३१ ॥ चितामणि रत्न हातीं । प्रसवे सुवर्ण नाना भांति । तैशी अचित्य ईश्वर शक्ति । प्रसवे जडजगत् ॥३२॥ चिंतामणि विकार रहित । अचित्यशक्ति अविकृत । ईश्वराची राही सत्य । शास्त्री मत प्रमाण हे ॥ ३३ ॥ वेदवृक्ष प्रणव बीज । हेचि महावाक्य जाणिजे । तेंचि ईश्वर स्वरुप सहज । शास्त्राधारें वर्णिले ॥ ३४ ॥ केवळ निविशेष भगवान । हे अर्धे ईश्वर स्वरुप जाण । सविशेष स्वरुप भगवान । नित्या शक्ति सहित तो ॥३५॥ स्वरुपानु बंधिनी नित्या शक्ति । सहीत राही भगवत् मूर्ति । सविशेष स्वरुप हेचि निश्चिती । पूर्णत्व हे जाणिजे ॥३६॥ शक्ति विण भगवान् । तयाचे अर्धे स्वरुप जाण । पुर्णत्व मानो, हे अप्रमाण । म्हणोनि शक्ति सहित तो ॥३७॥ ऐकोनि वेदान्त तात्पर्य वचन । यतिवर पावे समाधान । प्रभु सामर्थ्य, ज्ञान । प्रत्यया आले ॥ ३८ ॥ ऐकिला प्रभुचा शास्त्रार्थ । स्वामी होती आश्चर्ये चकित । पश्चातापे दग्धचित्त । दशा अभ्दुत देखिली ॥ ३९ ॥ तनु अष्ट सात्विकभाव युक्त । भावावेशे हरि हरि गर्जत । ज्ञानाचा अहंकार व्यर्थ । वस्त्र संभार शरीरीं १४० ॥ विकृत चित्त, मिटावया अज्ञान । यतिरुपे येतीं नारायण । प्रभुमुर्ती हृदयीं ठेवुन । स्वामीं निर्मळ जाहले ॥ ४१ ॥ वाहय दशे येती चैतन्य । सकल यतींचे झाले भोजन । सकल जाती आपुल्या स्थानीं । तोष मनीं द्विजाच्या ॥ १४२ ॥ दुसरें दिनीं गंगास्नान । करुनि निघाले चैतन्य । द्विज करी वृत्त कथन । तापे पोळे स्वामी तनु ॥ ४३ ॥ आपुली माया अपार । निंदी अहंकारे यतिवर । परि बालक सदृश अपार । तापे करी रुदन ॥ ४४ ॥ गाढा वेदान्तभिमान । ज्ञान ताठा कठिण । असतां त्यजिले पठन पाठन । चैतन्य चरण चित्ती ॥ ४५ ॥ भगवंताचे दयाळुपण । दयेची पाखर घाली पुर्ण । करुनिया प्रेमदान । भगवान केला आपुलासा ॥ ४६ ॥ इतुके केलें कथन । गौरहर गेले तेथुन । घेती बिंदु माधव दर्शन । पाहता भाव प्रकटला ॥ ४७ ॥ भावे करिती नृत्य । भक्त देतीं तयासाथ । वाहय ज्ञान शुन्य होत । दर्शनार्थी मिळाले ॥४८॥ संकीर्तन मधूर ध्वनी । स्वामी पातले पडे श्रवणीं । रमले स्वयें पद्यगानीं, ध्यानी मनीं चैतन्य ।४९। वाहयदशा हो प्राप्त । संपविलें गायन नृत्य । तो स्वामी प्रणाम करित । असतां, देखनि चैतन्य ।१५०। कासया मज नमस्कार । मी असे दीन पामर । पाप चढविता मजवर । वंदनीय मजलागी ॥५१॥ स्वामी वदले वचन । पुर्व कृत पापक्षालन । करी केले निंदा व्यंजन । परिमार्जन असे तयाचे ॥५२॥ या परी बहुभाषण । झालीया केले गृही गमन । सुर्यास्ती पुन्हा गमन । येति प्रभु सन्निधीं

॥ ५३ ॥ स्वामी करिती साष्टांग नमन । परमार्थीं मी अनाभित । कार्य हेतु लोक कल्याण । कर्तव्य कथन करावे ।५४। वा! श्रीकृष्ण प्रेमोपलब्धि । हिच पुरुषार्थ सिध्दि । प्रभुपदी प्रीती हा अवधी । साधी अंतिम फळ हे ॥ ५५ ॥ ईशचरणीं अनुसंधान । ठेविता होय तो प्रसन्न । स्विकार करी आपुला म्हणोन । त्रीद पुराणीं वर्णिले ॥ ५६ ॥ कृतार्त केले प्रकाशा नंद । नामे ठेविले प्रबोधानंद । भागी संकीर्तन आनंद । वृंदावनीं ॥ ५७ ॥ प्रभु आज्ञा शिरोधार्य । मानूनि निघाले यतिवर्य । त्यजिला शिष्य सप्रदाय । द्रव्य मठादी सर्वही ॥ ५८ ॥ वास्तव्य केले वृंदावनी । काल घालवी चिंतनीं । मधूर भावे दिन रजनीं । जिवन चरणीं अर्पिले ॥ ५९ ॥ काव्य गानीं कालव्यतित । श्री चैतन्य चंद्रामृत ग्रंथ । श्रीं वृंदावन रसामृत । लोकी प्रथित असती हे ॥ १६० ॥ श्री वृंदावन शतक ख्यात । श्री राधारस सुधानिधी ग्रंथ । चैतन्य चरणीं अतिप्रित । कृतकृत्ये काव्य जाहले ॥ ६१ ॥ पवित्र भुमि वृंदावनीं । कालिया दमन सन्निधानी । पांच भौतिक तनु त्यजूनि । ईश्वरचरणीं मीनले ॥ ६२ ॥ ऐसे चरित्र रसाळ । तुम्हा कथिलें सकळ । भक्ति प्रेम कवळ । घालवया मुखी ॥ ६३ ॥ चैतन्य चरित श्रवण । करी अहंकार जाई गळुन । द्रव्य प्रतिष्ठा दंभ, मान । अलिप्तपण तया ये ॥६५। परिसा कथा सुरस । भक्ति प्रेम मधूररस । चाखवि भाविकास । प्रभु चरणी कास धराया ॥ ६५ ॥ श्री. चैं वि. ग्रंथ रसाळ । म. ली. प्रसग सोज्वळ । प्रकाशनंद चरित मंगळ । पसतीसाध्यायीं । कथियले ॥ ६६ ॥ श्री. चै. वि. ग्रं म, ली. प्रसंग । प्रकाशानंद । चरित्र कथन नाम अध्याय पसतीसावा समाप्त (३५) ओ. सं. १६५ एकुण संख्या ४७७८

दि. २९-७-६४ बुधवार आ. व. ५ शके १८८६ या पुढे अंत्यलीला सुरु झाली

## अध्याय समाप्त

# अध्याय ३६ वा

तुम्ही संत मायबापा । दीनावरीं कराकृपा । आचारे भक्तिमार्ग सोपा । करुनि ठेविला ॥ १ ॥

श्री गणेशायनमः॥ श्री सरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः श्रीकृष्ण चैतन्याय नमः ॥ रामावतारी वानर गण । जन्मे होती जातीहीन । त्यासीं उद्धरिले तत्क्षण । कृतार्थ करुनि ठेविले ॥ २ ॥ ज्ञानदेवें कौतुक केले । रेडया करवी वेद वदविले । तैसे श्वाना करवी घडविले । 'हरिबोल, चैतन्य ॥ ३ ॥ संतांचे अनंत उपकार । होती भक्त जनावर । त्यापरी श्वान, जनावर । सत्वर कृतार्थ केले त्या ॥ ४॥ तो अद्भुत कथा प्रसंग । श्रोतया कथितो सांग । चित्त द्यावे लाग वेग श्रवणास्तव ॥५॥ गौंडदेशा धकारीं । सुबुद्धिराय नामे थोर । तयाचा हुसेन कर्मचारी । बांधकामी निरीक्षक नेमिला ॥ ६ ॥ तलावाचे खोदकाम । तेथ नेमला मुकादम । ढीलाईने केले कर्म । शिक्षा केली तयासी ॥ ७ ॥ पृष्टि फटके मारिते । बहुतकाल चिन्ह राहीले । दैवे राज्य पद मिळालें । हुसेन जाहला अधिकारी ॥ ८ ॥ मागिल वृत्त ध्याना आनिले । सुबुद्धिरायासी बाटविलें । रायेपंडितां विनविले । प्रायश्चिता स्तव ॥९॥ काशीक्षेत्रीचे पंडित । राजया देती प्रायश्चित । उकळीलें घृत प्यावे त्वरित । त्याग करावा देहाचा ॥ १० ॥ रायहोई अति:दुखित । तें समयीं प्रभु काशित । सकळ निवेदला वृत्तांत । शरण जाई चैतन्या ॥ ११ ॥ श्रवणीं पंडिताचा निर्णय । प्रभुस वाटे आश्चर्य । येथ कल्याण संभव काय ? । यास्तव उपाय कथियला ॥ १२ ॥ निरंतर नाम सकीर्तन । नामा भासें पापनाशन । प्राप्ति होती कृष्ण । कृष्णस्थान होय वास्तव्या ॥ १३ ॥ महापाप प्रायश्चित । कृष्ण चरणीं ठेवी चित्त । राये मानिले त्वरित । घालवी चरण जींवित वृंदावनीं ॥१४॥ येणें रीती रायें जिवदान । देऊनि करितीं गमन । जगन्नाथ पुरी लागून । निलाचली ॥१५॥ मागिल कथानुसंधान । पंडिताचें होय परिवर्तन । काशी निवासी सज्जन । येती दर्शना ॥१६॥ वेदान्ती पंडित शास्त्रार्थ । करावया प्रभुसह ईच्छित । घाली तयाची समजून शास्त्रार्थ । मज ना कळे ॥ १७ ॥ सकळ शास्त्र सार । चरचरी असे ईश्वर । त्याचे करावे ध्यान सत्वर । परिहार होय दोषांचा ॥ १८ ॥ ऐकुनि पंडित निरुत्तर । त्यजिती शास्त्रार्थ विचार । ईशचरणीं निरंतर । श्रद्धा निर्भर ठेविती ॥ संसारिक गोष्टीचे श्रवण । तेणें उबगं प्रभुमन । श्रीकृष्ण कथे वाचून । आन्य भाषन ना रुचे ॥ २० ॥ टाळावा जन संपर्क । एकांताचे व्हावे सुख । पुरी जावया उत्सुक । झाले, भाविक दुःखद

॥ २१ ॥ सनातन बोलें वचन । आज्ञा द्यावी मज लागून । कर्तव्य द्यावें उमजवून । मार्ग क्रमण तेणें होय ॥ २२ ॥ वृंदावनी बंधू श्रीरुप । राहावे त्याच्या समिप । लुप्त तिर्थ उद्धार संकल्प । लीला अमूप प्रकटवी ॥ २३ ॥ तुम्ही उभय विरक्त । पंडित मर्मज्ञ कवि होत । अप्रकट लीला प्रचारार्थ । ग्रंथ निर्मावें भक्तिचे ।२४। तुम्ही जे ग्रंथ कराल जगी ठरतो अमोल । जन कल्यान साधे विपुल । जाणा फल तयाचे ॥ २५ ॥ सनातन बोले वचन । मी असे अधमहीन कार्याचे हें थोरपण । मज करवी कैचे घडे ॥ २६ ॥ मी असे केवळ यंत्र । तेणें गुण परतंत्र । यंत्रीं चालवी तैसे यंत्र । घडे, स्वतंत्र केवीं हो ॥२७॥ तेथ माझा नसे पुरुषार्थ । केले कार्य हो व्यर्थ । प्रभु बोलती स्पष्टार्थ । माझे कथित सत्य की ॥ २८ ॥ तुम्ही व्हावे कार्य प्रवृत्त । श्रीहरी प्रेरणा निश्चत । हृदयी शक्ति संचार त्वरित । करवी, सत्य मात ही ॥ २९ ॥ श्रीकृष्ण लीलेंचे स्पुरण । होई सत्य माना वचन । तुमच्या हृदयीं प्रकटून । ग्रंथ लेखन करवी तो ॥ ३० ॥ सनातनासी समजाविलें । वृंदावनीं जावया आज्ञापिलें । स्वये प्रस्थान ठेविलें । पूरी जावया ॥ ३१ ॥ मार्गी क्वचित । भिक्षान्न । प्रसंगी खावे लागे कदन्न । कदा होय फला स्वादन । करुनि ठेवी बलभद्र ॥ ३२ ॥ नित्यनाम संकिर्तन । । उच्चस्वरे उच्चारण । रामराघव कृष्ण केशव स्मरण । येणें पंथ क्रमिती तै ॥ ३३ ॥

भजन :– रामराघव, रामराघव, रामराघव रक्षमाम् । कृष्ण केशव कृष्ण केशव, कृष्ण केशव पाहिमाम् ॥

निजनवनीं मार्ग बिकट । प्रखर निदाघ अतिकष्ट । तृषा लागली अति उत्कट । घोट ना मिळे उदकाचा ॥३४॥ मार्गी जाता गोप पुत्र । मस्तकी घेऊनि मृत्तिका पात्र । पितयालागी द्यावया तक्र । जातां त्वरे देखिला ॥ ३५ ॥ वदले प्रभु तया लागून । मजसी तृषा लागे दारुण । तृप्त करिवा तक्र देऊन । विद्धाम न जाहले गोपाचे ॥ ३६ ॥ गोप पाचारी गौरहर । तक्रे तृप्त करीं यतिवर । प्रेमदान केला उद्धार । पुरी सन्निध पातले ॥ ३७ ॥ ध्वजासी नमस्कारित । पुरित येती शचिसुत । वार्ता कळतां गौड भक्त । दर्शना येती सत्वर ॥ ३८ ॥ मार्गी भक्त शिवानंद सेन । त्याचे संगती येई श्वान । भगवद् भक्त म्हणोन । भोजन देई तयाते ॥३९॥ शिवानंद भृत्य एक दिन । श्वानां निशी ना दे भोजन । जाहले तया विस्मरण । तेणें श्वान दुरावला ॥ ४० ॥ बहुत शोधिला श्वान । न गवसे कुना लागुन । पुरींत येता सकळजन । प्रभु सन्निध श्वान देखिला ॥ ४१ ॥ सन्निध परि दुरी । बैसला श्वान शेजारी । प्रभु खावया देतीं परोपरी । प्रसाद

नरि केल शकले ॥ ४२ ॥ खावया देती शंबल । मुखी रामकृष्ण हरिबोल। श्वान ही कृष्ण कृष्ण बोले । आश्चर्य झाले सकलासीं ॥ ४३ ॥ पाहोनी शिवानंद सेन । श्वानासि करीं नमन । केले क्षमा याचन । आपराध झाला म्हणोनि ।४४। तदुपरी तो श्वान । सिद्ध देहे वैकुठ गमन । करी, न दिसे कोना लागून । ऐसे थोरपण तयाचे ॥ ४५ ॥ केला गजेंद्र उद्धार । तैसा जटायू भक्तवर । रीस मर्कटादी वनचर । उद्धरी, श्वान तैशापरी ॥४६॥ ऐसे प्रभुचे थोरपण । कित्येक तरले भक्तजन । नामे तरलें पाषाण । जींव अनन्य कापसे ।४७। प्रभु घेती नाथ दर्शन । पुजारी करी नमन । प्रसाद माला करीअर्पन । भाळी चंदन र्चाचिले ॥४८॥ चैतन्य प्रेम विव्हळ । दर्शने, अंग विकल । पाहती जगन्नाथ भक्त वत्सला । गग्दद कंठ जाहला ॥ ४९ ॥ आंगणीं करिती कीर्तन । साथ देतीं भक्तजन । भुजा उभारोनी नर्तन । पाहती जन सप्रेमे ॥५०॥ घालूनि मंदीर प्रदक्षिना । जाती काशीं मिश्र सदना । वृत्त कथियले भक्त गणा । वृंदावन यात्रेसहित ॥ ५१ ॥ सकल भक्ता पाचारोनी । भिक्षा केली मिश्र सदनी । प्रभु प्रसादे संतोषोनी । गेले विश्राम करावया ॥ ५२ । व्दीपीचे प्रेमळ भक्त । परिवारासह भेटती त्वरीत । स्त्री संभाषण प्रभु टाळीत । यतिधर्मा अनुचित तें ॥ ५३ ॥ शास्त्राज्ञें चोख वर्तत । द्वीपीचा परमेश्वर नामे भक्त । चैतन्य गृहा समिप वसत । करीं मिठाई विक्रय ॥५४॥ प्रभुच्या बाल्यावस्थेंत । परमेश्वर करी अतिप्रीत । खावया दे मिष्ठ पदार्थ । उत्संगी नित्य घेतसे ॥ ५५ ॥ बालका लावी बोलाया । हरिबोल म्हणे वा सखया । तयासी संतोष द्यावया । हरिनाम गातीं बाल्यात ॥ ५६ ॥ तो भक्त परमेश्वर । वृद्धत्वे जाहला । जर्जर । सहपरिवार येई सत्वर । प्रभु दर्शना पुरीसी ॥ ५७ ॥ अजानपणें करी नमन । बोले प्रेमळ वचन। झाले असेल विस्मरण । वृद्धपण माझे म्हणोनि ॥ ५८ ॥ प्रभु वदले अलिगून । परमेश्वराचे विस्मरण । कैसे होई मज लागून । मधूरपण खाद्याचे न भुलवी ॥ ५९ ॥ बाल्यी मजवाटे व्हावा । त्वा दिधला खाद्य मेवा । तृप्त केले माझ्या जिवा । दिधला प्रेम ओलावा ॥६०॥ भक्त बोले वचन । परिवारासह केले येणें । उत्सुक घ्यावया दर्शन । वदिले चरण तत्काळ ॥ ६१ ॥ जाहला स्त्रीं स्पर्श । तेणें संकोचें मानस । मुखें शद्ध साहस । प्रभुसीं न करवे ॥ ६२ ॥ करुनिया अधोवदन स्वस्थ राहिले संकोचून । नियम धर्म बंधन । भोळचा भावानां तळे ॥ ६३ ।. प्रभु प्रेमळ भक्त वत्सल । भक्त भेटे भाविक भोळा । तेथ नियम राही आगळा । लुटिता लाभ संगतिचा ॥ ६४ ॥ यापरि भक्त समाधान । कवणा द्यावे

दर्शन । कोठे भिक्षा निमंत्रण । कालक्रमण यापरी ॥ ६५ ॥ श्रीरुप, अनूप भक्त बंधू । तया पुरीचा लागे वेधु । मार्गी अनूप ज्वर संबंधू । बाधक जाहला ॥ ६६ ॥ दैवगती परम विचीत्र । ज्वरीं तप्त कलेंवर । त्यजीनश्वर शरीर । गंगा तीरी अनूप ॥ ६७ ॥ मृत्यू समयीं नामस्मरण । हें परमभाग्य लक्षण । ईश्वर संतोष होय पुर्ण । जन्म मरण कदा नसे ॥ ६८ ॥ जयाचें होंय पुर्व पुण्य । नित्य केलें हरिस्मरण । उत्तम गति निधान । प्राप्त होय तयासी ॥ ६९ ॥ गंगा प्रवाहित कलेंवर । केलें, श्रीरुप करी विचार । अनित्य खचित संसार । नाथ पुरी पातला ॥ ७० ॥ श्रींकृष्ण लींला गुणगान । करावे हा हेतु धरुन । काव्य केंले भावपुर्ण । नाटचा समेत ॥ ७१ ॥ एकाचें दोन भाग । नाटक असावे सलंग वृंदावनीं रचिलें केला लाग । दावावे भक्त वत्सला ॥७२॥ प्रथमभागी श्रीकृष्ण लीला । द्वितीयात द्वारका लीला । येणें करितां घनलीला । तोष वाटे म्हणोनिया ॥ ७३ ॥ मार्गीं असतां पुण्य नगर । उडिसी सत्यभामापुर । वास्तव्य करी दिनभर । मंदिरीं श्रीरुप ॥ ७४ ॥ निद्रे माजी पडे स्वप्न । सत्यभामा देई दर्शन । आज्ञापी श्रीरुपा लागून । द्वारकावर्णन पृथक् करी ॥ ७५ ॥ व्रजलीलें सांगाते वर्णन आमुचे न करी कदा जाण । ऐसे तया आज्ञापून । अंतर्धान पावली ॥७६॥ सत्यभामाज्ञें म्हणोनि निंके । द्वारका लीला पृथक । करुनि केले नाटक । ललीत माधव नामतया ॥ ७७ ॥ व्रजलीला विदग्ध माधव । द्वारका लीला ललींत माधव । ऐंसी नाटके अपूर्व । गीर्वांनी रचियली ॥ ७८ ॥ पुर्व एवन संसर्ग । पुरींत वास करी अलग । हरिदास गौरभक्त चांग । केला लाग श्रींरुपे ॥ ७९ ॥ हरिदास भक्त यवन । तया श्रेष्ट मानिती चैतन्य । करुनि येता गंगास्नान । आश्रमीं भेटतीं सप्रेमे ॥ ८० ॥ आश्रमीं येती चैतन्य । श्रीरुप करी साष्टांग नमन । प्रेमे दिधले अलिंगन । समाधान जहाले ॥ ८१ ॥ भक्ताची करुनि ओळखन । देती प्रभु स्वये आपण । सकल काव्य मर्मज्ञ जाणुन । आज्ञापिले ॥ ८२ ॥ चैतन्याज्ञा मानीं प्रमाण । श्रीरुप करी नाटच गाण । राय, सार्वभौम संतोषोन । धन्य म्हणोनि स्तविले ॥ ८३ ॥महाराष्ट्र भाषीं आनुवाद । काव्याचा केला विशद । तो व्हावा बोधप्रद । केला विस्तार तयाचा ॥ ८४ ॥

श्लोक :– सुधानां चांद्रीनामपि मधूरिमोन्माददमनीं । दधानाराधादिप्रणय घनसारैःसुराभिताम् ॥

समन्तात् सन्तापोद्गम विषम संसारसरणी । प्रणीतां ते तृष्णा हरतु हरिलीला शिखरिणी ॥ वि. मा, ना. १।१

चंद्री अमृताचा सधुरिमा । त्याचा चूर्ण करी गरिमा । त्याहुनि मधूर असे महिमा । हरिलीलेचा ॥ ८५ ॥ श्रीराधादींचा प्रणय । व्रजागनांचा अनुनय । हाचिकर्पुर अनुपमेय । तेणें सुगंधींत शिखरिनी ॥ ८६ ॥ शिखरिणी नामे श्रीखंड तैसी हरी लीला चोखंड । संसार मार्गी चालता असुड । संतापे जीवास झोडपी ॥ ८७ ॥ तेणें उत्पन्न होई तृष्णा । दुःखद अति सकलांना । मिटवावे तापनाना । तदर्थ हरिलीला वर्णिली ॥ ८८ ॥

श्लोक :– अनर्पितचरीं चिरात्करुण यावतीर्णःकलौ । समर्पयितु मुन्नुतोज्ज्वल रसां स्वभक्ति श्रियम् ॥

हरिः पुरट सुंदर धुति कदंब संदी पितः । सदाहृदय कंदरे स्फुरतु वः शचिनंदनः ॥ वि. मा १/२

रसमय, उज्वल, उत्कट । भक्तिसंपदा अतिचोखट । अर्पिली कोणा न असूनि गोमटी । काल लोटे अमित तै ॥ ८९ ॥ म्हणोनि । अवतार कलीयुगी . दयावश होऊनि लागवेगीं । सुवर्ण कान्ति भक्ति योगी । वाटावया जगी पातले ॥९०॥ ते हेमकान्ति देदीप्यमान । करुणामय शचिनंदन । करोत हृदयी स्फुरण । करण्या कवण आम्हासी ॥ ९० ॥

श्लोक :– सुररिपुसुदृशामुरोज कोकान् । मुख कमलानिच खेदयन्नखंडः ॥

चिरमखिल सुहृच्च कोर नन्दी । दिशतु मुकुंदयशः शशीमुदं वः ॥ ल. मा. १ । १ ॥

सुररिपु स्त्रियाचे स्तन । हेचि चकवे पक्षिजाण मुख रुप कमल समुहानां । शोक दारुण वाटे कीं । ९२ ॥ परीच कोर वृंदासमान । असति जे स्नेही गण । तयासी देऊन शितल किरण । समाधान करी सर्वदा ॥ ९३ ॥ तो मुकुंद यशपुर्ण चंद्र । चिरकाल तुमचे करोभद्र । प्रसन्नता देऊनि सुखप्रद । होवो सर्वदा आम्हासी ॥ ९४ ॥

श्लोक :– निजप्रणयितां सुधामुदयमान्पुवन्यः क्षितौ । किरत्यलमुरीकृत द्विज कुलाधि राजस्थितिः

सलुंचित तमस्तातिर्मम शचीसुताख्यः शशी । वशीकृत जगन्मना किमपि शर्म विन्यस्थतु ॥ ल. सा १।२

उदय होवोनि अवनींवर । द्विजराज स्थितीत राही निर्भर । प्रनय रुप रसामृत सुखकर । देत अहोरात्र भक्तजना ॥ ९५ ॥ तेणें मिटे अज्ञान तम । न राही कदा भवभ्रम । जगन्मन वशीकरण कर्म । करणे ठाम जयाचे ॥ ९६ ॥ तो शचिनंदन नामा । कल्याण करो पुर्ण चद्रमा । मंगल करोनी वाढवी प्रेमा । हेंचि आम्ही प्रार्थितों ॥ ९७ ॥ यापरि श्रवण करवी नाटक । ऐकोनि श्रोतया अत्यंत सुख । प्रशंसिले सकौतुक । प्रसादोत्सुक श्रीरुप जाहलो ॥ ९८ ॥ प्रसाद

नामे चित्त प्रसन्न । पाहोनि दिधलें अलिंगन । प्रभूंमीं केलें प्रेमदान । समाधान तया जाहले ॥ ९९ ॥ श्रीं महाप्रभु नृत्य काली । विरहें होती व्याकुळ । काव्यप्रकाश श्लोकावली । विरह श्लोक गाती लीलेने ॥१००॥ नित्य मुखीं असे कवन गूढ हेतु न कळे कुणा लागुन । केवळ गोस्वामीसी ज्ञान । जाणतीं तात्पय तयाचे ॥ १ ॥ एकदा श्रीरुपे केले श्रवण । गर्भितार्थ त्याचा काव्य लिहून । प्रभु मानस हेतु पुर्ण । संपुर्ण तया जाणिला ॥२॥ श्रीरुप गेले समुद्रस्नाना । प्रभु आले भेटीं लागून । लिहिला श्लोक पाहुन । आनंदलें ॥ ३ ॥ परतोन आले सदनी । गौरांग देखिले नयनी । प्रणाम केला चरणीं । सन्निध केले श्रीरुपा ॥ ४ ॥ वा माझ्या मनीचा हेत । कैसा जानीला निश्चित । कोना न कळे गर्भितार्थ । गूढ तात्पर्य तयाचे ॥ ५ ॥ प्रसन्न जाहले गौरहर । गोस्वामीसी कथिले सारे । श्रीरुप पावला अधिकार । शक्तिसंचार ॥ ६ ॥ केला तनीं म्या

श्लोक प्रभुचा :– यः कौमार हरः स एवहिवरस्त एव चैत्रक्षेपाः । ते चोन्मीलित मालती सूरभयः प्रौढा कदंबा निलाः॥ साचैवास्मि तथापि तत्र सुरतव्यापार लीलाविधौ । रेवारोध सिवेतसी तरुतले चेतः समुत्कंठते ॥ कां प्रकाश

श्रीरुप श्लोक : – प्रियःसोज्यं कृष्णः सहचरित कुरुक्षेत मिलितः । तथाहंसा राधा तदिदमुभयोः संगम सुखम् ॥ तथाप्यन्तः खेलन् मधूर मुरलीं पंचम जुषे । मनोमे कालींदी पुलीन विपिनाय स्पृहयती ॥ पद्यावली

श्री राधा बोले सखीसीं । प्रिये आज कुरुक्षेत्रासी । भेटला प्रिय व्रजवासी । मजसी कंसारी सप्रेमे ॥ ७ ॥ तोचि कृष्ण मीच राधा । मिलन सुख तेंचि सर्वदा । परि मधूर मुरलीं निवादा । क्रीडा काली परिसिलें ॥ ८ ॥ त्या मधूर स्वरानंदीं वनासहित पुलिन कालिंदी । स्मृति तो अवधीं । चित्त स्पृहा करितसे ॥ ९ ॥

श्लोक :– तुंडे तांडविनीरति वितनुते तुण्डावली लब्धये । कर्ण क्रोडकदंबिनी घटयते कर्णार्बुदेभ्यः स्पृहाम् ॥ चेतः प्रांगण संगिनी विजयते सर्वेंद्रियाना कृतिं । नो जाने जनितकिय द्भिरमृतैः कृष्णेति वर्णद्वयी ॥ वि.मा

न जानें कृष्ण वर्ण दोन । अमृतासह सृजी कोन । वदनीं नाचती नटिसमान । मुखे असंख्य इति इच्छिती ॥ ११० ॥ प्रवेशि ती कर्ण कुहरी । अर्बुदकानांची स्पृहा अंतरी । संगिनी रुपे चित्ता माझारी । उदित होतीं ॥११॥ समस्त इंद्रीय व्यापार । नियंत्रण राहीं त्यावर । संयमे विजयी कलेवर । अधिकार कृष्ण वर्णाचा ॥ १२ ॥ स्वामीसी ऐकुनि कवन ।

चित्ती होय समाधान । प्रभुसि वदले कृपा भाजन । अंतरंग निजजन वाटला ॥१३॥ श्रीरुपा जावे वृंदावनीं । रत असावे कृष्ण भजनीं । हिच अंतिम भेट जाणूनि । खिन्नवदन जाहले ॥ १४ ॥ वृंदावनीं अखंडवास । संतोषवीं जगन्निवास । भक्ति ग्रंथ हव्यास । नित्य चालवि ॥ १५ ॥ अखंड श्रीकृष्ण कीर्तन । करुनि केले देहार्पण । भक्ति महात्म पुर्ण । चैतण्य कृपे दाविले ॥ १६ ॥ ऐसे चरित्र रसाळ । श्रीरुप भक्त प्रेमळ । तया प्रसन्न गोपाळ । विख्यात झाला भक्ताग्रणी ॥ १७ ॥ श्रीरुप चरित्र श्रवण । करिता प्रभुकृपे स्फुरे कवन । कृष्ण चद्र प्रसन्न । जन्म मरण नातळे ॥ १८ ॥ चरित श्रवणें इद्रीयदम । चित्ती वाढे भक्ति, प्रेम । संकीर्तन मार्ग सुगम । कृष्णधाम प्राप्त हो ॥ १९ ॥ तेंचि स्फुरण चित्तांत व्हावे चरणीं प्रार्थित । संतवृंदा विनवित । वरद व्हा संत सेवका ॥ १२० ॥ श्री. चै. वि. ग्रं. रसाळ । अंत्यलीला प्रसंग सोज्वळ । सुबुद्धिराय, श्रीरुप चरित मंगळ । श्वानोद्धार छत्तिसावियां ॥ १२१ ॥ श्री चै. वि. ग्रं., अंत्यलो प्रसंग सुबुद्धिराय उद्धार, श्वानोद्धार, श्रीरुप चरित कथन अध्याय छत्तिसावा (३६) ओ. सं. १२१ एकुण संख्या ४८९९

दि. ३०–७–६४ गुरुवार आ. व. ६ श. १८८६ सं २०२०

## अध्याय समाप्त

# अध्याय ३८ वा

श्री गणेंशायनमः।। श्री सरस्वत्यैनमः ।। श्रीगुरुभ्योनमः श्रीकृष्ण चैतन्याय नमः ।। नमन माझे कृष्णनाथा । तुवा उपदेशिले आपुल्या भक्तां । त्यजूनि भोगा समस्ता । शरण रिघता प्राप्त मी ।। १ ।। सर्वधर्म परि त्यागुन । यावे तुवा मजसी शरण । ऐसे भगवद्गीता वचन । अर्जुना लागीं कथियले ।।२।। घडावया त्याग भोगीं । कथिसी भक्तालागी । तयांतुन कनकामीनी लागवेगी । त्यजावें मार्ग भक्तीचा ।।३।। कामीनी तैसे कांचन । भक्ति मार्गी आणिती विन्घ । रावया कुंभारे त्यजिलें रत्यकंकण । परिक्षण करी नामदेव ।।४।। देवाचें सहाय्य घेऊन । लक्ष्मीं हातीचें रत्न कंकण । मार्गी त्यजिलें जाणून । मानी विन्घ कुलाल ।। ५ ।। देव झाले संतुष्ट । नामदेव मानीं भक्त श्रेष्ठ । हे भक्ति रहस्य वरिष्ठ । दाविलें स्पष्ट तुकयानें ।। ६ ।। वारांगना धाडिती दुष्टजन । तियेसी माता समजून । तुकया करी प्रणमन । नपूसक तू मजलागी ।।७ ।। ऐसे ऐकोनि वचन । वारांगना गेली शरण । तुकारामे केलें पावन । महिमान भक्तिचे ।। ८ ।। त्या प्रसंगाचें वर्णन अध्यायीं केले कथन । चैतन्य देती शिकवण । भक्तजन हरिदासां ।। ९ ।। सनातनाचे थोरपण । प्रभु स्वमुखे करिता तोषोन । तें अध्यायी निरुपन । सावधान परिसा ।। १० ।। कीर्तनीय प्रभु भक्त । छोटे हरिदास ख्यात । उच, सुरेल आवाजात । धूनगातां सप्रेमे ।।११।। महाप्रभु सन्निध्यात । भगवान आचार्य प्रथित । हे हरिदासा आज्ञापीत । त्वरित जावे माधवी गृही ।।१२।। कोणी एक गौड भक्त । तयें धाडिले तंडुल प्रस्त । भक्ति भाव तयात । परि असती बेचव ।।१३।। व्हावे बारिक सुवासिक । हरिदास प्रेषिला नावाजीक । गमन केले तत्कालीक । दिधले बारिक श्रद्धेने ।। १४ ।। प्रभु भक्तामाजी थोर । साडे तीन व्यक्ति राधापरिकर । श्रीरुप, राय, शिखि प्रियकर । अर्धी माधवी देवीं ती ।। १५ ।। शिखि माहिती भगिनी माधवी । वृद्धा तपश्विनी, वैष्णवी । दिधले हरिदासा करवी । सेवाभावीं तंडुल ।। १६ ।। प्रभु पातले माध्यान्ही । आचार्य गृही भोजनी । उत्कृष्ट सुवास ओदनीं । पाहोनि केली विचारणा ।।१७ ।। उत्तरीं वृत्तांत कळला । भिक्षेस जावुनि आणिला । हरिदासे माधवी देविला । जाहला घोर चित्रास ।। १८ ।। प्रभु परतले निजस्थली । गोविंदासी आज्ञा केली । कुटीत न यावा कदाकाळी । हरिदास, पाळी सत्वरे हें ।। १९ ।। जो साधू विरक्त । स्त्रींयासी करी मात । वदन पाहणें मजप्रद । उचित न लागे ।। २० ।। इंद्रीयें दुर्दमनीय । ग्रहण करिती त्वरें विषय । काष्ठ पुतळी

देखतां अपाय । मुनिसी हो ।। २१ ।। माता, कन्या, बहिण । एकांती नसावे सहासन । इंद्रिये असती बलवान । विद्वान मना ते कर्षिती ।२२।हरिदासा कळलें वृत्त । चित्त तयाचे दुःखित । तीन दिन राही उपोषित । परित्यक्त दुर्दैवें जाहला ।।२३।। तयां वाचूनि संकीर्तनी । रंग न भरे अनुदीनी । ऐसी प्रतीति प्रतीक्षणीं । येई, परि त्यजिले त्या ।।२४।। परमानंद पुरीपाद । प्रसन्न व्हावया करितीं अनुरोध । महाप्रभु सन्निध । बाधा नहो हरिदासा ।।२५।। असन्तुष्ट प्रभु बोलती । त्यासाठीं कराल विनति । त्यजीन पुरी निश्चिती । अलाल नाथी जाईन ।। २६ ।। पुरी स्तब्ध तयेवेळा । वर्ष कालावधि लोटला । प्रभु प्रसन्न तेला । ठावन लागे अल्पही ।। २७ ।। हरिदासे केला विचार । प्रभु सेवा घडावीं निरंतर । संकल्पे करी निर्धार । सत्वर तेथूनि निघाला ।। २८ ।। प्रयाग क्षेत्रीं त्रिवेणी पवित्र । तीत त्यजिले कलेवर । सग्दति पावला भक्तवर । अंतरी तोष हरिदासा ।। २९ ।। पुढाल चातुर्मास्यीं आगमन । श्रीवासे केलें पुरी लागून । केला हरिदास विषयक प्रश्न । प्रभुकथन करितीं तैं ।। ३० ।। स्वकर्म फळ भुक् जिवजाण । कृतकर्म फळ भोगी आपण । हेचि हरिदास प्राक्तन । जिवन घालवीं त्यापरी ।। ३१ ।। पंडितें कथिले प्रभुसि । कलेवर त्यजी त्रिवेणीसीं । स्त्रीदर्शने दंड देहासी । योग्य तयासी, वदलें हें ।। ३२ ।। ऐसें कठोर शासन । करोनि केले मार्ग दर्शन । सकळ भक्ता लागून । दोषसान असे तरी ।। ३३ ।। प्रभु कृपे व्हावया पात्र । भजने च्छु भक्त सर्वत्र । असावे शुद्ध आचार । सार उचित हें असे ।। ३४ ।। इंद्रिय लालसा ऐहिक । सर्वथा त्यजावी क्षणिक । परित्यागे हो सुख । गौर सेवक तोची हो ।। ३५ ।। अन्यथा सेवक रुपे ग्रहण । गौर कदा न करितीं जाण । द्यावया लोक शिक्षण । शासन केलें हरिदासा ।। ३६ ।। वैष्णवाचार्य प्रचारक । आचरवान् भक्त लोक । त्याचे आसन व्हावे चोख । उपदेशक प्रभु तयासी ।। ३७ ।। गूढ व्यभीचार परायण । वैष्णव वेषधारी, अजाण । भ्रांति फीटाया निमित्य करुन । तयाचा दंभ घालविला ।।३८।। विष्णु संबंध, तेथ पाप नसे । पापिया अनादर वसे । शास्त्रीय श्रद्धेच्या उदयास । कारण निष्पाप भक्त की ।। ३९ ।। बहिर्मुख मानवा लागून । शास्त्र कथी शासन विधान । तेथ दृढ विश्वास ठेवून । उत्पन्न होई श्रद्धा कीं ।। ४० ।। शास्त्रव अर्थी धारणा । करुनि मानी प्रमाणा । अविचलीन विश्वासे आचरणां । शास्त्रीय श्रद्धा जाणावी ।। ४१ ।। हरिदासे केले देह विसर्जन । प्रभु चरणी श्रद्धा दारुण । अदृष्य रुपे येवून ! कीर्तनी गान करितसे ।। ४२ ।। श्रवणीं करिता गान । आश्चर्य करिती भक्तजन । पिशाच्च योनीं

लागून । पतन पावे भक्त की ॥ ४३ ॥ प्रभु वदती हरि भक्तास । कुयोनी न मिळे भोगावयास । ईश्वर कृपे हरिदास उत्तम गतीस पावला ॥ ४४ ॥ तेणें गुणें सुक्ष्म देहे । निरंतर कीर्तनीं गात आहे । दोषी देह त्यजितां लाहे । श्रेष्ठ गतिसी ॥ ४५ ॥ प्रभु कृपा प्रसादास । अंती पावला छोटा हरिदास । ऐशा पवित्र चरित्रास । कथिले भक्तास सप्रेमे ॥ ४६ ॥ ऐसे भक्त चरित्र रसाळ । जये चित्त होय निर्मळ । कनक कामिनीं पासून सोज्वळ । भक्त राही वेगळा ॥४७॥ करितां चरित्र कथन । निष्पाप चित्त विरक्ति लक्षण । उपजे भक्त चरित्र गान । निर्मल फल पठनाचे ॥ ४८ ॥ मथुरा महात्म्यीं यात्रा वर्णन । सनातने ती केली पुर्ण । श्रीरुपाचे करावे शोधन । द्यावे दर्शन गौराचे ॥ ४९ ॥ प्रयाण केले पुरिस । प्रयागावरुन काशीस । सार खंड मार्गे प्रवास बिकट पथास क्रमिले ॥ ५० ॥ कंट काकीर्ण भींतीद पथ क्रूर स्वाप दे झाली अमित । विषवल्ली वायूसर्गे रक्तदुषित । कंड सुटे शरीरी ॥ ५१ ॥ तनु जर्जर दुषित रक्त । शरीरीं वाहें सतत । ऐशा दुःख स्थितीत । सनातन आले नाथपुरीं ॥ ५२ ॥ यवन ससर्ग कारण । आपणास मानीहीन । मंदीरी घ्यावे दर्शन । अनुचित मानी ॥ ५३ ॥ महात्मा भक्त हरिदास । त्याचे कुटी केला वास । कळे वृत्त प्रभुस । येती भेटीस सत्वर ॥ ५४ ॥ सनातन करी गमन । द्यावया गेले अलिंगन । व्याधीग्रस्त दुर्गंधी तन तत्क्षणीं दूर जाहला ॥ ५५ ॥ प्रभो मी पामर दिन । अधम संसर्ग यवन । वरी रोग ग्रस्त तन । स्पर्श न करावा मजलागी ॥ ५६ ॥ दुर्लक्ष केले तयाप्रति । अलिंगिले दृढ प्रिती । वदले प्रभु मागुती । झालो कृतार्थ आजला ॥५७॥ सनातना तव शरीर । परम सुगंधी, सुंदर । सुवासे लोक इहपर । सुकर हो मजलागीं ॥ ५८ ॥ सनातन तपस्तेज । होय सुगंधीत तनु सहज । अनुभविती प्रभुराज । संकोचे लाज भक्तासी ॥ ५९ ॥ प्रभोनु कंपा अपार । अहैतुकी कृपा त्यावर । तेणें मस्तकी होई भार । नेंत्री असावे वहळलीं ॥ ६० ॥ प्रभु आसनी स्थिर झाले । श्रीरुप अनूप वृत्त कथिले । अनूपे कलेवर त्यजिले । दुःखी झाले सनातन ॥ ६१ ॥ सनातन नेंत्र अश्रूपुर्ण हळव्या मने करिती सात्वन । अनूप परम वैष्णव जन । सद्गति वैकुंठ सुख लाभले ॥ ६२ ॥ अनुपाचे परम सौभाग्य । संसाराचा केला त्याग । प्राप्त झाले वैराग्य । यात्रेचा लाग साधिला ॥ ६३ ॥ भागीरथी तीरी पवित्र । बंधु अंकी ठेवूनि शिर । वैष्णव त्यजा देह नश्वर । व्यर्थ शोंक त्यासाठी ॥ ६४ ॥ प्रभो ! अनुप परम भागवत । श्रीं सीता रामचंद्र भक्त । मी अभागी खचित । अंतींवंचित जाहलो ॥ ६५ ॥

भेटीं न होय मज लागून । तेणें माझे कष्टी मन । त्याचे होता स्मरण । दारुण दुःख होतसे ॥ ६६ ॥ तयाचीं निष्टा कहाणी । काय सांगो सन्निधानीं । कनिष्ठ बंधु असोनी । आम्हाहूनि श्रेष्ठ जाहला ॥ ६७ ॥ त्रिभुवनीं ऐसा निष्ठावान । बंधु न मिळे आम्हा लागून । सीताराम चरणीं दृढमन । अन्यन देखिला ॥ ६८ ॥ आम्हीं बंधू तिघेजन । भागवत कथा श्रवण । करित होतो एकत्र मिळुन । अनुप रामचरणसेवीं ।६९। परीक्षेचा करुनि संकल्प । त्यासी बोलीलो अनूप कृष्णलीला माधूरी अनुप यास्थवउपास्य कृष्ण करी ।७०। बैसोनि आपण तिघेजन । करु एकत्र कृष्ण भजन । तुम्हीच माता पिता गुरुजन । करीन ते तें आज्ञेने ।७१। उदयीक द्यावा कृष्ण मंत्र । जपाचा करीन निर्धार । निद्रे गेला तदनंतर । अनुप कुटी भितरी ।७२। परो निद्रा न यें स्वस्थ मळमळ वाढे असस्थ झाला । प्राप्त:काली त्वरीत । येवुनि आम्हासी भेटला ।७३। श्रीराम चरणीं अर्पिले शिर । निवृत्त व्हावे हा विचार । न रुचे, त्यजावे शरीर । निर्धार ऐसा जाहला ।७४। एसी निष्ठा एकांन्तिक श्रीराम चरणी ठेवी अधिक । आश्चर्य वाटे अलौकीक । अनूप नाम सार्थ हे ।७५। चित्तां अन्य प्रलोभन । येता न हाले कींचिन्मन । एकांतिक भक्ति लक्षण । प्रभु प्रेम प्राप्त हो ॥ ७६ ॥ ऐसे करुनिया भाषण । आज्ञापिला भक्त सनातन । व्यास्तव्या हेचि स्थान । हरिदास सन्निध राही बा ॥ ७७ ॥ जाऊनियां स्वस्थानीं । गोविंदास केलें कथन । महाप्रसाद द्यावा नेऊन । भक्त व्दयास सत्वर ॥ ७८ ॥ गोविंदे दिधला महाप्रसाद । तदुपरि यमेश्वर प्रसिद्ध । तेथ जाति प्रभु गोविंद । पाचारी भिक्षेसी सनातना ॥ ७९ ॥ ज्येष्ठ मासी माध्यान्ह काळी । प्रखर उष्णता तप्त वाळू । अनवाणी चाले भक्त प्रेमळू । समुद्र तीर मार्ग भिक्षेस ।८०। सिहव्दार मार्ग असतां । केवळ आपुली हीनता । दर्शनार्थी भक्त स्पर्श होता । पापभागी होऊ भय हे ॥ ८१ ॥ तेणें चरण तळ भाऊले । चामडी फोटोनि चरें पडले । देखोनि प्रभु दुःखित झाले । अलिंगिले भक्तासी ॥ ८२ ॥ पाहोनि भक्त दिनता । मर्यादा तेवि सरलता । प्रसन्न जाहलें चित्ता । वैष्णव ता रहस्य जाणिले तूं ॥ ८३ ॥ तुजसाठी नसे विधी निषेध । तूं अत्यंत पवित्र शुद्ध । लोक मर्यादेस्तव अशुद्ध । मानुनिया आचरिसी ॥ ८४ ॥ हीन जाती झाला उन्नत । परि मर्यादा राखणें युक्त । हेचि शास्त्रविहीत । लोक निंदित न होय ॥ ८५ ॥ यापरि प्रभुवचन । संतोषे सनातन । अलिंगनें दुर्गंधी घाण । शरीरीं लागें प्रभुच्या ॥ ८६ ॥ सनातना दुःख अपार । मनीं केला विचार । त्यजावे नश्वर शरीर । रथाखालीं नाथाच्या ॥ ८७ ॥ देहत्याग विचार । सनातन

मनीं तीव्र । त्याचे जाणून अंतर । गौरभेटीमाझी । बोलीले ॥ ८८ ॥ मानवी अंतिम पुरुषार्थ । ईशप्राप्ति निश्चित । शरीर त्यागे होय व्यर्थ । लाभ तेथ कोणता ॥ ८९ ॥ तनु त्यागे ईशप्राप्ति । मी ही वर्ततो तैशा रीती । जीवासी नसे सग्दति । मागुती जन्म घेणें घडे ॥ ९० ॥ आत्माहत्या पातक । कर्मभोग विषयक । भोगवी आसूरी योनी अनेक संसार तापे खिन्न त्या ॥ ९१ ॥ म्हणोनि उत्तम शरीर । कृष्ण कीर्तनीं करावे पवित्र । जेणें सकळ प्राणिमात्र । दुःखमुक्त ॥ ९२ ॥ तू देह अर्पिला मजसी । त्याची चिंता तुज कायसी । पाळावे मम आज्ञेसीं । सर्वस्वेसी माझा तूं ॥ ९३ ॥ सनातने मानिलें वचन । परावृत्त होय ते पासून । प्रभुभक्तासह । परतोन । यैत झाले स्वस्थानीं ॥ ९४ ॥ प्रभु देती नित्य अलिंगन । संकोचे सनातन मन । व्यथा जगदानंदा लागून । निवेदी, वदले तयासी ॥ ९५ ॥ तुजलागीं प्रभुआज्ञा । रथयात्रा करुनि दर्शना । करुनि जावे वृंदावना । कीर्तनीं काल घालवी ॥ ९६ ॥ मानूनि पंडित वचन । करी रथयात्रा प्रतिक्षण । प्रभुसी करी निवेदन । संमत व्हावे आपणा ॥९७॥ अंतरी प्रेम क्रोधे उत्तर । पंडित मानी श्रेष्ठतर । शिक्षा द्यावया अधिकार । कैचा पोर तयासी ॥ ९८ ॥ श्रवणें पंडित खिन्न । सनातन वदे वचन । माझिया हिता लागून । मार्गदर्शन केलें तयें ॥ ९९ ॥ गौरहराचे वचन । तुझा देह असाधारण । त्या नसे वैष्णव महात्म ज्ञान । तनु सामान्य समजे तो ॥ १०० ॥ हे जगदानंद पंडित । प्रेम परिक्षा निमीत्त । सनातने चिन्मय देहांत । धारण केले कुष्ठ हे ॥ १ ॥ म्या स्पर्श न करावा शरीरीं । म्हणोनी संतोषे दुर्गंधी । वरी परी दिव्य सुगंधी भितरी । अनुभव करी प्रत्यक्षा ॥ २ ॥ माझा देह व्हावा पावन । म्हणोनि देतसे अलिंगन । ऐकतां स्तुतीस्तवन । सग्दद सनातन जाहला ॥ ३ ॥ प्रभो माझी करोनि स्तुति । कां लोटीतां अधोगति । मज न साहवे उक्ति । मृत्यू प्रीति वाटतसे ॥ ४ ॥ सनातन करुन वाणी । श्रवणें वदले तया लागूनि । मम सहज स्नेह म्हणोनी । पंडितासी दाविले ॥ ५ ॥ वास्तव्य करी संवत्सर । वृंदावनीं जावे तदनंतर । अलिंगूनि प्रिति पंडिभरें । तेजस्वी शरीर जाहलें ॥ ६ ॥ देखोनिया चमत्कार । चकित झाले भक्तवर । केले वास्तव्य वर्षभर । करविला परिचय भक्तासी ॥ ७ ॥ वृंदावनीं जावया भक्तवर । प्रभु आज्ञा शिरोधार्य । मानूनि केला नमस्कार । निघे पुरीहुनि तेधवां ॥८॥ ज्या स्थळी प्रभुगमन । तें तें पुज्य मानून । त्यास्थानीं घेई दर्शन । वृंदावनी पातलो ॥ ९ ॥ राही वृक्ष छाया स्थळी । श्रीरुपाची भेटी जाहली । दोन्ही बंधू एकमेळी । संकिर्तन केली

करिती तें ॥ १० ॥ श्रवणे रसाळ चरित्र । होई ईश्वर प्रीती पात्र । दुःख क्लेशना अणुमात्र । श्रीहरी संतोषे तयासी ॥ ११ ॥ असला यतिहीन । अनुदिनी नामस्मरण । त्याचे चुके जन्ममरण । प्रेमभजन श्रीहरी ॥ १२ ॥ श्रीहरी चरणी विनीत । होऊनि प्रार्थी रघुनाथसुत । माझें दोष निरसावे समस्त । कवन उत्स्फूर्त कृपे हो ॥१३॥ पुढील कथा सुरस । कथितो कृपे परमेश । भक्त ऱ्हदय मानसहंस । प्रसन्न व्हावया ॥१४॥श्री. चै. वि ग्रंथ अंतलिला प्रसंग सोज्वळ हरिदास सनातन वृत मंगळ भक्त थोरपण सदतीसावीया ।११५। श्री. चै. वि ग्रंथ अं प्र छोटा हरिदास चरित सनातन भक्त थोरपण कथा कथन नाम अध्याय सदतीसावा समाप्त ओ. सं ११५ एकूण सं ५०१४ दि. १-८-६४ शनिवार

## अध्याय समाप्त

## अध्याय ३८ वा

॥ श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्री श्रीकृष्ण चैतन्यायनमः ॥

जय जया सदगुरुराया । भक्तावरी करिसीं दया । पवित्र होय त्याची काया । अपार माया वाढविसी ॥ १ ॥ तुझिया कृपावचने । शिष्य संतुष्य तनमनें । आनंदाची उपवने । खुलतीं चित्ती ॥ २ ॥ शिष्याचे पुरे मनोरथ । साध्य होय परमार्थ । लौकीक वासना स्वार्थ । यथार्थ नासिसीं ॥ ३ ॥ तुमचे परमार्थ वचन । तेंचि अमृत भोजन । तृप्त होय छात्रगण । सौभाग्य मानी ॥ ४ ॥ व्हावया गुरुप्रसाद । सेवाभावी व्हावे सिध्द । सत्वरी होय आत्मबोध । शोध होय ब्रम्हाचा ॥ ५ ॥ करिता गुरुचरण सेवा । भक्तिचा मिळे मेवा । विषयी जना वाटे हेवा । मागोवा होय संताचा ॥६॥ यास्तव सद्गुरु नमन । करुनि करी चरित कथन । श्री सद्गुरु लिला चैतन्य । शुध्द मने गावया ॥ ७ ॥ मागील कथानुसधान । ध्यानी यावे सपुर्ण । शांतीपुरीं वास्तव्य जाणून । भेटे प्रभुसि रघुनाथ ॥ ८ ॥ उपदेशिले तयास । गृहिच करावे भजनास आज्ञा पाळी परी नाथपुरीस । आले प्रभु वृत्त कळे ॥ ९ ॥ अस्वस्थ विरक्ति अतरी । बहिरंग दिसे संसारी । विचीत्र घटना परीवारी । तेने आधार जाहला ॥ १० ॥ सप्तग्रामीची ठेकेदारीं । करीत असे यवन चौधरी । पश्चात झाले अधिकारी । मजुमदार हिरण्य गोवर्धन ॥ ११ ॥ जमेचा तीन चर्तूर्थांश । द्यावा लागे बादशाहस । स्वये एक चतुर्थांश । हक्क म्हणोनी स्विकारी ॥ १२ ॥ चालवून बुद्धी कौशल्य । दोन पंचमांश ठेविती बंधूव्दय । चौधरीस वाटे शल्य । तये आभियोग चालविला ॥ १३ ॥ दरबाराचा राज्यमंत्री । चौधरी त्यासी करि मैत्री । त्वरे प्रेषी राजकर्मचारी । बंधव्दय धाडवया ॥ १४ ॥ राजाज्ञे आले राजधूत । बंधूव्दय करण्या बंदीस्त । कळता ग्रामांतर त्वरीत । करण्यागृह त्यगिले ॥ १५ ॥ एकाकी सुत रघुनाथ । पाहोनी क्रोधे केला बंदीस्त । पितयाचे कथि वृत्त । ना तरी देहांत दंडतुज ॥१६॥ कारागीरी यातना सायास । होता चौधरी केला वश । रघुनाथ वदे तयास । करुण स्वरे ॥१७॥ मजवरी होता क्रुद्ध । काय माझा अपराध । पिता, काका तुम्ही बंधू । तिघे समान मानितो ॥ १८ ॥ तुम्ही सुजान जेष्ठ काका । व्हाल एक मज व्यर्थ दुःखा । देता हे वतन सुता देखा । कासया कारण न कळे ॥ १९॥ बालाचे बोल मधूर । हृदय पालटे सग्दध चौधरी । धनास्तव छळीले आजवरी । पुत्र असोनी भुलले मन ॥ २० ॥ बेटा केली तव

मुक्तता । काका पितावंदी आतां । नसती पाचारी गृहाप्रत । पापी लोभांत गुंतलो ॥ २१ ॥ बंधमुक्त होवोनी त्वरीत
। रघुनाथ येई गृहाप्रत । संसार रूप यथार्थ । ध्यानी येयी तयाच्य ॥ २२ ॥ संसार दुःख भांडार । षड विकाराचे
कोठार । दीनतेचे माहे पीडा अपार जीवासी ॥ २३ ॥ कुणा दुःख तैसे सुख । जग हे बहूपात्री नाटक । मान दंभ
अविवेक । गर्व आणिक चिताही ॥ २४ ॥ संसारी कदा न शांतीं । गुरु चरणाविण निश्चिती । जीवासी अनन्य गती ।
शरणागत व्हावे ॥ २५ ॥ चैतन्य चरण आश्रय । करावा, केला निश्चय । मानुनि जिवीत कार्य । सत्वर करी पलायन
॥ २६ ॥ पिवा रघुनाथा परतवीं । नजर ठेविता कष्ठजीव । प्रभु विरहे व्याकूळ वा । देह विलाप करितसे ॥ २७ ।
चिती वेदना अपार । मातेसी दुःख जडला विकार । कुलीं एक कुलदिपक पुत्र । वेडाचार करी सदा ॥ २८ ॥ तत्काल
बंधन शरीरी । पतीस कथी करावे सत्वरी । परमार्थीक वेडाचारी । बंधन कैचे मानीतो ॥२९॥ कांते पुत्राचे वेडेपण
। कांचन कामिनी न मानी बंधन । दामव्यर्थ एकता वचन । जननीं अस्थिर, दक्ष पता ॥ ३० ॥ तै नित्यानंद । चैतण्य
भक्त । येती कीर्तने हो सप्तग्रामात । दर्शनार्थी ग्रामस्त अर्पिती भेट सप्रेमे ॥ ३१ ॥ रघुनाथा कळे वृत्तांत । पित्राज्ञे
भेटीस येत । सेवक गणासमेत । नमन करी साष्टांग ॥ ३२ ॥ असता पितयाचे बंदीत । कैसा आला रघूनाथ । सन्निध
बैसविला त्वरीत । कृपापात्र जाहला ॥ ३३ ॥ पानिहारी दहि चिवडा महोत्सव । खर्च करावे तुवा द्रव्य । दहिचिवडा
दे भक्तास्तव । धनी पुत्र म्हणोनी ॥ ३४ ॥ या परी उत्सव संपला । रघुनाथ कृपा पात्र जाहला । चैतण्यपद प्राप्ति
तुजला । होई दिधला आशी तया ॥ ३६ ॥ नित्यानंदा द्रव्यार्पन । भक्तासी दिधले दान । दक्षिणा तैसे सुवर्ण । सदनी
ये रघुनाथ ॥ ३७ ॥ प्रभु भेटीचा तळमळ । त्वरे गाठावे निलाचल । परि जावया संधी न मिळे । शोधू लागे मार्ग तैं
॥ ३८ ॥ एके दिनी अरुण समयी । गुरु यदू नंदन त्याठायी । पातले चरणां ठेवीं डोई । निवेदी वृत्त रघुनाथा ॥३९॥
पुजारी न येई सेवेस । मज होती सायास । तूं समजवी तयास । ना तरी अन्यास पहावे ॥ ४०॥ तया देवूनि आश्वा-
सन । कथीन पुजाऱ्या जाऊन । जावया निघती यदूनंदन । आपण जाई सवे त्या ॥ ४१ ॥ निद्रीस्त होते पहारेकरी ।
रघुनाथ गेला आचार्य घरी । गुरु आज्ञा धरोनी शिरी । नाथ पूरी निघाला ॥४२॥ आड मार्गे करी गमन । तनुवरी फक्त
एकवसन । गाठी नसे मलीधन । अन्न तेही मिळेना ॥४३ ॥ प्रभाती पुत्र न दिसला । गृही आकांत जाहला घोडेस्वार ।

धाडी शोधायाला । ना ढळे दुश्चित सर्वही ।। ४४ ।। नयनी देखे प्रभु चरण । श्रम परिहारे करीं रुदन । आलिंगनें केले सांत्वन । वृत्त कथिले दामोदरा ।।४५ ।। नमन करु होता दर्शन । म्या सर्वस्व केले अर्पन । स्वरुपा प्रभु वचन । तुज सोंपला सर्वस्व तु ।। ४६ ।। स्वरुपाचा रघु ' अभिधान । ठेविले भक्त प्रेमाने । शेष प्रभुप्रसाद भक्षण । पाच दिन केले रघुनाथें ।। ४७ ।। प्रभु सन्निध राहून । घालवीं विरक्त जीवन । अयाचित वृत्ति अवलंबन । अनुदिन करीं ।। ४८ ।। रघुनाथाची विरक्ति । पाहूनि हो प्रभु तृप्ति । उपदेशिले तयाप्रति । येणें रिति वर्तावे ।४९।। गौरप्रभु मुखातुन । कर्तव्य करी श्रवण । रघुनाथे केला प्रश्न । वैरागी कासया बनविले ।।५०।। धन, गृह, संसार । सोडूनि आलो येथवर । अनुग्रह व्हावा मजवर । उपदेशावे सार मज ।।५१ ।। रागानुगा भक्ति विशेष । प्रभु उपदेशीती तयास । सिद्ध सेवक सेवा हव्यास । हृदयी नित्य असावा ।। ५२ ।। ग्राम्य कथा नायकावी । ग्राम्यता मुखीन वदावी । ग्राम्य सुखा पेक्षा नसावी । साधक जावे जनांत ।। ५३ ।। उत्तम खवे प्यावे । उत्कृष्ठ वस्त्र ल्यावे । ऐसें कदा न करावे । साधक जीवे सेवेत ।। ५४ ।। नापेक्षीं करा मान पान । सत्कार्यावें अन्यजन । नित्य कृष्णनामस्मरण । मानस पुजन करावें ।। ५५ ।। भजन, कीर्तन सत्संग । पुजन ध्यान यथासांग । निंदास्तुति आवेग । दुर्जन संग त्यजावा ।।५६।। संतसेवा हव्यास । न धरावी विषयास त्यजी संसार मोहास । ध्यान चित्ती सेवेचा ।। ५७ ।। सर्व श्रेष्ठा मानस पुजा । चित्ती पूजावे । गरुड ध्वजा । वैष्णवासी नसे दुजा । मार्ग रागानु भक्तिचा ।५८। उपदेशिले रघुनाथा । शांति लभ त्याचे चित्ता । अहर्निश सेवेकरिता । काल घालवी भक्त तो ।।५९।। गोवर्धन पितया कळे वृत्त पुत्र असे नाथपुरीत । प्रभु सन्निध सेवेत । सेवक, द्रव्य धाडिले ।६०। त्यातूनि नेमका अर्थ । घेई प्रभु प्रित्यर्थ । वेच करी भोजनार्थ । वर्षद्व्याचा संकल्प ।६१। मासामाजी दोन वार । भिक्षेसि पाचारी गौर । भोजन प्रीती पडिभर । घेती यतिवर संतुष्टी ।६२। पिता संसारी तयाचे धन । भोजनार्थ अनुचित वाटे मता विषयी जनाचे सेविता अन्न । मन मलीन भजन न घडे ।६३। ऐसा करोनी विचार । द्रव्य त्यजिले सत्वर । सारिला भोजन प्रकार । मधुकर हो रघुनाथ ।। ६४ । नित्य मधुकरीचे भोजन । कृष्ण स्मरण हे वर्तमान । प्रभुसि कळे तुष्ट मन । पाचारण केले तयासी ।। ६५ ।। तुजवर अत्यंत प्रीती । देई तुज मम संपत्ती । तूंचि अधिकारी निश्चिती चित्ती होय संतोष ।। ६६ ।।देईन आपुली गुंजामाला । तैशी गोवर्धन शीला । प्रसाद म्हणोनी दिधला । संतुष्ट झाला रघुनाथ

॥ ६७ ॥ कमंडलूचे शुध्दजल । शीला पूजावी मने निर्मळ । वाहावे तुलसी दल । भक्ति सोज्वळ सात्विक ॥ ६८ ॥ सिव्हव्दाचा व्हावया विपुल वैराग्य । मधुकरीचा केला त्याग । अन्य शोधिला मार्ग । जिव्हा संयम व्हावया ॥ ६९ ॥ सोडिला प्रसाद । अन्यत्र फकिती सुटता दुर्गंध । वेचूनि जले करी शुध्द । भक्षी अत्यंत आदरे ॥ ७० ॥ वैराग्य व्हावे तीव्रतर । म्हणोनि करी हा प्रकार । स्वरुपासह गौरहर । संतुष्ट जाहले ॥ ७१ ॥ चैतन्य एके दिनी । गेले रघुनाथ सदना । माग राहती छपूनि । पाहति भोजन भक्ताचे ॥ ७२ ॥ धुवूनि स्वच्छ केला भात । भक्षी रघुनाथ स्थिरचित्त कांबा ! सोडोनी आम्हा प्रत । पदार्थ एकाकी सेवेसी ॥७३॥ म्हणोनी घेती मुठभर । मुखी घालीती सत्वर । गोस्वामी पाहती प्रकार । रुदन करी रघुनाथ ॥ ७४ ॥ गौरहर भक्त वत्सल । भक्त भक्षिती उच्छिष्ट कवळ । प्रेमदान हेतु मनो केवळ । विचित्र लिला दाविती ॥ ७५॥ केले रघुनाथ सांत्वन । तुझे वैराग्य दारुण । प्रेममय होय जीवन । होती पूर्ण मनोरथ ॥ ७६ ॥ यापरी शोडष वर्ष । पुरीत केला निवास । करी जीवन विकास । रघुनाथदास सप्रेमे ॥ ७७ ॥ करुणरसे रसाळ । भक्तचरित्र प्रेमळ । वैराग्य प्राप्ति सोज्वळ । तत्काळ होय श्रवणाने ॥ ७८ ॥ यास्तव रघुनाथसुत प्रभुचरणी होईनत तयावरी ठेवा वरदहस्त । काव्यार्थ नेंमस्त गुरुराज ॥ ७९ ॥ प्रभुसन्निध बैसे सूंदर बालक । नित्य नमी हृदय चोख । त्यावरी प्रभुप्रीत अहेतुक । दामोधर करो प्रतिबंध ॥ ८० ॥ बालकाचे येणे वार्ताकरणें । न रुचे रुष्ट पंडीत तेणे । प्रतिबंध पृच्छा चैतन्ये । केली विषाद प्रभुसी ॥ ८१ ॥ बोले बालक विधवा सुत । त्यासी स्नेहे करिता मात । लोको विपरीतार्थ । मातेसी प्रीती म्हणोनी ॥ ८२ ॥ जे वैष्णाधिकारी । सिध्द पुरुष व्यवहारी । न समजोनि तयावरी । नियम लादणें भ्रम हा ॥ ८३ ॥ साधक जीवा शासन । सिध्दा तेचि नियमन । तेणें अपराध दारुणं । निस्तारण नसे तया ॥ ८४ ॥ ऐकोनी पंडित बचन । तुवा राखिले पवित्र पण । वरी संतोषवून । भोळेपण मनी आणोले ॥ ८५ ॥ प्रभु करिती विचार । पाचारिती पंडितवर । जावे तुवा सत्वर । करीं व्दिपी वास्तव्या ॥ ८६ ॥ तेथ शचिमाता रक्षण । भक्ता मार्ग दर्शन । भये शुद्धराही आचरण । कृष्णोपासनी लावावे ॥ ८७ ॥ बोधोनी धाडीला द्विपांत । जे स्वये आपण मुक्त । बाधा कैची? साधका सिद्धांत । दृष्टीत पारख सिद्धाची ॥ ८८ ॥ तैसी यावया दृष्टीं चित्ती । व्हावी अपार कृष्ण प्रितीं । चित्त शुद्धी विण आत्मप्रचिति । न होय निश्चितीं साधकां ॥ ८९ ॥ प्रभुभक्त

अव्दैताचार्य गृहस्थ । अवदान संकिर्तनी प्रीत । भक्त याचक परवडी अमित । हरवडी गृहात होवसे ॥ ९० ॥ भक्त प्रेमळ उदार । मस्तकी जाहला ऋणभार । राही ईशपदी निर्भर । अव्दैताचार्य स्वगृहि ॥९१॥ तयाचा विश्वास भृत्य आचार्य चरणी श्रध्दा अत्यंत । मनोभावे सेवी नित्य । परिवारासह ॥ ९२ ॥ आचार्य मस्तकी ऋण । पाहोनी दुःख दारुण । मिळवून द्यावे द्रविण । विश्वास मनी येतसे ॥ ९३ ॥ पुरित चैतन्य भक्त । प्रताप रुद्रराजा ख्यात । त्यासी दिधले प्राथना खत । ऋण परिशोध व्हावया ॥९४॥ राजा देखे प्राथनापत्र । प्रभु प्रति पाठवीं सत्वर । आश्चर्य करितो गौर । गोविंदाते पाचारिले ॥ ९५ ॥ आचार्यभृत्य विश्वास देख । आमुचिया नावा लावीं कलंक । येथे न यावा नावेक । उभय बदनाम होतसी । ९६ ॥ विषयी पुरुषा सन्निद्ध । धन याचना अपराध । आचार्य अवतारी शुद्ध पापे बध्द न होती ते ॥ ९७ ॥ भक्ता गोविंद निवेदीवृत्त । चैतण्य जाहले रोषयुक्त । आचार्य पातले त्वरीत । नतमस्तक पदी ज़ाहले ॥ ९८ ॥ प्रभो! अपराधी मी असे । मजलागी केले अनारिसे । नसे दोष हा विश्वासे । दंडास पात्र मी असे ॥ ९९ ॥ ऐकोनी आचार्य वचन । संतुष्ट जाहले चैतन्य । विश्वास भृत्य अजाण । भावकरण क्षमेसी ॥ १०० ॥ विश्वास मिषे भक्तगणा । शिक्षा याचना विषयीं जना । न करा प्रतिबंधी उपासना । उपदेशिले चैतन्ये ॥ १ ॥ भागवत टीकाकार वल्लभ पंडित । ख्यात प्रतिष्ठा अपेक्षी नित्य । दावाया थोरपण प्रभुप्रत । निवेदी ग्रंथ नमोनी ॥ २ ॥ केला श्रीभागवतार्थ । कृष्ण नामाचे विविध अर्थ व्याख्यांचा केला स्पष्टार्थ । चरणाप्रत निवेदिला ॥३ ॥ गौरव व्हावा भाव मनी उत्तर देतीं तया चैतन्य । कृष्ण नामार्थ एकचि जाणें । श्यामसुंदर श्रीकृष्ण ॥ ४ ॥ श्रीयशोदानंद मुरारी याविण अर्थ नसे अंतरी । परिसता प्रभु उत्तरी । मुद्रा विकल जाहली ॥ ५ ॥ ग्रंथसिध्दांत देखिले । तत्व विरोधी असती सगळे अव्दैताचार्य खंडिले । कळले अज्ञान स्वताःचे ॥ ६ ॥ एकदा आचार्यां करीं प्रश्न । जीव प्रकृति पति कृष्ण उच्च स्वरे संकिर्तन । कृष्ण नामाचे कैसे हो ॥ ७ ॥ असता अन्य पुरुष । नाम संकोच हो स्त्रीस । कैसे घ्यावे अन्या समक्ष तैसे व्हावें जीवासी ॥ ८ ॥ आचार्य वदे पंडित । प्रश्न करी चैतन्याप्रत । धर्म विग्रह हे प्रथित । कथिती स्पष्ट तुजलागी ॥ ९ ॥ भट्ट केला प्रभुसि प्रश्न । त्याचे करीती समाधान । स्वामी आज्ञा करणें पालन । पतिव्रत्य धर्म हा ॥ १० ॥ पति आज्ञा प्रमाण । करावे माझे संकिर्तन । कैसे करी उल्लंघन । पतिव्रता स्त्रीं ॥ ११ ॥ ऐकोनि प्रभु

बोला। भट्ट मनी विरमला। निरुत्तर होते वेळा। राहीला स्वस्थ पंडित ॥ १२ ॥ एकदा वैष्णव सभेत। भट्टप्रभु सन्निध ये त्वरीत। श्रीधरी टीका केली खंडित। नूतन व्याख्या दाविली ॥ १३ ॥ श्री भागवत टीकाकार कृष्णा भक्त स्वामी श्रीधर त्यांचा अत्यंत उपकार भक्तावर जाहला ॥ १४ ॥ परम वैष्णव श्रीधर। त्यांचा थोर अधिकार। सुलभ ग्रंथ केला दुर्धर। संसार तप जनास्तव ॥ १५ ॥ चित्तास मिळावया शांती भागवत ग्रंथोत्पति। समजाविला सुलभ रीती सग्दगुरु भक्त श्रीधरे ॥ १६ ॥ त्यांच्या टीकेचे खंडण। करणें अपराध जाण। गुरुद्रोह पाप दारुण। क्षालन न हो कल्पांती ॥ १७ ॥ श्रीधर प्रसादे कथन। तात्पर्य समजे आम्हा लागून। तोचि प्रसाद समजून। ग्रहण करितो ग्रंथाचे ॥ १८ ॥ श्रीधरानुसरण। करी श्रीकृष्ण भक्त जाण। त्यजूनिया अभिमान। शरण जावे तयाशी ॥ १९ ॥ नामापराध त्यजून। कृष्ण भजन संकिर्तन। करिता श्रीकृष्ण चरण। मीलन होय तयासीं ॥ २० ॥ पंडिताचा गेला अभिमान प्रभुचरणी ये शरण। केला कृपादान संपुर्ण। समाधान पावला ॥ २१ ॥ पंडित गोस्वामी गदाधर। देती किशोर गोपाल मंत्र। दिक्षा घेवूनि भक्तवर। करु लागे उपासना ॥ २२ ॥ करिता चरित श्रवण। निरसे ज्ञानाभिमान प्राप्त होती कृष्णचरण। सात्वन होय चित्ताचे ॥ २३ ॥ करी असता समाशस्त्र। दुर्जन काय करी पामर। तृणहीन भूमीवर। पडता अंगार शीत हो ॥ २४ ॥ पाहु जाता संत सज्जन। संतोषे घालविती जीवन। वैरकरी अकारण। दुर्जन स्वभाव ॥ २५ ॥ करोनिया परनिंदा। स्वप्रतिष्ठा वाढवी सदा। सज्जनासी व्देष स्पर्धा। करीं धंदा दुर्जन ॥ २६ ॥ असो निंदक शेजार। तुकाराम साधुवर। उपदेशिती वारंवार निर्धार वचन अभंगी ॥ २७ ॥ पुरी संन्यासी रामचंद्र त्यांचे कथितो चरित्र। निंदेवाचूनि अन्यत्र। कार्य नसे जयासी ॥ २८ ॥ भगवान माधवेंद्रपुरी भगवभ्दाव वसे अंतरी। संन्यासी असोनी वैखरी। नामस्मरणी सदा ते ॥ २९ ॥ व्रजविहारी गोपाळ। हेचि उपास्थ मानी केवळ। हे मथुरानाथ दयाळ। मुखकमल मज दावा ॥ ३० ॥ माधवेंद्रपूरीचा अधिकारु। ईश्वरपुरी शिष्य वरु गौराचे दीक्षा गुरु अन्य थोर शिष्य जाहले ॥ ३१ ॥ त्या माधवेंद्रपुरी लागून। रामचंद्र मानी गुरुजन। सन्निध्द राही काही दिन। गुरुनिंदक मोजने ॥ ३२ ॥ माधवेंद्रपुरी अतसमर्या। भगवच्चरण धारुनि हृदय। तनु त्यागिता त्याठायी। रुदन करिती उच्चस्वरे ॥ ३३ ॥ हे! नाथ तुमचे दर्शन। केव्हा हो मज लागून। विरहे चित्ती व्यथा

दारुण । तेणें दीन जाहले ॥ ३४ ॥ या विकलतेचे मर्म । ज्ञानी जाणें इतरा संभ्रम । रामचंद्र शब्द शास्त्री परम । उपक्रम केला बोधाचा ॥ ३५ ॥ घेतली असे मत्र्यदिक्षा । कैसी आपण देतो शिक्षा अहमन्य सोडी कक्षा । करी उपदेश गुरुते ॥३६॥ आपण ब्रम्ह आहां स्वये । हृदय मथूरापुरी होय । जगताचा ठाकचिनोहे । दुःख कासया करावे ॥ ३७ । करावा ब्रम्हानुभव । सारावा दूर भ्रम भव । शोक मोहादिक सर्व । अलीप्त पणें त्यजावे ॥ ३८ ॥ ऐसा मूर्खोपदेश । एकूंन जाहले पुरीउद न । ईश्वरपुरी करवी तयास । बाजुस सत्वर घालविला ॥ ३९ ॥ विरहव्यथे व्याकुळ हाऊन । अंती श्रीकृष्ण स्मरण । करिती श्लोक उच्चारण । तयाचे विस्तरण ऐसेकीं ॥ ४० ॥

श्लोक– आयंदीन दयार्द्रनाथ हे मथुरानाथ कदाव लोक्यसे । हृदय त्वदलोक कातर यित । भ्राम्यतिकि करोंस्यहम पद्यावली

हे दीन दयाद्रनाथ । हे दयाळू मथूरानाथ । माझे हृदय व्यथित । दर्शनाविण ॥ ४१ ॥ केव्हा पाहीन मुखकमल चित्त दुःखित अळूमाळ । तुम्हाविणें पळपळ । प्राण व्याकूळ होतसे ॥ ४२ ॥ यापरी करीता स्तवन । जाहले पुरीचे निधन रामचंद्राचे भ्रमण । तीर्थस्थानीं होई ते ॥ ४३ ॥ तेथूनि रामचंद्रपुरी । पातले जगन्नाथ पुरीं । गुरुबंधुसि नमस्कारी भेटी घेतली प्रभूची । ४४ । आपुल्या गुरुचे गुरुबंधु । देखोनी घनिष्ट सबधु । प्रभुनि आदरिला साधु । सत्कारिले तया ॥ ४५ ॥ परनिंदा मुळ स्वभाव । उचल करी सदैव । प्रभुचे देखोनि भक्ति वैभव । असाह्य जाहले तयासी । ४६ । करु लाग प्रभु निंदा जिव्ह विटाळी अनेकदा । मिष्ट पदार्थ खाती सदा सन्यास पदा दुषण ॥ ४७ ॥ खाता सुंदर मिष्टान्न । संन्यास धर्माचे न हो पालन । न होय भजन पुजन । सोंग संपादन केवळ ॥ ४८ ॥ एकें दिनी प्रातःकाली पुरी प्रभुनिवास स्थळीं । येता पिपिलिकावळी । विचरत देखिलीं ॥ ४९ ॥ पुरी करी छिद्रान्वेशन । बोले तदा प्रभु लागून । अधिक मिष्टान्न सेवन । तेणें पिपीला जाहल्या ॥ ५० ॥ इंद्रियाची लालसा । खाद्य पदार्थ लिप्सा । हे विरक्त धर्म संन्यासा । उचित नोहे ॥ ५१ ॥ केवळ दंभ प्रकार । भगवे वस्त्र संभार । दुकानदारीं व्यवहार आचार लवमात्र नसे कीं ॥ ५२ ॥ तरीं ऐसे न करावे । सन्यास धर्मी आचरावे । येणें तितीक्षा स्वभावे । अंगी बाणें ॥ ५३ ॥ केला प्रभुस उपदेश । गेले तेथूनि संन्यासी । अल्पसाध्या आहारात । घेऊ लागले तेधवा ॥ ५४ ॥ पुरीचा स्वभाव कुटिल । भोजनाग्रह करी विपुल । वरी निंदा कुशल । अत्याहारी म्हणोनी ॥ ५५ ॥ काय अत्याहारीं खादाड । पोटी

न राहीं अल्पवाड । होऊनि तने जाड । येई नाड विरक्तींसी ॥ ५६ ॥ भक्तगणा वृतांत । केले तदा साद्यन्त । प्रभु राहती क्षुधित । प्रार्थिती घ्याया आहार ॥ ५७ ॥ गुरु उपेक्षित शिष्य । त्यांचे फळ मिळे शिष्यास । ईश्वरासी अपराधास । करु लागे सगर्व ॥ ५८ ॥ रामचंद्र पुरीचे गुरुबंधु । परमानंद पुरी साधु । प्रभुशी घनिष्ट प्रेम संबंधु । वृत्त कथिले सांद्यत ॥५९॥ प्रभुचे क्षीण शरीर । घेती स्वल्प आहार । बोलती परमानंद पुरी । गौरहर काय हे ? ॥६०॥ मानूनि निंदकाच्या मानूनि बोला । सात्विक जाई रसातळा । यास्तव घ्यावे अन्न जलां । भागला देह अत्यंत ॥६१॥ मानूनि परमानंद बोल । आहारी अल्प केला बदल । चित्ती राहती निश्चल । भक्ता जाहला संतोष ॥ ६२ ॥ समजोनी वैष्णव क्षुद्र । साधक जीव, अधीन विकार । तयाच्या आहार विहारावर । निंदास्त्र चालवी दुर्जन ॥ ६३ ॥ तैना रामचंद्र पुरी । साधूंची नित्य निंदा करीं । पाप भरे, ते अवसरी । सोडा पुरी तत्काळ ॥ ६४ ॥ ऐसे निंदक चरित्र । केले श्रोतया सादर । काम क्रोध विकार । होती दूर ॥ ६५ ॥ संत निंदेचे विष । पचविणें दारुण निःशेष । तेणें होय आत्मनाश । त्याग करावा तयाचा । ६६ ॥ हेचि वचन मानूनि । राघव सुत लीन चरणी । कृपा दृष्टि खत पाणी । काव्य वेली वाढवी ॥ ६७ ॥ श्री चै वि. ग्रंथ रसाळ । अ. ली. प्रसंग सोज्वळ । रघनाथ गृह त्याग, अद्वैत याचन मंगळ । वल्लभ, रामचंद्र चरित्र कथन अडतीसाविया ॥ ६८ ॥ श्रीं. चै वि. ग्रंथ । अ. ली. प्रसंग रघुनाथ गृह त्याग वालक मिषे सन्यास धर्म कथन, अद्वैताचार्य याचना । वल्लभ भट रामचंद्र निंदक चरित कथाकथन नाम अध्याय अडतीसावीया (३८) समाप्त ओ. सं, १६८ एकुण सं. ५१८२ दि. ३-८-६४ सोमवार आषाढ सं. २०२०

# अध्याय समाप्त

## अध्याय ३९ वा

श्री गणेशाय नमः । श्री सरस्वत्यै नमः । श्री गुरुभ्योंनम । श्रीकृष्ण चैतन्याय नमः । गोपीनाथ पट्टनायक । उडीसादेशी भूसंपत्ती रक्षक । द्रव्यापहरणी नसे विवेक । युराजे दिधला मानदंड ॥ १ ॥ पश्चातापे चित्ततप्त । अंतसमयी कृष्ण वदत । प्रभुकृपे होय मुक्त । शरणागत भक्त तो ॥ २ ॥ यात्रेसमयी गौडीभक्त । येती पुरीस दर्शनार्थ । प्रभुचरणी भाव अत्यंत । खाद्य पदार्थ अर्पिति ॥ ३ ॥ दुरदेशीच्या वैष्णव गृहींणी । प्रतिवर्षी सेविती प्रभु लागोनी । श्रवणी पडे मधुरवाणी । होती मनी संतुष्ट ॥ ४ ॥ आपुला संसार संपूर्ण । श्रीकृष्ण चरणीं अर्पण करुनि गृहस्थी आचरण । अनुदिन श्रीकृपा वांछिती ॥ ५ ॥ पानीहाटी राघव पंडित । त्याची भगिनी दमयंती । प्रभुसि अर्पि विविध पदार्थ । विस्तृत पात्री भरोनी ॥ ६॥ सजल्या पात्रीं भोज्य पदार्थ सुगंधयुक्त वस्त्रे आच्छादित । राघव झाली संज्ञायुक्त शिरी करीती धारण ॥ ७ ॥ मार्गी संकिर्तन करीत । आर्तभावे मेळा पुरीत । दमयंती प्रेमळ भक्तासहित । दर्शना येत प्रतिवर्षी ॥ ८ ॥ प्रभुचरणी झाली अर्पण । घेती जगन्नाथ दर्शन । प्रभुसह संकिर्तन । करूनि भोगिती आनंद ॥ ९ ॥ देहासक्त विषयीजन । नाना साधने श्रृंगारी तन । त्यजावी आसक्ति मृणोन समर्पण देवासी करा या॥१० ॥ आपणा जो भोग प्रिय । अर्पावा देवासी यथायोग्य । देहासक्ति उडे निश्चय । झालीया चित्ताचा ॥ ११ ॥ अवंतीपुरी राजा इंद्रद्युम्न । वैष्णव सद्गुणसंपन्न । नाथचरणी दृढमन । मैत्रेतोरवी श्रीकांत ॥ १२ ॥ दृष्टांत होई तया लागून अक्षयतृतिया दिन । करी अंगी चंदन लेपन । प्रमाण मानी देवाज्ञा ॥ १३ ॥ एकमात्र चाले सुगंध लेपन । पावे चंदन यात्रा अभेदान । गिरीधारी मदन मोहन । तीरी नरेंद्र सरोवरां ॥ १४ ॥ पालखीत मिरविती नारी । पार्षदासह सत्वरी । विहार करीं गिरीधारी । चंदनपुकूर नाम तया ॥ १५ ॥ गौडीय भक्ता समेत । प्रभु संकिर्तन नृत्य करीत त्यास्थानी झाले उपस्थित । जलक्रिडा करावया ॥ १६ ॥ करू लागती जलक्रिडा । वाद्ये वाजती घडाडा । संकिर्तन घोष चोखडा । चाले धडाडा सर्वत्र ॥ १७ ॥ चंदन यात्रेत जलविहार करूनि निघाले गौरहर । सवे भक्त संभार १थन मंदिरी पातले ॥ १८ ॥ घेती जगन्नाथ दर्शन । स्वस्थानी जाती भक्तगणचंदन यात्रा महिमान । श्रोतया कथियले ॥१९॥ प्रभु प्रवर्तक संकीर्तन । एकत्र करुनि भक्त, जन । कीर्तन सुलभ साधन । महोमा चैतन्य दाविती ॥ २० ॥

वैष्णव पंथी वेडा संकीर्तन । तथा प्राप्त हो श्रेष्टस्थान । मुर्तीसी घालीती प्रदक्षिणा । नृत्य संकीर्तन यानाव ॥ २१ ॥ तोचीं सकीर्तन रास । करुनि भाविती ईशास । मुखी गाती कवनास । तेणे संतोषे मुकुंद ॥ २२ ॥ यारास नृत्याचा प्रचार । सर्वत्र चाले अपार । तेणें मिषें गौरहर । तोषवी श्रीधर सद्भावे ॥ २३ ॥ नीलाचली वेडा संकिर्तन । करावे घेई प्रभुमन । सप्तदळ रचून । नेमिले दलप्रमुख ॥ २४ ॥ अव्दैत वक्रेश्वर नित्यानंद । श्रीवास सत्यराज अच्युतानंद रहरी हे सप्तपार्षद । प्रमुख नेंमिले ॥ २५ ॥ सप्तदलाचीं वर्तूळे । मध्ये प्रभु असती आगळे । घेरघेती आपुलालें भजनी विस्मृति देहासी ॥ २६ ॥ प्रत्येक दळी गौरहर । एकसमयी वाटे आश्चर्य । पाहूनि चकित भक्तवर । नृत्य अद्भुत वर्णिले ॥ २७ ॥ प्रभुरुपे भिन्नभिन्न । अष्टसात्विक भावपुर्ण । बाहयदशा विस्मरण । संकिर्तनी जाहलें ॥२८॥ अमित चाले रास किर्तन । बाहयदशेचे हो अवधान । भक्तासवे समुद्रस्थान । करुन घेती प्रसादा ॥ २९ ॥ वेडा संकिर्तन प्रेमळ । वंगाल उडीसा उत्कल । सौराष्ट्र गुर्जरी बहूल । महाराष्ट्री अल्पसे ॥ ३० । भारती सर्वत्र संचार जनस्थानी येती गौरहर । पाहूनि प्रसन्न गंगातीर । श्रीराम मंदिर देखिले ॥ ३१ ॥ तेथ देहभान विसरुन । केले वेडा संकिर्तन । घर्मे होय आर्द्र जमीन । भक्ता आश्चर्य जाहले ॥ ३२ ॥ पुरीत वास्तव्या चैतन्य । दर्शना येती भक्तजना स्त्रीसमेत भाव जाणून । किर्तनानंद लुटावया ३३ ॥ भक्त शिवानंद सेन । स्त्रीसह संगे भक्तगण । येई सेवी श्रीचरण । वांछी सुसुत गर्भवति ॥३४॥ सती मनोगत ओळखून । श्रीवदले आशीर्वचन । पुत्र होंई गुणवान । ज्ञाने संपन्न विख्यात ॥३५॥ आज्ञापिला भक्तसेन । करावे पुढति नामकरण । पुरी गोस्वामी नामाभिधान ममाज्ञे ठेवी तयाचे ।३६। आज्ञा मानूनि शिरोधार्य । यथाकाल झाला कुमर । अविकेसी शुंडाधर । भक्तवर लोकी विख्यात ॥३७ ॥ नामे परमानंददास मानी प्रभु आज्ञा संतोष । बाल्यात दिसे गुण विशेष । श्रीदर्शनास बालका ॥ ३८ ॥ बाल्यी बुध्दी विशाल । संस्कार करी माता प्रेमळ । प्रभुचरीत शिकवी रसाळ । गानें समाधान पुत्रासी ॥ ३९ ॥ माता पिता होती प्रसन्न । गौरभक्ताची करविली ओळखण । उत्कंठा व्हावे प्रभुदर्शन । अनुकरण करी पित्याचे ॥ ४० ॥ सेवभक्ताचा व्यवसाय । प्रभुदर्शनाचे करिती दिव्य । यात्रस्थांचीं मार्गी सोय । खर्चावे द्रव्य तयासाठी ॥४१॥ प्रपंची कांता तीन पुत्र । चैतन्यदास रामदास कर्णपुर । चैतन्य चरणी मनस्थिर । जाहले कींकर सकळ ॥ ४२ ॥ तिन्हीं पुत्रात लहान । असोनि पुरीदास बुध्दिमान ।

मति प्रत्युत्पन्न । जानपण, सरस हृदयाचा ॥ ४३ ॥ दर्शनी, धोसरा लावी पित्यास । पत्नी सुतां नेई पुरीस । एकांती करिती भक्त कथेस । भक्तसेन पातला त्या ठायां ॥ ४४ ॥ सुतास घाली प्रभु चरणीं । बालक अंगुष्ठ चोखी वदनी । प्रभु संतुष्ट तेने मनीं । भाविती प्राशी गंगोदक ॥ ४५ ॥ पुसता निवेदी भक्तसेन । परमानंद नामकरण । नाम घेता सायास जाणून । पुरीदास नाम राखीले ॥ ४६ ॥ मस्तकी फिरवोनि हस्त । वदले प्रभू तयाप्रत । तू पुरीदास निश्चित नाथ सेवक होसी वा ॥ ४७ ॥ तैं पासव विख्यात । पुरीदास समस्त भक्तात । प्रभु कृपा ठेवा प्राप्त । बालका जाहला ॥ ४८ ॥ सात वर्षाचा झाला बालक । गाई प्रभुलिला अलौकिक । शिवानंद श्रीचा सेवक दर्शना नावेक पातला ।४९॥ प्रभु चरणी केले नमन । बालक देखिला कृपापुर्ण । मुखे बोले कृष्ण कृष्ण । आज्ञा करिती तयासी ॥ ५० ॥ बालक न बोले कृष्ण । समजाविती शचिनंदन । बालकाचे अबोलपण । काहि केल्या नसुटे ॥ ५१ ॥ आश्चर्ये जन समस्त । पिता होय दुःख ग्रस्त । ऐसा सुत कुलटा अभक्त । कासया उन्मत निपजे ॥५२ ॥ गौरहर करिती नवल । बालक न वदे हरि बोल । नामे बोलती जगत सकल । अपवाद बाळ जाहला ।५३। स्वरूप गोस्वामी ते वेळा । वदलें भक्ता सकळा बाळ बुध्दी मंत आगळा । कथिला मंत्र न वदे की ।५४। प्रभु करिती मंत्र प्रदान बालक कैसे करीकथन राखी मंत्राचे गुप्तपण व्यर्थ न जावा म्हणोनिया ॥ ५५ ॥ गुरुकृत मंत्रोपदेश । प्रकट केलीया होती क्लेश । व्यर्थ दोक्षेचा हव्यास । होई ऐशी शास्त्राज्ञा ॥ ५६ ॥ प्रभु ठेवा करीं जतन । जप मनीं करीं चिंतन । व्हावे मंत्र प्रकटन । मान्य न होय बालकां ॥ ५७ ॥ येणें उत्तरी वाटे संतोष । पुरीत वास्तव्य काही दिवस । ऐके दिनीं पुरीदासास । प्रेमवश बोलती प्रभु ॥ ५८ ॥ करावे वा कांही कवन । आम्ही करु प्रेमे श्रवण। आज्ञा मागुनि प्रमाण । श्लोकगिर्वान रचिला ॥ ५९ ॥

श्लोक :– श्रवसो: कुवलयमक्ष्णो रंजन मुरसो महेन्द्र मणिदाम । वृंदावन रमणींनां मंडन मखिल हरियर्जती ॥६०॥ वृंदावनी रमनीचे कर्णभूषन । तैसे नेत्रीचे अंजन । समस्त तनूचे अभरण । भगवान त्यांचा जय असो ॥ ६१ ॥ बालक वर्षे वय सप्त । कवित्व करी देव वाणींत । भक्त आश्चर्य चकीत । मानित प्रभु कृपा फल ॥ ६२ ॥ प्रभु बोलती वचन । श्लोकी कर्णालंकार वर्णन । केले कवीजनी मान्यता । मान कर्णपूर नामे ख्यात जनी ॥ ६३ ॥ प्रभुकृपे कर्णपूर । विख्यात जाहला सर्वत्र । तये रचिला ग्रंथसंभार । गौरहर भाव जाणूनि ॥ ६४ ॥ अलंकार कौस्तुभ, आनंद वृंदावन

चैतन्य चरित महाकवन । चैतन्य चंद्रोदया दिस्तवन । ग्रंथी नाना केले तैं ॥ ६५ ॥ प्रभु स्तवनार्थ जनना । मानी कृतकृत्य आपणा । तैसी वेची लेखनी रसना । कृष्ण सेवना समजोणी ॥ ६६ ॥ श्रीकृष्ण तेवि प्रभु चैतन्य । एकचि अवतार संपुर्ण। उभयलीला मानी समान। करीं वर्णन स्वकाव्यी ६७। वृंदावन वासी कृष्ण गोपी । चैतन्य भक्तरुपे व्दिपी । अवतरल्या कवण स्वरुपी । काव्यात कल्पी प्रतिभेने ॥ ६८ ॥ रुप, सनातन, रघूनाथदास । हे पृथ्थक दावी सखी-रुपास । तैसे विरादूती स्वपित्यास । प्रमुख खचित कल्पीले ॥ ६९ ॥ गोपीस न्यावया कृष्ण सन्निध । विरादुती कर्म प्रसिध्द । श्रीकृष्ण लीला प्रसंगीं संबंध । शिवानंद अवतार तोचि ॥ ७० ॥ ऐसी सुंदर कवि कल्पना । ऐकोनी संतोषं भक्तजना । कमनिय काव्यामृते रसना । पान करितां स्थिरावली ॥ ७१ ॥ धन्यथोर कविश्वर । वाल्मिकीं हनुमान ऋषीश्वर। मुखी राहे नाम मधूर। गातीं निरंतर रामगुण ॥७२॥ वाणी, तनु तैसे मन सर्वस्व भगवंती अर्पण । देहाचे केले सार्थकपुर्ण धन्य वंश उध्दरीला ॥७३॥ तैसे कर्णपुर भक्तउध्दार । स्तवनी वेंचिले कलेवर। भक्तीने वंश गौरहर ।कविवर जगी विख्यात ।७४॥ वाणीनें प्रभु गुणगाण । श्रवने कथा करी श्रवण । हस्तादिकी देवतार्चन चरणी मन अर्पिले ।७५। नेंत्री सदैव भगवदरुप । पाही चितनी अलभ्य अरुप । त्यासी प्राप्त हो सोमप । ईशस्वरुप तनु हो ॥ ७६ ॥ ऐसे कवि चरित रसाळ । जो का संत सेवक प्रेमळ । श्रवणें बुध्दी निर्मळ । कवित्व कुशल अंगी बाणें ॥ ७७ ॥ तेचि मनी आठवून । चित्ती ठेवी जानकीं रमण । पुढिल कथानु संधान द्यावे चैतन्ये मजलागी ॥ ७८ ॥ मा संतचरण किंकर । ग्रथ रचनी केवळ पामर । परिसंत चरित उदार । स्फूर्ति दाता प्रभु होय ॥ ७९ ॥ गावे गौरांग चरित । मी सत्य अपात्र गुरुकृपा वरद हस्त पवित्र । पामरा करवी तो ॥८० ॥ चैतन्ये चोवीस वर्ष संन्यास । दीक्षा घेतली वैराग्य विवश । तीर्थक्षेत्री केला वास । पुरीस काल घालविला ॥ ८१ ॥ अंतिम आयुष्य नीलाचली । वास्तव्ये मे दिनी पवित्र केली । गौड भक्त रथो सत्व काली । चारमास वस्तीस राहती ॥ ८२ ॥ प्रभु सन्निध संकिर्तन प्रेमोन्मादे विकलजन ध्यानी मनी राही कृष्ण । सुखदाम चित्ती प्रभुच्या ॥ ८३ ॥ चैतन्य सदनी काशीमिश्र । पंडित राही एकांत कुटीर नाम तियेचे गंभीरा । प्रतापरुद्र राजगुरु ॥ ८४ ॥ मिश्र सदन विशाल । यात्रस्थानी योग्य स्थल । वास करीती अल्पकाल भक्त प्रेमळ गौडीय ॥ ८५ ॥ गंभीरा मंदिरी एकांत स्थान । निभृत नीरव निर्जन । येथ विश्राम प्रभुसि मान्य । येति

नित्य त्यागया ॥ ८६ ॥ स्वामिभक्त गोविंद । प्रभुसेवे मानी परमानंद । निस्वार्थ सेवी प्रभुपद । प्रसाद ग्रहण झालीया ॥ ८७ ॥ भोजन झालीयावरी । विश्रामा येति गंभिरा मंदिरीं । प्रभुपाद संवाहन करी । निद्रावरी तोवर ॥ ८८ ॥ निद्रेमाजी चैतन्य । गोविंद उच्छिष्ट करी सेवन । ऐसा नेंम अनुदिन । भाव ठेवूनि चालवी ॥८९॥ संकिर्तनी एकदिन । श्रांत जाहले चैतन्य । मंदिर द्वारात तनु । टाकूनि स्वस्थ पहुडले ॥ ९० ॥ मार्ग जावया नसे भीतरी । स्वामी निद्रिस्त अरुंद द्वारी । गोविंद विचार करी । कैसी सेवा करावी ॥ ९१ ॥ गोविंदे प्रार्थिले चैतन्य । सेवें मार्ग द्या मज लागून । अंग घ्यावे अल्प मुरडून । जाईन भीतरीं त्वरे ॥९२॥ करीन अंग मर्दन । तैसे पाद संवाहन । प्रभु वदले वचन । कासया छळण मांडिले ॥ ९३ ॥ माझे अतिश्रांत शरीर । नहालवे अणुमात्र । तव इच्छे येई ते करी । निद्रावरी मज लागीं ॥९४॥ गोविंदे आणूनि अंगवस्त्र । झाकिले चैतन्य कलेवर । उलंघूनि गेला सत्वर । सेवा तत्पर जाहला ॥९५॥ प्रभु निद्रा भंग होता । भर्त्सिले गोविंद भक्ता । येथ भोजन न करिता । बैसला किमर्थ सांग मज ॥ ९६ ॥ आपणद्वारी निद्रिस्त असता । मज न नरुचे उलंघावे तत्वता । स्वामी शरीर ओलांडिता । पापमाथा मज ये ॥९७ । स्वामी बोलतीं वचन भीतरी आला तनु उलंघून । जावया कासया संकोचून । विना भोजन राहसीं ॥ ९८ ॥ गोविंद वदे हे स्वामीन स्वामीस्तव जाहलो पापभाजन । रोख नरक साधन । प्राप्त मज जाहले ॥ ९९ ॥ सेवेस्तव माझे तन । सेवेसाठी माझा प्राण । सेवेसाठी सर्वस्वार्पन । स्वामी चरणीं केलें की ॥१००॥ करीता असता स्वामी सेवा । प्राप्त झाला नरक ठेवा त्याचीं लव न करीं पर्वा । भाव सेवा नियम हा ॥ १ ॥ परि स्वसुखास्तव । करावे पाप मानी भेव । यास्तव दुःख भोगी सदैव । वात्सल्य भाव न सांडी ॥ २ ॥ गोविंद भक्त एकनिष्ट । पाहुनि प्रभु संतुष्ट । पुरविलें भक्तभिष्ट । कृपा कटाक्षे उध्दरिलें ॥३ ॥ देऊनि गाढ अलिंगन । केले श्रीकृष्ण प्रेमदान । शुध्द भक्ति रहस्य ज्ञान । गोविंद मिषे प्रकटलें ॥ ४ ॥ आपणा शांति सुख मिळावे । वरी तृप्ति झाली सेवावे । ऐसें भक्ते न वांछावे । आपुल्यास्तव ॥५॥ आत्मेंद्रिय सुख कामना । तैसी मुक्ति मुक्ति वासना । कदा न राही भक्त मना । कल्पना चित्ती साहे ना ॥ ६ ॥ शुध्दभक्ति रहस्य । गोविंद मिषे कळे उपासकास । तेणें उपजे सेवेची आस । संसारी उदास राहीं तो ॥७॥ व्हावया चित्त शुध्दी तैसी निर्मळ बुध्दी । योग्य समयी प्रतिशुध्दी व्हावया गोविंद चरित हे ॥ ८ ॥ श्रीचैतन्य कृपामृत प्राशन । करुनिकरी

चरित कथन । तरीं श्रोती अवधान । द्यावे संपूर्ण मजलागी ॥ ९ ॥ श्री. चै. वि. ग्रंथ रसाळ । अ. ली प्रसंग सोज्वळ राघव झाली चंदन यात्रा मंगल । कर्णपूर गोविंद कथा कथन एकूण चाळीसाविया ॥ ११० ॥ श्री. चै. वि अ ली प्रसंग राघव झाली चंदन यात्रा प्रसंग कर्णपूर गोविंद सेवा कथन नाम अध्याय एकूण चाळीसावा (३९) समाप्त

ओ. सं ११० एकूण सं ५२९२ दि. ४-८-६४ मंगळवार आ. वद्य ११-८४ सवत २०२०

## अध्याय समाप्त

## अध्याय ४० वा

श्री गणेशाय नमः । श्रीं सरस्वत्येय नमः । श्री गुरुभ्योनमः । श्रीकृष्ण चैतन्याय नमः । आतां वंदू गौरीहर । जो योग विद्येचे माहेर । परी नामाधिकार । थोर करुनि दाविला ।१। विषे दाहिला शिवकंठ । ख्यात नाम हो निलकंठ । राम नामामृत प्राशीं आकंठ । कंठे काळ दाहशांत हो ॥ २ ॥ काय नामाधिकार । उमेसी कथीं प्रेमे शंकर । सकल वेदशास्त्र सार । रामनाम रुजहर असे ॥ ३ ॥ भवसागर तराया निका । रामनाम असे नौका । येथ संदेह धरु नका । वदले एका संत हे ॥ ४ ॥ रामनाम भव तारक । राम नाम पाप हारक । नाम शांती दायक । काळेमन नाशक नाम हे ॥ ५ ॥ नामे पाषाण तारिले । नामे पापीं उध्दरिले । नामे रोग मुक्त केले । दोष नासिले या नामें ॥ ६ ॥ नारदे केले नाम संकीर्तन । पतित जाहले पावन । ते संकीर्तन महिमान । चैतन्ये जगां दाविले ॥ ७ ॥ त्यांचे गावया चरित्र । म्यां व्हावे तेणें पवित्र । आशिर्वाद कृपापात्र । कींकर चरणी प्रार्थितो ॥ ८ ॥ तुम्ही संत कृपा सागर। रसाळ कथितो चरित्र । आपुला सतत आधार । प्रारंभ करी कथेचा ॥ ९ ॥ हरिदास नामाचार्य । निर्जन पुष्पोद्यानी निरंतर । राही सन्निधी गौरहर । मुखी नाम नित्य वसे ॥ १० ॥ जप संख्या पुरी जाहल्याविण । न करीं अन्न ग्रहण । गोविंद पोंचवी प्रसादान्न । करी भोजन जपांतरी ॥ ११ ॥ ऐके दिनी भक्त गोविंद । घेवूनि येई महाप्रसाद । शयन करी नेत्रबंद । ठाकूर मूखीं नाम ये ॥१२॥ हरे राम मंत्र मुखातून । येई वाचा होई क्षीण । त्याचे करावया कारण । सन्निध गोविंद पातला ॥ १३ ॥ गोविंद पुसे हरिदासा । ठाकूरजी तुम्हा होय त्रास । नाम येई सावकांस । बेचैन झाला दिसतसे ॥ १४ ॥ उठावे सत्वर आपण । करावा प्रसाद ग्रहण । ठाकूर बोलती वचन । संख्या पुर्ण झाली नसे ॥ १५ ॥ परी प्रसादाचा अवमान । न करांवा म्हणून । मुखी घाली एक कण । केले नमन प्रसादा ॥ १६ ॥ गोविंदे कथिला वृत्तांत चैतन्ये केला भेटी संकेत । समुद्र स्नान।हूनि परत । द्वितिय दिनी पातले ॥ १७ ॥ आश्रमी पहूडले ठाकूर । सन्निध जानी गौरहर । कुशल पुसती हळुवार । उत्तर दिधले हरिदासे ॥१८॥ सन्निध येतां गौरहर । नमिले चित्ते निर्वीकार । वदले क्षीण स्वरे ठाकुर । स्वस्थ शरीर असेकी ॥ १९॥ परिमज मनोव्यथा । कष्टवी अतिशय चितां । बुद्धिची होय अस्वस्थता । काही केल्या न जाय ॥ २० ॥तुझीया मनाचा रोग । प्रभु वदले मजसांग । नाम संख्या अपुर्ण सुभाग

होय दुःख मजलागी ।। २१ ।। संख्या पूर्ण जाहलिया विण । चित्ता न पडे चैन । अथवा अन्नग्रहण । मज न रुचें ।।२२।। ठाकूरांची नामनिष्ठा । पाहुनि होती प्रभु संतुष्ट । तया वदले तैं स्पष्ट । तुझा हट्ट बरा नसे ।। २३ ।। तुमचा देह असे सिद्ध । सख्येचा कासया बाध । म्हणोनि न करावा खेद । आग्रह सोडीं सत्वरी ।। २४ ।। तुम्हास लोक शिक्षण निमीत्त । साधन नेम तैसे व्रत । कार्य करणें नेमस्त । नित्य मुक्त सदा निदोर्षी २५ येणें उत्तरीं समाधान । ठाकूर वदले प्रभु लागून । माझे ऐकाजी नम्र वचन । चरणी निवेदन करितसें ।। २६ ।। आपुले प्रेमोन्माद लक्षण । मज सुचवी विलक्षण । शिघ्र लीला संवरण । करण्या इछितां ।। २७ ।। माझे अंतीम मागणे । नेत्री दुःखद प्रसंग पाहणें । श्रवणी न पडो ऐकणें । चरणी प्रार्थना करितसे ।। २८ ।। आपुले आधी माझे मरण । झालीया मज समाधान । ऐसीं आरतो करा पूर्ण । दिनदास विनवीतसे ।। २९ ।। प्रभु चरण हृदयी धरावे । नेंत्री चैतन्य रुप पहावे । मुखी श्रीकृष्ण चैतन्य नाम यावें ।। देहावसान व्हावे यापरी ।। ३० ।। आपण स्वतंत्र ईश्वर । आपला थोर अधिकार । तैसे समर्थ प्रभुवर । सामर्थ अपार तुमचे की ।।३१।। आपुले पश्चात कलेवर । न राहो ऐसी मनिषा फार । भिक्षार्थी मीं उपकार । करा मजवर दयाळा ।। ३२ ।। ऐसे ऐकता ठाकूर वचन । अश्रू युक्त प्रभु लोंचन । कासया वदसी कठोर भाषण । संगती तुझीये स्थिरमन ।३३। वासा एकत्र स्थान । केले सांगाते संकीर्तन । मला देशी साथ अनुदिन । जाशी त्यजून मजलागी ।। ३४ ।। ठाकूर वदे वचन । मी जाती हीन दिन । तुमचिये कृपे थोरपण । तेणें जाहलो पावन ।। ३५ ।। आता नसे अन्य कामना । पुरवाजी आरती मना । ऐकोनि ऐशिया वचना । 'तथास्तु' म्हणोनि तुष्टविले ।। ३६ ।। दोन दिन लोटल्यावर । ठाकूर भेटीस गौरहर । आले समेत भक्तवर । पाहूनि गहिवर दाटला ।। ३७ ।। ठाकूर कुटीसमोर । चालू झाले सत्वर । संकीर्तन ध्वनी गंभीर । श्रवणे भक्तवर आनंदला ।। ३८ ।। हरिदासा घेरीले चौंफेर । संकीर्तन घोष गजर । चाले, ठाकूर गुणसंमग्र । वर्णिती गौर सप्रेमे ।। ३९ ।। रामानंद सार्वभौम, गदाधर । स्वरुप दामोधर वक्तेश्वर । जगदानंदा काशीश्वर । भक्त जमले त्यास्थानी ।। ४० ।। सकल वैष्णवी केला प्रणाम । ठाकुर भक्तिचे जाणुनि वर्म । जावया निघाले परधाम । अश्रूपूर्ण नयन पाहले ।।४१।। आपुलिया नेंत्रासमोर । ठाकुरे बैसविले गौरहर । न्याहाळू लागलें मुखचंद्र । आकंठ पान करावया ।। ४२ ।।

हृदयी धरीले चरण युगुल । दृष्टी दिसू लागे तेजाळ । सकल वैष्णवा चरण धूळ । धारण केली मस्तकी ॥ ४३ ॥ मुखीं श्रीकृष्ण चैतन्य । वारंवार करिती नामोच्चारण । भिष्मापरी इच्छामरण । महाप्रयाण वरियले ॥ ४४ ॥ सकलमुखी हरिकृष्ण । उच्चस्वरे उच्चारण । करिती महासंकिर्तन । प्रेमानंदे चैतन्य ॥ ४५ ॥ श्री प्रसादीवस्त्र आणून । सारे शरीर लपेटून । विमानी ठेविलीं प्राण हीन तनु । दर्शन सकला व्हावया ॥ ४६ ॥ पार्थिव देही ठाकूर । आणूनिया सागर तिरी । स्नान घातलिया वरी । गौरहर वदले भक्तजनां ॥ ४७ ॥ श्री हरिदास चरण धौत । जले, सागर हो महातिर्थ । प्राशन करिती सकल भक्त । वस्त्रे झाकिला जड देह ॥ ४८ ॥ तनूस चंदन लेपन । गर्ते माजी करविले शयन । आपुलिया हस्ते समाधी देऊन । पावन केलें हरिदासा ॥ ४९ ॥ ते समयीं नाम गजर हरि बोल वदले भक्तवर । संकीर्तनाचा उच्चस्वर । अपार चाले ॥ ५० ॥ त्यास्थानी समाधी बांधून । चैतन्ये घातली प्रदक्षिणा । मुखे चाले हरिकिर्तन । सिंव्हव्दारी पातले ॥ ५१ ॥ महोत्सव व्हावा ठाकुराचा । पुकारा केला भिक्षेचा । जमाव जमला विक्रेत्यांचा । प्रसाद भिक्षा द्यावया ॥ ५२ ॥ महाप्रसाद केला संग्रहित । त्याची गणना नसे तेथ । हरिदास विरहोत्सवी लोटे जनता । स्वहस्ते दिधला प्रसाद ॥५३॥ तृप्त केलें सकल जन । भक्तासह केला प्रसाद ग्रहण । उपरीं केले संकिर्तन चैतन्ये विरह महोत्सवे ॥५४॥ हरिदाम विरहे व्याकुळ । करिती विलाप अळूमाळ । कृष्णें दिधला संगस्नेहाळ । तोडिला लीला तयाची ॥ ५५ ॥ धन्य हरिदास ठाकूर । जो पावला भवपार । स्वहस्ते समाधी गौरहर । देती अपार भाग्य हे ॥ ५६ ॥ सार्थकी लागलें कलेवर । मुखीं रामनाम गजर । चुके जन्म मृत्यु फेर । गौरवी गौरहर जयासी ॥५७॥ श्रेष्ठ नामाधिकार । भक्तावरी प्रभुकृपाछत्र । नित्य वैखरी उच्चार । कोंदंडधर तुष्ट हो ॥ ५८ ॥ हरिदास भक्त चरित्र । गाती, होय वाणी पवित्र । वाचे नाम निरंतर । शांतिचिर चित्तासी ५९ ॥ शिवानंद पुत्र चैतन्यदास । निमंत्रण करी प्रभुस । पुत्राची करिती विचारपूस । पृच्छा केली नामाची ॥ ६० ॥ बालक चैतन्यदास नामा । प्रभुचरणीं ठेव प्रेमा । प्रभु वदले आम्हा । नामार्थ न कळे कीं ॥६१॥ आपुलें दासयत्व सूचक नांव । ऐकूनि छपविण्या आपुलाभाव । ऐसें नांव काशास्तव । ठेविले, हेतु कथन करीं ॥६२॥ शिवानंद बोले वचन । श्रीकृष्णे केलीं प्रेरणा । केले म्या अनुसरणा । अन्य कारण नसे की ॥६३॥ ऐसे करूनिया कथन । भोजना केले आमंत्रण । महाप्रसाद आणून । भक्तासंगे जेवविले ॥६४॥

केला असता संन्यास ग्रहण । भोजनी न रुचे पक्वान्न । ते वेळी केला भोजनी सन्मान । अप्रसन्न चित्ती चैतन्य ।। ६५ ।। संन्यास म्हणजे सम्यक्न्यास । त्यजावे विषय भोग विलास । धरावी वैराग्य कास । वृत्तिस अंतर्मुख व्हावया ।।६६।। तरीच त्याचा संन्यास वाटते । चिन्हे हो उपहास। भगवे त्यागाचे प्रतिक खास । संन्यास धर्मी निवेदिले ।।६७।। जाणूनि प्रभु अभिप्राया । चैतन्यदासे पाचारिले यासमया । लघु आहार भोजनी खावया । अग्निमांद्य व्हावया प्रतिबंध ।। ६८ ।। पाहूनि लघु आहार । संतुष्ट जाहले गौरहर । चैतन्यदास पुत्र चतुर । जाणें अंतरी अभिप्राय ।। ६९ ।। शिवानंदा ! पुत्रनिमंत्रणें । संतुष्ट जाहलो भोजने । अंति भक्षूनि दार्घ ओदन । दिधले चैतन्यपुत्रा उच्छिष्ठ ।। ७० ।। चैतन्यदासा अलिंगन । देऊनि बोलिलें आशीर्वचन । अप्राकृत कवि म्हणोन । होई गणना सर्वत्र ।। ७१ ।। आशीर्वादे कृपापात्र । संतुष्ट होतो पिता पुत्र । किर्ती जाहली सर्वत्र । सेवाफल पावलें ।। ७२ ।। करिता गुरु शुश्रूषण । चारी पुरुषार्थ घेती लोळण । गुरुचरणीचे महिमान । किती म्हणोन सांगावे ।। ७३ ।। जाणूनि गुरु मनोगत । भावे होती सेवारत । त्यांचे पुरती मनोरथ । कृपेचे सामर्थ्य थोर की ।। ७४ ।। आपणा सारखे तात्काळ । करिती गुरु न लगे वेळ गुरुकृपेचे हे फळ । मिळे तत्काल सेवेने ।। ७५ ।। मी अनाथ पामर दीन । सनाथ कराजी कृपा करून । जेणे होउ उत्कूर्त कवन । गुरुचरण चित्ति वागली ।। ७६ ।। स्फुर्तीचे सत्य अधिष्ठान । चंद्रशेखर उमारमण । नित्य करी राम गुणगान पावन करोत मजलागी ।। ७७ ।। गुरु, संत सेवा घडो नावेक । म्हणोनि जाहलो संत सेवक । कृतार्थ व्हावया पाईक । चैतन्य चरित्र गातसें ।। ७८ । द्यावे अनुसंधान पुढिल कथे । जेणे मनींचीं शंका फिटे । चित्ती भक्ति प्रेमदाटे । होय भेटी संताची ।। ७९ ।। श्री. चै. वि. ग्रंथ रसाळ । अ. ली प्र. सोज्वळ । हरिदास ठाकूर निरोधान मंगल । चाळीसाध्यायी कथियले ।। ८० ।। श्री. चै. वि. ग्रंथ अ. ली प्रसंग हरिदास ठाकूर निरोधान, चैतन्यदासा निमंत्रण कथा कथन नाम अध्याय ४० सावा ( ४० ) ओ. स. ८० एकूण संख्या ५३७२ दि ४-८-६४ मंगळवार आषाढ। व ११-८६

# अध्याय समाप्त

# अध्याय ४१ वा

॥ श्री गणेशाय नमः ॥ श्री सरस्वत्यैनमः ॥ श्री गुरुभ्यो नमः ॥ श्री कृष्ण चैतन्याय नमः ॥

नमन माझे दत्तात्रया । तापत्रयेनेशी विलया । निवारी सत्वर भवभया । नाशी आमया दुर्वृत्ति ॥ १ ॥ केलें यतिधर्म पालन । व्हावे विशुद्ध आचरण । संन्यासियां दिधले शिक्षण । लोक विलक्षण कृतिही ॥ २ ॥ आपुले शिकवणीचा आचार । श्रीकृष्ण लीलावतार । प्रत्यक्ष करिती गौरचंद्र । चरित्र त्यांचे गातसे ॥ ३ ॥ श्री पंडित जगदानंद पुरीत वसती प्रभु सन्निध । मधुरभावें सेवास्वाद । नित्य घेती स्वानंदे ॥ ४ ॥ प्रभुचें संन्यास ग्रहण । सेवेपुढे मानिती गौण । व्हावे शरीर संरक्षण । क्षण एक पीडा न हो ॥ ५ ॥ प्रभुस्तव उत्तम भोजन । तयांत रुचकर पक्वान्न । शयनासी मृदु आसन । तैलें मर्दन शरीराचें ॥ ६ ॥ नित्य ऐसी पंडित मनिषा । यतिधर्म विरोधी वाटतसे । वाढे नित्य प्रेम संघर्ष । तितिक्षा न राहीं म्हणोनिया ॥ ७ ॥ प्रभुस न रुचे शरीर चोज । उभयांत कलह माजे । वाक्ताडन करी पंडित राज । भक्तराज म्हणुनि साहती ॥ ८ ॥ द्विप्तीं निमित्ते जाती पंडित । मातेसी प्रसाद वस्त्र सहित । देती मानी भेट सुत । वार्ता कथिली प्रभूची ॥ ९ ॥ भक्त शिवानंदसेन । तैसे सकळ भक्तजन । तयां सप्रेमें भेटून । वर्तमान कळविले ॥ १० ॥ सेनें दिधला सुगंधित । तैल कलश प्रभु निमित्त । आणिला लोटले त्वरित । पुरींत माघारे पातले ॥ ११ ॥ पंडितें दिधला तैल कलश । प्रेमे कथिले गोविंदास । व्यथा होतसे प्रभुस । दाहशांत तैलें हो ॥१२ ॥ भावावेशें अंगप्रत्यंग । व्यथित होतसे सर्वांग । दाह शांति तैले सुभग । उपयोग तदर्थ करी बा ॥ १३ ॥ असोनी गाढे पंडित । भुलले शास्त्रीय सिद्धांत । तैलाभ्यंग निषिद्ध । यतिधर्मी निवेदिला ॥ १४ ॥ गोविंदे केलें साग्र निवेदन । प्रभुस, करावया जाई मर्दन । लोक शिक्षण हेतू धरुन । केलें कथन तयासी ॥ १५ ॥ मी संन्यासी असता जाण । कासया मजला तैलाभ्यंगन । तयांत तैल सुगंध पूर्ण । कैसें लक्षण त्यागाचें ॥ १६ ॥ यतिधर्म मोठा विकट आचरितां नये चोखट । त्यांत संयमाची रुंधली वाट । वोखट पण तयाय ॥ १७ ॥ तरी ऐसें न करी । तैल कलश न्यावा मंदिरीं । दीपक लाविलया भीतरीं । श्रम सत्वरी सफल हो ॥ १८ ॥ ऐकूनि स्पष्ट प्रभु वचन । गोविंदे वरिले मौन । पंडितां केलें कथन । मोह न सुटे तयाचा ॥ १९ ॥ पंडितें केलें कथन । कासया करिसी अनमान । क्रोधावरी

न घाली मन । मर्दन करावे तनुचे ॥ २० ॥ गोविंदे केली तीच मात । मर्दना आणिले तैल त्वरित । चैतन्य जाहले कुपित । तयाप्रत बोलिलें ॥ २१ ॥ सुगंधी तैल देई पंडित । मर्दन कराया सतत । सेवक कां न धाडी येथ । तदर्थ घेतला संन्यास ? ॥ २२ ॥ यांत माझा सर्वनाश । तदुपरी होई उपहास । हेंचि कारण सर्व जगास । दारी संन्यासी म्हणावया ॥ २३ ॥ ऐसे ऐकोनी वचन । गोविंद झाला लज्जायमान । पंडितां केले साग्र कथन । दुःखित मन झाले तदा ॥ २४ ॥ प्रेमवशें झाले सक्रोध । कलश फोडिला प्रभु सन्निध । गृहीं परतले जगदानंद । द्वार बंद करुनि बैसले ॥ २५ ॥ करूनिया प्रायोपवेशन । न घेती अन्न जलपान । ऐसे लोटले दोन दिन । स्वस्थ शयनीं पहूडले ॥ २६ ॥ वृत्त परिसतां गौरहर । पंडित गृहीं पातले सत्वर । हाका मारिती उच्चस्वरें । प्रेम निर्भर होवोनी ॥ २७ ॥ भिक्षेस्तव याचक आला द्वारी । त्यासी फिरविता माघारी । सकल पुण्य वेवोनि सत्वरी । जाई शास्त्रतो ऐसें हे ॥ २८ ॥ तयांत मी संन्यासी । भिक्षेस्तव तव सदनासी । मजला माघारा फिरवितोसी । नोहें तुजसीं उचित ॥ २९ ॥ श्रवणीं पडतां प्रभुवचन । पंडित जाहला लज्जायमान । धरी घट्ट प्रभुचरण । विनवी भोजना सत्वरीं ॥ ३० ॥ प्रभूचे होई स्नान, दर्शन । तोवरि पंडितें केलें सिद्धान्न । करूनि चरण प्रक्षाळण । भोजना बैसविले ॥ ३१ ॥ स्वहस्तें वाढिलें पक्वान्न । चित्ती जाहले समाधान । पंडित द्वारां भिक्षाग्रहण । केली, भक्तजन संतोषे ॥ ३२ ॥ पंडितासह भक्तां भोजन । कराया दिधले अनुमोदन । सकलांचे जाहलें समाधान । गेला जिरोन क्रोध तें ॥ ३३ ॥ केवळ प्रभु प्रेम विवश । भाव विरहें पीडा देहास । न व्हावो करी अकार्यास । बोधे तयास शिकविले ॥ ३४ ॥ ऐसा द्वितीय प्रकार । पुढील कथेंत केला सादर । श्रवण करा चित्तें एकाग्र । कृपा पात्र व्हावया ॥ ३५ ॥ नमो आजि वायुसुता । नसे राम भक्त तुझिया परता । राम कार्यार्थ जीविता । देऊनि धन्यता पावला ॥ ३६ ॥ तू मूर्तिमंत ब्रह्मचर्य । तुझेंनि सेवें तेजवीर्य । अंगीं बाणे जी चातुर्य । भक्ति वर्म तुवा शिकविलें ॥ ३७ ॥ तू भक्त राजीव नयन । अखंड करिसी राम गुणगान । मज द्यावें तें स्फूरण । चैतन्य चरित गावया ॥ ३८ ॥ श्री कृष्णचंद्र विरहानल । तेणें चैतन्य व्याकुळ । शयनीं कदली पत्रावळ । विव्हळ होती भक्तजन ॥ ३९ । विरहनले तनू क्षीण । तनुसि पीडा हो दारूण । शीतल घेतां कदली पर्ण करिती शयन त्यावरी ।४०। सुकुमार शरीर नित्य तप्त । तें पर्णीं पडे अस्ताव्यस्त । पाहोनि भक्त दुःखित। पंडिते केला

उपाय ।४१। भगव्या रंगाचे वस्त्र आणून । पंडिते मृदुशय्यासन । गोविंदास दिधले करवून । प्रभु कारणें ।४२। गादीवरी प्रभुचे आसन । घालूनि करती प्रभुशयन । करी ऐसे कथिले निक्षून । केले गमन स्वगृही ।। ४३ ।। करावया आले प्रभुशयन । तक्या गादी मृदूआसन । संतप्त झाले चैतन्य । पाचारण केले सेवका ।। ४४ ।। घावरा जाहला गोविंद अंगसुटे कंप स्वेद । येऊनि विनम्र प्रभुसन्निध । काय आज्ञा ? पृच्छा करी ।। ४५ ।। वरी क्रोध प्रेमा ऱ्हदयात । प्रभु वदले तयाप्रत । मी धर्म भ्रष्ट व्हावे मनात । तुमच्या नित्य वसतसे ।। ४६ ।। माझी तनु तुमच्या आधीन । तेणें मी पराधीन । परां संन्यास धर्म त्यागून । राहीन ऐसे न मना ।। ४७ ।। तनु सुखास्तव ध्यान भजन । करिता तुम्हीं सकल जन । माझी शरीर चिंता दारुण । तुम्हा लागली ।। ४८ ।। शरीर आणि चैतन्य । हे असती भिन्न भिन्न । शरीरपीडा जरी दारुण । आत्मां आनंदघन नित्याचा ।। ४९ ।। आत्मा नित्य सुखमय । तैसाचि तो आनंदमय । विभुचैतन्य प्रेममय ज्ञानमय स्वय जाणावा ।। ५० ।। संन्यास धर्म टाकून । चोजवावे नित्य तन । वांछाराही तुम्हा लागून । आश्चर्य मनी वाटते ।। ५१ ।। प्रभु वदलें वचन । कोठूनि आणिलें सुखासन । कोणी दिधलें यास्तव धन । कथन करीं सकल ।।५२।। गोविंद वदे नम्र वचन । जगदानंदे दिधलें सुखास्तव । आज्ञापिलें मज लागून । ऐकूनि मनी वरमलें ।। ५३ ।। जाणूनि पंडित स्वभाव । वृत्ति स्थिर हा सभ्ज भाव । गोस्वामी जाणूनि मनोभाव । चैतन्यदेवा वदलें तै ।। ५४ ।। आपुली अस्वस्थावस्था । पाहुनि पंडिते केली व्यवस्था । हा आपत्ती काळ तत्वता । रुग्णावस्था जाणावी । ५५ ।। रुग्णकाली नियम पालन । करणें होय सकला कठींण । म्हणोनि मर्यादा तिक्रमण । झाले तया हानी ना ।। ५६ ।। ऐकूनि स्वरुप वचन । गंभीर वचे वदलें चैतन्य । आपण स्वयं असतासुज्ञ व्हावया पतन इच्छिता ।। ५७ ।। आज मृदुशय्यासन । उद्या भोजनी मिष्टान्न । तदुपरी तनु मर्दन । पलंगी शयन वासना हा ।। ५८ ।। शरींर नियम जै सुटे । हळुहळू सारे वोहटे विरक्ति वस्त्रफाटे । भोगी वोखटे शरिर हो ।। ५९ ।। गिरीहूनि जल प्रवाह सुटला । तो पर्वता नये भेंटायला । पवित्रता मलीन वस्त्राला । काही केल्या नये ।। ६० ।। येथ आग्रहाचे नसे काम । तनुस होती जरी श्रम । परिपालन नित्यधर्म । मनीं वर्म जाणूनि ।। ६१ ।। ऐसे चैतन्य वचन । स्वरुपे केले श्रवण । गोविंदे मृदु आसन । संकेते बाजूस सारिले ।।६२ ।। स्वरुप गोस्वामी व्दितीय दिनी । सुकी कदलीपर्णे आलें घेऊनि । नखे तुकडे करुनि । जीर्णवस्त्री घातले

॥ ६३ ॥ त्याची शय्या बनविली । कष्टे प्रभुसि मान्य जाहली । सकल सतोषली । स्वीकारली म्हणोनिया ॥ ६४ ॥ असता साधक संन्यासी । श्रीकृष्ण प्रेम चित्तासी । भोग विषय नसावे मानसीं । आदर्श शिक्षेसी दिधलें ।६५। स्वये निष्ठा युक्त आचार । परिणाम होय भक्तावर । म्हणोनि पाळीती गौर । नियमे शरिर चोजविले ॥ ६६ ॥ संन्यासी असोनि विरक्ति । गृहस्थी असोनि शांती । हरिदास असोनि वैराग्य भक्ति । तरी हे ही अपुर्वता ॥ ६७ ॥ ज्ञानावाचूनि संत । दक्षते वाचूनि अर्थ । विरक्तिविण परमार्थ । हाता नये ॥ ६८ ॥ ऐसे वर्म जाणून । जगास दाविलें आचरून । हेचि चैतन्य महिमान । किती म्हणोन वर्णावें । ६९ । त्यांचे चरणी मस्तक । ठेवूति करी प्रार्थना एक । कवनीं स्फूर्ति, द्यावा विवेक । परलोक साध्य जेंणे होय ॥ ७० ॥ चैतन्य चरित्र गुणगानी । रमावीं तनु मन वाणी । तेचि स्वरूप असावे चिंतनीं । मागणा संतसेवक करी ॥ ७१ ॥ म्हणोनि द्यावें अवधान । प्राप्त होतीं सुख साधने । इहपर लोक त्यागुणें । साध्य वचनें सतांचीं ॥ ७२ ॥ मी तो केवळ संतसेवक । मजसी द्या मति विवेक । प्रार्थी चरणी नावेक । सुख प्राप्त व्हावहा ॥ ७३ ॥ श्री चैतन्य वि. ग्रं. रसाळ । अं. ली, प्रसंग सोज्वळ । जगदानंद पडित कथा मंगळ वर्णिली एकेचाळीसाविया ॥ ७४ ॥ श्री चै. वि. ग्रं. अं. ली. प्रसंग जगदानंद पंडित चरित कथन नाम अध्याय एकेचाळिसावा (४१) समाप्त ॥

ओवी सं. ७४ ए. सं. ५४४६ दि- ५-८-६४ बुधवार

## अध्याय समाप्त

## अध्याय ४२ वा

॥ श्री गणेशाय नमः । श्री सरस्वत्यै नमः । श्रीं गुरूभ्यो नमः । श्रीकृष्ण चैतन्याय नमः ॥

नमन माझे संतजना । तुमची सगुण उपासना । पावन केले दीन जना । नामस्मरणा बोधोनी ॥ १ ॥ नामस्मरण प्रताप । दुष्कृति केले अपाप । चित्तीं लावूनि भक्ति रोप । संसार ताप शमविला ॥ २ ॥ नामे चित्त निर्विषय । प्रपंच वृत्ति क्षय होय । ईश प्राप्त्युपाय । प्रमेय दाविले उकलोनी ॥ ३ ॥ तुम्ही संत मायबाप । तुमची कृपा झालीया अमूप । सकल विद्याधिप । परमार्थ सोपा होई त्या ॥ ४ ॥ व्हावे निर्विषय मन । म्हणोनि सेवी संतचरण । मी संत सेवक दीन । कवित्व स्फुरण द्या मज ॥ ५ ॥ टोटा यमेश्वर शिवस्थाना । घ्यावया जाती प्रभुदर्शना । मार्गी कोणी अंगना । गात कवना मधुर स्वरे ॥६ ॥ कंठकोकील, मधुरसुरेल । गात होती भावें निर्मळ । गीत गोविंद काव्यरसाळ । झाले सकल विमोहित ॥ ७ ॥ मुग्ध जाहले सकल जन । विस्मृत झाले देहभान । अल्प काव्य वर्णन । श्रोतेजन ऐका सप्रेम ॥ ८ ॥

श्लोक – चंदन चर्चित नील कलेवर पीत वसन वनमाली ॥ केली चलन्मणि कुंडल मंडित गणू युगस्मित झाली एका सखीचे दुसरीस कथन । पहा सखये ! हा श्रीकृष्ण । कैसा अपूर्व शोभायमान । वाणी वर्णना असमर्थ ॥ ९ ॥ नीलवर्ण तनु कोमल । सुगध चर्चित अंगभाल । पीतवसन मकरकुंडल । गळामाळ वैजयंति ॥ १० ॥ रासक्रिडा समय मकरकुंडले कांचन मय । हालताती अतिकमनीय । कपोली अतिशय शोभती ॥ ११ ॥ त्याचे मंद हास्यमुख । अपूर्व शोभते देख । माझिया चित्ता हरिख । नेत्रसुखे संतुष्ट हो ॥ १२ ॥ मधूर जयदेव कवि कवन । चित्त थरारे करिता श्रवण । प्रभु विसरले देहभान । श्रवणें विव्हळ जाहले ॥ १३ ॥ प्रियतम आपुला कृष्ण । त्याचे स्वरुप वर्णन । तयांत सुरेल गान । भान न राही ॥ १४ ॥ जेथ चाले गान प्रकार । जावया धावले गौर । गोविंदे केला प्रतिकार । जाता अकार्य घडे की ॥ १५ ॥ चाले देवदासी संगीत । कासया प्रभो जाता तेथ । कंटक असतीं मार्गात । अनुचित यति धर्मास ॥ १६ ॥ श्रवणी पडता स्त्री नांव । विस्मित होत वाटे भेव । बाह्य दशा ये सर्वथैव । गौरविला गोंविद ॥१७॥ गोविंदा! तुजसी धन्य । माझे वाचविले जीवन । स्त्रीस्पर्श माझा प्राण । खोवून बैसतो ॥ १८ ॥ तुझे मजवरी ऋण

कदा न फीटे जाण । मज केले सावधान । न हो उल्लंघन धर्माचे ॥ १९ ॥ ऐसे वदुनि चैंतन्य । गाठीती त्वरे स्वस्थान गोविंद स्तुति गान । विरक्त जनाबोधाया ॥ २० ॥ श्रीकृष्ण गुणगान निमीत्त । ऐकावे स्त्रीसंगीत । साधक संन्यासी विरक्त । तया उचित नसे हे ॥२१ ॥ ऐसी देऊनि शिकवण । केले सावध भक्तजन । संप्रदाय शुध्दपण । राखिती चैतन्य आचारे ।, २२ । संताचे थोरपण । आचारी असे जाण । फुका शब्दाचे जाडपण । चित्ती न वसे कदाहीं ॥२३॥ परनिंदा धन स्त्रीसंग । संत यापासाव निःसंग । भक्ति सागर अथांग । सत्संग भेषज दीनाचे ॥ २४ ॥ श्रीचैतन्य भक्त रघुनाथ । त्याचा कथितो वृत्तांत । वास्तव्य काशीपुरीत । देऊनि चित्त परियेसा ॥ २५ ॥ काशीवासी महापंडित । तपनमिश्र ख्यात । तयाचा सुत रघुनाथ । अनुरक्त गौरपदी ॥ २६ ॥ वाटे घ्यावे प्रभुदर्शन । रघुनाथ निघे काशीहून मार्ग केला आक्रमण । दक्षीणदिशेस जावया ॥२७। मार्ग सावकाश क्रमीत । असता गौडदेशात । येता रामदासकायस्थ। नाथ दर्शनेच्छु भेटला ॥ २८ ॥ उपनाम असे विश्वास । पंडित विनयी निघे यात्रेस । रघुनाथाची धरिली कास । दर्शनी आस प्रभुच्या ॥ २९ ॥ उभय आले पुरीत । पातले प्रभु दर्शनार्थ । सन्मुख देखती शचिसुत । प्रणिपात केला साष्टांग ॥ ३० ॥ गौरहर वदले प्रेमळ । वृत पुसिले सकळ। श्रवण केले क्षेम कुशल । संतोष वाटला चित्तासी ॥३१॥ वास्तव्य केले आठमास । नित्य पाचारी भिक्षस । रघुनाथ स्वहस्ते भोजनास । घाली सुग्रास पक्कान्ने ॥ ३२ ॥पश्चात करीं प्रसाद ग्रहण । ऐसा नेंम चाले प्रतिदिन । अशनीं होता संतुष्ट मन । धन्य मानी रघुनाथ ।३३। ऐसे लोटले अष्टमास दिधली आज्ञा रघुनाथास । वृध्दमाता पिता सेवेंस । करीं कर्तव्य आपुले ॥ ३४ ॥ तुझी विरक्त वृत्ति । तुज नसे गृहासक्ति । तैसी प्रपंच आसक्ति । पासूनि मुक्त सदा तु ॥ ३५ ॥ यास्तव न करी संसार । पि सेवेत राही तत्पर कारण तू एकला पुत्र । दुःखभार पित्यासी न हो ॥३६ ॥ मातापितयाच्या अंतकाली । तुवा असावे जवळी । नदनंतर यावे निलाचली । पाळी आज्ञा यापरीं ॥ ३७ ॥ माता पिता देवा समान । त्याचे करावे पुजन । घ्यावे नित्य आशीर्वचन । करी कल्याण सर्वथा ॥३८॥ यापरी बोधोनि रघुनाथ । काशीस जावया निघे त्वरीत मन जाहलें दुःखींत विरहे चित्त व्याकुळले ॥ ३९ ॥ लोटे पंचवर्षाचा काल । माता पित्याचा होई काल । क्रियाकर्म केले सकळ । मुक्त जाहला रघुनाथ ॥ ४० ॥ सत्वर पातला पुरीत । दर्शनार्थं होता आर्त । सन्निध ठेविती तयाप्रत । भक्तितत्व त्यासी

बोधावया ॥ ४१ ॥ पुनरपी ठेविले अष्टमास । भक्तितत्व शिकविले तयास । आज्ञा दिधलीं वृंदावनास । कृष्णदर्शनास जावया ॥ ४२ ॥ वृंदावनी घेई दर्शन । तेथ असतीं रुप सनातन । तुझे करिती शंका समाधान । भागवत पठण करी तु ॥ ४३ ॥ घ्यावे नित्य कृष्ण नाम । चालवी पारायण नियम । चित्तीं वसो भगवत्प्रेम । कृपाळू परम कृष्णनाथ ॥ ४४ ॥ पवित्र भूमिवृंदावन । परम मंगलमय भगवान । भक्ताचे आश्रय स्थान । त्याग न करावा तयांचा ॥४५ ॥ कृष्णचंद्र भक्त प्रेमळ । तुझे नित्य करी मंगल । तेथील रजःकण सकल । कृष्णाचे नि जाहले पवित्र ॥ ४६ ॥ चाले गोपिका नृत्य । विरहे व्याकुल होती तप्त । त्यांचा दाह करी शांत । तृप्त होती गोपिका ॥ ४७ ॥ भक्त मनीचा सत्य भाव । असलया, भेटे कृष्णदेव । तयावरी कृपा सदैव । करी भव भ्रम दूरी तो ॥ ४८ ॥ ऐसा बोधिला रघुनाथ । निरोप देतीं तयाप्रत । वृंदावनीं असती जे भक्त । स्मृती तयासी देईजें ॥ ४९ ॥ रघुनाथे केले गमन । यें काशीपुरा लागून । प्रयागाहुनि वृंदावन । येई सनातन भेटलें ॥ ५० ॥ सनातने केला सत्कार वास्तव्या दिधलें आपुलें घर । सत्संग भागवत निरतर । पठण सुरू जाहलें ॥ ५१ ॥ पठण समयी रघुनाथ । सुस्वर श्लोक गात । श्रोतयांचे श्रवण तृप्त । प्रेम अद्भूत प्रकटे तै ॥ ५२ ॥ रघुनाथ कंठ कोकीळ । मनी भक्तिभाव प्रेमळ । गायनी उमटे भाव सकल । नेत्राश्रु जल वोसरे ॥ ५३ ॥ वृंदावन विहारी गोविंद त्याचे ध्यान नित्य ऱ्हदी । तेणें होय चित्तशुद्धी । प्राप्ति निरुध तयाची ॥ ५४ ॥ यापरी भगवत्सेवन । रघुनाथ घालवी जीवन । जयाचे भक्तिचे नि गुणें प्रसन्न झाले चैतन्य ॥ ५५ ॥ ऐसा भक्त रघुनाथ । त्याचे चरित्र गायिले येथ । चैतन्य चरणी सादर करित । पुढील चरित गातसे ॥ ५६ ॥ रघुनाथ मिषे शिकवण । देती, सकलां चैतन्य । संसारी आसक्त जीवन । कदा न राही वर्तावें ॥ ५७ ॥ मातापिता गुरूजन । त्यांची सेवा केल्या जाण । घडे ईश्वर दर्शन । संत सज्जन बोलिले ॥ ५८ ॥ त्यजावीं प्रपंचासक्ति । तैशापरी विषयासक्ति । असावी निर्लोभ वृत्ति । उमाकांत चित्तीं भजावा ॥ ५९ ॥ नमो आधीं जगज्जननी । सकल जगाची स्वामिनी । आदि शक्ति म्हणवूनि । तुझेनि उत्पत्ति, स्थिति, संहार ॥ ६० ॥ तुझिये आश्रये विण । न हो ब्रम्हांड सृजन । प्रकृति पुरुष मीलन । उत्पत्ति कारण सृष्टीचे ॥ ६१ ॥ तुझी केलीया चरण सेवा । भक्त पावले वैभवा । जाणूनिया सुखभावा । धरी भक्तिभाव अंतरी॥६२॥ माते! तुझे अनंत उपकार ।

न फिटती देता कलेवर । दिन दुबळया आधार । जगज्जननींचा ॥ ६३॥ रामकृष्णादि भक्तवर । तुझिया सेवे निर्भर । शक्ति उपासना कठिण तर । जीवनी घोर आचरिली ॥ ६४ ॥ तया देऊनि दर्शन । सिद्ध केले मातृपण । मी बालक अज्ञान । प्रसन्न व्हावे विनवी तसे ॥ ६५ ॥ वांचूनि मातेच्या आधारा । बालक काय करी विचारा । मज तुझचि आसरा । मातृहिन तारी अंबे! तू ॥६६ । तुझे कृपेचे नि योगे । संतचरित गावू लागे । ते स्फुरण लागवेगे । द्यावें माते! गे ! मज ॥ ६७॥ चैतन्य स्वये श्रीकृष्ण । असता भक्तासि शिक्षण । द्यावे आदर्श म्हणोन । झाले अवतीर्ण राधाभावे ॥ ६८ ॥ कृष्णाची श्रेष्ठ सेविका । असे प्रियतम राधिका । तिची कांती भाव घेऊनि निका । भक्तितत्व । भाविका दाविलें ॥ ६९ ॥ श्रीकृष्ण वांछापुर्ण । करणें हेचि आराधन । करी म्हणोनि पुराण । राधिका जाण संबोधी ॥७०॥ लीला पुरुषात्तम श्रीकृष्ण । त्यांची अभिलाषा जाणून । सर्वेंद्रिये सर्वभाव नितपुर्ण । करण्या तनू धरिली की ॥७१॥ तीच प्रियतम राधिका । श्रीकृष्ण श्रेष्ठ आराधिका । श्रीराधा नामे श्रेष्ठ सेविका । मान्य सकळीका जाहली ॥७२॥ भक्तिचेनि गुणें थोरपण । पावे श्रेष्ठ सेवक जाण । सेव्य तत्वद्दारा आपुलें भोगसाधन । प्राप्त न करी कर्म कदा ॥७३॥ तो निरंतर इंद्रिय समस्त तद्वारा सर्व तो भावे नेमस्त । कैसातुष्ट हो रुक्मिणीकांत । चित्त तयाचे त्याकडे ॥ ७४ ॥ त्याचे चित्ती अनुसंधान । तेणें शरिरी भावावेश पुर्ण । तैसेचि राही उन्मत्त पण । मधूर भाव लक्षण हे ॥७५॥ तोचि आवेश उन्मतता । त्याचि झालीया अधिकता । पराकाष्ठेचीं ये शिथिलता । विकलता होय तनुची ॥ ७६ ॥ अवस्था झालीया ऐसी । भक्ति शास्त्र परिभाषी । दिव्योन्माद नामेसीं । कथिलीं असे सविस्तर ॥ ७७ ॥ मधुर भाव अंतिम लक्षण । दिव्योन्मादे तनु क्षीण । विरहिणी सोसे दुःख दारुण । राधाभाव जाणा पूर्ण हा ॥ ७८ ॥ राधाभावे चैतन्य शरिर । नित्य होई पीड जर्जर । दिव्योन्माद निरंतर । विरह अपार होतसे । ७९॥ स्वप्नामाजी एकदिन । शामसुंदर मुरली वदन । राधाराणी संगें घेऊन । गोपींसह नर्तन करिता हे ॥ ८० ॥ गोपी होवोना मंडलाकार । नृत्य करिती अतिसुंदर । मध्य नाचे मुरलीधर । दृष्य मनोहर पाहती ॥८१॥ पंच पच उषःकाली । प्रभु निद्रा नाही गेलीं । पाहूनि गोविंदे तें वेळी । जागृति दिधली तयासी ॥ ८२ ॥ जागृत होता विरह व्याकूळ । होऊनि वदलें कृष्ण घननीळ । तुझे रूप पाहता सोज्वळ । गुप्त जाहला कासया ॥ ८३ ॥ कोठे गेला मुरलीधर । कैसे रूप देखिले मनोहर । पाहण्या नेत्र

अधिर । विरह विधुर जाहले ॥ ८४ ॥ आपुला श्रीदर्शन नेम । त्वरीत करावे नित्य कर्म । गोविंद चतुर परम । केलें कथन प्रभुपदि ॥ ८५ ॥ नित्य कर्म आटोपून । श्रीचे घ्यावया दर्शन । नाथ मंदिरा लागून । जाती चैतन्य सत्वरी ॥ ८६ ॥ श्रीजगन्नाथ नाटय मंदिर । तेथूनि गरुड स्तंभ असे दूर । त्याच्या पृष्ठभागी गौर । जोडोनी कर राहती ॥८७ ॥ नारायणाचा नित्य पार्षद । गरुड असे भक्त शुद्ध । पश्चात भागी त्यासन्निध । राहोनीं घेती दर्शना ॥८८॥ शुद्ध भक्तानु गमन । करुनही व्हावें कृष्णदर्शन । मनुज होई आर्त मन । भगवान कृपा पात्र हो ॥ ८९ ॥ त्या गरुड स्तंभापासूनि । प्रभु घेती श्रीदर्शन । भावावेश मग्न तन । अश्रुपुर्ण नेत्र जाहले ॥९०॥ लक्षावधी जन समुदाय । दर्शनी लोटे निर्मळ भाव । ते समयीं श्रीदर्शनास्तव । उत्कलवासिनी नारीये ॥ ९१ ॥ जनसमुदायाच्या भिडे । स्त्रीस दर्शन न घडे । प्रभु स्कधीं पद ठेऊनि चढे । गरुड स्तंभी तेधवा ॥ ९२ ॥ घेतहो ती सुखें दर्शन । गोविंदे व्यग्र होऊन । कथिले स्त्री लागून । उचित नोहे कम तुज ॥ ९३ ॥ गौरहर वदले गोविंद । सेवाभावे आनंद कंद । तुष्टवीं तिजला प्रतिबंध । सेवेंत बाध अनुचित ॥ ९४ ॥ कळले स्त्री लागून । पाय ठेविला ते चैतन्य । खिन्न जाहले तिचे मन । शरण चरणी पातली ॥९५॥ देखूनि स्त्रींचा आर्तभाव । करिती गौर गौरव । मज नसे ऐसा भाव । जो कीं हिजला प्राप्त हो ॥ ९६ ॥ तिचा देह मन प्राण । नाथ चरणी आविष्ट पुर्ण । नसे तिज बाह्यज्ञान । स्कंधी पाऊल अन्याचा ॥९७ ॥ महिला अत्यंत भाग्यवंत । ईशचरणी अनुरक्त । तिच्या कृपेस्तव प्रार्थना करित । आर्तता चित्ती उदया ये ॥ ९८ ॥ जननी ! तुझी एकाग्रता । कोटि कोटि तुज धन्यता । माझ्यास्कंधी पद ठेविला । चित्ताचे भान हरपले ॥ ९९ ॥ ऐसे बोलोनी करिती रुदन होता भाव गेला निघून । बाह्यदशे मन खिन्न । गेले स्वथानी गौरहर ॥ १०० ॥ महाप्रभु शिकवण । उपदेशिला भक्तगण एकांतीं सेविता कृष्ण । होणे तद्रुपते समयी ॥ १ ॥ तयाचे ऐसे कथन । जे इंद्रिय जन्य ज्ञान । तद्द्वारा स्त्रीपुरुषा लागून । बाह्यरुपे पाहणे उचित ना ॥ २ ॥ जवं जवं प्रकृति ज्ञान अभिमान । स्त्रीपुरुष म्हणोन । त्यासी कैचे ? नाथ दर्शन । आर्त भाव न हो तया । ३ । श्रीकृष्ण सुखानु संधान । ज्याचे होय अविष्ट मन । तो सर्वत्र कृष्णसेवा उपकरण । भावपूर्ण पाहि सर्वदा । ४ ।। असो ऐसे चरित्र निर्मळ । श्रोतया कथिले प्रांजळ । संत दयाळ करकमल । मस्तकी स्नेहाल ठेविती ॥५॥ मज नसे सेवा भाव । कैचा पोटि आर्तभाव । परिचित्ती सदैव ।

ठेवी स्मृति संताची ॥ ६ ॥ सेवेचा नसे स्वभाव । परिभक्ती वसे सदैव । वाढो ही चित्ती हाव। सीतापतीस विनवीं मी ॥ ७ ॥ श्री. चै. वि. ग्रं रसाळ । अं. ली. प्र सोज्वळ । उत्कल महिलाभाव रघुनाथ कथा मंगल । देवदासी गान बेचाळीसाविया ।१०८। श्री. चै, वि. ग्रं अंलीं देवदासी गीतगान रघुनाथ उत्कल महिलाभाव कथा अध्याय ४२ समाप्त

ओ. सं १०८ ए. ५५५४ । ६-८-६४ बुधवार आ व १२ श १८८६

## अध्याय समाप्त

बोधावयां ॥ ४१ ॥ पुनरपी ठेविले अष्टमास । भक्तितत्व शिकविले तयास । आज्ञा दिधली वृंदावनास । कृष्णदर्शनास जावया ॥ ४२ ॥ वृंदावनी घेई दर्शन । तेथ असतीं रुप सनातन । तुझे करिती शंका समाधान । भागवत पठण करी तु ॥ ४३ ॥ घ्यावे नित्य कृष्ण नाम । चालवी पारायण नियम । चित्तीं वसो भगवत्प्रेम । कृपाळू परम कृष्णनाथ ॥ ४४ ॥ पवित्र भूमिवृंदावन । परम मंगलमय भगवान । भक्ताचे आश्रय स्थान । त्याग न करावा तयांचा ॥४५ ॥ कृष्णचंद्र भक्त प्रेमळ । तुझे नित्य करी मंगल । तेथील रजःकण सकल । कृष्णाचे नि जाहले पवित्र ॥ ४६ ॥ चाले गोपिका नृत्य । विरहे व्याकुल होती तप्त । त्यांचा दाह करी शांत । तृप्त होती गोपिका ॥ ४७ ॥ भक्त मनीचा सत्य भाव । असल्या, भेटे कृष्णदेव । तयावरी कृपा सदैव । करी भव भ्रम दूरी तो ॥ ४८ ॥ ऐसा बोधिला रघुनाथ । निरोप देतीं तयाप्रत । वृंदावनीं असती जे भक्त । स्मृती तयासी देईजें ॥ ४९ ॥ रघुनाथे केले गमन । यें काशीपुर। लागून । प्रयागाहुनि वृंदावन । येई सनातन भेटलें ॥ ५० ॥ सनातने केला सत्कार वास्तव्या दिधलें आपूलें घर । सत्संग भागवत निरतर । पठण सुरू जाहलें ॥ ५१ ॥ पठण समयी रघुनाथ । सुस्वर श्लोक गात । श्रोतयांचे श्रवण तृप्त । प्रेम अद्भूत प्रकटे तैं ॥ ५२ ॥ रघुनाथ कंठ कोकीळ । मनी भक्तिभाव प्रेमळ । गायनी उमटे भाव सकल । नेत्राश्रु जल वोसरे ॥ ५३ ॥ वृंदावन विहारी गोविंद त्याचे ध्यान नित्य ऱ्हदी । तेणें होय चित्तशुद्धी । प्राप्ति निरुध तयाची ॥ ५४ ॥ यापरी भगवत्सेवन । रघुनाथ घालवी जीवन । जयाचे भक्तिचे नि गुणें प्रसन्न झाले चैतन्य ॥ ५५ ॥ ऐसा भक्त रघुनाथ । त्याचे चरित्र गायिले येथ । चैतन्य चरणी सादर करित । पुढील चरित गातसे ॥ ५६ ॥ रघुनाथ मिषे शिकवण । देती, सकलां चैतन्य । संसारीं आसक्त जीवन । कदा न राही वर्तावें ॥ ५७ ॥ मातापिता गुरूजन । त्यांची सेवा केल्या जाण । घडे ईश्वर दर्शन । संत सज्जन बोलिले ॥ ५८ ॥ त्यजावीं प्रपंचासक्ति । तैशापरी विषयासक्ति । असावी निर्लोभ वृत्ति । उमाकांत चित्तीं भजावा ॥ ५९ ॥ नमो आधीं जगज्जननी । सकल जगाची स्वामिनी । आदि शक्ति म्हणवूनि । तुझेनि उत्पत्ति, स्थिति, संहार ॥ ६० ॥ तुझिये आश्रये विण । न हो ब्रम्हांड सृजन । प्रकृति पुरुष मीलन । उत्पत्ति कारण सृष्टीचे ॥ ६१ ॥ तुझी केलीया चरण सेवा । भक्त पावले वैभवा । जाणूनिया सुखभावा । धरी भक्तिभाव अंतरी॥६२॥ माते! तुझे अनंत उपकार ।

न फिटती देता कलेवर । दिन दुबळ्या आधार । जगज्जननींचा ॥ ६३॥ रामकृष्णादि भक्तवर । तुझिया सेवे निर्भर । नवित उपासना कठिण तर ! जीवनी घोर आचरिली ॥ ६४ ॥ तया देऊनि दर्शन । सिद्ध केले मातृपण । मी बालक अज्ञान । प्रसन्न व्हावे विनवी तसे ॥ ६५ ॥ वांचूनि मातेच्या आधारा । बालक काय करी बिचारा । मज तुझचि आसरा । मातृहिन तारी अंबे! तू ॥६६ । तुझे कृपेचे नि योगे । संतचरित गावू लागे । ते स्फुरण लागवेगे । द्यावें माते! गे ! मज ॥ ६७॥ चैतन्य स्वये श्रीकृष्ण । असता भक्तासि शिक्षण । द्यावे आदर्श म्हणोन । झाले अवतीर्ण राधाभावे ॥ ६८ ॥ कृष्णाची श्रेष्ठ सेविका । असे प्रियतम राधिका । तिची कांती भाव घेऊनि निका । भक्तितत्व । भाविका दाविलें ॥ ६९ ॥ श्रीकृष्ण वांछापुर्ण । करणें हेचि आराधन । करी म्हणोनि पुराण । राधिका जाण सवोधी ॥७०॥ लीला पुरुषोत्तम श्रीकृष्ण । त्यांची अभिलाषा जाणून । सर्वेंद्रिये सर्वभाव नितपुर्ण । करण्या तनू धरिली की ॥७१॥ तीच प्रियतम राधिका । श्रीकृष्ण श्रेष्ठ आराधिका । श्रीराधा नामे श्रेष्ठ सेविका । मान्य सकळीका जाहली ॥७२॥ भक्तिचेनि गुणें थोरपण । पावे श्रेष्ठसेवक जाण । सेव्य तत्वद्वारा आपुलें भोगसाधन । प्राप्त न करी कर्म कदा ॥७३॥ तो निरंतर इंद्रिय समस्त तद्वारा सर्व ता भावे नेमस्त । कैसातुष्ट हो रुक्मिणीकांत । चित्त तयाचे त्याकड ॥ ७४ ॥ त्याचे चित्ती अनुसंधान । तेणें शरिरी भावावेश पुर्ण । तैसेचि राही उन्मत्त पण । मधूर भाव लक्षण हे ॥७५॥ ताचि आवेश उन्मत्तता । त्याचि झालीया अधिकता । पराकाष्ठेचीं ये शिथिलता । विकलता होय तनुची ॥ ७६ ॥ अवस्था झालीया एसी । भक्ति शास्त्र परिभाषी । दिव्योन्माद नामेसीं । कथिलीं असे सविस्तर ॥ ७७ ॥ मधुर भाव अंतिम लक्षण । दिव्योन्मादे तनु क्षीण । विरहिणी सर्व स दुःख दारुण । राधाभाव जाणा पूर्ण हा ॥ ७८ ॥ राधाभावे चैतन्य शरिर । नित्य होई पीडे जर्जर । दिव्योन्माद निरंतर । विरह अपार होतसे ॥७९॥ स्वप्नामाजी एकदिन । शामसुंदर मुरली वदन । राधाराणी संगें घेऊन । गोपीसह नर्तन करिता हे ॥ ८० ॥ गोपी होवोनी मंडलाकार । नृत्य करिती अतिसुंदर । मध्य नाचे मुरलीधर । दृष्य मनोहर पाहती ॥८१॥ पंच पच उषःकाली । प्रभु निद्रा नाही गेलीं । पाहूनि गोविंदे तें वेळी । जागृति दिधली तयासी ॥ ८२ ॥ जागृत होता विरह व्याकूळ । होऊनि वदले कृष्ण घननीळ । तुझे रूप पाहता सोज्वळ । गुप्त जाहला कासया ॥ ८३ ॥ कोठे गेला मुरलीधर । कैसे रूप देखिले मनोहर । पाहण्या नेत्र

अधिर । विरह विधुर जाहले ॥ ८४ ॥ आपुला श्रीदर्शन नेम । त्वरीत करावे नित्य कर्म । गोविंद चतुर परम । केले कथन प्रभुपदि ॥ ८५ ॥ नित्य कर्म आटोपून । श्रीचे घ्यावया दर्शन । नाथ मंदिरा लागून । जाती चैतन्य सत्वरी ॥ ८६ ॥ श्रीजगन्नाथ नाट्य मंदिर । तेथूनि गरुड स्तंभ असे दूर । त्याच्या पृष्ठभागी गौर । जोडोनी कर राहती ॥८७ ॥ नारायणाचा नित्य पार्षद । गरुड असे भक्त शुद्ध । पश्चात भागी त्यासन्निध । राहोनीं घेती दर्शना ॥८८॥ शुद्ध भक्तानु गमन । करुनही व्हावें कृष्णदर्शन । मनुज होई आर्त मन । भगवान कृपा पात्र हो ॥ ८९ ॥ त्या गरुड स्तंभापासूनि । प्रभु घेती श्रीदर्शन । भावावेश मग्न तन । अश्रुपुर्ण नेत्र जाहले ॥९०॥ लक्षावधी जन समुदाय । दर्शनी लोटे निर्मळ भाव । ते समयीं श्रीदर्शनास्तव । उत्कलवासिनी नारीये ॥ ९१ ॥ जनसमुदायाच्या भिडे । स्त्रीस दर्शन न घडे । प्रभु स्कंधीं पद ठेऊनि चढे । गरुड स्तंभी तेधवा ॥ ९२ ॥ घेतहो ती सुखें दर्शन । गोविंदे व्यग्र होऊन । कथिले स्त्री लागून । उचित नोहे कर्म तुज ॥ ९३ ॥ गौरहर वदले गोविंद । सेवाभावे आनंद कंद । तुष्टवीं तिजला प्रतिबंध । सेवेंत बाध अनुचित ॥ ९४ ॥ कळले स्त्री लागून । पाय ठेविला ते चैतन्य । खिन्न जाहले तिचे मन । शरण चरणी पातली ॥९५॥ देखूनि स्त्रींचा आर्तभाव । करितां गौर गौरव । मज नसे ऐसा भाव । जो कीं हिजला प्राप्त हो ॥ ९६ ॥ तिचा देह मन प्राण । नाथ चरणी आविष्ठ पुर्ण । नसे तिज बाह्यज्ञान । स्कंधी पाऊल अन्याचा ॥९७ ॥ महिला अत्यंत भाग्यवंत । ईशचरणी अनुरक्त । तिच्या कृपेस्तव प्रार्थना करित । आर्तता चित्ती उदया ये ॥ ९८ ॥ जननी ! तुझी एकाग्रता । कोटि कोटि तुज धन्यता । माझ्यास्कंधी पद ठेविता । चित्ताचे भान हरपले ॥ ९९ ॥ ऐसे बोलोनी करिती रुदन होता भाव गेला निघून । बाह्यदशे मन खिन्न । गेले स्वथानी गौरहर ॥ १०० ॥ महाप्रभु शिकवण । उपदेशिला भक्तगण एकांतीं सेविता कृष्ण । होणे तद्रुपते समयी ॥ १ ॥ तयाचे ऐसे कथन । जे इंद्रिय जन्य ज्ञान । तद्वारा स्त्रीपुरुषा लागून । बाह्यरुपे पाहणे उचित ना ॥ २ ॥ जवं जवं प्रकृति जान अभिमान । स्त्रीपुरुष म्हणोन । त्यासी कैचे ? नाथ दर्शन । आर्त भाव न हो तया । ३ । श्रीकृष्ण सुखानु संधान । ज्याचे होय अविष्ट मन । तो सर्वत्र कृष्णसेवा उपकरण । भावपूर्ण पाहि सर्वदा । ४ ॥ असो ऐसे चरित्र निर्मळ । श्रोतया कथिले प्रांजळ । संत दयाळ करकमल । मस्तकी स्नेहाल ठेविती ॥५॥ मज नसे सेवा भाव । कैचा पोटि आर्तभाव । परिचित्ती सदैव ।

ठेवी स्मृति संताची ।। ६ ।। सेवेचा नसे स्वभाव । परिभक्ती वसे सदैव । वाढो ही चित्ती हाव। सीतापतीस विनवीं मी ।। ७ ।। श्री. चै. वि. ग्रं रसाळ । अं. ली. प्र सोज्वळ । उत्कल महिलाभाव रघुनाथ कथा मंगल । देवदासी गान वेचाळीसाविया ।१०८। श्री. चै, वि. ग्रं अंलीं देवदासी गीतगान रघुनाथ उत्कल महिलाभाव कथा अध्याय ४२ समाप्त

ओ. सं १०८ ए. ५५५४ । ६-८-६४ बुधवार आ व १२ श १८८६

# अध्याय समाप्त

# अध्याय ४३ वा

श्री गणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः । श्रीकृष्ण चैतन्याय नमः

जयजय श्री सद्गुरुनाथा । पूर्णकामा तूं समर्था । तुझेनि परमार्थ होता । यें सर्वथा ॥ १ ॥ जें वेदासी न कळे । जेथ गद्ध पडती लुळे । तें शिष्यां आकळे । तुझेचें नि ॥ २ ॥ तूं ब्रह्मविद्यासागर । अध्यात्माचीं आकर । तुझेनि शास्त्राधार प्रकटो लागे ॥ ३ ॥ निर्गुण सगुण भेद । तुझिये गुणें विशद । तैसा संसार दुःखद । कळों लागे ॥ ४ ॥ गुरुकैवल्य भांडार । अनाथांचें माहेर । त्वरें करी भवपार । ऐसे थोर गुरुत्व ॥ ५ ॥ तुमची गा ! ब्रह्मस्थिति । सकळ जीवाची विश्रांति । मुमुक्षूंची शरणागति । मुक्तिपावें ॥ ६ ॥ शास्त्रार्थाचें पांडित्य । योगविद्या गुढार्थ । कीर्तन भक्ति तत्वार्थ । सत्य कळे ॥ ७ ॥ यास्तव चरणी नमन । करुनि वांछी आशीर्वचन । जयाचेंनि कृपें स्फुरण । कवना होय ॥ ८ ॥ मागील कथेचा भाव । भावें उन्मत्त चैतन्यदेव । दिव्योन्माद सदैव । होऊ लागे ॥ ९ ॥ श्रीकृष्ण विरह अपार । वाढू लागे उत्तरोत्तर । विलापे चित्त अस्थिर । नित्य होय ॥ १० ॥ जाहलिया निशासमय । स्वरुप रामानंदराय । सन्निध विलाप अतिशय । होऊ लागे ॥ ११ ॥ बहुत विलाप प्रकार । श्रीकृष्ण सुख हेतुकर । व्याकुळ होती गौरहर । प्रहर रात्र जाहली ॥ १२ ॥ न व्हावी विरह वेदना । भक्त उपाय करिती नाना । दूर हो ऐसी संभावना । न दिसेचि ॥ १३ ॥ स्वरुपे मधुर गायन । रामानंदे कथा श्रवण । करवावे परी परिवर्तन । अवस्थेमाजी न होय ॥ १४ ॥ भावें करिती विलाप । काय उदेले माझें पाप । माझिया असतां समीप । कोठे गेला ॥ १५ ॥ न होता कृष्णदर्शन । निघोन जाती माझे प्राण । सख्यानो ! आणा शोधून । विरही मना शांतिचा ॥ १६ ॥ अंगी विभूति लावीन । मी जोगीण बनेन । स्वयें आत्मघात करीन । न साहीन विरहातें ॥ १७ ॥ कैसा रे निर्दय कृष्ण । मजसी गेला सोडून । तुजसी कैसे पडे चैन । निष्ठुर मन करितांना ॥ १८ ॥ ऐसा विलाप करित । स्वस्थानीं होती निद्रिस्त । कवाडें बंद मध्यरात्रींत । कानीं भजन न पडे ॥ १९ ॥ भक्त असती चिंतेत । संदेहे थरारे चित्त । निद्रास्थानीं कवाडे बंदिस्त । असतां प्रभु दिसतीना ॥ २० ॥ शोधितां सन्निध नाथमंदिरी । उत्तरदिशी सिंहद्वारीं । अचेतन कलेवर नेत्री । पाहोनि अधिर जाहले ॥ २१ ॥ तनु त्यजी प्राणा । ऐसें वाटे भक्तांना । उच्च स्वरें कृष्ण गर्जना । करिती सारे ॥ २२ ॥

कृष्ण नाम उच्चारण । होतां तनु सचेतन । होई बाह्यदशा ज्ञान । चैतन्य सदनी पातले ॥ २३ ॥ ऐसा हा राधाभाव प्रभुसि होई सदैव । तेणे उन्माद दिव्य । होई विरह सर्वदा ॥ २४ ॥ आपुले इष्ट दैवत । दर्शने भाव उदित । ऐसे भाग्यवंत पुनीत । अवनी करितीं ॥ २५ ॥ चैतन्य असती सिद्धभाव । होती तीन अवस्था सदैव । बाह्य अर्धबाह्यदशा अपूर्व । अंतर दशेत राहती ॥ २६ ॥ सागर तटीं एके दिनीं । गिरी चटक देखिला नयनीं । त्यासी गोवर्धन समजोनी केलें पलायन वायुवेगें ॥ २७ ॥ तत्संबंधी भागवत श्लोक । मुखें बोलती अलौकिक । भावें लागे अलोलिक । भान सर्काळक विसरे ॥ २८ ॥ सात्विक भाव अद्भूत । प्रकटे सकळ शरिरांत । राहे दशा अप्रतिहत । झाले मूर्च्छित भूमीसीं ॥ २९ ॥ प्रभूची अर्धबाह्यदशा । अभिमान राखितीं नित्यश: । मी राधिका दासी हीं ईर्षा । वर्णन करिती तियेचे ॥ ३० ॥ रात्रंदिन विरह व्याकुळ । भेटावा मज धननीळ । येणें होती प्रेमे विव्हळ । त्यांत सर्वकाल राहती ॥ ३१ ॥ भूमीसी झालें पतन । तेणें आलें मूर्छन । गोविंद मुखी जल घालून । वस्त्र व्यजने शांतवी ॥ ३२ ॥ भक्त करितीं संकीर्तन । प्रभुसि आले देहभान । कोठें गेला गोवर्धन । मनमोहन नयनी न दिसे ॥३३॥ राय स्वरूप गळा पडून । करिती प्रभु विलपम । वल्लभा कृष्णा ममप्राण । कान्हा कां, न भेटसी ॥३४॥ हा गोपिहृदय रमणा । माझिया जीवीच्या जीवना । महाभावावेश पूर्ण । भक्तजन डोळां पाहती ॥ ३५ ॥ मंदिरद्वार रक्षक । होता परम भाविक त्याचा धरूनि हस्तक । दावी विशोक मजला तू ॥ ३६ ॥ ऐशा अनंत लीला । भावावेशें कळती सकलां । चैतन्य चरितामृतीं वर्णिल्या । अधिक पुढती कथियेल्या ॥ ३७ ॥ द्वादशवर्ष दीर्घकाल । पुरीत अंतिम लीला सकल । घालविती प्रभु निर्मळ । विरह विकल देह सदा ॥३८॥ उद्धव दर्शनें राधालाप । ग्रंथी वर्णिला अमूप । द्वादशवर्ष विरह विलाप । भक्तासमीप करिती प्रभु ।३९। कृष्णसेवेस्तव देह म्हणोनी राधेस। कृष्णविरह । न भेटे हा ध्यास अहह! । वाचे अहोरात्र उच्चारी ४० विरह दशेंत नित्य । राही राधा दिनरात । तोचि भाव चैतन्यात । वसे सतत मंदिरी ४१ राधेसी भेटावया ये उद्धव । ते समयी भ्रमर करी गुंजारव । त्यासी पाहूनि मुर्छित भाव । मानी अहेव लाभ हा ॥ ४२ ॥ ते विगयी भागवत ग्रंथी । साद्यंत कथा भंवर गीती । तीच दशा निची प्रिति । दिनराती प्रभुसी होतसे ॥ ४३ ॥ मधुर भावे तनु व्याप्त । स्वय राधा मानूनि नित्य । विरहानले तनु तप्त । द्वादशवर्ष जाहली ॥ ४४ ॥ त्याविरहे उन्माद ।

व्हावा सदैव भ्रम मद । भ्रमे लिला विषयक शद्व । मुखी येती विशद ॥ ४५ ॥ कृष्ण विरह राधेसी । तोचि होय आपणासी । तीची लीला अहर्निशी । भक्तासी सखीं समजोनी ।४६। त्या प्रसंगाचे वर्णन । तोचि उन्माद तेचि वचन । तोचि प्रलाप तेचि रुदन । भावयुक्त तन जैं असे ॥ ४७ ॥ रोमातुनि येई रुधिर । दंतपंक्ति शिथील रुचिर । क्षणी क्षींण हो शरीर । क्षणी पुष्ट तर विरहे ॥ ४८ ॥ प्रभुसि गंभिरा मंदिरात । निद्रा नये तनु तप्त । मुखघर्षनासी सदा भित । भावात शुद्ध राहिना ॥ ४९ ॥ तीन व्दारातुनि उड्डाण । करुनि येति अंगणी । मुखे सदा प्रलपन । क्षणांत मूर्छना येतसे ॥ ५० ॥ पूर्वी कोणी न देखिले । ऐसे भाव शरिरीं उमटले । तेचि निदर्शना आले । सकला, नव्हते ऐकिले जे ॥ ५१ ॥ ते भाव प्रभु शरिरी । उमटती सकल अहोरात्रीं । राधा विरह वेदनेंपरी । गौंरहर होती जर्जर ॥ ५२ ॥ हस्तपादादी प्रभु अवयव । वाढती. लधु होती सदैव । अस्थि चर्म विलग अपूर्व । उमटे भाव ।।५३। कै कुमार्गी परीं शरीरी । संहरती इंद्रिये गौरहरी । तेणें हस्तपादादी बाहेरी । देखणें नेत्रीं न होय ॥ ५४ ॥ ऐसे भाषात होती प्रकार । परी मन:स्थिति शुन्याकार । व्याकुळ पण राही बाहेर । हा:हा:कार मुखे हो ॥ ५५॥ कोठे जाऊ शोधू कृष्ण । कोठ पाहू व्रजेंद्र नंदन । प्राणनाथ मुरली वदन । त्याविण दु:ख कोण जाणें ॥ ५६ ॥ काय करू न सुचें काही । विरहें हृदये विदीर्ण होई । दर्शन घडे ऐसे ग्वाही । कोण देई मजलागीं ॥ ५७ ॥ ावावेशे विलपत । गीत गोविंद कृष्ण कर्णामृत । नाटकादि राय ऐकवीत । तेणें होत संतुष्ट ॥ ५८ ॥ राय, स्वरूपा सखी मानून । राधाभावे करिती प्रलपन । म्हणती, प्रेमांकुर वाढवी कृष्ण । चित्ती जाण माझिया ॥५९॥ प्रेमभावना रुपनगर । बनवी स्वये शारंगधर । नष्ट करण्या निजकर । उद्युक्त निरंतर ठेवी तो ॥ ६० ॥ जैसा बाहेरी आत ही कृष्ण । चतुर कुशल अति निपुण । शठ साज करी धारण । नटला जाण कपटी तो ॥६१ ॥ परनारी प्रेमबंध । करण्या राही नित्यसिद्ध । पारधी सावजा स्तव सावज । राही पारध कराया ॥ ६२ ॥ सख ! ही विधातृ करणी । अपुर्व वाटे मज लागोनी । सुखास्तव केले प्रेमकृष्णी । परिणामी विपरीत जाहले ॥ ६३ ॥ माझी स्थिती ऐसी होय । प्राण न जाय न शरिरी राहे । प्रेमावस्था अपूर्व आहे । पाहे कुटील कृष्णावरी ॥ ६४ ॥ प्रेम न जाणें स्थान अस्थान । न जाणें कृष्ण कारस्थान । बरवे, वाईट हे अप्रमाण । बोलणे जाण प्रेमाचे ॥ ६५ ॥ क्रुर शठ असे कृष्ण । त्यासी प्रेम करी न जाणूनि । गुणरूप गुणें बंधन ।

करून मारी तयाप्रतीं ॥६६॥ तेणें मज न करवे रक्षण । ओढवले वाटे मरण । जगणें मरणें व्दंद्वातून । वाचणें कठिण मजलागी ॥ ६७ ॥ हा कृष्ण मदन तनुहीन । परद्रोही, त्यात प्रविण । त्यांचे मज पंचवाण । हृदयविदीर्ण करिती की ॥ ६८ ॥ त्याचा शब्द बाण मधुर । कर्णी लाग अति रुचिर । तेणें होय माझें शरिर । अति जर्जर सखे गे ॥ ६९ ॥ तैसे स्पर्श, रुप, रसगंध । बाणें माझे हृदय विध्द । न राही मजला शुद्ध । विरह दग्ध तनु होय ॥ ७० ॥ दुःख देई मजला कृष्ण । परि न घेई माझा प्राण । माझे मनीचें दुःख दारुण । त्याविण न जाणें अन्य की ॥ ७१ ॥ अटल शास्त्र सिद्धांत । असें, जाण सखे सत्य । एकाचे मन अन्यासी ज्ञात । न घडे मात ऐसी ॥ ७२ ॥ एका कृष्णा वाचून । तू सखी माझीं असुन । न जाणसी माझे मन । असता प्राणप्रिय माझी तू ॥ ७३ ॥ सखये ! जाणते माझे मन । तरी मज बोधिते धीर वचन । येई कृष्ण देई दर्शन । परी ते न घडे कदा ॥ ७४ ॥ सखे ! श्रीकृष्ण जगज्जीवन । अवश्य कृपा करील जाण । तो कृपा सागर कारण । व्यर्थ वचन तुझे हे ॥ ७५ ॥ चंचल मनुष्य जीवन । कमलपत्री जेंवि जीवन । कृष्णाचे होई आगमन । जगणें कठीण तोवरी ॥ ७६॥ शतवरुषे आयु जाण । हे शास्त्री असे प्रमाण । मज वाटे असत्य, कारण । करी श्रवण लवलाही ॥७७॥ शतवरुषे मानवी जीवन । निद्रेमाजी अर्धे जाण । अर्धे बाल्य तारुण्य । वृध्दपण जाण अर्धाचे ॥ ७८ ॥ शरिरी होती नानारोग । भोगावे लागती नानाभोग । अभ्यंतरी मृत्यु योग । सांग सुख कैचे मिळे ॥ ७९ ॥ आयुष्य असले भरपुर । यौवन धन दिन चार । जरा ग्रस्त नारी शरीर । सुखकर केवि घडे ॥ ८० ॥ चित्ती कामना व्हावे दर्शन । ते समयी न येता कृष्ण । मागुता आला द्यावया दर्शन । सुखाकारण कैचे होय ॥ ८१ ॥ मागुता कृष्ण यावा । मज कैची घडे सेवा । तेथ सुखाचा मागोवा । व्हावा कैचा ॥ ८२ ॥ मज न देववे कृष्णा सुख । काशास जीयावा देह देख । घेते कीं आणभाक । कृष्णेंविण विख जीवन ॥ ८३ ॥ अग्नि स्वरूप दाखवी, अंग । जाळी, होय भस्म पतंग । आपले गुण दाखवी शुभांग । आकर्षी सुभग रीतीने ॥ ८४ ॥ कृष्ण गुणाभिराम । आकर्षी मनरीती सुगम । दुःखसागरी लोटूनि दुर्गम । देई विराम मजलागी ॥ ८५ यापरी विषादे दुःखित । हृत्कपाट खुले करीत । विलाप करिती विरहांत । श्लोकांत भाव दाविला ८६ वाजवी बन्सी बन्शीधर । त्याचे दर्शन न घेती नेत्र । ससाणा झडपोनि फोडी, कुपात्र । म्हणोनि प्रीतिकर असे कीं ॥ ८७ ॥ हे ! सखे ! मी

हतभागी जाण । माझे चित्त, शरीर, इंद्रियें मन । कृष्ण दर्शनावाचुन । विफल होय जीणें मम ॥ ८८ ॥ कृष्णाची मधुर वाणी । अमृताची तरंगिणी । न पडे ज्यांचिया श्रवणीं । दुर्दैवी जनीं, जाण, तो ॥ ८९ ॥ तयाचे असतीं श्रवण । भग्न कर्पादिका परिस जाण । विफल होय जीवन । समाधान नसे चित्तांत ॥ ९० ॥ कृष्णाचें मधुर अधरामृत । तैसे जीवन कथा चरित । सुधास्वातासी तुच्छ लेखीत । आनंद देत रसनेसी ॥ ९१ ॥ तो आस्वाद मधुर । प्राप्त न हो जिव्हे रुचिर । कां न झडोनि पडे भूमिवर । जन्मतः दर्दुर समान मी ॥ ९२ ॥ मृगमदासी तुच्छकरी । ऐसा सुगंध कृष्ण शरीरी । न घे, घ्राणेंद्रिय त्याची माधुरी । भस्मापरीं नासिक ते ॥९३॥ कृष्णाचें हस्त, पदकमळा । कोटी चंद्रापरी शीतल । असला स्पर्श कोमल । झाला नसे देहासी ॥ ९४ ॥ तो देह जड जाण । अथवा लोह पिंडा समान । त्यासी नुमजे थोरपण । भाग्य विहीन होय सदा ॥ ९५ ॥ यापरी शचिनंदन । करिती भावांत विलपन । हर्ष, गर्व, विषाद, दैन्य । भावना ऐशा प्रकटती ॥ ९६ ॥ राय, स्वरूपा मानूनि सखी । भावावेशें होती दु:खी । करिती विलाप हे सुमुखी ! । म्हणोनी श्लोकीं निवेदिले ॥ ९७ ॥ बन्सी वदन कृष्ण स्वप्नी । देखिला म्यां नेत्र भरोनि । परी वैरी आड येवोनीं । हिरोनि नेति सुखातें ॥ ९८ ॥ वैरी दोन आनंद, मदन । त्यांनी केले मनहरण । कृष्णा न पाही नेत्र भरोन । तेणें असमाधान मजलागी ॥ ९९ ॥ ऐसा कोणता येई क्षण । जै पाही कृष्ण वदन । तो क्षण घटि, पळ जाण सकळ मानीन धान्य मी ॥ १०० ॥ सखे दर्शन झालियावरी । काय करीन निर्धारीं । ते चित्तीं अवधारी । कामना सत्वरी पुर्ण करीन ॥ १ ॥ कृष्णासी मस्तकी चंदन । लावूनि, अंगीं करीं लेपन । मालारत्नें आभुषण । लेववीन गोपीकारमणासी ॥ २ ॥ नेंसवीन भरजरी वस्त्र । भोग लावीन पक्कान्न मधुर । जचेयानि बन्सीधर । सत्वर होय संतृप्त ॥ ३ ॥ ऐसे वदतो भावांत । तोचि बाह्य दशा होय प्राप्त । राय, स्वरुप सन्मुख दिसत । संकोचित मन हो ॥ ४ ॥ म्हणती मी चैतन्य काय ? । कृष्ण विरहें तप्त काय । तो भाव देहीं होय । मुखें वाक्य उच्चारी ॥ ५ ॥ स्वप्नीं देखिलें वर्तमान । तेंचि केले प्रलपन । तें तुम्ही केलें श्रवण । सांगा समाधान द्यावया ॥ ६ ॥ तुम्ही माझे प्राण, बंधु । तुमचा माझा प्रेम संबंधु । श्रवण करा वृत्त दुःखदु । स्वप्न संबंधु जेथ हो ॥ ७ ॥ स्वप्नी जाहलें कृष्णदर्शन जागृती न हो दुर्भाग्य जाण । तयां एकचि कारण । कृष्ण प्रेमी गंध नसे ॥ ८ ॥ माझें दरिद्री जीवन । सदैव राही

करंटपण । देह, इंद्रियें, मन । व्यर्थ जाण सर्वस्वें ॥ ९ ॥ हाय हाय ! बंधो ! मात । ऐका मम समस्त । ज्यां हृदयी केले निश्चित । सांगा त्वरित विचारें ॥ ११० ॥ कृष्ण प्रेम कामना रहित । हें मनुजा असे अप्राप्त । जांबुनद सुवर्ण स्वर्गी स्थित । न मिळें सत्य यालोकी ॥११॥ कामना रहित कृष्णप्रेम । मृत्युलोकीं असे दुर्गम । जैसे असंभव स्वर्गहेम अप्राप्य, दुर्गम । १२ ॥ कृष्णप्रेम अविकृत । दैवयोगें जाहलें प्राप्त । वियोग अशक्य तेथ । जाण संकेत तयाचा । १३ कृष्ण वियोग जाहलिया । प्राण स्वर्वस्व जाती विलया । शुष्क काष्ट युक्त काया । जाण वाया तयाची ॥ १४ ॥ माझें हृदय दुर्बळ । निकृष्ट जाणें हे प्रांजळ । कथितो त्यजूनि लज्जा सकळ । प्रेमळ सखे बंधू तुम्ही ॥ १५ ॥ शुद्ध कृष्ण प्रेम सुगंध । मज न कळे तयाचा संबंध । अति दूर मी, मज प्रबोध । नसे शोधू कोठे तया ॥ १६ ॥ कपट रूप माझे प्रेम । म्हणोनि कृष्ण प्राप्ति दुर्गम । कापटच नसता अतिसुगम । होता, घनःशाम मज ॥ १७ ॥ तुम्हां वाटे असत्य वैखरी । कारण विरहें रुदन करी । प्रेम नसतां ऐशापरी । वृत्ती यापरीं कैसी होय? ॥१८॥ याचें परिसा कारण । भाग्याचे व्हावें उजळण । होय चित्त प्रक्षाळण । निश्चयें जाण करी मी ॥ १९ ॥ माझें विश्वासाह वचन । कथिलें तुम्हा कारण । विरहाचे दुःख दारूण । बोलवी जाण मजकरवी ॥ २० ॥ वन्सीयुक्त कृष्णचंद्र मुख । जोवरीं देखिले नाहीं देख । मज नसे आधार प्रमुख । तोंवरी उत्सुक राहीन ॥२१॥ मानी देहावरी प्रीति । इद्रियावरी आसक्ति । व्हावी कामनापूर्ति । कीटकापरी धरी प्राण तनु २२ कृष्णप्रेम गंगाजल । असे पवित्र निर्मल । अमृतसागर केवळ । होती सकळ पावन ॥२३॥ ते कृष्ण प्रेम जयाचे चित्तीं । त्याची सकळा ये प्रचीति । नाभीमृग कस्तुरीप्रति । शपथीं कथन न लगे ॥ २४ ॥ शुभ्र वस्त्रीं कृष्णचिन्ह । न राही कदा छपून । तेंवि कृष्णप्रेम लक्षण । करणें कथन अयोग्य ॥ २५ ॥ मजवरी दाविती अविश्वास । पागल म्हणोनीं बाहती चौकस । हा कृष्ण प्रेम विशेष । इतरास न कळे॥ २६ ॥ यापरी प्रभुभाव जीवन । बाह्य ज्वालेपरी दिसे तपन । भीतरी आनंदमय पूर्ण । अपुर्व साधन गमे हे ॥ २७ ॥ हा कृष्ण प्रेमाचा अद्भुत स्वभाव । बाहेरी उमटे मधूरभाव । आत आनंदाची साठव । पूर्व पुण्ये लाभ तायचा ॥ २८ ॥ कृष्ण प्रेमा स्वादन । जैसे तप्त ईशुचर्वण । खाता मुखभर्जन । न हून गोडीस पारखे ॥ २९ ॥ जयाचे मनी कृष्णप्रेम तीचि अवस्था जाणे महत्तम । करूनि एकत्र विष अमृतयुग्म । दिधले मगम खावया ॥ ३० ॥ तेणें होय जी अवस्था ।

तैशी कृष्ण प्रेमावस्था । मारी न जगवी ऐशी दशा । प्रेमी मस्यापरी तडफडे ॥ ३१ ॥ मत्सा नेत्री जळ दिसे । परि तो भुमिवरीं असे । जलासन्निध जाण्या सरिसे । सामर्थ्य नसे तया ॥ ३२ ॥ गरुडस्तंभासन्निध राहुन । प्रभु करिती नाथ दर्शन । होतीं अश्रुपुर्ण नयन । जल साठवण भूमीसी ॥ ३३ ॥ गृही मृत्तिका ढीगावरी । बैसोनी नखे मृत्तिका कोरी । जणू लेखन भूमिवरी । वाटे करिती भावात ॥ ३४ ॥ त्या अवस्थे विलाप । कोठे वृंदावन गोप । कोठे यमुना पुलीन समीप । कदंप पादप कोठे तो ॥३५॥ कोठे गोविंद नंदनंदन । वेणु राधिका सखीजन । रास नृत्य गोपी खेलन । पाहाया नयन भुकेले ॥३६॥ त्या त्या समयी ते ते भाव । उठवी उव्देग आवेग सदैव । तेंणें हो दुःख अतिव । भावाचा अडिवा वरीवरी ॥ ३७ ॥ हे ! कृष्ण नदनंदन । तुझिया दर्शना विण । अधन्य असती रात्रं दिन । काळ उदासीन गमे ॥ ३८ ॥ तू अनाथ दीनबंधु । तू अपार करुणा सिंधु । दर्शना होय प्रतिबंधु । संबंधु करी दुर तो ॥३९॥ प्रभु ऐसे मुखे बोलता । भावोदय हो चित्ता । चंचल मन अस्वस्थता । भावावस्था न कळे की ॥ ४० ॥ बिरहे माझे हो ज्वलन । कै देसी कृष्णा दर्शन । तूचि करी मज कथन । वियोगे मन पोळतसे ॥ ४१ ॥ ऐसे येती मनी विचार युध्द होतसे अपार । विविध भाव प्रकार । कथितो सत्वर श्रोतया ॥ ४२ ॥ उत्सुकता चापल्य दैन्य । रोमहर्ष युध्दीचे सैन्य । प्रमोन्मादे एकत्र येऊन । शत्रुपण करिती शरिरी ॥ ४३ ॥ विविध भाव मत्त गज । देह इक्षुवनी शिरे सहज । जैसा कपोता झडपे बाज । बंधेज घाली कवण त्या ॥ ४४ ॥ ऐशापरि दिव्योन्माद । प्रभु शरिर होय विध्द । न राहीं देह शुध्द । विलापे रुध्द कंठ हो ॥ ४६ ॥ हे ! देव ! दैत ! भुवनेक बंधु । हे कृष्ण चपल करुणैक सिंधु हे नाथ हे रमण नयना सुखदु । तवपद दृष्टी कै पडे ॥४६॥ हेचि उन्माद लक्षण । कृष्ण सन्मुख होय स्फुरण । भावावेशे प्रणयमाण । उत्पन्न होय निरंतर ॥ ४७ ॥ भावांत सौष्ठव वचन । कै गर्वोक्ति कदामान । प्रीती निंदा कै सन्मान व्याजस्तुति जाण होतसे ॥ ४८ ॥ श्लोकी कृष्णासी विशेषण । त्याचे प्रत्येकी प्रबोधन । पृथक भाव उमटती जाण । विवरण परियेसा ॥४९॥ कृष्णासी देव संबोधन । सकल स्त्री मनिषा पुर्ण । करीं तत्काळ म्हणोन । देवपण प्राप्त हो । ॥ ५० ॥ कृष्णा तू असशी दैत । तुझे ठायी अत्यंत प्रीत । माझिये निरंतर चित्तांत । वास करिसी म्हणोनिया ॥५१॥ तुझे नाम असे कृष्ण । पृथ्वीवरचा नारीगण । करिसी स्वभावे आकर्षण । समाधान देसी चित्तासी ॥ ५२ ॥ तुझे मन

अति चंचल । न राही स्थीर एकपळ । एकेठायी न वसे सकळ । स्वभावे अवखळ म्हणोनी ॥ ५३ ॥ तू करुणा सिंधू प्राणासिंधू । तुजवरी म्हणोनी नसे क्रोधु । मानपाना दि संबंध । नसे गोविंद्र तुझे विषी ॥ ५४ ॥ तू मम प्राणानाथ असती । रक्षलें तुवा व्रजवासी । कार्यव्यापी बहु तुजसी । समय न देसी म्हणोनिया ॥ ५५ ॥ भक्ताचे करिसी अभिष्ट तुझेनि होती सकल तुष्ट । चातुर्य कुशलता गरिष्ठ । ऐसे इष्ट प्रकार किती ? ॥ ५६ ॥ म्या केला गर्व मान । आपण गेला मज सोडून । पाचारीं सप्रेमे तुझां लागून । नयनाभिराम मज व्हा ॥ ५७ ॥ माझे तुम्ही प्राणधन । यास्तव करी अभ्यर्थन । मज द्यावेजी दर्शन । बोलती वचन भावात । ५८ ॥ अष्ट सात्विक भावयुक्त । भाषणी शरिर होत । हास्य नृत्य गाणे गात । भ्रमती प्रभु इतः स्ततः ॥५९॥ कै गावे रुदन करावे । कदा मूर्छित व्हावे । ऐशा अवस्था स्वभावे । भावें होती चैतन्या ॥ ६० ॥ मूर्छनेत साक्षात्कार । होता सावध व्हावे सत्वर । विलाप करावा निरंतर । ऐसा प्रकार नित्याचा ॥ ६१ ॥ वर्णावी कृष्ण गुण माधुरी । स्तुति करावी नानापरि । तेणें भ्रम व्हावा सत्वरी । वदे वैखरी श्लोकाते ॥ ६२ ॥ स्वरुप कृष्ण कामदेव मूर्तिमंत । माधुर्य धारिले मूर्तिमंत । ममनेंत्र मनोत्सव अमूर्त । प्राणनाथ असे की ॥ ६३ ॥ ममवचन हेचि सत्य । कृष्ण ममनयनामृत । जेणें आनंदे चित्त । जीवीत ही तयावरी ॥ ६४ ॥ चैतन्य भाव हाचि गुरु । शिष्यगण मम शरिरु । गुरु शिष्यां नाचवीं स्वैरु । विविध प्रकारु अगण्य ते ॥६५॥ ऐसा होई दिव्योन्माद । कालजाई व्दादशाद्व । व्याकुळ शरिर होय विध्द । परि आनंद अभ्यंतरी ॥ ६६ ॥ ऐसे अदभुत चरित । भक्ता कथिले साद्यंत । तो भाव अल्प होत । कृतार्थ मानी तनु मन ॥ ६७ ॥ धन्य धन्य शचिनंदन । भावें आकळिला नंदनंदन । त्यासी शतशःवदन । तुटो बंधन संसारी ॥ ६८ ॥ श्री चै. वि. ग्रं. रसाळ । अ. ली. प्र सोज्वळ । चैतन्य दिव्योन्माद मंगल । वर्णिला अध्यायी त्रेचाळीसावियां ॥ ६९ ॥

श्री चै वि ग्रं, अं. ली. प्रसग - दिव्योन्माद कथा कथन नाम अध्याय (४३) सावा समाप्त ॥

ओ सं. १६९ एकूण सं. ५७२३ दि- १४-८-६४ शुक्रवार तुळशीजयंती श्री, गु ७/८६

## अध्याय समाप्त

# अध्याय ४४ वा

श्री गणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरूभ्योनमः । श्रीकृष्ण चैतन्याय नमः

नमन माझे संत सज्जना । भक्त्या तोषविती जगज्जीवना । सारुनि संसार कामना । तन मनाशरण हरि ॥ १ ॥ संसारी तुलसीदल । ठेवूनि भावित सोज्वळ । करुनि जाहले निर्मळ । वाचे सर्वकाळ हरिनाम ॥ २ ॥ मानूनि जनी जनार्दन ईशभावे सकलजन । सेविती प्रभुपदी लीन । भाळीचरण रज चर्चिती ॥ ३ ॥ वैष्णव ग्रंथीं भक्त पदरज । पादोदक उच्छिष्ट त्यजोनि लाज । सेविती सप्रेमे सहज । श्रद्धा निज वाढाया ॥ ४ ॥ या तीन तत्वांचे माहात्म्य । साधन श्रेष्ठ मानिले परम । तेणें संतुष्ट पुरुषोत्तम । भक्त काम पुरवी सकळ ॥५॥ श्रीकृष्णाचे उच्छिष्ट । हाचि महाप्रसाद श्रेष्ठ । त्याहिवरी संतोच्छिष्ट । गरिष्ठ प्रेम वाढवी ॥ ६ ॥ श्रीचा महाप्रसाद । भगवन्नाम गोविंद । वैष्णव विग्रहि विश्वाणा शुद्ध । भगवत प्रसाद त्या होय ॥ ७ ॥ येणें कृष्णचरण प्रेम । प्राप्ति होय अतिसुगम । हेचि साधन श्रेष्ठ परम । प्रिति अनुपम श्रीकृष्णी ॥ ८ ॥ वैष्णव प्रेमी थोर भक्त । कालीदास नामे ख्यात । रघुनाथदास बंधुसुत । जाति कायस्थ तयाची ॥ ९ ॥ वैष्णव जनोच्छिष्ट । भोजन करावें यथेष्ट । कृपासंपादन उद्दिष्ट । हेचि अभिष्ट तयाचे ॥ १० ॥ कालीदासाचे अजीवन । हेचि साध्य साधन । उच्छिष्ट पादोदक सेवन । ईशभजन सतत ॥ ११ ॥ ध्यावया महाप्रभु दर्शन । पुरीस जाती वैष्णवजन । विश्राम करिती दोन प्रहर । भदुआ ग्रामी दासाच्या ॥ १२ ॥ वैष्णवाची जातपात न ओळखोनि करी प्रीत । सुग्रास अन्नदान नेमस्त । ऐसे संतत करीतसे ॥ १३ ॥ वैष्णव भोजन झालीयावर । करी प्रसाद अंगीकार । लावी चरण धूळी भाळावर । विश्वास अपार तयाचा ॥ १४ ॥ श्री महाप्रभु भक्त । झडु ठाकुर विरक्त । भुईमाली शुदु कुलांत । झाले अविभुर्त तेधवा ॥ १५ ॥ पत्नी पती परायण । भक्ति भावे सेविती कृष्ण उभय करिती संकिर्तन । नामस्मरण अहर्निश ॥ १६ ॥ एकेदिनीं कालीदास । दर्शन करावे ही आस । गेला ठाकूर सदनास । केला उभयतास प्रणाम ॥ १७ ॥ भेट ठेविली आम्रफल । ठाकूराचें नम्र बोल । मी दीन हीन दुर्बळ । धन्य केले मजलागी ॥ १८ ॥ सत्कार करावा इच्छा प्रबळ । परि हीन जाती अकुल । व्दिजगृहि व्यवस्था सकळ । पाक निर्मळ करविती ॥ १९ ॥ कालीदास वदे ठाकुर । दर्शने पावला सत्कार । ठेवाचरण मस्तकावर । रज पवित्र लाविती

॥ २० ॥ करितो चरणीं प्रार्थना । हिच माझी अभ्यर्थना । करा पुर्ण कामना । येणे मना समाधान ॥ २१ ॥ भक्तबोले कालीदास । व्हावा माझा आपणा स्पर्श । हे अनुचित मनास । सर्वनाश मानी मी ॥ २२ ॥ श्रवण करिता भाषण । मज दुःख दारुण । मी असे जातीहीन । पाप भाजन कासया ॥ २३ ॥कालीदास वदे उचित । भक्ता नसे जात गोत । वैष्णव श्रेष्ठ भागवत । बंधनापरता कृपा करा ॥ २४ ॥ ठाकूर वदे वचन । मी अमक्त संसारी पुर्ण । तुमचा गुढभाव भजन । अभिमान शून्य भक्त खरे ॥ २५ ॥ दामवदे कस्तुरि कामोद । सकला दे आनंद । तुमचा भक्ति सुगंध । गुढ भाव प्रकटवी ॥ २६ ॥ भक्तिशास्त्र ओळख । स्वये आचरिता देख। इतराची होय पारख । वाटे हरिस सेवेचा ॥२७॥ कालीदास कथंने समाधान । झाले परि न मानी वचन । प्रतिबंध करी सेवे लागून । शास्त्राव मान केला होय ॥ २८ ॥ ठाकूर निश्चय पाही दास । निघे जावया पोचवी तयास । झडु येई गृहास । कालीदास राही छपोनी ॥ २९ ॥ ठाकूर पदचिन्ह धुली । कालीदास लावी भाळी । रात्रीच्या शांत वेळी । आम्रफल नैवेद्य दावी झडु ॥ ३० ॥ खाती उभय ठाकूर भक्त । असार त्यजिती मार्गात । कालींदासे देखिले गुप्त । घेई प्रसाद चोखूनि ॥ ३१ ॥ भक्त उच्छिष्ट शेष । भक्षी तुष्टे कालीदास । गेला निज सदनास । प्रेम विह्वल जाहला ॥ ३२ ॥ एकदा जाई कालीदास । भक्तासवे निलाचलास । गेला प्रभु दर्शनास । कृपेस पात्र व्हावया ॥ ३३ ॥ कालीदासा अनन्य भाव । सन्निध ठेविती वास्तव्या । पादोदक ग्रहणी सदैव । प्रतिबंध असे भक्तासी ॥ ३४ ॥ प्रतिवासरीं नाथ मंदिरीं । पाद प्रक्षाळिता सिहद्वारी । तीथग्रहणीं संयम करी । भक्तजन गौर आज्ञेने ॥ ३५ ॥ परी अंतरंग भक्त दोन । न मानिती आज्ञावचन । कालिदासें समयीं येऊन । अंजुली तीन तीर्थ प्राशिले ३६ ॥ पाहूनि चैतन्य केले हास्य । जवळी केला कालिदास । ऐसे पुनरपि न करी साहस । कृपेस पात्र होसी तू ॥ ३७ ॥ प्रभु आज्ञे उच्छीष्ट प्रसाद । कालिदासा देई गोविंद । खाऊनि मानी आनंद । ऐसा छंद भक्तीचा ॥ ३८ ॥ महाभागवत चरणधूलि । हीच मानी भक्ती भली । वैष्णव चरणजली । अंजली करी प्राशन ॥ ३९ ॥ भागवत युक्त शेष । हेचि साधन बल निःशेष । ऐसी सेवा घडल्या विशेष । प्रीतीस पात्र कृष्णाच्या ॥ ४० ॥ श्रीकृष्ण चरण प्रेमप्राप्ती । हेंचि साध्य मानि निश्चिसी । या सिद्धांताची प्रचिती । भक्ति करूनि घेतली ॥ ४१ ॥ वैष्णव सेवा

अति कठिण । जेणें संतुष्ट नारायण । साधल्या जाण श्रीकृष्ण । प्रेम प्रीतीनें बांधिला ॥ ४२ ॥ भक्तें ऐसें साधन । करूनि सेविलें श्रीकृष्ण चैतन्य । तेणें संतुष्ट श्रीकृष्ण । कालिदास धन्य । भक्त तो ॥ ४३ ॥ असो ऐसे संतजन । जे सेविती जनार्दन । संत सेवक चरण । वदन करी भक्तीने ॥ ४४ ॥ चैतन्याचा भावावेश । अप्राकृत तेणें विवश । उन्माद, प्रलाप, बहूश: । कृष्ण दर्शनास पूर्ण हो ॥ ४५ ॥ हृदयाची व्याकुळता । तेने शरीरीं विकलता । भावोपयोगी संगीता । गाती राय स्वरूप ॥ ४६ ॥ कैं करुणस्वरें रूदन । कैं विरहें भूमि शयन । कैं सागर जलीं पतन । करूणाक्रंदन कैं हो ॥ ४७ ॥ हे मुरलीधर मनमोहन । हा प्रिय व्रजेंद्रनंदन । तूं माझें प्राणधन । हृदय विदीर्ण तुझेनि ॥ ४८ । तूं न भेटसी मजलागून । तरी तडफडे माझाप्राण । जीवनाविण जैसा मीन । चंद्राविन चंद्रिका ।४९। मज होती विरह वेदना । न साहसी नंदनंदना । कोण जाणु शके यातना । प्राण जीवना तुझेविण ॥ ५० ॥ ऐसा विलाप रात्रदिन । स्थान सोडोनि करितीं भ्रमण । मार्गी होई तनु पतन । देहभान उडे प्रभुचे ॥ ५१ ॥ एके दिनी घडे अद्भुत । कथितों ग्रंथ साद्यंत । प्रभुचे जे प्रिय ग्रंथ । विवरिती भक्त सन्निध ॥ ५२ ॥ करू लागती संकीर्तन । प्रभु करितो श्लोक विवरण । अंतरी विलाप दारूण । श्लोक व्याख्यान होतां तै ॥ ५३ ॥ रात्र जहाली प्रहर दोन । प्रभूसि करविलें शयन । भक्तें केलें गमन । स्वस्थानी विश्रामा ॥ ५४ ॥ गंभीरा कुटी द्वारीं । भक्त गोविंद निद्रा करी । जाहलीया अर्धरात्री । करिती गौर संकीर्तन ॥ ५५ ॥ उच्चस्वरें संकीर्तन । हरे मुरारे गोविंद कृष्ण । हे नाथ! वासुदेव नारायण । करी श्रवण गोविंद ॥ ५६ ॥ कृष्णचरणी तनु प्रक्षेप । प्रभुचा विरह विलाप । गोविंदासी हो मन:स्ताप । दु:ख प्रकोण नित्याचा ॥ ५७ ॥ तयीं निद्रावसरीं । मंदिरद्वारें बंद करी । गोविंद गंभीर द्वारीं । निद्रा करी अन्यल्प ॥ ५८ ॥ निद्रिस्त असतां गोविंद । कीर्तन करिती शचिनंद । सकल द्वारे असती बंद । भावें बंध तोडला ॥ ५९ ॥ गृहाबाहेरी केलें निर्गमन । सिंहद्वारी दिशा दक्षिण । तैलंगी गोमाता गोस्थान । तेथ पतन पावनलें ॥ ६० ॥ गोस्थानीं पावलें मुर्छित । कूर्माकृति अस्ताव्यस्त । देहाचीं न वाटे खंत । भावांत विश्चेष्ट राहिले ॥ ६१ ॥ इकडे गंभीरा मंदिरीं । कर्णी न पडे स्वर माधुरीं । गोविंद पाही झडकरी । भींतरी चैतन्य न देखिले ॥ ६२ ॥ सत्वर पाचारी गोस्वामीस । कवाड बंद रात्रीस । प्रभु नसती स्थानास । सुचेनासे जाहले ॥ ६३ ॥ बंदी गृहांतूनि सत्वर ।

प्रभु पडले बाहेर । याचें वाटे आश्चर्य । नसती गौर त्या स्थानीं ॥ ६४ ॥ यांचें आश्चर्य वाटून । गोंस्वामी येती दीपक घेऊन । देखिती चहुकडोन । नारळ चैतन्य भोवतीं ॥ ६५ ॥ मार्गी असतां शोधीत । आले सिंहद्वारांत । दक्षिण दिशीं गोस्थानांत । विपरीत देखिलें ॥ ६६ ॥ गोमाता असती वर्तुळाकृति । तयांत प्रभु कुर्मांकृति । गाई प्रभुसि हुंगितीं । ऐसी स्थिती देखिली ॥ ६७ ॥ इंद्रियें हस्तपादादिक । संव्हरूनि उदरीं जवळीक । केली कुर्माकृति नेमक । देखिलें दृश्य भक्तांनीं ॥ ६८ ॥ फेन येई मुखांतूनि । पुलकित होई श्रीतन । होती अश्रुपूर्ण नयन । बाह्यचेतन देखिले ॥ ६९ ॥ आनंद विव्हळ भीतरी । तेज विलसे मुखावरी । गाई हुंगिती परोपरी । करितां दूरी न होती त्या ॥ ७० ॥ करिती भक्त संकीर्तन । केलें कर्णी नामोच्चारण । परी दृढभावे चैतन्य । अचेतन राहिले ॥ ७१ ॥ दु:खित झालें भक्तजन । सदनी आले घेऊन । उच्चस्वरें सकीर्तन । होता तन सचेत हो ॥ ७२ ॥ अर्धबाह्य दशाप्राप्त । संहरिलें अंग केले विस्तृत । इतरत्र दृष्टि फेंकित । क्रंदित झालें ॥ ७३ ॥ हें ! प्यारे ! शाम मोहन । कोठे गेलासी मज सोडून । मज कोण यई घेऊन । विरहे मन दग्ध हो ॥ ७४ ॥ स्वरूपा ! मी असे कोण । असे मी कोणत्या स्थानीं । येथ आणावयाचे काय कारण । मज लागून सांगाना ॥ ७५ ॥ मी असतां वृंदावनीं । सुख भोगित आनंद भुवनी । कशास आणिलें यास्थानीं । दु:ख मनी व्हावया ।७६। यापुरी प्रभु विलाप । करिती स्वरूप समीप । बाह्य दशेचे स्वरुप । प्रकंट होय ।।७७।। ऐशी बाह्यदशा अद्भुत । चैतन्या ठायीं विलसत । अल्प कथिले चरित । शुद्ध चित्त व्हायया ।७८। श्री चै वि, ग्रं: रसाळ । अं. ली. प्र. सोज्वळ । कूर्माकृति चैतन्य कथा मंगळ । चौरेचाळिसाध्यायी वर्णिली ॥ ८० ॥

श्री चै. वि. ग्रथ अं ली. प्रसंग कूर्मरूपाकृति चैतन्य कथा कथन नाम अध्याय चौरेचाळीसावा (४४) समाप्त

ॐ० सं० ८० ए. स. ५८०३ दि- २०-८-६४ गुरूवार श्रा शु १२ शके १८८६

## अध्याय समाप्त

# अध्याय ४५ वा

श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्री गुरूभ्योनमः । श्रीकृष्ण चैतन्याय नमः ॥

नमन माझे यदुनंदन । जो यादव कुलभुषण । भक्त मनोरथ करी पुर्ण । होई अनन्य चरणासी ॥ १ ॥ भक्त उद्धव अक्रुर । त्यांची सख्य भक्ति थोर । ज्ञानेंचि केला उध्दार । कर्णधार भव सागरी ॥ २ ॥ करूनि पार्थसारथ्य । जगा शिकविले नीती सत्य । युद्धें निर्मळ केला भारत । पांडव सख्यत्व म्हणोनि ॥ ३ ॥ अनीतींचा केला संहार । पांडव तारीले भक्तवर । गीता संदेश जगभर धर्मभार वाहिला ॥ ४ ॥ रामावतारी गोरक्षण । झालें नाहीं हे कारण । अव तरसी गोपाल कृष्णा । गोसेवन करावया ॥ ५ ॥ घालविले सारे बालपण । केले गाईचे पालन । मधुर मुरलीस्वन हरवी देहभान गाईचें ॥ ६ ॥ शास्त्री भागवत । श्रेष्ठ तयांत दशमस्कंद वरिष्ठ । पुर्वार्ध तयांत गरिष्ठ । श्रेष्ठ रास पंचाध्यायी ॥ ७ ॥ त्यामाजी उत्कृष्ठ गोपीगीत । जे अत्यंत अतुलीत । बालकृष्ण चरित तेथ । झाल्या मोहित गोपीका ॥ ८ ॥भागवत रास पंच्याध्यायी । चित्तरमे तिथे ठायी । प्रभु ठेविती नित्य हृदयीं । भावावेश होई तत्काळ ॥ ९ ॥ भ्रमण विभिन्न उद्यानी । करिता आलें आई टोटास्थानी । देखिला सागर तेथूनि । प्रसन्न मनी जाहले ॥ १० ॥ निशा समय प्रशांत । चंद्रमा खुले गगणांत । नीलसिंधू तरंग उसळत । शोभता किरण अपुर्व ॥ ११ ॥ दृष्य मनोहर देखिले । तै यमुनेचे स्मरण झाले । यमुना समजोनी गमन केलें । त्वरे पातले त्यास्थानी ॥ १२ ॥ दृष्टि चुकवोनी झडकरीं । वेगे धावले सागर तीरी । प्रवेशिले सागरा भीतरीं । जलांतरीं मूर्च्छित जाहले ॥ १३ ॥ सागराच्या प्रचंड लाटा । कै बुडविती, फेकीती तटा । तरग नाचविती करिती चेष्टा । जाती वाहात कोणा की ॥ १४ ॥ पुरीहुनि एकोणीस मैल । उदींची सुर्यमंदिर विशाल । कोणार्क नामे तीर्थ निर्मल । कृष्णः शिला युक्त जे ॥ १५ ॥ त्या दिशे गेले वाहात । सागरास कालिंदी कल्पित । कृष्ण जल केली पहात । भावांत राहिले ॥ १६ ॥ पुर्ण चंद्रमा निर्मळ । शरद शर्वरी उज्वळ । सागर कालिंदी कल्लोळ । गोपीसह केलीं कृष्णकरी ॥ १७ ॥ प्रभुदासी भावांत । वृंदावन दृष्य नेत्री पहात । असता, आनंद भोगीत । घेत श्रीकृष्ण दर्शन ॥ १८ ॥ स्वरुपादि भक्तगण । तया न दिसती प्रभु म्हणोन । शोधिती सकल स्थाने । चिंता मग्न जाहले ॥ १९ ॥ करिती नाना कुतर्क । स्थानें शोधिली अनेक निशासरे

प्रभा फाके । अंतर्हित । गौरांग जाहले ।। २० ।। ऐसा निश्चय सकलांनी । केला विच्छेद दुःख मनी वाटे प्राण जाती निघोनि चित्ती जाचणी जाहली ।। २१ ।। असे मनुष्य स्वभाव । असता स्नेह बंधुभाव । अनिष्ट आशंकेस वाव चित्ती वसे ।। २२ ।। चैतन्य प्रभुदर्शन । होई आशा मनोंमन । करिती अन्यत्र शोधन । हरपले धन गिवसावया ।। २३ ।। ते समयी एक कैवर्त । हरि हरि नाम उच्चारित । स्वरुपे देखिला अकस्मात । साहित्य स्कंधी जयाच्या ।। २४ ।। भावावेश पाहोनी अद्‌भुत । गोस्वामी आश्चर्य चकित । पृच्छिती धीवराप्रत । कारण अवस्थेचे सांग पा ।। २५ ।। तदा बोलू लागे मी नारी । करीत होतो का मगिरी । जाळे टाकिलें सागरी । रात्री मत्स धरावया ।। २६ ।। तो माझिया जाळचांत मत्साऐवजी देहमृत । विशाल अडकला चकित । झालो, अत्यंत पाहुनीं ।। २७ ।। त्यासी काढोनी बाहेर । ठेविलें मी भूमीवर । अंगस्पर्श जाहल्यावर । भूतशरीरीं प्रवेशिले ।। २८ ।। मृतदेही झाला भूत संचार । भये कंपयुक्त शरिर पुलक नेत्री अश्रुपूर । गग्दद वैखरी प्रकाशे ।। २९ ।। मृतदेह दर्शन मात्रे । बिघडे मनुष्य शरिर । प्रवेशिती भूतव्यापार चेष्टा अपार करी तो ।। ३० ।। तेचि भूत जाणा क्वचित । मनुष्य रूप धारण करींत । ये गों गों शद्ब वाणीत । अचेत होऊनि पडे कदा ।। ३१ ।। धीवर बोले भयभींत । स्पर्शता माझ्या शरिरात । प्रविशले भुत अकस्मात । व्हावया मुक्त जातसे ।। ३२ ।। भूत बाधेने आले मरण । स्त्री, पुत्रा घाली अन्न कोण । या भये जाहलो हैराण । जातो सदनी मांत्रिका ।। ३३ ।। माझे कर्म रात्रंदिन । करीत होतो अनुदिन । एकाकी स्थान निर्जन । भये मन न उरे की ।। ३४ ।। श्रीनृसिंह दैवत भगवान । त्याचे करी नामस्मरण । तेणें भूतबाधा कारण । मज लागून नसेचि ।। ३५ ।। आश्चर्य थोर नृसिंह नाम बोले वैखरी । भूतबाधा झाली शरिरी । स्पर्श सत्वर होता तै ।। ३६ ।। आपण न जावे त्यास्थानी । भूतबाधा होय तनी । जातसे मांत्रिका सदनी । निरसनी पींडेच्या ।। ३७ ।। धीवराची ऐकूनि मात । गोस्वामी स्वस्थ चित्त । भय न धरी हो सावचित । घासवितो भूत मंत्राने ।। ३८ ।। मी मांत्रिक असे तज्ञ । मज असे बाधा ज्ञान । देई भींती सोडून । मृत तन दावी मजलागी ।।३९।। ते भूत नसे भूतभावन । श्री प्रभुदेव चैतन्य । भावे प्रेमाविष्ट होवोन । झाले पतन सागरी ।। ४० ।। तु आपुलिया जाळचांत । धरिला त्यांचा देहमृत । बाहेर काढिता स्पर्श होत । कृष्णप्रेम उदीत जाहले ।। ४१ ।। तू भाग्यवंत थोर । स्पर्शे झालीं तनु पवित्र । भूतबाधेचा विचार । मनी न धरीलव ही ।। ४२।।

दावीं मजला ते स्थान । आम्ही घेऊ चैतन्य दर्शन । म्हणोनी जातीं भक्तजन । किर्तन करींत त्याठायी ॥ ४३ ॥ सागरतीरी पुलीनी । मूर्छित देह देखिला नयनीं । शिथिलांग चैतन्य देखोनी । आर्द्र कौपीन सारिली ॥ ४४ ॥ अन्य वस्त्र नेसवून । सकल करिती संकिर्तन । कर्णी गर्जती कृष्ण कृष्ण । काही क्षण जातीं तै ॥ ४५ ॥ प्रभु अर्धबाह्य दशेत । येता भावावेशांत । कथिलें विरह दशेत । भोगी । वृंदावनांत आनंद ॥ ४६ ॥ यमुनेचें घेतले दर्शन । तेथ व्रजेंद्र नंदन । संगे असता गोपीगण । जलक्रीडन देखिले ॥ ४७ ॥ यमुनातीरी होतो उभा । देखिली जलोत्सव शोभा लीलासमयी कृष्णप्रभा । लाभे संतुष्ट जाहलो ॥ ४८ ॥ भावांत एसे कथिले । बाह्यदशे प्रभु आलें । कासया येथ आणिले । वदले भक्तगणा प्रभु ॥ ४९ ॥ स्वरूपे साद्यंत इतिहास । कथन केला प्रभूस । करवूनि स्नान स्वस्थानास आणिले तयास सत्वर ॥ ५० ॥ ऐसा थोर चमत्कार । भावावेश गौरहर । लुटतीं आनंद अपार । नसे पार वर्णनी ॥ ५१ ॥ श्रीकृष्ण दर्शनी विव्हल । होती चैतन्य विकल । त्याचा इतिहास सकल । कथिला प्रेमळ भक्तासी ॥ ५२ ॥ विव्हल स्त्रीपुरुष संसारी । दुःख भोगिती परोपरी । भगवत्प्रेम नांदे । शरीरीकृपाधिकारी तो होय ॥ ५३ ॥ ऐकिता अदभूत चैतन्य चरित्र । विषय बाधा नसे लवमात्र । प्रपंच पिशाच्य पळें अन्यत्र । चित्त उपरत भक्तिने ॥ ५४ ॥ व्हावया चित्र निर्मळ । चैतन्य चरित्र रसाळ । कथितो होवोनी निर्मळ । सकल सकल श्रोते हो ॥ ५५ ॥ माझा अधिकार अल्प । चैतन्य कथा कोटि कल्प । तयांतूनि कथिली स्वल्प । मानाजस्य कौतुकें ॥ ५६ ॥ कथेसी द्यावया अवधान । विनवी तुम्हां श्रोतेजन । तुम्हाविन मज स्फुरण । नये म्हणोनि प्रार्थितो ॥५७॥ चैतन्य विजय ग्रंथ रसाळ । अंत्य लीला प्रसंग सोज्वळ । भावे सागरी चैतन्य कथा मंगल । पंचेचाळिसाध्यायीं कथियली ॥ ५८ ॥ चै. वि. ग्रं,

अं लीला प्रसंग चैतन्य सागरी पतन कथा कथन नाम अध्याय पंचेचाळीसावा (४५) समाप्त

ओ, संख्या ५८ एकुण संख्या ५८६१ दि- ३०-८-६४ रविवार गोकुळ अष्टमी श्रा- व ८।१८८६

## अध्याय समाप्त

# अध्याय ४६ वा

॥ श्री गणेंशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः । श्रीकृष्ण चैतन्यायनमः ॥

धन्य धन्य हा नरदेहो । प्राप्त होय परमार्थ लाहो । हे अपुर्वता न संदेहो । संकल्प पावे सिद्धीतें ॥ १ ॥ या नरदेहाचे प्रयोजन । भगवत भक्ती हे साधन । मुखी सुमधुर नामस्मरण । तनु धारण यदर्थी ॥ २ ॥ ऐसें असें भागवत वचन । तें मानूनियां प्रमाण । प्राप्त होय यदुनंदन । जीवित अर्पण करणें तया ॥ ३ ॥

श्लोक .- एत्तावानेंव लोकेऽ स्मिन् पूसां धर्मः परः स्मृतः । भक्ति योगो भगवति तन्नाम ग्रहणादिभिः ॥ ६-३-२२ भाग भगवत्प्राप्तीवीण । वाया घालवी जो क्षण । तो जितचिप्रेतासमान । व्यर्थ जनन तयाचें ॥ ४ ॥ विषयद्वारीचा बराडी कथा कीर्तनीं नावडी । ईशभक्तीची नसे गोडी । वावडीं सद्‌वृत्ति तयासी ॥ ५ ॥ ऐसा जो का कर्महीन । दरिद्री, नावडे भजन । जित असोनि पाषाण । कवडी मोल तन नासिले ॥ ६ ॥ नरदेहीं परम कल्याण । नित्यभगवन्नाम स्मरण । तेणें संतोषें सीतारमण । होई सुवर्ण तनुचें ॥ ७ ॥ आतां द्यावें अवधान । चरित्र गातसे शचिनंदन । जेणें तनु पावन । परम कल्याण जीवाचे ॥ ८ ॥ श्री गौरंग मातृभक्त । असती उन्मादावस्थेंत । तरीं मातेचीं पृच्छा करीत । विस्मृति नसे कदाही ॥ ९ ॥ जगदानंद जातीं प्रतिवर्षी । मायापुरीं गौंडदेशीं । करिती मातेची चौकशी । तोष चित्तासी द्यावया ॥१०॥ जगन्नाथाचे वस्त्र, प्रसाद । येतां, मातेसीं वाटे आनंद । पुत्र विरहाचा खेद । मानसीं विषाद न राही ॥ ११ ॥ प्रभुचे नित्य आश्वासन । देती संदेश, मातेलागुन । तेणें माता प्रसन्न । खिन्नपण पार उडें ॥ १२ ॥ प्रभु संदेश वचन । कथितो श्रोतयालागुन । चित्ती होय समाधान । मातृप्रेम दर्शन जयांत । १३ । शास्त्र विरुद्ध वर्तन करुनि केले संन्यास गहण । त्यजिलें सेवेंलागून । बावुल होवोन राहिलों ॥ १४ ॥ माझ्या ऐशा अपराधा । माते ! न मानावें खेदा । पुत्रत्वाची न सांडी मर्यादा । निमाई सर्वदा तुझाचि ॥ १५ ॥ तुझी आज्ञा मातें प्रमाण । नीलाचलीं वस्तिस्थान । जोंवरी शरीरी प्राण । न सोडी जाण यास्थान ॥ १६ ॥ प्रतिवर्षी ऐसा संदेश । मातेसी देती जगदीश एकदां आले नवद्वीपास । प्रभु आज्ञेस मानुनी ॥ १७ ॥ मातेसी प्रसाद दिधला । कुशल समाचार कळविला । प्रभुच्या उन्मादावस्थेंला । ऐकता झाली दुःखित ॥ १८ ॥ कळे पुत्राची विकल दशा । मातेसी वाटे निराशा । जीवीत्वाची

नुरे आशा । दृष्टींस न पडे पुत्र की ॥ १९ ॥ मातेचा संदेश घेऊन । आचार्ये केले वृत्त कथन । नव्वदवर्षे वयोमान । अस्तमान होय जीवनीं ॥ २० ॥ पंडित देखोनी, शांतचित्त । अव्दैत झाले, कळे वृत्त । पत्र देऊनि पहेली युक्त । बोळवण केली तयाची ॥ २१ ॥ पंडित पातले पुरीस नमस्कारिले प्रभूस । कुशल कथिलें सकलांस । दिधली प्रभूस पत्रिका ॥ २२ ॥ पत्रिकेतील वृत्तांत । पठण करी वा साचंत । आज्ञापिला पंडित । श्रवण करिती भक्त तैं ॥ २३ ॥ हरिनामाचे व्यापारी कुशल । श्री चैतन्य असती प्रेमळ । अद्वैत त्यांचे दलाल । बाऊळ दोघे असतीतें ॥ २४ ॥ अद्वैत लिहिती प्रभुस । आपण उत्कृष्ट व्यापारी खास । भारी तांदुळ ठेविला विक्रीस । ग्राहक नसे दुकानी ॥ २५ ॥ प्रेमरुप भरलाबाजार । प्रेम तंदुल भरले घरोघर । विक्रीचा न राही बहर । त्याची कदर नसे कुणा ॥ २६ ॥ गोपीप्रेमाचे तात्पर्य । उपलब्ध न होई दुस्तर । शुद्ध मधुरभाव प्रकार । नाकळे इतर भक्तासीं ॥ २७ ॥ मधुर भाव ग्राहक । न मिळें सत्य देख । विपर्यास करिती कित्येक । लोक. ओक सारिखा ॥ २८ ॥ तरी कथितो यास्तव । बंद करावी देवघेव । उत्तम श्रेणीस येथ वाव । न राही. भाव उतरला ॥ २९ ॥ त्यासी वदावेंजीं स्पष्ट । प्रेमातूर मी अद्वैत । सांसारिक कार्य विरहित । प्रेमोन्मत्त जाहलों ॥ ३० ॥ चैतन्य प्रेम पागल । त्यासी वदावे सकळ । अद्वैतही प्रेम पागल विव्हळ होवोनि बोलिलों ॥ ३१ ॥ श्रीचैतन्य अवतार । कार्याचे जे तात्पर्य । संपूर्ण जाहले येथवर । करावें गोरहर इच्छितीं तें ॥ ३२ ॥ पहिलेचे केले श्रवण । प्रभुकरिती हास्य वदन । आचार्य आज्ञा पालन । करणें मान्य मजलागी ॥ ३३ ॥ वदले स्वस्थ चैतन्य । स्वरूपादि भक्त अनन्य । पत्रार्थ व्यावाजी समजोन । विनवितो ॥ ३४ ॥ पत्राचे गुढपण । अलपही न जाणें आपण । तात्पर्य करा कथन । हास्यकारण तैसेंचि ॥ ३५ ॥ श्री चैतन्यें गंभीर होवोन । संकेतें कथिले गूढपण । आचार्य अनन्न साधारण । ज्ञानी महान् असती ॥ ३६ ॥ आगमशास्त्रविधी विधान । तैसे पूजाविधि उपासन । त्यामाजी आचार्य तज्ञ । करा श्रवण कौशल्य ॥ ३७ ॥ प्रथम देवता वाहन । करून षोडषोपचार पूजन । अल्पकाल स्थिर ठेवून । उत्तर पूजन विधि हा ॥ ३८ ॥ झालिया उत्तर पूजन । 'गच्छगच्छ सुरश्रेष्ठ म्हणून । विसर्जन शास्त्रीय विधान । केले कथन संकेते ॥ ३९ ॥ मायापुरी गंगातीर निर्मळ । अद्वैतें घेऊनि गंगाजल । सवें घेतलें तुलसीदल । पूजन केलें प्रभुचे ॥ ४० ॥ गोलोकीं केले आवाहन । भूलोकीं व्हावे आवतीर्ण । आतां अवतार

कार्य पूर्ण जाहले पुजन यथासांग ॥४१॥ म्हणोनि पुजारी विसर्जन । कराया संकेतें करी कथन । हेंचि आचार्य अनुमान । असत्य न मानावें ॥ ४२ ॥ ऐसें ऐकता वचन । भक्त होतीं कंपायमान । प्रभुलीला संहरण । नयनीं दिसों लागले ॥ ४३ ॥ पत्र पठनानंतर । चैतन्य देव गौरहर । विरह दशा पावले सत्वर । उन्मादे शरीर तेधवा ॥ ४४ ॥ विरह वेदने व्याकुळ । प्रभु होती अति विकल । विलापे वदती बरळ । अर्धरात्र समयांत ॥ ४५ ॥ प्रभु उन्माद अवसरीं । येती गंभीरा द्वारीं । कोमल मुख द्वारावरी । रगडूं लागती विरहें तें ॥ ४६ ॥ द्वारी मुख घर्षण । रुधिर येई तयांतून । परि नसे देहभान । भाव कारण तयासी ॥ ४७ ॥ कृष्ण विरह दारुण । सहन न होई म्हणून । करिती मुखघर्षण । पाहोनि उद्विग्न मन हो ॥ ४८ ॥ कंठी होई घरघर । श्वास चाले भराभर विरह कापे शरिर । रात्रभर चाले ऐसी क्रिया ॥ ४९ ॥ गों गों शब्द मुखांतुन । येई स्थान रक्तवर्ण । घर्मबिंदु पूर्ण तन । अवस्था कठिण जाहली ॥ ५० ॥ स्वरूप राय करिती गान । समयोचित काव्यगान । संकिर्तन व्हावे समाधान परि सात्वन न होय ॥ ५१ ॥ कारण कृष्ण विरह सिंधू । प्रभूचा उसळे अगाधु । बाह्य दशेचा प्रबोधु । होता वदले भक्तासी ॥ ५२ ॥ व्हावया मज कृष्ण दर्शन । म्हणोनी माझे पागलपण । द्वार नाढळे निशी म्हणोन । घर्षण केले ॥ ५३ ॥ निशासमयी वेदना । तेणें मज अत्यंत यातना । द्वारा बाहेर जावे मना । ऐसे नित्य वाटतसे ॥ ५४ ॥ ऐसे प्रभुचे अवस्थान । होता भक्तजना चिंता दारूण । प्रभु चरण हृदयी ठेवून । शयन करी शंकर ॥ ५५ ॥ तैं शंकराचे नामाभिदान । पडे 'प्रभुपादोपाधान' । घडे प्रभुचरण सेवन । धन्य, भक्तजन शंकर ॥ ५६ ॥ चैतन्य चरित रसाळ कथिले भाव प्रेमळ । तुटती सारें संसार जाल । राही गोपाळ हृदयस्थ । ५७ ॥ श्री. चै वि. ग्रंथ रसाळ अ. ली प्रसंग सोज्वळ । लिला संगोपन संकेत मंगल । सेहेंचाळीसाध्यायी कथियला ॥ ५८ ॥ चै. वि. ग्रंथ अ लिला प्रसंग

लिला संगोपन संकेत कथा कथन नाम अध्याय सेहेचाळीस समाप्त ( ४६ )

ओ. सं ५८ एकूण सं ५९१९ दि. ९-१०-६४ शुक्रवार आश्वीन शु. ४-८६ सं २०२०

## अध्याय समाप्त

# अध्याय ४७ वा

श्री गणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः । श्रीकृष्ण चैतन्याय नमः

नमन माझें गोपिकारमणा । दयानिधे नंदनंदना । आर्त पुरवी भक्तजना । जगज्जीवना दातारा १ तूं गोकुळीचा चोर । दहिदूध नाशिलें अपार । वेडावले व्रज नारीनर । मुरली मधुर स्वनेतव ॥ २ ॥ गोपिकांचें चोरिलें चित्त । सवंगडीं वेडावले अमित । तैसे अनंत भक्त । विरह व्यथे व्याकुळ ॥ ३ ॥ मथुरे नेई तुज अक्रुर । रूदन करिती गोपी अधीर । विरह व्यथें होती अस्थिर । संबोधिती क्रूर अक्रुरा ॥ ४ ॥ गोपीचे असे कृष्ण प्रेम । कबीर म्हणती अतिपरम । सकल संसार कर्म । करूनि घनःशाम सेविती ॥ ५ ॥ सोडूनि सकल कामधंदा । चित्तीं आठवितीं गोविंदा । मुरलीनें लावीसी नादा । वायदा भक्तिप्रेमाचा ॥ ६ ॥ ऐसे वेडावलें भक्त । तैसे चैतन्यनाथ पुरीत । कृष्ण विरहे व्यथित । व्याकुळ चित्त जाहले ॥ ७ ॥ वैशाख मास पौर्णिमा । नभीं उगवे पुर्णचंद्रमा । महाभाव परिसीमा । वल्लभ उद्यानीं जाहली ॥ ८ ॥ जगन्नाथ वल्लभ उद्यान । विरहिणी भावें करिती विचरण । उत्कंठा, उद्वेग, अवस्था दैन्य । चित्र जल्पोक्ति प्रकटविती ॥ ९ ॥ ( या तीन अवस्थेंत दहा प्रकारची चित्र जल्पोक्ति भावात प्रकट करुं लागले ) संगे असती भक्तगण । स्वरूप राय प्रधान । शिक्षाष्टक श्लोक विवरण । करिती निशा संपली ॥ १० ॥ महाप्रभुचे शिक्षाष्टक । भक्तासि आनंददायक । तेणें चित्ताची बैठक । स्थिर होय ॥ ११ ॥ त्या अष्टकाचा भावार्थ । समजावया देतो येथ । श्रोती व्हावें सावचित्त । चित्त द्यावे श्रवणासी ॥ १२ ॥

श्लोक – चेतोदर्पण मार्जनं भवमदादावाग्नि निर्वापणम् । श्रेयः कैरवचंद्रिका वितरणं विद्यावधू जीवनम् ॥

आनंदाबुवर्धनं प्रतिदिनं पूर्णामृतास्वादनम् । सर्वात्मस्वपनं परं विजयते श्रीकृष्णसंकीर्तनम् ॥ १ ॥

श्रीकृष्ण संकीर्तन । त्याचे कैसे लक्षण । चैतन्यें केलें कथन । करा श्रवण यथार्थ ॥ १३ ॥ चित्तरूप दर्पण । त्याचें करी परिमार्जन । संसाररूप महादावाग्न । टाकी विझोन सत्वरी ॥ १४ ॥ परममंगलरुप कुमुद । त्यासी विकसित करी विशद । एशा ज्योत्स्नेंसी विवृद्ध । करी संकीर्तन कृष्णाचे ॥ १५ ॥ परा विद्यारुप वधुजीवन । आनंदसागर करी वर्धन । प्रतिपदीं पूर्णामृत स्वादन । करी संकीर्तन प्रदान ॥ १६ ॥ जींवात्म्यास करी निर्मळ । स्नेह संपादी

प्रेमळ । ऐसे अद्वितीय संकिर्तन रसाळ । विशेपरूपे विजयींहो ॥ १७ ॥

श्लोक – नान्मामकारी बहुधा निजसर्व शक्ति: । तत्रार्पिता नियमित: स्मरणेन काल: ।

एनादृशी तवकृपा भगवन्ममापि । दुर्दैवमींदृशमिहाजनि नानुराग: ॥ २ ॥

प्रभो तुझी अनंत नामावली । गोविंद गोपाल वनमाली । प्रकट झाली भूतली । शिणली वाणी वर्णनी ॥ १८ ॥
आपुल्या श्रीहरि नामांत । समस्त शक्ति झाली अर्पित । म्हणोनि नामस्मरणांत । कालमर्यादित नसेचि ॥ १९ ॥
येतां जातां उठतां बसतां । देतां, घेतां, काम करितां । नाम वदनीं वदतां । कालाकाल विचार त्या नसे ॥ २० ॥
आपुली ऐसी कृपाथोर । परी माझा अपराध घोर । अनूराग नसे नामावर । झालो लाचार संसारी ॥ २१ ॥

श्लोक -- तृणदापिसुनीचेन । तरोरपि सहिष्णुना । अमानिना मानदेन । कीर्तनीय: सदा हरि: ॥ ३ ॥

तृणाहूनि व्हावें हीनु । वृक्षाहूनि अधिक सहिष्णू । स्वयें अमानी होऊन । द्यावा मानु इतरासीं ॥ २२ ॥ निरंतर हरिनाम वदनीं । वृत्ति श्रीहरी कीर्तनीं । जडावी ऐसी अनुदिनीं । कर्तव्य जीवाचे ॥ २३ ॥

श्लोक- न धनं न जनं न् सुदरीं । कविता वा जगदीश कामये । मम जन्मनिजन्मनींश्वरे । भवताद्भक्तिरहैतुकीत्वार्य ।४।

मजला नको धन जन । नको सुंदर स्त्रीरत्न । नको पांडित्य, कवन । संसारी वासना नसावी ॥ २४ ॥ याजन्मीं वा जन्मांतरीं । तुझें रूप माझे अंतरी । तुझिये ठायी चित्त निर्धारीं । राहो अकिंचना भक्ति हो ॥ २५ ॥
ऐसा नामाचा प्रताप । वर्णन करिता अमूप । स्फूर्ति होतां श्रीकृष्णरुप । दिसो लागे नयनासी ॥ २६ ॥

श्लोक -- अथि नंदतनूज ! किंकरं । पतितं मां विषमेभवाम्बुधौ । कृपया तवपादपंकज स्थित धूलीसदृशं विचिन्तय । ५ ।

हे ! प्रियनंदकिशोर । मी असे तव किंकर । बुडमीं घोर संसार सागर । कृपा मजवरी करी वा ! ॥२७॥ तुझाचरण रज:कण । त्याचे समान मी जाण । कृपेचे घाली आवरण । तेणें समाधान चित्तासी ॥ २८ ॥

श्लोक - नयनं गलदश्रुधारया । वदनं गद्गदरुद्धया गिरा । पुलकैर्निचित्तं । वपु:कदा । तव नामग्रहणे भविष्यति ॥२९॥

हे ! गोपीजनरमण । मुखी होता नामग्रहण । होती अश्रुपूर्ण नयन । भाग्य समजेन ते समयीं ॥३०॥ कंठ होई सद्गद । नाम घेतां वाणीरुद्ध । तनु होई पुलकित । सात्विक भाव उपजे कैं ? ॥ ३१ ॥

श्लोक – युगायितं निमिषेण चक्षुषा प्रावृषायितम् । शून्यायितंजगत्सर्वं गोविंद विरहेंण मे ॥ ७ ॥

गोविंदा तुझा विरह कठिण । निमेष वाटे युगासमान । वर्षाधारासम अश्रूपूर्ण । नयन जगत्शून्य हो ॥३२॥ ऐसें कथितां श्रीकृष्ण । देव गेले दृष्टी समोरुन । तेणें व्याकुळले मन । अश्रुपूर्ण नयन होती तैं ॥ ३३ ॥

श्लोक – आलिष्य वा पादरतां पिनष्टु मामदर्शनान्मर्म हंतां करोतु वा ॥
यथा तथावा विदधातु लम्पटो, मत्प्राण नाथस्तु स एव नापरः ॥ ८ ॥ शिक्षाष्टकम्

तुझिया चरण सेवेत । आलिंगने करिसी तृप्त । अथवा मज धिक्कारीत । चक्कींत पिसावया घालीसी ॥ ३४ ॥ मजला न देसीं दर्शन । मर्मावरी घाव दारुण । तु सर्व तंत्र स्वतंत्र कृष्ण । दुषण कोण देई तुज ॥ ३५ ॥ तव ईच्छा मजप्रमाण । मज न वाटे किमपिन्युन । पॅार तू माझा प्राण । तुजविण प्राणनाथ अन्यना ॥ ३६ ॥ ऐसे स्वरचित शिक्षाष्टक । श्रवण करिता उत्तम श्लोंक । घटिका जाती कित्येक । रात्रसरे तयात ॥ ३७ ॥ होई कधी गीतगोविंद । कर्णामृत गाई रामानंद । कै भागवतास्वाद । घेती चंडिदास पदावली ॥ ३८ ॥ कृष्ण बिरह भाव सागर । येणें उचंबळे रात्रभर । विकल हो सारें शरिर । भाव मधुर यथार्थ ॥ ३९ ॥ समस्त आकृत महाभाव । राधे ठायी राहीं सदैव पूर्णतेने प्रकट श्रीकृष्ण सेव्य । प्रेम अपूर्व तियेचे ।४०। जगी केवळ शुष्क वैराग्य । चित्ती अभि निवेश अयोग्य । धरुनि करिती सामान्य व्यवसाय । न कळे भावधारणा ॥ ४१ ॥ मधुरभाव प्रयोजन । काय जाणे भक्त सामान्य । जरी असला वैष्णव जन । ना कल न होय तयाचे ॥ ४२ ॥ वैकुंठिचे ऐश्वर्य जयाचित्ती । त्यासी कैचीं भाव प्राप्ति । कृष्ण प्रेमोन्माद प्रचीती । न जाणे भक्त राधेचीं ॥ ४३ ॥ राधेसी कृष्ण प्रेम । सेवा राज्याची सीमा चरम । त्याप्रेमाची पराकाष्टा अंतिम । मुर्तिमान केली चैतन्ये ॥ ४४ ॥ पुर्णतन राधाभावी । कृष्णसुखानुसंधान ठेवीं । तेचि ध्यान चित्ती उभवी । परि मज करवी सेवा न घडे ॥ ४५ ॥ करुनि न घडे सेवा काहीं । ऐसें नित्य ठेवीं हृदयी । इंद्रिय तृप्ति कैसी होई । मज करवी कृष्णाची ॥ ४६ ॥ यास्तव प्रबलोत्कंठा निरंतर । होई विप्रलंभ नाम रुचिर । तोचि कृष्ण विरह अपार । भाव मधुर शास्त्रवदे ॥ ४७ ॥ ऐसे उच्चतम भजन । जगी वितरती चैतन्य । अन्य स्थानी वितरण । प्रभुविण पुर्वी न हो कदा ॥ ४८ ॥ प्रभु वल्लभ उद्यानी । भ्रमण करिता रजनीं । उन्मादलें भाव साधनी । अलिंगना

अधिर जाहले ॥ ४९ ॥ कै वृक्षा अलिंगन । कै होई भूमिपतन । कै सर्वत्र पलायन । शोधन प्रियतमाचे व्हावया ॥ ५० ॥ हास्य, रुदन, रोमांच । भाव उमटती अति उच्च । उठती तरंग उन्मादाचे । प्रियाचे दर्शन व्हावया ॥ ५१ ॥ तो कृष्ण तनु दिव्य सुगंध। नासिकाद्वारा घेती गंध । सूं सूं करूनि हुंगीती मद । परी गोविंद दृष्टी न ये ॥ ५२ ॥ गंध येई ज्या दिशेने । त्या दिशे करिती शोधन । नेत्र अतृप्त दर्शना विण । तप्त तनु तेंणें होय ॥५३॥ यापरी चाले कृष्ण शोधन । न मिळे व्याकूळ हो मन । प्राणनाथ वियोग दुःख स्मरण । ग्लानी येई शरिरी ॥ ५४ ॥ हो निस्तेज प्रभुवदन उदयाचली ये पूषण । राय स्वरुप येती घेऊन । स्वस्थानाप्रति चैतन्या ॥ ५५ ॥ यापरी भावावेश होता । लिला संहरण वार्ता । कळली अंतरंग भक्ता । उद्विग्न होत मानसी ॥ ५६ ॥ चोवीसवरुषे गृहाश्रम । उपरि स्वीकृति संन्यास धर्म । भारतीवर्षी भक्तिवर्म । प्रचारद्वारा दाविले ॥ ५७ ॥ गेली सहा संवत्सरें । अष्टादशवरुषे नाथपुरी । सत्संग भक्तसहवास माधुरी । अभिनय लिला दाविली ॥ ५८ ॥ अभिनव भक्ता संगती । चाखिली रसास्वाद महति । नित्य भाव प्रकटविती । विरही लोटीती भक्तासी ॥ ५९ ॥ केले लिला संहरण । भक्ता दुःख दारूण । ते चरित्र करिकथन चित्त उद्विग्न न हो ॥ ६० ॥ श्रीरूपाचे अश्टकी वर्णन । सागर तीरी पाहुनि उपवन । होय स्मृति वृंदावन । प्रेम विवश तनु होय ॥ ६१ ॥ नित्यवाचे कृष्ण कृष्ण । कै हो संकिर्तन । रसना चंचल नामस्मरणें । एसें चैतन्य दिसती कै ? ॥ ६२ ॥ तो चैतन्य विरह प्रसंग । वर्णिता होय चित्त दुभंग । म्हणोनी विनवी श्रीरंग । अभंग ठेवी वृत्ति ते ॥ ६३ ॥ श्री चै. वि. ग्रंथ रसाळ । अं. ली. प्र. सोज्वळ । प्रभु शिकवणसार, शिक्षाष्टक मंगळ । सत्तेचाळिसांत कथियला ॥६४॥ चै. वि. ग्रंथ, अ. ली. प्रसंग, प्रभु शिकवणसार, । शिक्षाष्टक कथाकथन नाम अध्याय सत्तेचाळीसावा (४७) समाप्त ओ. सं. ६४ एकुण ५९८३ सं दि ९-१०-६४ शुक्रवार आश्विन शु. ४ शके १८८६ सं २०२०

## अध्याय समाप्त

# अध्याय ४८ वा

॥ श्री गणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः । श्रीकृष्ण चैतन्यायनमः ॥

श्रीभगवंताचें अवतार । त्याचे अनंत प्रकार । धर्म स्थापना भक्ति प्रचार । दुष्ट संहार करावया ॥ १ ॥ लोंक नीति मर्यादा सांडिती । धर्म सेतू उल्लंघिती । भ्रष्टाचाराचीं गणतीं । किती म्हणोन वर्णावी ॥ २ ॥ दुर्जनाचे वाढे प्रमाण । गांजती गाई ब्राम्हण । छळिती संतसज्जन । पीडा दारूण दीनासी ॥ ३ ॥ यास्तव ईश्वरावतार । अथवा संत मिषे अवनींवर । गंथरुपें प्रचार । हाही अंतरीं हेतू वसे ॥ ४ ॥ श्रीसंत ज्ञानेंवर । पूर्ण श्रीकृष्णावतार । ग्रंथ निर्मिला ज्ञानसागर । ज्ञानेश्वरी नाम तयाचें ॥ ५ ॥ जें जें समयी जे जे कार्य । घडावें प्रभु वांछा होय । धारण करिती देह दिव्य । मानव्य निर्गाण व्हावया ॥ ६ ॥ ज्ञानेश तैसे नामदेव । ईशचरणीं अत्यंत भाव । नाम प्रचार सदैव । गाथा नव्य निर्मियलीं ॥ ७ ॥ नाथ, समर्थ, तुकाराम । संत ग्रंथ निरुपम । भावगत दासबोध गाथा परम । भक्ति अध्यात्म वाढवी ॥ ८ ॥ तुलसीदास रामायण । सूर, कबीर, मीरा सजन । संत असोनि केलें कवन । भक्तिमार्ग सोपान दाविला ॥ ९ ॥ सोपान, मुक्ता वेणा बहिणा । संत असोनि काव्य प्रेरणा । ऐशा ईशावतार कारणा । किती म्हणोनि वर्णावें ॥ १० ॥ दत्त, शक्ति शिवोपासक । वैष्णव, गाणपत्य, कित्यैक । रामकृष्णादि अनेक । धर्ममार्ग भ.विका दाविती ॥ ११ ॥ रामकृष्ण परमहंस । टेंबे स्वामी ईश्वरांश । भक्तिमार्ग प्रकाश । दाविला विशेष भक्तांसी ॥ १२ ॥ ऐसे अवतार अनंत । त्या त्या काली जनहित । साधाया येतीं अवनीत । भक्ति नवनीत पुरविती ॥ १३ ॥ श्रीकृष्णावतार चैतन्य । मधुर भाव प्रकाश गहण । पुनीत केले सकल जन । कृष्ण प्रेम ज्ञान दिधलें कीं ॥ १४ ॥ **श्रीकृष्ण सेवा परम कठीण । ती राधेंसी** उमगे संपूर्ण । त्या भावाचे करुनि ग्रहण । शुद्धपण जगा दाविले ॥ १५ ॥ **प्रेम मार्गीचा सोपान । मधुर भाव** संपूर्ण । तो दाविला विशद करुन । स्वयें आचरण करूनिया ॥ १६ ॥ श्रीकृष्णें केले अवतार संहरण । योजिले क्षेत्र प्रभास पट्टण । शरयुतीरी राम लक्ष्मण । इच्छा तन त्यजियली ॥ १७ ॥ कार्य झालिया संपूर्ण । येतीं अवतार संहरून । ऐसी देव कृति गहण । किती म्हणोनि वर्णावी ॥ १८ ॥ **ज्ञानेशांचे वयोमान । अल्प असतां** कार्य संपूर्ण । होतां तकाल्ल समाधि स्थान । देवाज्ञ योजिलें ॥ १९ ॥ नामदेवाचे

वृद्धपण । नाथ, समर्थ वयोमान । पाहतां ईशेच्छा कारण । अवतार संहरण व्हावया ॥ २० ॥ धर्मस्थापक धुरंधर्य । श्रीमदाद्य शंकराचार्य अल्पवयीं संपविले । कार्य । अपार कार्य करोनिया ॥ २१ ॥ ग्रंथ निर्मिले सविस्तर । भाष्याचे अनेक प्रकार । मठ स्थापिलें भारतभर । धर्मकार्य निरंतर व्हावया ॥ २२ ॥ श्रीचैतन्य देव गौरहर । लीला संहरण विचार । करितीं न नुरे कार्य । प्रेमावतार जगीं जाहले ॥ २३ ॥ कळतां ऐसे भक्तजनां । होती मानसीं यातना । गौर तनु दिसे नयनां । वेदना दारुण होती तैं ॥ २४ ॥ श्री चैतन्य चरित्रकार । अंतिम लीला अदर्शन प्रकार । वर्णनी हेतू पुरःसर । धरिती मौन सर्वही ॥ २५ ॥ चैतन्य मंगलकार । अल्प वर्णन करी गौरहर । अंती अलौकिक चमत्कार । वृत्त सविस्तर कळाया ॥ २६ ॥ लौकिक शरीर प्रकार । तैसे नव्हेती गौरहर । अलौकिक प्रभु शरीर । शांत होई अपूर्व तया ॥ २७ ॥ चैतन्य पांच भौतिक तन । न मानिती वैष्णव जन । वाटे शरीर परीं सामान्य । तेजोमय जाणा अलौकिक । २८ ॥ गौरलीला विग्रह । सामान्य दृष्टीस गमे देह । परी तेजोमय दिव्य । लीला भव्य दाविल्या ॥ २९ ॥ प्रभुलीला संहरण । श्रवण न करिती वैष्णवजन । परी अलौकिक घटना वर्णन । केले जाणून श्रेष्ठत्व ॥ ३० ॥ चैतन्य देव असतीं नित्य । त्यासी कैचा असे मृत्य । कळावया घटना सत्य । भौतिक येथ दाविय्रली ॥ ३१ ॥ जैसे अग्नीचे दाहकत्व । पदार्थी राही प्रकट सुप्त । तैसे चैतन्य तत्व । राही नित्य जगतीं तें ॥ ३२ ॥ अग्नी सर्वत्र व्यापक । विश्वीं मूर्तिमंत देख । संसारी न राहता तत्वपावक । क्षणीं प्रलय जगी हो ॥ ३३ ॥ तैसे चैतन्य स्वरूप । जगीं भरूनि राही चिद्रूप । प्रेम वैराग्यें आपोआप । भक्तिमिषें प्रकटले ॥ ३४ ॥ साच्चित ज्ञानघन । असतीं नित्य चैतन्य । त्याची लीला अदर्शन । संक्षेपे कथियली ॥ ३५ ॥ अठरा वरुषें पुरींत वास तयांत षड् वरुषे भक्तसहवास । द्वादश विरह दशेस । प्राप्त देहास जाहले ॥३६॥ तो विरह कथावृत्तांत । पूर्वी कथिला साद्यंत । व्याकुळती कृष्णदर्शनार्थ । दिव्योन्माद होतसे ।३७। पुत्र विरह दुःखभार । माता त्यजि शरीर । संपूर्ण जाहले अवतार कार्य । सफल होय उद्दिष्ट ॥ ३८ ॥ समाप्त करावा अवतार । ऐसा प्रभु विचार । तो दिन पातला सत्वर सविस्तर परियेसा ॥ ३९ ॥ अंतरंग प्रभु भक्त । त्याकळले प्रभु चरित । अवतार समाप्ति हेत । तेणें चित्त कष्टलें ॥ ४० ॥ पातला आषाढमास । वर्षाकाल बहुवस्त्र । भक्त, रथयात्रा उत्सवांस । दर्शनास येती ॥ ४१ ॥ चैतन्य

वृत्ति अति गंभीर । तें दिनीं बघतां भक्त अस्थिर । ललाटीं तेंज अपार । निघे, तेजस्वी मुख दिसे ॥४२॥ भाळी तेज अदभुत । कथा श्रवणी दत्तचित्त । स्वरुप मुखे रस भरीत । चैतन्य ऐकिती सप्रेमे ॥ ४३ ॥ वृत्ति जाहली तल्लीन । कृष्ण चरणी स्थिरमन । विराट स्वरूपी विलीन । विस्व मायाधीन जे ॥ ४४ ॥ तो एकाकी सत्वरगमन करिती नाथ । मंदिरा लागून । आश्चर्ये थकित भक्तजन । वरिती गमन सकल ॥ ४५ ॥ भक्त करितीं अनुगमन त्वरें जाती धावून । जिज्ञासा मनीं धरुन । प्रभु कारण मंदिरी ॥ ४६ ॥ गरूड स्तंभा लागून । नित्य असे दर्शनस्थान त्याते गेले त्यजून । देवडी समीप पातले ॥ ४७ ॥ प्रवेश केला गाभारी । दर्शन घेतले सत्वरी । तो चमत्कार अभ्यंतरी निर्धारी जाहला ॥ ४८ ॥ कवाडे आपोआप बंद । होतीं सकला प्रतिबंध । प्रभु सन्निध गोविंद । एकाकीं आनंद भोगिती ॥ ४९ ॥ ते समयी गाभारीं । होता भाग्यवान पुजारी । गुंजाभवनीचा सेवेकरी । पाही अपुर्व दृश्या ते ॥ ५० ॥ नाथसन्मुख । चैतन्य । उभे राहती कर जोडोन । कंठ गग्दद अश्रुपुर्ण नयन । प्रार्थना करिती सप्रेमे ॥५१॥ हे ! दयामय दीनवत्सल । जगत्पिता, जगन्नाथ, दयाळ । सत्य, त्रेता, द्वापार, कळी । धर्म रसाळ संकिर्तन ॥५२॥ जीव अज्ञान पामर । त्यावरी दया करा निरंतर । आपुले नाम सुमधुर । गाती किर्तनी सप्रेमे ॥ ५३ ॥ कलियुग अत्यंत घोर । जीवां ईशचरणाधार । यावाचूनि अन्य प्रकार । नसे उद्धार व्हावया ॥ ५४ ॥ आपुल्या चरणाचा आधार हाचि जीवाचा निर्धार । त्याविण दुःख अपार । भोगी, निरंतर जीव हा ॥ ५५ ॥ यास्तव आपुले पवित्रचरण । त्याचा आश्रय करा प्रदान । मुक्ति लागी हेचि धन । करीं जतन जीव हा ॥ ५६ ॥ ईतुके वदोनीं चैतन्य । नत मस्तक वरिती श्रीचरण । गाढ देऊनि अलिंगन । झाले लीन श्रीविग्रही ॥ ५७ ॥ चैतन्य विग्रह तेंजयुक्त । गेला मिळोनि श्रीस्वरूपांत । तेज मीनले तेजांत । भौतिक भाव लोपला ॥ ५८ ॥ गाभारीं तेंजाचा लखलखाट । पुजारीं जाहला चकित । प्रभुचें दिव्यतेज पहात । धावे त्वरींत धरावया ॥ ५९ ॥ प्रभो ! तुमचीं अगम्य लिला । मज न कळे दिनाला काशास्तव ऐशा दिव्याला । करिता सांगा मजलागीं ॥ ६० ॥ ऐसे वदुनि धावला । धरु पाहे प्रभुजींला । प्रभु स्वरूपीं लीन ते वेळा । पाहता जाहला मूर्छित ॥ ६१ ॥ शके चौदाशे पंचावन्न । सवंत पंधराशे नव्वद जाण । पधराशे तेहतीस इसवींसन । प्रभु अंतर्धान पावलें ॥ ६२ ॥ आषाढ मास शुल्ल पक्ष । रथयात्रा उत्सव विशेष । द्वादशी तिथीं पुण्य

दिवस । वैकुंठ धामास पातलें ॥ ६३ ॥ स्वर्गी होई जयजयकार । बहुविध वाद्यांचा गजर । श्रीकृष्ण चैतन्य गौरहर गोलोकी सत्वर पातले ॥ ६४ ॥ पवित्र केली मेदिनी । प्रेम दाविले भक्तजनी । मातेची कूस धन्य करोनि । केले पावन निजकुल ॥ ६५ ॥ पुजारी सावध हो, आक्रंदला । हे ! प्रभो दनी दयाळा । कैसे सोडोनी गेले मजला । कृपेला अपात्र जाहलो ॥ ६६ ॥ हे ! प्रभुदेव चैतन्य । आता कैचे नयनी लावण्य । देखू कैचा गौरवर्ण । जेणें नयन तृप्त होत ॥ ६७ ॥ नयनी न देखे विरहमूर्ति । न दिसे मज करुणा मुर्ति । कैची पुरेल आर्ति । प्रीती मजवरी कोण करी ॥ ६८ ॥ दावा वदन अश्रुपुर्ण । विरहे मुखे कृष्ण कृष्ण । ध्वनी पुनीत करी श्रवण । नयनी न दिसे की ॥ ६९ ॥ मीं तवचरण किंकर । अज्ञानी जीव पामर । करी वा ! कृपा मजवर । दर्शन सत्वर द्यावे जी ॥ ७० ॥ आता कैचे माझें भाग्य । उदयास पावे सौभाग्य । पुरवा आस यथायोग्य । अन्य उपाय मज नसे ॥ ७१ ॥ संसार मानूनि असार झालो श्रीचरणी स्थिर । आपुला विरह दुस्तर । साहवे अपार कैचा मज ॥ ७२ ॥ पुजाऱ्याचे करुण क्रंदन । घाबरे होती भक्तजन । व्दार उघडो करिती कथन । परि शुध्द नसे तया ॥ ७३ ॥ अल्प समय झालीयावरी सावध जाहला पुजारी । व्दार उघडी सत्वरी । भीतरी भक्त पातलें ॥ ७४ ॥ काय जाहले वर्तमान । कोठे गेले प्रभु चैतन्य । सत्वर करी कथन भक्तजन वदले समय ॥ ७५ ॥ नेत्राश्रु कंठ सग्ददीत । पुजारीं कथी वृत्तांत । श्रवण केला साद्यंत । मूर्छित भक्त जाहले ॥ ७६ ॥ धरणीसी घेती लोळण । कोणी घेती भाळ पिटून । किती करिती रुदन । व्याकुळ प्राण होती ते ॥ ७७ ॥ प्रभुचे बाहेरवर प्राण । स्वरूप गोस्वामी विरक्त पुर्ण । कैसे साहती विरह दारुण । स्तंभित झाले तेधवा ॥ ७८ ॥ श्रीसन्मुख राहुन । नयनी पाहती श्रीचरण । चित्त चिंतन । प्रभु अनु गमन करावया ॥ ७९ ॥ मुखावाटे येई स्वल्पधूम । वरी तेज निघे अनुपम । श्रीस्वरूपीं मिळे सहज सुगम । अनुसरण परम प्रीतींचे ॥ ८० ॥ दुःखित झालें भक्तजन । मार्ग क्रमितीं अन्योन्य । परि गोस्वामीं धन्य । इच्छातनु धरिलीं त्यां ॥ ८१ ॥ यापरीं लिला अवतार आपूला आपण केला संहार । चैतन्य प्रेमावतार । संकिर्तन मार्ग अपार दाविला ॥ ८२ ॥ ये विषयीं भागवत वचन एकादशीं निरुपण । एकतींस अध्यायीं केले जाण । षष्टश्लोकीं निवेदिले ॥ ८३ ॥

श्लोक-- लोकाभिरामां स्वतनुं धारणाध्यान मंगलम् । योगधारण याग्नेय्या ऽदग्धा धामाविशत् स्वकम् । ११-३१-६

योगी असती इच्छामरणी । तैसा नव्हे हा यादवमणी । योगी योगधारण करूनि । स्वच्छंद मृत्यु भोगिती ॥ ८४ ॥ कळीं काळासीं जिंकोनी । योगी जे का इच्छामरणी । अग्निधारणें देह जाळूनि । आत्मस्वरुपी लीन होती ॥ ८५ ॥ जल उपरत झाले । वा घृत थिजले, वितळले । तैसे सगुण निर्गुण झाले । योगाग्निधारण संज्ञा तया ॥ ८६ ॥ श्रीकृष्ण पूर्ण अवतार । त्यांचा देह लिला शरिर । योगधारणेंचा प्रकार । कासया करितीं दहनार्थ ॥ ८७ ॥ लिला शरिर केले धारण तेथ कासया दहन मरण । नेत्रीं देखता लागे ध्यान । मनचरणी स्थिरावे ॥ ८८ ॥ कृष्ण स्वरुपाची खाण । जो जगासी टाकी मोहून । सौदर्य भूलोनी मदन । उदरी जाण पातला ॥ ८९ ॥ आनंदघन श्रीकृष्ण चरण । पाहोनि भुलली लक्ष्मी जाण । योगिया सदाध्यान । करिती चिंतन शिवादिक ॥ ९० ॥ सकल मंगलाधिष्टान । चैतन्यघन श्रीकृष्ण । जगाचे विश्रामस्थान । आत्माराम जाण ॥ ९१ ॥ लिला विग्रही घनशाम । ज्ञानस्वरुप आत्माराम । जो योगीया ध्यानगम्य । जगासी आराम जाहला ॥ ९२ ॥ थिजलया घृताचीं पुतळीं । तेवी चैतन्य रसमूर्ति बनली । तीच कृष्ण स्वरूप जाहली । खलीले धरिली तनु ॥ ९३ ॥ कृष्णें दावाग्नि प्राशिला । कालींया वीषबाधा कैची त्याला । मुखीं ब्रम्हांड दावी मातेला । मर्त्यदेह कैचा तो ॥ ९४ ॥ हृदयी प्रकटे श्रीकृष्ण । तो देह विदेही जाण । देहत्व कैचे त्यालागून । नाश न पावें कदाही ॥ ९५ ॥ त्यासी नसें जन्म मरण । नसे पुनरपी आवागमन । स्वेच्छे करी तनुधारण भक्त रक्षण करावया ॥ ९६ ॥ दर्पणी जैसे प्रतिबिंब । लोपे न लागता विलंब । तैसा आभास लीन सुलभ । आपुले ठायी विलीन हो ॥९७॥ करिता ज्याचे नामस्मरण । खुंटे भक्ताचे जन्ममरण । त्या कृष्णास होता मरण । भक्तोद्धरण कैचे होय ॥ ९८ ॥ आपुल्या मायेनें जाण । प्रकट जाहले श्रीकृष्ण । लिला टाकूनि स्वरूपीं लीन । करी गमन वैकुंठी ॥ ९९ ॥ जैसा होय भक्त भाव । तैसा देव होई सदैव । भक्त हृदयी मूर्ति ठेव । ठेवूनि जाई निजधामा ॥ १०० ॥ जरी कृष्ण झाला सगुण । दाह न होई तनु लागून । त्याच्या आश्रये जग संपूर्ण । उपनिषद् वचन ऐसें असे ॥ १ ॥ जाहलिया कृष्ण दहन । विश्वाचे होई अग्नीत ज्वलन । की विश्वीं विश्वंभर म्हणून । विश्वरूप कृष्ण जाणा ॥ २ ॥ कृष्णाचे येणें जाणें । अथवा राहणें बोलणें । स्वयें तोचि तो जाणें । अज्ञानें अगम्य बुद्धीस ॥ ३ ॥ कृष्णापरिस चैतन्य जे स्वयेंचि श्रीकृष्ण । त्यासी कैचें जन्ममरण । स्वस्वरुपी लींन जाहले ॥ ४ ॥ भक्तासी करावया प्रेमदान । केला

निज इच्छे देह धारण । भक्तां भक्तिमार्ग दावून । केलें गमन निजधामा । ५ ।। जे नित्य सच्चितानंदघन । असती गौरचैतन्य । भक्तास्तव लीला प्रकटवून । केले गमन वैकुंठीं ।। ६ ।। ये विषयींचे वचन । ब्रह्मपुराणीं असे जाण । त्याचे अल्पकरी कथन । अवधान दीजे सत्वरी ।। ७ ।।

श्लोक– अजातो जातवद्विष्णुरमृतोमृत्तवत्तथा । मायया दर्शयेन्नित्यं अज्ञानां मोहनायच ।। ब्र. पु.

अजन्मा विष्णु भगवान । मायाबळें घेती जनन । अमृतरुप असोन । होती मृतजीव समान ते ।। ८ ।। अज्ञानी जीव मोहित । व्हावे धरुनि हा हेत । लीला दाविती जगांत । परिनित्य मुक्त असती ते ।। ९ ।। तैसा चैतन्यावतार । मोहित करी चराचर । प्रेम भक्तीभाव मधुर । केला उद्धार दीनांचा ।। ११० ।।

श्लोक -- नाम संकीर्तन यस्य सर्व पापप्रणाशनम् । प्रणामो दुःखशमनस्तं नमामि हरि पदम् ।। १२।१३।२३ भाग०

ज्याचिये नाम संकीर्तन । सुमधुर करी पापनाशन । ज्यासी करितां प्रणमन । दुःखनाशन सकलहो ।। ११ ।। श्रीराम रुप सर्वोत्तम । त्या श्रीहरीचे पादपद्म । तेथ शतशः प्रणाम । मरण जन्म निरसावया ।। १२ ।। रामहृदयीं वसे शंकर शिव चित्ती राम शंकर । त्याचे स्मरण निरंतर । करुनि चरित्र कथियले ।। १३ ।। चैतन्य चरित्र श्रवण । करितां न हो जन्ममरण । मुक्ति लाभ हो तत्क्षण । ईशप्राप्ति जाण निश्चये ।। १४ ।। श्री चै. वि, ग्रंथरसाळ अं, ली. प्रसंग सोज्वळ । लीला संहरण कथा मंगळ । अठ्ठेचाळीसाध्यायीं कथियली । ११५ ।।

श्री. चं. वि. ग्रंथ, अं. ली: प्रसंग लीला संहरण कथाकथन नाम अध्याय अठ्ठेचाळिसावा समाप्त (४८)

ओ० सं० ११५ एकूण ओ० ६०९८ दि, ११-९-६४ रविवार आ० शु० ६ शके १८९६ सं० २०२०

## अध्याय समाप्त

# अध्याय ४९ वा

श्रीगणेशाय नम: । श्रीसरस्वत्यै नम: । श्री गुरुभ्योनम: । श्रीकृष्ण चैतन्याय नम: ।।

श्लोक – गौरशक्ति महामायां नवद्विप निवासिनीम् । विष्णुप्रियां सती साध्वी तांदेवीं प्रणतो ऽ स्म्यहम् ।।

गौरशक्ति महामाया । नवद्विपी करीं वास्व्या सति साध्वि विष्णुप्रिया । चरणीं तिचया प्रणाम ।। १ ।। जीं प्रत्यक्ष आदिशक्ति । जिचेनि जगाचीं उत्पत्ति । तैसी लय आणि स्थिति । भाविती जगन्माता तिज ।। २ ।। घेई नवद्वीपी अवतार । जनाचा करावा उद्धार । पातिव्रत्य महति थोर । दावाया अपार हेत हा ।। ३ ।। स्त्री नव्हे संसारीं दास । नव्हे संसारीं उदास । प्रपंच परमार्थ दोघास । धरूनि कास राहती ।। ४ ।। स्त्रीस परमार्थ ह्व्यास । मानी देवदेवतेस नितांत ठेवी भावास । धरी आस उद्धरणीं ।। ५ ।। विषयद्वारी वराडी । व्हावी स्त्री कल्पना कुडी । पुरुष वासना विघडी । करी धडपडी विषयास्तव ।। ६ ।। विषयी व्हाया संयम । स्त्रीस अत्यंत सुगम । भाव. श्रद्धा, व्रतनेम । करी अनुपम वैराग्ये ।। ७ ।। स्त्री चरित्र उज्वल । दोन्ही कुलें करी धवल । उद्धरी बेचाळीस कुळं । भाव निर्मळ भक्तिचा ।। ८ ।। स्त्री पातिव्रत्य प्रखर । तेणें संतुष्ट होय मित्र । द्विज कौसिक भार्याचरित्र । भारतकारें वर्णिले ।। ९ ।। आपुल्या पतिव्रत्य तेजाने । सूर्यास घातले बंधन । तेणें सूर्यनारायण । लोपवी किरण तेजस्वी ।। १० ।। आपल्या पतिदेवास्तव । साध्वीं वेचीप्राण सर्वस्व । होती भोग वैभव । प्रेमास्तव जाण निश्चयें ।। ११ ।। किती करिती प्राणार्पण । किती वनवासी विरक्तपूर्ण । संसारी यतिधर्माचरण । साधन करिती ललना ।। १२ ।। तैसी चैतन्यदेव भार्या । नामे साध्वी विष्णूप्रिया । पातिव्रतें विष्णू प्रिया । जाहली, दावाया मार्गातें ।। १३ ।। देवी त्याग वैराग्य संपन्न । पतिहूनि असे दारुण । प्रभु भक्तिचें साधन । न कळे, कोणा गृहांतरीं ।। १४ ।। एकांती साधना गृहांतरीं चाले, नकळे बाहेरी । नसे प्रसिद्धी संसारीं । भक्तीची परी ऐसी ही ।। १५ ।। प्रभु त्यजोनि मध्यरात्रीं । गेले संन्यासी बनले सत्वरी । श्रवणें दुःख हो भारी । निर्धार करी विष्णूप्रिया ।। १६ ।। विरह वेदना दुस्तर । न साहे केला निर्धार । देहाविषयीं हो निष्ठूर । तापवी नश्वर शरीर १७ न जाई कदा बाहेर । भाषण वर्ज्य सत्वर । अन्न. पान, मान चैन पार घालवी दूर चित्तांतूनी १८] निरंतर सेवा सासूची । हरिभजनी काळ वेची । चित्ती मूर्ती पतीची । तारक तोचि भाव हा

देह प्राण इंद्रिये मन । पतिदेवा केले अर्पण । त्यांचिया आज्ञे अन्नसेवन । करी अनुदिन साध्वी ती ॥ २० ॥ तंत्र तपे तापवी देह । नवांछी प्रपंच गेह । अंतरी सेवेचे ध्येय । समजे हेय विषयासी । २१ । यापरी घालवी जीवन । विरहे वेदने व्याकुळ मन । मृत्यूस करि आवाहन । लोटती दिन किती एक । २२ । पहावा श्रीकृष्ण चंद्रनयनी । म्हणोनीं प्रभु जाती वृंदावनी । देवींची विरह व्यथा जाणोनी । सदनी द्विपीं पातलें । २३ । करावी व्यथा शांत । म्हणोनी मार्गीं विश्रात । सदनी पातले त्वरित । भक्त हेत पुरवावया ॥ २४ ॥ पतिदेव येता सदनी । प्रणाम करी देवी चरणी । संतोष व्हाया ममजीवनी । चिन्हे पुनीत करावे ॥ २५ ॥ ऐकोनि भार्या वचन । प्रभुचे द्रवले अंतःकरण । चरणीच्या पादुका देऊन । केले पावन पत्नीसी ॥ २६ ॥ भक्त जाणूनि केला उपदेश । करावे चरण सेवेस । जीवन घालवीं अहर्निष । पावे संतोष गोविंद ॥ २७ ॥ तुझें भक्ति तप प्रखर । संतुष्ट हो शारंगधर । निश्चये करीं उद्धार निष्ठा अंतरीं असो दे ॥ २८ ॥ अमृत तुल्य पतिबोल । देवींसी जाहले अमोल । चित्त प्रसन्न उत्फुल्ल । जीवन वेल प्रफुल्लीत २९ पादुका जीवनाधार । मानूनि सति निर्भर । राही सेवेत शरीर । घालवीं अहोरात्र निश्चये ३० वृद्ध मातेची सेवा । करी तोचि माते विसावा । तोचि आधार बरवा । शांतवी जीवा विष्णुप्रिया ॥ ३१ ॥ सासु मानी जीव प्राण । स्नुषेवरी सारे जीवन । मानूनि करि कालक्रमण । समाधान तिसी होतसे ३२ यापरी उभयता सासु सुन । घालविती संतोषे जीवन । जगन्नाथ प्रसादवसन । लेवूनि अंगी राहती । ३३ । प्रतिवर्षी जाती यात्रेकरी । नाथदर्शनी रुचिभारी प्रसाद वस्त्र देती तयाकरी । झडकरी मातेसी द्यावया । ३४ । प्रभुप्रेषित प्रसाद वस्त्रे । देवी आच्छादी शरिर मन । प्रिया राही मंदिरी गंभीर । फिरे प्रभुचरणी पुरीत ॥ ३५ ॥ प्रिय न वाटे ऊंची वस्त्र । परि माताज्ञा मानी वर । प्रिया राही निरंतर । पटे वस्त्रावमान न हो ॥ ३६ ॥ मुल्यवान वस्त्रे भूषणे । प्रिया करी तनुसी धारण । मातेची आज्ञा कारण । उल्लंघन मानीं दोषाते ॥ ३७ ॥ जुना प्रभु सेवक । असे ईशान नामक । पुत्रापरी माता मानीं विषेश । तोही सेवक एकनिष्ट ॥३८॥ तयासी पातले वृद्धपण । म्हणूण सेवक वंशीवदन । धाडीला प्रभूनीं ब्राम्हण । सेवन व्हावे मातेचें ॥३९॥ वृद्ध ईशान वंशीवदन सेवा करिती तन मने माता प्रियेसी समाधान संपुर्ण काल सेविती ते ४० कांचना नामक प्रिय दासी । राही सन्निध प्रियाजीसी । दासी असोनि सखी विशेषी । सेवा अतिशयेसीं करी ॥ ४१ ॥

द्वीपी दामोदर पंडित । मातेची चौकशी करी नित्य । कै प्रभु दर्शना जाई पुरींत । करी वृत्तांत कथन ॥ ४२ ॥ मातेचें कळवी वृत्त । प्रिया वैराग्य उत्कट । कथीं प्रभुसी साद्यंत । तेणें संतुष्ट, प्रसन्नती ॥ ४३ ॥ श्रवणीं भार्या तपकठोर सेवा भावी अतीतत्पर । वाटे नवल थोर । त्याग मग जीवन श्रवणीचे ॥ ४४ ॥ दे प्रियेचे एकचि अवलंबन । चरण पादुका जीवन । उच्चासनी देवगृही ठऊन । पुजन करी सद्‌भावे ॥ ४५ ॥ नित्य धूप दीप नैवेद्यादि । पुजा करि यथा विधी । मंत्र जपे सारा अवधि । उपाधि अल्प भोजनी ॥ ४६ ॥ हरेराम हरेराम । मंत्र अहर्निश निष्काम । सेवाभाव अनुपम । परम समाधान अंतरी ॥ ४७ ॥ पुत्रशोके जर्जरित । वृध्द माता दुःखित । ऱ्हदय फाटे हो व्यथित श्रवणी येत वार्ता ते ॥ ४८ ॥ महाप्रभु दिव्योन्माद । वार्ता श्रवणी विशद । पडे मातेंसी हो खेद । मानसी विषाद अतिशय ॥ ४९ ॥ निमाईचे विरह दुःख । माते वाटे सदृश विरुद । देही प्राण न राही देख । आज्ञा पालक भक्त तुम्हीं । ५० । माझे न राही पार्थिव शरिर । न्यावे मज गंगातीरी । भगवती भागीरथी पवित्र । सन्निध पडावे शरिर हे ॥ ५१ ॥ माताज्ञा मानिती प्रमाण । नेंति पालखी मधून । समस्त भक्तजन । स्कंधी वाहून आपुलीया ॥ ५२ ॥ सवे येई विष्णु प्रिया । मातेचे दुःख जाणूनिया । सात्वन करी सहृदया । संतोष व्हावया ॥ ५३ ॥ दिव्योन्माद प्रभुजीचा वाटे लाभ शेवटिचा । दुःखद वृत श्रवणाचा योगप्राप्त न हो ॥ ५४ ॥ तत्पुर्वी आपुला देह जावा । माता ऐसे धरी जीवा । प्रियेच्या निर्मळ भावा । जाणूनि सन्निध पाचारी ॥५५॥ देऊनि प्रेमालिंगन । सुते केले सन्यास ग्रहण । तुज दुःख हो दारुण । त्याचे जाणपण मज असे । ५६ । परि तू भाग्यवान । देव पुरुषाची पत्नी जाण । तुझे खुंटे जन्ममरण पावन झालीस त्रिलोकी ।५७। तव पतिव्रत्य थोर । सत्किर्ति वाटे अपार । पार्वती, सीता, सरिस तुजवर । ठेविती नारी निष्ठा त्या ।५८। तु मनी शोक नाणी । चित्ती चिंती चक्रपाणी । नामस्मरण पवित्र वाणी । तनु पडे तोवरी घे ।५९। मज सेविले अत्यंत । मज दिधले सुख बहूत । तेणें संतुष्ट रमाकांत । सुख नितांत तुज दे ।६०। मातेचे आशिवचन । प्रियेसी जाहले समाधान । माते नश्वर देह त्यजून । केले गमन वैकुंठी ।६१। भक्तासी शोक अपार । अश्रुपूर्ण प्रियानेत्र केला अन्य संस्कार । एकाकी परते गृहांतरीं ।६२। वृध्द ईशान सेवक । माते पुर्वी गाठी परलोक । तोचि माता त्यजि इहलोक । प्रिया एकाकि राहिली ॥ ६३ । गृही राही वंशीवदन । सेवा करी मनापासून । दामोदराचें लक्ष्यपुर्ण ।

सदनी सर्वकाल असे तो ॥ ६४ ॥ प्रियेचे वैराग्य थोर । वाढु लागे उत्तरोत्तर । प्रभु विरह व्यथे जर्जर । दुःखे अपार तडफडे ॥ ६५ ॥ मातेचे दुःख दारुण । पति विरहाचे पडतीं घण । तोचि वज्राघात निर्धृण । वार्ता कठिण श्रवणीं ये ॥ ६६ ॥ पुरीत श्रीकृष्ण चैतन्य । करिती लिला संहरण । निजधामी केलें गमन । श्रवणी येई वृत्तांत ॥ ६७ ॥ वायूने कर्दळी कंपित व्हावी । अथवा उन्मळून पडावी । साध्वीं प्रिया देवी । मूर्छित तेवी जाहली ॥ ६८ ॥ तैं दिक्षा शिष्य वंशीवदन । पाहीं मातेंची दशा दारुण । तेणें केले समाधान । वर्जिले अन्नपान देवीने ॥ ६९ ॥ तेचि आचरी वंशीवदन । गुरुमाऊलीसह उपोषण । भक्तें परोपरी सांत्वन । केले वचन नायके ॥ ७० ॥ संकटीं पडे भक्तजन । माता वर्जि अन्नपान । ते गौरांगे स्वप्नो येऊन । उपदेशीले प्रियेसीं ॥ ७१ ॥ माझें तुज आज्ञावचन । काही काल तन धारण । करावे अन्नादिग्रहण । तेणें समाधान मज हो ॥ ७२ ॥ स्वप्नी जाहले प्रियदर्शन । त्याची मानी आज्ञाप्रमाण करू लागे अन्नग्रहण । वंशी मानी प्रमाण ते ॥ ७३ ॥ एके दिनी स्वप्नामाजीं । आले गौरांग प्रभुजी । वदले विष्णू प्रियाजी । आज्ञा माझी परिसे तु ॥ ७४ ॥ ज्या निंब वृक्षातळी केले स्तनपान । त्यास्थानी काष्ठमूर्ति करी स्थापन । तेचि राही वासस्थान । अनुदिन माझे ॥ ७५ ॥ ते समयी भीती अंतरी । वाढूनि झाली घावरी । त्वरे बैसे शय्यवरीं विचार करी स्वप्नाचा ॥ ७६ ॥ नेंमके तेंचि पडे स्वप्न । पाही निद्रे वंशीवदन । करिती परस्पर कथन । निराकरण जाहले ॥ ७७ ॥ करविली काष्ठमुर्ति सुंदर । वृक्षातळी स्थापी गौर । वस्त्रें, भूषणें, मनोहर । सिंहासनावर बैसविले ॥ ७८ ॥ मूर्तित हो अविर्भाव । प्रत्यक्ष गौरांग दिसती अपुर्व । दर्शनी प्रकटला भक्तभाव । ठेव. सापडे दरिद्रया ॥ ७९ ॥ केली प्रतिष्ठापना । अन्नदान केले सकलांना । नित्य नैंमित्तिक अर्चना । यादव नंदना, बंधुसुता ॥८०॥ आपुला बंधु, बंधुसुत । मंदीरी पुजारीं केलें नियुक्त । स्वये घे दर्शन नित्य । समाधान चित्त जाहले ॥ ८१ ॥ काले करूनि वंशीवदन । करी परलोक गमन । चित्ती दुःख दारुण । क्लेशे तन पोळले ॥ ८२ ॥ प्रभाती कांचनेंस घेऊन नित्य करावे गंगास्नान । तेही वर्ज्य करून गंगा आणवी गृहाप्रति ॥ ८३ ॥ परपुरुषाचे ईक्षण । न करी तैसे संभाषण भक्तांसीं घ्यावया दर्शन । कठीण जाहले ॥ ८४ ॥ मातेचे घेता दर्शन । कृतकृत्य वाटे भक्तजना । तेंथही जाहले बंधन । दुःख दारुण भक्तासी ॥ ८५ ॥ प्रभुचे प्रिय भक्त । अव्दैताचार्य शांतिपुरात । वृध्द, तनु जर्जरित । वृत्त

तया विदीत हो । ८६ । जगन्माता विष्णुप्रिया । कठोर करी तपश्चर्या । ईशान, नागर प्रिय शिष्या । शोधाया व्दिपा धाडीले ।। ८७ ।। दामोधर पंडित श्रीवास । तयासी भेटे नागर शिष्य । नेंले माता दर्शनास । अलौकिक तपास देखिलें । ८८ । तपकांती अनुपम । केला साष्टांग प्रणाम । कृतार्थ मानी तोषे परम । भाव निस्सीम वाढला ।। ८९ ।। प्रभाती स्नानादिकरावे । नित्य पूजा मंदिरी वसावे । जपध्यान सतत करावे । आळवावे षोडश नामानें ।। ९० ।। हरेराम हरेकृष्ण । पात्री तांदुळ घेऊन । जपमाला संख्या एक मोजून । टाकावे धान्य अन्यपात्रीं ।।९१।। जेतुल्यमाला तेतुले दाणे । टाकूनि जप संख्येप्रमाणे । तितकेच तांदुळ रांधणें । नैवेद्य करणे तयाचा ।। ९२ ।। भक्तासा प्रसाद तयातून । शेष करावे भोजन । खावे लवणाविण । नेम अनुदिन चाले हा ।। ९३ ।। मंदिर कवाडे करावी बंद । भक्ता सही प्रतिबंध । कठोर तप अनिर्बन्ध । प्रेमास्वाद गौर भक्तिचा ।। ९४ ।। नागर शिष्ये कथिले गुरुसी । जगन्माता थोर तापसी । परिसूनि अव्दैत मानसी । तृप्त वदे हरि इच्छा ।। ९५ ।। नित्यानंद अवधूत । पत्नी जान्हवी वसुमती प्रियेचा तप वृत्तांत । कळे साद्यंत तयासीं ।। ९६ ।। नित्यानंदे केले परलोक गमन । पत्न्या अधिकारी पुर्ण । जान्हवी तयात पुत्र हीन । दीक्षा देई भक्तजना ।। ९७ ।। दोघीं निघाल्या शांतीपुरी । पातल्या आचार्य घरीं । सीतादेवीसी सत्वरीं । व्दिपी दर्शनार्थ निघाल्या ।। ९८ ।। व्दिपी चैतन्य दास । वंशीवदन सुत गृहास । तीघीही आल्या वास्तव्यास प्रियेस कळे वृत्त हे ।। ९९ ।। आपुला सेवक सुत । चैतन्य दास श्रेष्ठ भक्त । त्याचे गृही जावे संकेत । केला त्वरीत मातेने ।। १०० ।। तिघांचा अधिकार थोर । जाणे प्रिया मान्यवर । भेटीस निघे सत्वर । गौरहर पत्नी तें ।। १ ।। जाहले परस्पर मीलन । दिधले सप्रेमे अलिंगन । भेटीस जाहले बहुदिन । मिळता समाधान पावल्या । २ । तपे शुष्क हो काया । पाहोनि दुःखित जाहल्या । समजाविती बिष्णुप्रिया । शिणसी कासया कष्टे तु । ३ । जी तनु घई हरिनाम तीसी सुकविसी काय काम । तनु कष्टवावी हा अधर्म । बिघडें कर्म शरिराचे ।। ४ ।। एसे बोलती संतजन । तैसे प्रभु चैतन्य । वरी वेद शास्त्रवचन । रहावे मानून साधके ।५। शरिरे घडावा परमार्थ । तरीं नित्य असावे स्वस्थ जर्जर होता तनु स्वार्थ । परमार्थ न घडे तया ।६। मम पति देवाचे वचन । तैसे शिकबितीं चैतन्य । उभय मानी प्रमाण । कष्टवावे तन बरे नव्हे ।७। ऐसे ऐंके प्रिय वचन । अश्रुपुर्ण होती नयन । प्रिया बोले जान्हवी लागून । भगिनी श्रवण

करी गें ॥८॥ करी तू पति आज्ञा पालन । माझें पति यतिजान । अपार कष्टविले तन । सुख न भोगिले कदा ।९। मम पतिचे तापस जीवन । मीही तैसे घालवीन । ऐसे वदून सकला नमन । अश्रुपुर्ण नेंत्र केलें तदा ॥ १० ॥ सींता देवी वदे जगन्माता असशी तू प्रभूकांता । तव अधिकार पाहता । वर्णिता कुंठित मति हो ॥११॥ केले देहाचे सार्थक । केले तप अलौकिक प्राप्त होय पति लोक । वैकुंठ नायक तृप्त हो १२ वदूनि करिती रुदन । परस्परा शोक दारुण । गृही जावया परतोन । घेती स्त्रीजन आज्ञेसी ॥ १३ ॥ आता कै भेटी होईल । जै देवासनीं येईल । उत्तर देई, चित्त विकल परतली प्रिया गृहासी ॥ १४ ॥ प्रियेसी दिनानुदिन । वियोग दुःख दारुण । करी नित्य रुदन । कांचना समजावी तियेसी ॥ १५ ॥ चैतन्य लिला कथा रुचिर । दासीं ऐंकवि वारंवार । चित्त परि अधिर । पति लोकी सत्वर जावया ॥ १६ ॥ नेत्री वाहे अश्रुपुर । पति देवांच्य चरणावर । देह त्यजावा हा विचार । वारंवार मनी ये ॥ १७ ॥ चैतन्याचा जन्मदिन । शुद्ध पोर्णिमा मास फाल्गुन । प्रियेचे वाढें अधिरपण । रुंदन करी पतिनामे ॥ १८ ॥ हे प्राणनाथ ! ह्दयरमण प्राणवल्लभ सर्वस्व जीवन । कै घडें मज दर्शन । व्याकुळ प्राण जाहले ॥ १९ ॥ कांचना देखं प्रकार । मातेची दशा हा विचित्र ऐकवी चैतन्य चरित्र । सात्वन करी देयाच ॥ २० ॥ आजचा अपुर्व प्रकार दासी होय मनी अस्थिर । शांत होणं कर्म दुष्कर प्रिया अधीर देखता ॥ २१ ॥ तोचि काचने बधुसुत यादवे । त्वां सत्वर पाचारावे । भीतरी दर्शन घ्यावे । व्हावे कृतार्थ वाट मज ॥ २२ ॥ देवी करितीसी आज्ञा । सत्वर पाचारी कांचना । यादवाचार्य येती त्यास्थाना । कवाडं खोलून दिधली ॥ २३ ॥ देवी जाई मंदिरी । करि प्रवेश गाभारी लपेटून निवस्त्र शरीरी । द्वार सत्वरी झाकिले ॥ २४ ॥ करावा एकांतवास । ऐसी माझी असे आस । यास्तव झाकिले द्वारास । केले आज्ञेस यादवे ॥ २५ ॥ कांचना राही व्दारी । बहू काल लोटे तरी । प्रिया न येई बाहेरी । शका अतरी जाहली ॥ २६ ॥ म्हणोनी बोले यादवाचार्य । द्वार उघडा सत्वर । माझे मन होय व्यग्र । प्रिया भीतरी असे की ॥ २७ ॥ भये उघडी आचार्य व्दार · तो देखिला चमत्कार । अनभूंत झाले शरीर । कृष्ण चैतन्य मूर्तित ॥२८॥ न राही भौतिक शरिर । न देखिली खूण वावस्त्र । कांचना करी चीतकार । सत्वर मूर्छित जाहली ॥ २९ ॥ हादेवा विष्णुप्रिया । कोठे गेली मज सोडूनिया । तुजविणें देह जगवाया । अण्य कारण नसेचि ॥ ३० ॥ न केले मज कथन

न कळे मज तुझे मन । न केले उपदेश दान । व्यर्थ तनु पोशिली ॥ ३१ ॥ तुझे तप भाग्य थोर । पति लोकी गेलीं सत्वर । माझा देह भूमिभार । सेवा अल्पही न घडे ॥ ३२ ॥ ऐसा केला आकांत । भक्तजन होती दुखित । एसे अदभुत चरित । आश्चर्यें चकित जन हो ॥ ३३ ॥ प्रियादेवी भारतीय ललना । केलेतप वैराग्यदि साधना पतिव्रतेत थोर गणणा । झाली जाणा तियेसी । ॥ ३४ ॥ करुनि तप दारुण । कठोर दावी आचरण । पातिव्रत्यधर्मे जीवन । घालूनि सार्थकी लाविले ॥ ३५ ॥ झाली गौरांग गृहिणी । विषयावरीं सोडी पाणी । तारुण्य वेचिले सेवनी अर्पी चरणीं । तनु अंती ॥ ३६ ॥ पातिव्रत्य महिमा थोर । दावी जगी अपार । स्त्री जातीत मान्यवर । होऊनि प्रियकर जाहली ॥ ३७ ॥ ऐसे जगन्माता चरित्र । मज करवी केंले सत्वर । हेचि मम भाग्य थोर । लाभ अपार मानी मी ॥ ३८ ॥ मी एक रंक अज्ञानि । मज स्फूर्ति हे फोलपण । मातेचे आशीर्वचन । तेणें कवन जाहले ॥ ३९ ॥ मातेच्या उत्संग बैसता । न धरी बाळ संकोच चित्ता । ते विमाता गुण गाता । भयवार्ता मुळी नसे ॥ ४० ॥ कवनी मातेचे स्मरण । तेणें चित्ता समाधान । येथन्युन असे पुर्ण । श्रोते जनी करावे ॥ ४१ ॥ श्री. चै. वि. ग्रथ रसाळ भक्त चरित्र सोज्वळ । विष्णुप्रिया कथा मंगल । एकूण पन्नासी कथियली ॥ ४२ ॥ श्री. चै. वि ग्रंथ विष्णुप्रिया चरित्र कथा कथन नाम अध्याय एकूण पन्नासावा समाप्त ओ सं १४२ एकूणसं ६२४० दि १२-१०-६४ सोमवार

अश्विन शु ७ शके १८८६ सं २०२०

## समाप्त

# अध्याय ५० वा

जयजयाजी गणनाथा । सकळ विद्यासिद्धीदाता । विघ्नहर्ता सुखकर्ता । दुःख निवारिता भक्तांचे ॥ १ ॥ तैसी शारदा वेदमाता । नामें सरस्वति ब्रह्मसुता । वाणि स्फुरें जियेची सत्ता । चरणी माथा तियेच्या ॥ २ ॥ तुमचिय कृपेचा प्रसाद । त्याची देऊनियां साद । चैतन्य चरित्र करविलें विशद । भक्तिबोध व्हावया ॥ ३ ॥ आपुला व्हावा वरद हस्त । गाई पुढील चरित । पार्षदगण समस्त । महा प्रभूचें ॥ ४ ॥ श्रीराम जगज्जीवन । जानकीनाथ मनमोहन । मनोरथ करी पुर्ण । करूणाघन दीनाचा ॥ ५ ॥ हनुमान, भरत, शत्रुघ्न । नळ, नीळ, अंगद, जांबवान श्रीराम पार्षदगण । वर्णन असे रामायणीं ॥ ६ ॥ राधारमण कृष्णचंद्र । पार्षदगण उद्धव, अक्रुर । प्रल्हाद, नारद तुंबर । अर्जुन दैत्यवर विभीषण ॥ ७ ॥ श्रीमद्‌भागवत ग्रंथ । तेथ वर्णिलें सकल चरित । सेवक भक्तिभाव अद्‌भूत । केला ग्रथित सग्रंथीं ॥ ८ ॥ ओं नमोजी चैतन्य देवा । करावया चरण सेवा । चैतन्य विजय ग्रंथ बरवा । चरणीं अर्पावा हेत हा ॥ ९ ॥ इय ग्रंथी चैतन्य चरित । आदि, मध्य, लीला अंत्य । वर्णिली असे साद्यंत्य । भक्त हेत यथामति ॥ १० ॥ प्रभो तव कृपा ठेवा । घेऊनि संतग्रंथ मागोवा । तोष व्हावा सकल जीवा । सद्भावा जो उपजवा ॥ ११ ॥ प्रभो आपुलें पार्षदगण । त्यांचे करी चरित कथन । अद्वैत, गदाधर, सनातन । नित्यानंद, हरिदास श्रीवास ॥ १२ ॥ रामानंद, दामोधर श्रीपाद । ऐसे अमित भक्त प्रसिद्ध । चरित्र गावया आशीर्बाद । वरद हस्त हो मस्तकी ॥ १३ ॥ गुरु कृपेचा केवळ खेळ । दत्तप्रभुचे पाठबळ । कवना मति प्रबळ । व्हावया सकळां संतां नमीं ॥ १४ ॥ श्रीचैतन्य पार्षदगण । नित्यानंद प्रभु सुजाण । चरित करी कथन । इयें अध्यायीं भक्तीनें ॥ १५ ॥ राढ देशीं एकचाका ग्राम । मैथिली द्विज सकुन धाम । हाडाई पडीत नाम । घनःशाम चित्ती जयाच्या ॥ १६ ॥ हाडोओसा । संबोधिती । पत्नि धार्मिक पद्मावती । ईश चरणीं परमप्रीती । आळविती भक्तीनें ॥ १७ ॥ नसे पुत्रसंतान । संसारी मनीं खिन्न एका श्रीहरीवाचून । कृपाछत्र कोणाचें ? ॥ १८ ॥ ऐसा मनी ठवोनि भाव । ईश चिंतनी सदैव । भोगिती भक्ति वैभव । तेणें संभव प्रसन्न हो ॥ १९ ॥ माघशुद्ध त्रयोदशी तिथी । पद्मावति होई पुत्रवती । कुबेर संज्ञा तयाप्रति । तुष्ट होती उभयतां ॥ २० ॥ बालक देखितां दृष्टि । पूर्व जन्माची होय प्रचीति । योगभ्रष्ट असावा निश्चिती । ऐसी

वदन्ति जनांत ॥ २ ॥ बालक तेजस्वी गौरवर्ण । मोहित होती सकल जन बालमति प्रत्युत्पन्न । प्रसन्न होती मातापिता ॥ २२ ॥ द्वादश वर्षाचा बालक । वैष्णव, सन्यासी, परिव्राजक । अतिथि रूपे आकस्मिक । सगृहीं येती भिक्षेसी ॥ २३ ॥ भिक्षा मागिती बालाची । अपूर्व मागणी यतीची । वृत्ति बावरे उभयतांची । सामर्थ्य प्रचीत तत्काल ये ॥ २४ ॥ यति ईश स्वरूप मानून । बाल केला स्वाधीन । त्यांचें संगती तीर्थाटन । बहुत दिन केले तें ॥२५ ॥ भारतीं सकल तीर्थें । दर्शन घेती उभय तेथें । पश्चिम भारती मागुतें । भ्रमण करिते जाहले ॥ २६ ॥ श्री माधवेंद्र पुरीपाद । त्यांसीं मानिले नित्यानंद । त्यांचा घेऊनि कृपाप्रसाद । आनद भोगिती ॥ २७ ॥ वीसवर्षें केलें भ्रमण । द्वीपी प्रकटले चैतन्य । कळतां घेतले दर्शन । अंती चित्ता स्थिरावले ॥ २८ ॥ पवित्र श्रीवास सदनीं । व्यासरूपे गौरांग पूजन । करिता दाविले षड्भुज दर्शन । वर्णन अपूर्व तयाचें ॥ २९ ॥ मुख कमनीय सहाहात रूप मनोहर, नेत्र आरक्त । चंपक वर्ण, नासिका धरधरित । ओष्ठीं रक्तिमा विलसे ॥ ३० ॥ आजानबाहु सुहास्य वदन । ओंकार स्वरूप शूर्पकर्ण । त्रिपुंड तिलक भाली चंदन । कंबुकंठ, मान तिरकस ॥ ३१ ॥ गळा रूळे पुष्पमाळा गौरवर्ण शोभे आगळा । कटी पीतांबर पिवळा । उपवस्त्र डाले तनुवरी ॥ ३२ ॥ शंख चक्र, गदापद्म । कमळ पुष्प करी सुगम । चरण युगुली पादुका मनोरम । मंगलधाम भक्तांचे ॥ ३३ ॥ ऐसे देऊनि दर्शन । आज्ञापिलें भक्तजन । द्वीपी व्हावें कृष्णभजन । ठाकूर सन्निधानी ॥ ३४ ॥ श्रीकृष्ण भजन प्रचार । करिती नित्यानंद घरोघर । मद्यपि मधाई करी प्रहार । शिरी अपराध घोर हो ॥ ३५ ॥ सारे पाप सहन करून । तयावरी केले कृपादान । जगाई, मधाई बंधू दोन । चैतन्य कृपापात्र करविलें ॥ ३६ ॥ चैतन्य केले सन्यास ग्रहण । नीलाचली घ्यावया दर्शन । निघतां दंड खंड तीन । नित्यानंदे जाणून केलें तैं ॥ ३७ ॥ साधक जीवा समान । नसे साक्षात भगवान । त्यासी सन्यास ग्रहण । दंड धारण कासया ॥ ३८ ॥ प्रभु आज्ञा मानुनि प्रमाण । गौडदेशी केले गमन । प्रेम भक्तीने भारिले जन । उद्धरण व्हावया ॥ ३९ ॥ वैष्णव विव्देषी रामचंद्र । बेनापोली पाखंडी जमीनदार । नित्यानंद अपराध थोर । सपरिवार नष्ट जाहला ॥ ४० ॥ केला दहि चिवडा महोत्सव । पुनीत पानिहटगांव । विनम्र रघुनाथ भाव । लुटावा आनंद भक्तांनीं ॥ ४१ ॥ श्री अंगीचें अलंकार । लुटाया ये डाकू सरदार । चित्तशुद्धि घडविली साचार ।

अंतरी प्रेमा उपजविला ॥ ४२ ॥ ऐसा अनंतलीला । नित्यानंदे केल्या वेळोवेळा । घेती परमहंस दीक्षेला । नित्यानंद बनले अवधूत ॥ ४३ ॥ व्रजलीलेत बलराम । तेंचि नित्यानंद निताई नाम । गौरावतारीं श्रेष्ठ परम । अद्भुत प्रेम उभयतांचें ॥ ४४ ॥ जान्हवी, वसुधा पत्नी । नित्यानंद शक्ति दोन्हीं । वसुधा गर्भ संभव होवोनी । वीरभद्र गोस्वामीं अवतरले ॥ ४५ ॥ सापत्न मातेचे झाले शिष्य । मातांचा अधिकार विशेष । ज्ञान दिधले तया निःशेष । भक्तीस करूं लागला ॥ ४६ ॥ नित्यानंद पार्षदगण । द्वादश गोपाल ख्यात जनीं । व्रजी असती सखा म्हणून । केले कथन चरित ॥ ४७ ॥ चैतन्य बंधू नित्यानंद । त्याचे चरित केलें विशद । प्रेम भक्ति आस्वाद । चाखिला मोद चित्तासी ॥ ४८ ॥ चैतन्य भक्त अद्वैत । त्यांचे कथितो अल्पचरित । श्रवणी द्यावे चित्त । संसारी मुक्त व्हावया ॥ ४९ ॥

श्री अद्वैताचार्य चरित्र

स्वये विष्णुतत्वख्यात । ईश्वरी अभिन्न होत । म्हणोनी नामें अद्वैत । चरित अल्प कथितसे ॥ ५० ॥ महाविष्णु अंशपूर्ण असतो, सर्व गुण संपन्न । भक्ति उपदेशावाचून । वाणीतुन अन्य नये ॥ ५१ ॥ यास्तव नामें अद्वैताचार्य । वैष्णवगुरू आचार्य । जगां पूजनीय मान्यवर । ज्ञान अपार, तयांचे ॥ ५२ ॥ माघशुद्ध सप्तमी दिन । झालें कमलाक्ष अवतरण श्रीहट्टग्रामी परम पावन । उद्धरण व्हावया भक्तांचें ॥ ५३ ॥ श्रीमाधवेंद्रपुरी शिष्यवर । जाहले अद्वैताचार्य । वास्तव्यास शांतिपुर । मायापुरी सभा स्थापिली ॥ ५४ ॥ श्रीवासगृह सन्निधानीं । केली वैष्णव सभा स्थापन । बहिर्मुख जीवदशा दारुण । पाहूनि, कुमति, दुर्दशा ॥ ५५ ॥ नवद्वीपीं मायापुरी । जल तुलसींद्वारां आराधी सत्वरीं कलियुग पावन अवतारी । गौरहर प्रकट व्हावया ॥ ५६ ॥ फुलिया ग्रामी आचार्य । सन्निध येती हरिदास ठाकुर । कृपापात्र जाहले सत्वर । संतोष अपार चित्तासी ॥ ५७ ॥ अवनीं प्रकटले गौर । आत्मप्रकाश केला सत्वर । लीला विलास नानाप्रकार । आचार्य होत सहभागी ॥ ५८ ॥ जीवाचा व्हावा उद्धार । भक्त व्हावें कृपापात्र । व्रजलीला करितीं गौर । मायापुरी भक्तवृंदा सवे ॥ ५९ ॥ अद्वैत, नित्यानंद, श्रीवास । चंद्रशेखर भुवनी हरिदास । नाटयाभिनय बहुवस । होई भक्तास घवोनी ॥ ६० ॥ अद्वैतें विदुषक वेष । घेऊनि द्यावा संतोष । कीर्तन, नर्तन, विलास । केलें अहर्निश आचार्य ॥ ६१ ॥ आदर्श आचार्य संसार । दोन स्त्रिया सहा पुत्र । अच्युत, गोपाळ, श्रीकृष्ण

मिश्र । बलराम, स्वरूप जगदीश ॥ ६२ ॥ श्री जगन्नाथ क्षेत्रीं । प्रतिवर्षी जाती आजार्य । रथयात्रें अहोरात्र । सवें गौरहर नृत्यकरी ॥ ६३ ॥ गौरभक्त सारे पुत्र । पत्नी सीतादेवी पवित्र । पुत्रा कथी गौर चरित्र । भक्ति दृढत्तर व्हावया ॥ ६४ ॥ अद्वैत महिमा अपार । प्रकटविती गौरहर । श्रीवास पंडीत मान्यवर । तयासी प्रवर कथियला ॥ ६५ ॥ एके बा पंडित । शुकप्रल्हादादि वैष्णव भक्त । बालका परिस ते असत । अग्रणी अद्वैत वैष्णवां ॥ ६६ ॥ अद्वैत प्रथम श्रेष्ठ भक्त । हें सारे मागुता जन्म घेत । ऐसे जाणें निश्चित । तयालागी प्रकट जाहलों ॥ ६७ ॥ अद्वैत नामाचा हुकार । कानी येई निरंतर । शयनीं होतो क्षीरसागरी जागविला । अपार भक्तीनें ॥ ६८ ॥ ऐकूनि अद्वैत हुकार । जागृत जाहलो सत्वर । त्वरे घेतला अवतार । भक्तवर तोषवावया ॥ ६९ ॥ देवासी अवतार कारण । भक्ताचें श्रेष्ठ उपासन । तें व्हावे मज लागून । ऐसे दान द्यावे जी ॥ ७० ॥

– श्री गदाधर पडित –

श्री गौर शक्ति अवतार । गोस्वामी पडित गदाधर । असती ते चरित्र थोर । वर्णी भक्त वराचे ॥ ७१ ॥ पिताश्री माधव मिश्र । मातार लावति विरक्त थोर । कृष्ण प्रेमी सुत । गदाधर वैराग्य अपार शैशवी ॥ ७२ ॥ श्रीईश्वर पुरी पाद । व्दीपी योगी भक्त सिद्ध । श्रीकृष्णलिला मृत ग्रथ प्रसिद्ध । पढवी भक्तिस्वाद घ्यावया ॥ ७३ ॥ श्रीकृष्ण चरणी भक्तिप्रेम । तेणें वाढ अनूपम । न्यायशास्त्री श्रेष्ठ परम । पडित नाम पावला ॥ ७४ ॥ व्दिपी निमाई पंडित न्यायशास्त्री त्यांसी वाद करित । ससारी परी विरक्त । आजन्मवसत गदाधर ॥ ७५ ॥ चटगांव निवासी महा भागवत पूंडरीक विद्या निधि असत । वैष्णव प्रेमीं कृष्णभक्त । दिसती बिलासी भोगी कि ॥ ७६ ॥ त्यांचा वैष्णव प्रेमभाव । संशय उपजे जनावाव । वाटे गदाधरा शका अतीव । अज्ञानेभव म्हणोनी ॥ ७७ ॥ दृष्टीस दिसे तसे नसे परि देखणा शरु ते भासे । जन त्यावरीं अविश्वासे । अज्ञान नासे तोवरी ॥ ७८ ॥ अज्ञान नाशिलिया । संशय जाई विलया । अपुर्व प्रेम पाहुनिया । आशंका लया पावली ॥ ७९ ॥ पुंडरिकाची कृष्णभक्ति । पाहुनि गदाधर चकित मति परिमार्जन व्हावया चित्ति । उपरती शिक्षेची उपजली ॥ ८० ॥ करुनि दीक्षा मंत्रग्रहण । गुरु मानुनि गेला शरण । तेणें झाले समाधान । निरसे अज्ञान तत्काल ॥ ८१ ॥ प्रभूचे सन्यास ग्रहण । झाले नीलाचली वासस्थान

गोपीनाथ सेवे लागून । राहविले पडिता ॥ ८२ ॥ नीलाचल सन्निधानी । यमेश्वर रोटा स्थानी । रत राही भजन पूजनी । गदाधर मानी आज्ञेंसी ॥ ८३ ॥ नरेंद्र सरोवर तीरी । असती प्रतिदिन गौरहरी । भागवती व्याख्यान करी वाग्देवी जिव्हेवरी नाचतसें ॥ ८४ ॥ ख्यात श्रीवल्लभाचार्य । रघुनाथ भागवतार्थ । अच्युत लोकनाथ शिष्यवर मान्यवर पंडिताचे ॥ ८५ ॥ पंडित गौरांग पार्षदगण । त्यासी प्रेमे करी नमन । हरुनि न्यावा अभिमान । लिन सत सेवक ॥ ८६ ॥

– श्री हरिदास ठाकूर –

यशोधर प्रांतीग्राम बूढन । आविर्भूत कुली ब्राम्हण । श्री हरिदास ठाकूर जाण । नामग्रहण केले जये ॥ ८७ ॥ बाल्ली मातापित्याचे निधन । म्हणोनि संरक्षण । एकाकीं बालक जाणून । राहविला सदनी आपुल्या ॥ ८८ ॥ त्यासी नसे पुत्र संतान । शेजारी राही सज्जन यवन । तेणें केले पालन पोषण । जनी यवन मानिला ॥ ८९ ॥ यवन कुलाची रिती । त्यजिला आचार तैसी निति । हरिनाम ग्रहण प्रति । झाले युवावस्थी तेधवा ॥ ९० ॥ बूढणग्राम त्यजून । बेना पाली निर्जन वन । तेथ कुटी बनवून । रात्रंदिन सेवा तुलसीची ॥ ९१ ॥ अहोरात्र जप लक्षतीन । करिती श्रीनामसंकिर्तन । भिक्षेसी वरिती व्दिज सदन । निर्वाह कारणा ॥ ९२ ॥ पवित्र हरिदास जीवन । उज्जल करी नाम संकिर्तन । ऐसे लोटले बहुत दिन । सहन न होई राजया ॥ ९३ ॥ त्या देशीचा जमीनदार । वैष्णव द्रोही रामचंद्र तेणें युवती धाडीली सुंदर । चरित्र व्हावे कळंकित ॥ ९४ ॥ पातली कुटी सुंदरी । नेत्र मोडे कला कुसरी । भयभीत अभ्यंतरी । भक्ति अपार पाहुनि ॥ ९५ ॥ हरिदास महा भागवत । एकांती भजन करित । वेश्यही पश्चातप्त । शुद्ध चित्ते चरणनमी ॥ ९६ ॥ घोरपापी दुराचारी । मज न कळे भक्ति परी । जन्मूनि व्यर्थ आजवरी । दुष्कर्मी शरिर घालविले ॥ ९७ ॥ गेली ठाकुरा शरण । नित्याचे कर्म त्यजून । बनली स्वये जोगीण । सर्वस्व दान केले तै ॥ ९८ ॥ वैष्णव धर्म पालन । करी बनली अग्रगण्य । संतापराध घोर जाणूण । शिक्षेस पात्र दुष्ट हो ॥ ९९ ॥ रामचंद्र खा जमीनदार । संत छलक दुष्ट क्रूर । गेले धन घरदार । नाडिले कलेंवर दुष्टकृत्य ॥ १०० ॥ बेनापोल त्यजिले सत्वर शांतीपुरी आले ठाकूर । संगतीत राहती आचार्य । कुटीर फुलीया ग्रामात ॥१ ॥ कुटी श्रीनाम भजन । तेथे ही पातले

वरी विघ्न । काजी अबुया करी कथन । सुभेदार कारणें तेंधवा ॥ २ ॥ भजने आम्हा होय त्रास । होय नित्य निद्रा नाश । ठाकुर पात्र शिक्षेस । न्यायास करावे सत्वर ॥ ३ ॥ सुभेदार होई सक्रोध । कैदखानी ठाकूरा केला बंद । इतर कैदीयासी संबंध । येऊ लाग तयाचा ॥ ४ ॥ दर्शन वदन कृपादान । संतुष्ट अपराधी जीवन । मंगलोदयाचे अनुमान । करु लागती मनात ॥ ५ ॥ सुभेदार वदे ठाकुरा । हिंदु धर्माचा न धरी वारा । कलमा पढावा त्वरा थारा न राही दुःखाचा ॥ ६ ॥ ठाकूर वदे सुभेदार । या देशीचा तु सत्ताधारी । करण्या परधर्म स्वीकार । कासया करिसी उपदेश ॥ ७ ॥ स्वधर्मी निधन श्रेयस्कर । ऐसे वदे गीताशास्त्र । नाणी आग्रह विचार । न करी बलात्कार सत्य हे ॥८ ॥ मी न सोडी भजन । तेंचि माझे असे जीवन । देहाची छकले केली म्हणून । मुखे किर्तन न त्यजी । ९ । सुभेदार झाला सक्रोध । काजीस वदे द्यावा दंड । निर्दयपण मारिती उदंड । अबध्द करिती अन्याय । १० । पाप्याच व्हावे कल्याण । हेचि इच्छि ठाकूर मन । अक्षत शरिर पाहून । यवन मानिती परि हा ॥ ११ ॥ यवन बोलती वचन प्रहार केले असता दारुण । तुमची राही अक्षत तन । आश्चर्ये मन थक्क हो ॥ १२ ॥ तनु न सोडी तुमचे प्राण । सुभेदार दंडि आम्हा लागून । ऐसे ऐकता यवन वचन । समाधि मग्न जाहले ॥ १३ ॥ यवनासि व्हावा उपकार । समाधीत राही कलेवर । नये जाणूनि मृत शरिर । गंगे भीतरी त्यजियले ॥ १४ ॥ गंगमाजी कलेवर । प्रवाहीं वाहे राही स्थिर । फुलीया ग्रामी गंगातीरी । शुद्धिस सत्वर पातले ॥ १५ ॥ करु लागले संकिर्तन । भगवद्भजनी होती तल्लीन । जनासि कळले वर्तमान । भक्तजन तोषले ॥१६ ॥ कुटीमाजी विषधर । सर्प राही निरंतर । परि दंशाचा विचार । न करि ठाकुरा ॥ १७ ॥ अप्राकृत भावसाधन । ठाकुराचे करिता अनुकरण । कष्टी हो दंभी ब्राम्हण । शिक्षा दारुण पावला ॥ १८ ॥ शांतिपुरी अव्दैताचार्य । पितयाचे देती श्राद्धपात्र । तुम्ही भक्षिता कोटी सपात्र । तृप्त होती द्विजवर ॥ १९ ॥ हरिदासाचे नामस्मरण । उच्च स्वरे हो अनुदिन । तेणें विघ्न संतोषी जन । विघ्न करितीं ॥ २० ॥ हरिदास अपराधे दारुण । गलीत कुष्ट जाहला रुग्ण । गोपाल चक्रवर्ति ब्राम्हण । दुःख अप्रमाण भोगीं ॥ २१ ॥ चैतन्य आज्ञा प्रमाण । मानूनि नित्य संकिर्तन । गावोगावी निशिदिन । करिती उध्दरण दीनाचे

करिती भक्तजन धन्य । भक्ति सामर्थ्य भक्तांचे ।२३ । ॥ २२ ॥ विश्वी श्रीनाम महात्म्य । हरिदासा करवी चैतन्य । ठाकूर भक्त पुरी प्रभुसह अवस्थान । नित्य चाले संकिर्तन । संख्यापुर्ती अंतीम दिन । जाहली पूर्ण नामाची ॥ २४ ॥ नामोच्चार मुखे करुन प्रेमळ । हृदयी चैतन्य पदकमळ । नेत्री चैतन्य रुप तेजाळ । मुखी सोज्वळ गौरहर ॥ २५ ॥ हरिदास पार्थिवतन । घेऊन नृत्य सभोवती पार्षदगण । असता पुढती चैतन्य । महाप्रयाण करी हरिदास ॥ २६ ॥ विमानी हरिदास कलेवर । सवे करित नाम करिती चैतन्य । धन्य भक्त महिमान । नयना सामोरे चैतन्य ॥ २७ ॥ स्वये भिक्षा मागून । साजरा केला पुण्य दिन । उत्सवी गजर । गाठले सागरतीर । स्वकरे दिधली समाधि ॥ २८ ॥ देही सदैव नामस्मरण । अंती चैतन्य दर्शन । ऐसयासी म्हणे यवन उद्युक्त भक्तजन । चैतन्य भक्त धन्य तो ॥ २९ ॥ करुनि नाम प्रचार । पावन केले घरोघर । पवित्र परिसर जाण पाषाण हृदयीं तो ॥ ३० ॥ ऐसे लाभे भाग्य थोर । मज अल्प लाभ व्हावा । यावा कणवा दीनाचा जाहला ॥ ३१ ॥ हरिदास भक्तिभावा । पाहोनीं संतोष जीवा । भक्ति अंश नसे मज लागून । कृपावलोकन कै होय ॥ ३२ ॥ म्हणोनि वंदितो संत चरण । मज दुःख वाटें दारुण । कृपे होय परम कल्याण । संत सेवक चरणीचा ॥ ३४ ॥ ॥ ३३ ॥ द्यावे मज पसायदान । माझे असे अल्प कथन ।

– श्रीवास पंडित –

गौरहरि विशुद्ध भक्त । मुख्य भक्तित्व पात्र । असती श्रीवास पंडित । चरित वर्णी अल्पसे ॥ ३५ ॥ श्रीवास बंधू आप्तगण । एकांत सेवक प्रभुजन । श्रीवास सहधर्मचारिणी । मालिनी देवी नामे जी ॥ ३६ ॥ मानी चैतन्य दासी सेवा करी अहर्निशी । स्नेहभावे जननीसी । वाटे, निताई, गोरांगा ॥ ३७ ॥ श्रीपंडिताचें जन्मस्थान । तेथ जाहले अवतरण । गगावास निमित्त करुन । व्दीपस्थान शोधिले ॥ ३८ ॥ मिश्रगृहासन्निध । निवास बनवी स्वतः सिद्ध । निदपा जोवरी शचिनंद । संबंध तेथीचा तोवरी ॥ ३९ ॥ झाले प्रभू संन्यास ग्रहण । कुमार हट्टी केले वासस्थान । तेथीचे दुष्ट पाखंडिजन । साहती वाग्बाण तयाचे ॥ ४० । बहिर्मुख पाखंडि दुराचारी । असती जातीनिष्ठ दुर्व्यवहारी त्या न रुचे चैतन्य थोरी । सेवा चाकरी तैशापरी । ४१ । ऐसे निर्दयी दुष्टजन । त्याचे सर्वस्वी छळण । श्रीवास करि

प्रेमे सहन । अज्ञान जीव म्हणोनी ॥ ४२ ॥ चैतन्य भक्ति आदर्श । भावे दावी सकलास । भाविका होय संतोष श्रीवास भक्ति पाहुनी ॥ ४३ ॥ नित्य श्रीवास सदनी । गौर पार्षदगण संकिर्तनी । येतीं प्रेमे निशीदिनी । भक्तजनी वाढे संतोष ४४ नित्यानंदे श्रीवास सदनी । श्रीव्यास पुजा अनुष्ठानी । श्रीचैतन्य संकिर्तनी । भक्तजना दिधला आनंद ।४५। चैतन्ये श्रीवास सदनी । महाप्रकाशलिला प्रकटोनीं । सामर्थ्य दाविलें भक्तजनी भाग्यवंत जनी श्रीवास । ४६ । श्रीवास दासदासी । शरण होत प्रभुसी । पात्र झाले कृपेसी । जन्ममरणासी खुंटविले ॥ ४७ ॥ श्रीवास परम वैष्णव आदर्श गार्हस्थ भक्तिभाव । पुत्र विरह दुःख अतीव । सारिले अपूर्व भक्तिने ॥ ४८ ॥ व्हावया चैतन्य संतोष । चित्ती नाणी दुःख स्पर्श । संकिर्तनीं भाव विशेष । आस गौरहरि भक्तिची । ४९ । पाहोनि श्रीवास भक्ति । न राही बालक मृति । करविली तत्वज्ञान प्राप्ति । ज्ञानें तृप्ति जाहली ॥ ५० ॥ श्रीवास सकल परिवार । तैसे दास पशु मार्जार । तत्वोपदेशे केला उध्दार । संसार दुःख रहित ॥ ५१ ॥ श्रीवास नारदावतार । यास्तव जाहले भक्तवर चैतन्व दर्शन अहोरात्र । किर्तनी नित्य होतसे ॥ ५२ ॥ चैतन्य भक्तामाजी श्रेष्ठ । कथी चैतन्य चरितामृत । श्रीवास असती भक्त । नत मस्तक संत सेवक ॥ ५३ ॥

– श्री दामोदर स्वरुप –

प्रभूचे व्दितीय स्वरुप , अत्यंत मर्मी दामोदर स्वरुप । गोस्वामीपाद भक्ति अमूप । चैतन्य समीप नित्य जे ॥ ५४ ॥ पुर्वाश्रमी नामे पुरुषोत्तम । आचार्य पंडित सर्वोत्तम । गान विद्या अतिसुगम । निगमागम जाणती ॥ ५५ ॥ प्रभु सन्निध नित्यवास । करिती प्रेमे सेवेस । संगीत शास्त्राभ्यास । गाने मनास रिझविती ॥ ५६ ॥ प्रभूचे संन्यास ग्रहण होऊ लागे सर्वत्र भ्रमण । स्वरुपा विरह दारुण । केले गमन काशीसी ॥ ५७ ॥ श्रीचैतन्यानंद सन्निध । हेत केला विशद । संन्यास घ्यावया झाला सिद्ध । बोध केला स्वरुपासी ॥ ५८ ॥ गुरु केला नाम मात्र । त्यागिले स्वरुपे शिखासूत्र संन्यास घे सत्वर । योगपट्ट दंड राहिला ॥ ५९ ॥ ब्रम्हचर्य असे नैष्ठिक । स्वरुप नाम वनें सुचक । लाभे प्रभु जवळीक । अलौकिक भाग्य तयाचें ॥ ६० ॥ संगींताचें अदभुत ज्ञान । दामोदर नाम ठेविले जाणून । तेचि

संबोधती भक्तजन । चैतन्य आज्ञे ।। ६१ ।। प्रभुसेवा घडा म्हणून निलाचली केले राहणें । प्रभूस जे घडे श्रवण । काव्यावलोकन स्वरुप करी ।६२। सिद्धांत विरोधीं वचन । कदा नायकिती चैतन्य । त्याचे प्रथम परिक्षण । करुनि प्रभूसि ऐकवी ।। ६३ ।। अतलिला समयी । प्रभूसि दिव्योन्माद होय । ते वेळी ऐकवी काव्य । स्वरूप राय सन्निध त्या ।। ६४ ।। श्रीकृष्णाचा संतोष तेचि काव्य बहुवस । आस्वाद देति अहर्निश । प्रभूस शांति लाभाया ।। ६५ ।। गौरभक्ति रस सिध्दांत । उज्वल झाला अविष्कृत । गौडीय संप्रदायी प्रचारित । स्वरूप होत मूळ तया । ६६ । भक्तिरस सिध्दांत गूढ । मधूर रसास्वाद गाढ । तो काय जाणे इतर मूढ । दृढ स्वरूप जाणे तया ।। ६७ ।। कळ इतरा सिध्दांत । तो स्वरूपद्वारा होय ज्ञात । अंतरंग प्रभु भक्त । स्वरूप अत्यंत म्हणोनि ।। ६८ ।। तों भक्तिरस सिध्दांत । मज कळाया सांघंत । संतचरणी होई नत । सतसेवक तुमचा मी ।। ६९ ।। तुम्ही संत परम उदार । तुम्हा भक्तिरस आधार । मज द्यावा निरंतर । भवपार व्हावया ।। ७० ।।

### श्री रामानंदराय

वेंटपुरीं भवानंदराय । ज्येष्ठसुत रामानंदराय । चैतन्यासीं अत्यंत प्रिय । संसार हेच मानितसे ।। ७१ ।। उडिसा नरेश प्रताप रुद्र । देई पश्चिम गोदातिर । रामानंदाशासनाधिकार । शासन कर्ता म्हणोनिया ।। ७२ ।। राजनितीज्ञ कवि पंडित । वैष्णव, महाभागवत । न्यायें राज्य अविरत । दैवत मानी गौरांतें ।। ७३ ।। गोदातीरीं गोष्पदतीर्थ । चैतन्य भेटी होय तेथ । भटाचार्यांचा सांगात । भाग्य उदित जाह्लें ।। ७४ ।। साध्य, साधन तत्व विषय । चर्चा करी नित्य राय । उत्तरें देती चैतन्य । भाव सेव्य उपजला ।। ७५ ।। नित्यकृष्ण कथालाप । व्हावा, प्रभुसमीप । रसास्वादानीं कालक्षेप । जावा, नृप चित्तीं ये ।। ७६ ।। राय त्यागिलें राज्य, वैभव । नीलाचलीं राहे सदैव । प्रभु सेवा मनी भाव । सेवी चैतन्य देव, तो ।। ७७ ।। रायाच असे अभोल भक्ति । परी राहणी श्रीमंती । तेणे संदेह उपजे चित्तीं । मिश्र प्रभृति भक्तांत ।। ७८ ।। परी राय शुद्ध चित्त । भजनी प्रेम अप्राकृत । मर्म समजावे ती शचिसुत । चरित श्रवणें तुष्टले ।। ७९ ।। मिश्रास वदलें चैतन्य । राय असे विद्वन्मान्य । ऐकावी

हरिकथा त्यापासून । आज्ञा जाण तुजलागीं ॥ १८० ॥ श्रवण करितां कृष्णकथा । तोष वाटे, मिश्रचितां । मानव नसे राय तत्त्वतां । रसमयता कृष्ण भक्तीची ॥ ८१ ॥ कृष्ण प्रेम रसस्वादन । प्रतिरात्रीं करिती चैतन्य । त्यासी स्वरूप, राय, कारण । विरह वेदना शांत हो ॥ ८२ ॥ स्वरूपाचे प्रेम गान । रायाचें कथा किर्तन । वांचती तेणें चैतन्य प्राण । ऐसे वचन भक्तांचें ॥ ८३ ॥ ऐसा थोर अधिकार । राय संपादी भाग्यवर । काव्य, नाटक, साहित्य अपार । ऐकवी गौरहर तोषाया ॥ ८४ ॥ नृप परम भागवत । त्यासी साष्टांग प्रणिपात । काव्य स्फुरण द्यावें त्वरित । संत चरित गावया ॥ ८५ ॥ श्री चैतन्य वि. ग्रंथ रसाळ । भक्त चरित सोज्वळ । पार्षदगण चरित्र मंगल पन्नास अध्यायीं कथियली ॥ ८६ ॥ श्रीं चै. वि, ग्रंथ पार्षदगण चरित कथा कथन अध्याय पन्नासावा समाप्त (५०)

ओवी संख्या १८६ एकूण सं. ६४२६ दि. २६-१०-६४ सोमवार अश्विन व॥ ५ शके १८८६ सं २०२०

# समाप्त

# अध्याय ५१ वा

## श्री सनातन गोस्वामीपाद

।। श्रीगणेशाय नम: ।। श्रीसरस्वत्यै नम: ।। श्रीगुरुभ्यो नम: ।। श्रीकृष्ण चैतन्याय नम: ।।

चैंतन्य मनोवांछित । पुरविती एसे सद्भक्त । असती अत्यंत एकनिष्ठ । गोस्वामी षट् वदती जया ।। १ ।। तयांत श्रेष्ठ सनातन । गोस्वामीपाद असती पूर्ण। भरद्वाज गोत्रीं यजुर्वेदी ब्राह्मण । सर्वज्ञ नरेश वंशीं जन्मले ।। २ ।। कर्नाटकीं नरेशख्यात । सर्वज्ञ नामे कुलवंत । त्याचे वंशी कुमारदेव पंडित । त्यांचा सुत सनातन ।। ३ ।। श्रीरूप बंधू सनातन । दोघे विख्यात भक्त चैतन्य । मागें चरित्रीं वर्णन । केलें संपूर्ण विशद ।। ४ ।। संवत पंधरासें चारोत्तरे चाळीस । चौदाशें अष्टोत्तरें ऐशीं इसवीस । आयुमर्यादा सत्तर वर्षे । सेवेस सर्वस्व वाहिलें ।। ५ ।। गौडदेशीचा नरेश । त्याचे पदरीं सेवेस । मंत्रीं, सेनाधिपउच्च पदस्थ । चित्तीं संतोष राजया ।। ६ ।। राज्य करितां एक समय । भाग्यलाभ अमृतमय । पातला, उदयलें भाग्य । चैतन्य दर्शन जाहलें ।७। गौडीग्रामीं रामकेली । प्रभु स्वारीं पातली । तेथ भाग्योदय कालीं । दर्शनीं आली पूरे तें ।। ८ ।। ऐश्वर्य, वैभव, लागवेग । सर्वसंग परित्याग । धरिती प्रभु सेवामार्ग । पत्करिला विलग होवोनी ।। ९ ।। राजकारणीं अस्वस्थ । राये घातले बंदीत । दाम दिधला झाले मुक्त । श्रीरूप गुप्त जाहले ।। १० ।। श्रीरूपें धाडिले गूढखत । सनातना देऊनि त्वरित । द्रव्ये वश केले द्वाररक्षित । मुक्त केले सत्वरीं ।। ११ ।। प्रभु गमन वृंदावनीं । वृत्तपड सत्वर कर्णी । दरवेशी वेष घेऊनि । मार्गस्थ छपूनि होती तें ।। १२ । काशीक्षेत्रीं हा मीलन । घती चैतन्य दर्शन । चरणीं मीनले सनातन । समाधान चित्त जाहले ।। १३ ।। दरवेशीं त्यजिला वेष । झाले वैष्णवाग्रणी विशेष । शक्ति संचार करूनि तयास । साध्य, साधन शिक्षे दिलें ।। १४ ।। दशाश्व मेधीं दीक्षा चोखट । आचरी भक्ति विकट । सनातन ऐसा धीट । पट्टशिष्य जाहला ।। १५ ।। चत्वार सेवा भार । घालिती त्यावरी गौर । मानूनि तो कृपावर । सत्वर करी आचार ।। १६ ।। कथिलें चैतन्यें सनातनां शुद्ध भक्ति सिद्धांत स्थापना । करावी, सकल भक्तजनां । सम्यक्ज्ञाना प्राप्त जे ।।१७।। उपरी मथुरा परिसरी ।

लुप्त तीर्थोद्धार करी । लीलास्थान निरूपणथोरी । सत्वरी वर्णावी ॥ १८ ॥ श्री विग्रह प्रकटन । करीं वृंदावनी जाऊन । वैष्णव स्मृति संकलन । सदाचार प्रवर्तन वैष्णवांचें ॥ १९ ॥ सेवेच्या ऐशापरि । कथिल्या प्रीति पडिभरी । सत्वर जाऊनि आचरी । आदेश गौरहरि देतीं तया ॥ २० ॥ वृंदावनी केले गमन । आर्ति, वैराग्य, अतिदैन्य । संगे करी कृष्ण भजन । विरहे मन पोळले ॥ २१ ॥ नित्य प्रभु आज्ञा पालन । प्रचार करी सनातन । प्रभु वांछित करी पुर्ण । आदर्श जीवन चालवी ॥ २२ ॥ एकांतीं करी हरि भजन । भक्तासवे लिला प्रकटन । सेवी प्रेमे मदन मोहन । मागुते संपुर्ण कथियलें ॥ २३ ॥ सनातन विव्दमान्य । अमोल ग्रंथ अस्तमान्य । रचिले भक्तिप्रेमे अनन्य सेवे चैतन्य तुष्टले ॥ २४ ॥ भक्तिरसे तेजाळ । सनातन भक्त प्रेमळ । पावला देह निर्मळ । अर्पिला प्रभु चरणासी ॥ २५॥ ऐसे संत चरित रसाळ । कथियले म्या प्राजळ । व्हावया चित्त निर्मळ । प्रार्थी गोपाळ चरणासी ॥ २६ ॥

– श्रीरुप गोस्वामी पाद –

सनातन बधू गोस्वामी । श्रीरुप तयाचे अनुगामी गौडी राम केली ग्रामी । क्षात्रधर्मी रतसदा ॥ २७ ॥ आला संसार उबग । धरिला परमार्थ मार्ग । चैतन्य चरण सुभग । लागवेगी दर्शन घेतले ॥ २८ ॥ ग्रामांतर फतेहाबादी । केले वास्तव्य व्हावे सुखद । नौकेतुनि आणि गृहधनादी । संपदा विभागी शुद्धर्थ ॥ २९ ॥ द्वीज सेवे अर्धे धन । चतुर्थांश कुटुंब भरण । अवशष आपत्ति सरक्षण । व्हावे यास्तव राखिलें ॥ ३० ॥ त्यावरीं विश्वस्त नेमून । अनुज अनुप संगे घेऊन । प्रयागी केले गमन । प्रभुदर्शन घ्यावया ॥ ३१ ॥ देखिले प्रभुचरण । दशाश्वमेधी अनु ग्रहण । शक्ति संचार देही करुन । दशदिन उपदेशिती गौर ॥ ३२ ॥ श्रीकृष्ण तत्व भक्तितत्व । शिक्षा दिधली रसतत्व । दीक्षा देऊनि परम वैष्णव । केला शुद्ध भावे तया ॥ ३३ ॥ दशदिनी मेळवी शिक्षण । केला उपदेश ग्रहण । ते विशद केले ग्रंथी विभिन्न । वृंदावनी भजन आरंभिले ॥ ३४ ॥ श्रीरुप काव्य अति सुरस । तेणें चैतन्या संतोष । नीलाचली दर्शनास । हृदगत काव्यी प्रकटविले ॥ ३५ ॥ पुर्ण प्रभु मनोगत काव्यी उत्तरे तंतोतंत । तेणें भक्तजन संतुष्ट उल्हसित होत चैतन्य ॥ ३६ ॥ ज्ञान निधी वैराग्य थोर । काव्य सुरस मनोहर । मौक्तिक कावली अक्षर । पाहोनी चैतन्ये

गोरविले ॥ ३७ ॥ स्तुति सुमनें श्रीरुपाबरी । काव्य रसास्वादन भक्त करी । गोविंद देव सेवा चाकरी । वरी श्रीरुप
सदभावे ॥ ३८ ॥ अल्पही नसे ज्ञान गर्व । चित्ती वसे भगवतभाव । चैतन्य चरणी सभ्दाव । वैभव भोगी भक्तिचे
॥ ३९ ॥ केला विविध ग्रंथ संभार । संतुष्टले गौरहरी । आयु वेचिलीं जन्मभर वृंदावनी कलेवर ठेविले ॥ ४० ॥
भजन मार्गावलंब । करूनि ठेवी वृत्ति निर्लोभ । निराहारे क्षुधाक्षोभ । झाला न मानी भक्तकदा ॥ ४१ ॥ भजनमार्गी
ये विन्घ । म्हणोनी करी उपोषण । त्याची चिंता दयाघन । गोपाल कृष्ण निवारी ॥ ४२ ॥ मृत्तिकापात्री दुग्ध
पवित्र । गोपवेशे । देई सत्वर । बोले बाबा साधुवर । घ्यावे रुचिर गोदुग्ध ॥ ४३ ॥ क्षुधा असता न हो भजन
हे सकल जाणती । जन । म्हणोनि घ्यावे भिक्षादान । ग्रामातून नित्य आणावे ॥ ४४ ॥ श्रीरुपे केले दुग्ध प्राशन
अमृता परि लागे स्वादन । ऐसे श्रीकृष्णावांचून देई कोण आपणा ॥ ४५ ॥ वृंदावन धनी कृष्ण । कैसा राहवी क्षधे
विण । दुग्ध पात्र गुप्त जाणून । शंकित मन जाहले ॥ ४६ ॥ सनातन कळे समाचार । धावूनि आला सत्वर । भाई!
मन मोहन सुकुमार । कष्ट अपार होती तया ॥ ४७ ॥ म्हणोनि न करी ऐसे कर्म । कृष्ण भक्ता घड अधर्म । भिक्षा
भोजनी नियम । करी शाम कष्टि न हों ॥ ४८ ॥ तै पासाव आणी भिक्षान्न नैवेद्य । करि समर्पण । गोविंदाचें पडे
स्वप्न । उद्धरण करि सत्वरी ॥ ४९ ॥ पश्चिम दिशी उपवन । भूमीत असे कष्ट दारुण । गोमाता दुग्ध अर्पून । जाई
वनातून गृहासी ॥ ५० ॥ तेचि जाणे वास्तव्य चिन्ह । करीं माझे उध्दरण । निशीं पडता स्वप्न । सत्वर स्थान देखिले
॥ ५१ ॥ दृष्टी पड गोमाता । स्तन धारा । अव्रतीहता । छिद्रा वाटे जाती भूमीत आश्चर्य चकित श्रीरुप ॥ ५२ ॥
उपरी आणिले गोविंद । मन मोहक नंद नंद । पाहता चित्ती आनंद । पूजा प्रबंध करविला ॥ ५३ ॥ जयपूर राणा
। मानसिंह । भावे पाही गोविंद देव । मंदिर उभारी भव्य । विशाल भाव भक्तिने ॥ ५४ ॥ भाग्यशाली श्रीरुप
भक्त । भोजन बनवी रुक्मिणीमाता । प्रसाद भक्षण करी श्रेष्ठता । पावला धन्यता त्रिलोकी ॥ ५५ ॥ ऐसे श्रीरुप
चरित । जनास वाटे अदभूत । श्रीकृष्णी रत चित्त । ऐसा भक्त विरळा की ॥ ५६ ॥ श्रीरुप चरणी नमन । विनवी
द्या भक्तिदान । चित्ती होई समाधान भगवद्भजन सदा घडे ॥ ५७ ॥

- श्री रघुनाथ गोस्वामी पाद -

प्रभुचें अंतरग भक्त । रघुनाथ अति विरक्त । त्यांचा सकल वृत्तांत । कथिला साद्यंत ग्रथांतरीं ॥ ५८ ॥ बलराम आचार्य गृहीं पाठार्थ । जाई नित्य रघुनाथ । हरिदास ठाकूर असती तेथ । भेटीस नित्य बाल ये ॥ ५९ ॥ हरिदास कृपा संपादन । सत्संग घडे बाल्यापासून । दीक्षा गुरू यदुनंदन । आचार्य देई दीक्षेसी ॥ ६० ॥ असता वैभव अपार स्त्रीरत्न अतिसुंदर । यौवनीं त्यागिलें सत्वर । वैराग्य थोर तयाचे ॥ ६१ ॥ पुरीत चैतन्य सेवेंत काल घालवी रघुनाथ रघुनामे परिचित । प्रीत सकलांची तयावरी ॥ ६२॥ गोवर्धन शीला गिरिधारी । तेंथ रघुनाथ पुजारी । बनवूनि केला अधिकारी । भक्ति प्रभुवरी अमुप ॥ ६३ ॥ प्रभू जाहलें अंतर्धान । तया दुःख दारूण । तनू त्यागावया कारण । वृंदावनी जाई रघुनाथ ॥ ६४ ॥ गोवर्धन पर्वत शिखर । त्यागावे तेथून कलेवर । ऐसा केला निर्धार वृंदावनी सत्वर पातला ॥ ६५ ॥ तया रोधीं रूप सनातन । आत्मघाते नरक पतन । यास्तव गिरींधारीं चरण । भजनी देह घालवी ॥ ६६ ॥ रघुनाथ विरक्त थोर । तयाचा आहार, विहार । कृष्णदास वर्णी मान्यवर । भक्तवर अपूर्व वाटला ॥६७॥ त्यजिले अन्नजल पान । करी अल्प तक्र प्राशन । रात्रंदिन नामस्मरण । मानस पूजन नित्याचें ॥ ६८ ॥ दोन सहस्त्र भगवत्प्रणाम । एकलक्ष घेई मुखे नाम । वैष्णवास्तव नमी देवासम । अदभुत कर्म तयाचें ॥ ६९ ॥ महाप्रभु चरित्र कथन । करावे रघुनाथे अनुदिन । प्रतिदिनी त्रिकाल स्नान । द्यावे आलिंगन वैष्णवा ७० ऐसी कठोर उपासना । रघुनाथ न करी अनुमाना । भक्त श्रेष्ठ आगळा जाणा । छंद मना भक्तिचा ॥ ७१ ॥ गोविंद चरणी समर्पण । रघुनाथ करीं आपूले तन । त्यासी सहस्त्रशः नमन । शुद्ध मन व्हावया ॥ ७२ ॥ रघुनाथ परम भक्त । मीस्वये रघुनाथ सुत । पितयाचें उपास्य दत्त दैवत । माझे चित्त श्रीरामी ॥ ७३ ॥ शिवाची मज अति प्रीत । राम मंत्र जपती नित्य । श्रीराम शिव, कृष्ण दत्त । मानी सत्य ब्रम्हरूप ॥ ७४ ॥ संत श्रेष्ठ रघुनाथ । गुरू, पिता रघुनाथ । उभयाचें चरण वंदित वरदहस्त व्हावया ॥ ७५ ॥ मी अज्ञान बालक । मज न कळे भक्ति सुख । तुमचीया चरणीनंत मस्तक । उद्धारक माय बाप कि ॥ ७६ ॥

– गोपाल भट्ट गोस्वामी पाद –

श्रीरंग क्षेत्री वेंकटेश भट्ट । द्विज महा पंडित । चातुर्मासी चैतन्य तेथ । करिती व्रतार्थ वास्तव्य ॥ ७७ ॥ गोपालभट्ट द्विजसुत । सेवा भावी सदैव रत । प्रभु वदले । द्विजाप्रत । भाग्यवान असे सत्य हा ॥ ७८ ॥ करवी तयाते ज्ञानार्जन न घाली विवाह बंधन । मम आज्ञा मानी प्रमाण । कथिले गमन वरियले ॥ ७९ ॥ माता पित्याचे सेवन । होता प्रभुवचन स्मरण गोपाळ गाठी वृंदावन । सनातन सन्निध राहीला ॥ ८२ ॥ व्दादश शालीग्राम गंडकितून । कुटिमाजी केले स्थापन करी भजन पूजन । होय समाधान देवाचे ॥ ८१ ॥ मथुरावासी कोणी धनिक । वस्त्रे अलंकार अमोलीक अर्पी देवतास अनेक । भट्टा सकळीक दिधले ते ॥ ८२ ॥ शालीग्राम अवयव रहित । लेवावे कैसे चिंती चित्त । निद्रा जाय येणें निमित्त । मनी अस्वस्थ जाहला ॥ ८३ ॥ प्रात काल जाहलियावरी । पाहि गोपाल कुटी माझारी हस्तपादादी अवयव धारी । शालीग्राम श्रीहरी एक हो ॥ ८४ ॥ मयूर रूप व्रज किशोर । जाहला सत्वर मुरलीधर शामसुंदर मनोहर । चित्तहर होई भक्ताचे ॥ ८५ ॥ आश्चर्य चकित भक्तजन । आनंदले रूप सनातन । अभिषेकिला राधारमण । महोत्सव संपन्न केला तें ॥ ८६ ॥ वैशाख मासी पौर्णिमा । पुर्णरुप जै चंद्रमा । प्रकट केले पुरुषोत्तमा भक्तारामा भक्ताच्या ॥ ८७ ॥ गोपालभट्ट परम भक्त । भक्ताग्रणी विख्यात । जयास्तव हस्तपादयुक्त । अच्युत जाहला ॥८८ ॥ गोपाळासी करी नमन । व्हावया शुद्ध मन । कृष्ण प्रेम वरदान । द्यावे दीना मजलागी ॥ ८९ ॥ मी सदा संत सेवक । यास्तव बने याचक । सेवकाचे करा कौतुक । अल्पमातुके देऊनि ॥ ९० ॥

– श्री रघुनाथ भट्ट गोस्वामी पाद –

काशीवासी तपन मिश्र । तयाचा रघूनाथ सुपुत्र । कोकिळ कंठ मधूर स्वर । ईश्वर दत्त जनभुले ॥ ९१ ॥ मिश्रगृहि वास । करीती प्रभू दोन मास । रघुनाथ करी सेवेस । चरण सेवेस नित्यशः । ९२ । उच्छिष्ट प्रसाद भक्षण करि । प्रभु प्रसन्न तयावरी । जाहला थोर अधिकारी । गौरहरी कृपेने ।९३। पाकशास्त्री अतिनिष्णात । अष्टमास करी वास पुरित स्वहस्ते बनवी रघुनाथ । भोजनी तृप्त गौरहरी ॥ ९४ ॥ चैतन्य वदले तया लागून । माता पित्याचे वृद्धपण । त्याची

सेवा करी जाऊन । विवाह बंधनी न पडावे ॥ ९५ ॥ रघुनाथ पातला काशीस । सेवी माता पिता अहर्निश । सोडिले तेणें इहलोकास । पुरित सेवेस रघुनाथ ये । ९६ । अष्टमास वास पुरीत । सेवाकर्मी सदा रत । प्रभु आज्ञे जाई वृंदावनात सनातन सन्निध राहिला ॥ ९७ ॥ रघुनाथ कंठ मधूर । भागवती प्रभुत्व प्रखर । किर्तनी रंग अपार । डुलती भक्तवर आनंदे ९८ ॥ ईश्वरी देणे कंठ मधुर । भगवदजनीं लावी सत्वर । हा असे थोर उपकार । भक्तवर कृतज्ञ जाहला ॥ ९९ ॥ ऐसा भक्त रघुनाथ । मधूरस्वरे प्रभु आळवित । कां न करी जगन्नाथ । कृपा त्वरीत तयावरी ॥ १०० ॥ ब्रम्हरुप काया होत किर्तनी । ऐसी असे संतवाणी । नादब्रम्ह उपजे त्यास्थानी । रिझें भजनी प्रभु सदा ॥ १०२ ॥ गाणें तुष्टवी रघुनाथ । जो का गोविंद परम भक्त । त्यासी साष्टांग प्रणिपात । रघुनाथ गाणी रिझावा ॥ १०१ ॥

— श्री जीव गोस्वामीं पाद —

श्रीरुप सनातन । अनूप कनिष्ट बंधु तीन । अनुपसुत श्रीजीव जाण । एकुलतेपण तया ये । ४ । वावलाचंद्र निरुपं जनन । श्रीजीव बालक लहान । एक वर्ष वयोमान । विरक्त पितयाने त्यजियले ॥ ५ ॥ श्रीरुप अनूप सनातन विरक्त जाहले सारे त्यजून । साधू बनले वृंदावनीं । कृष्णचरण सेवाया ॥ ६ ॥ गृहि जीव बालक । सकलांचा एकला एक । एक वंशाकुर सुरेख । वाटे हरिक प्राणप्रिय ॥ ७ ॥ पाच वर्षाचा बाल जाहला । तया खेळाचा लो लागला । सकळ जन वदू लागला ।साधु बाळ पितात्यजी ॥ ८ ॥ जीव बोले मातेसी । साधुसुत ववती यजसी । पिता काका दूरदेशी कासयासी गेले कथीं तू ।९। याता बोले बालकासो । तव वडिले त्यजिले आम्हासी । साधू बनूनि वृंदावनासी गेले आस नसे दुजी ॥ ११० ॥ मज न कळे माते साधू । कैसा ? तयाचा करी बोधु । साधुत्वाचा काय संबधु । करि प्रबोधू त्यागाचा ।११। बालके धरियला हट्ट । दिसे गोमटा अति धीट । तयावेष दिधला चोखट । साधुत्व ते प्रकटतो ।१२। भस्म अंगी चर्चिले भाळी उर्ध्वपुंड्र लाविले । भगवे शरिरी दिधले । कमंडलु सवें करात ।१३। स्कंधी ठेविले मृगाजिन । कटी लंगोटीं वरी कौपीन । तुलसी माला [करविली धारण । विनोदे जाण बालका ।१४। बाल साधु पाहोनी । सोंग संपादिले योग्य मानी । बालक साष्टांग नमूनि । जावया निघे सत्वरी । १५ । माते! मज द्यावी आज्ञा । मी जातसे

वृंदावना सेवी कृष्ण चरणा । मन विकल्प न आणि तु ॥ १६ ॥ मी न राही या सदनी । जाई सत्वर वृंदावनी । माता समजावी बालका लागोनी । दीनवाणीं परोपरी ॥ १७ ॥ तुझे वय लहान । कैसे फावे तुज कानन । बालक बोले ध्रुव अजाण । पावला कृष्ण तयासी ॥ १८ ॥ माते ! माझे बालपण । प्रतिबंध न करी साधूपण । म्हणोनि त्यजि बाल सदन । आक्रंदन माता करी तै । १९ । जमला लोक संप्रदाय । बाल न धरी मनीं भय । वृत्त ऐकतां हाय हाय करिती उपाय राहविण्या ॥२०॥ दिधला सहज साधु वेष । तोचि जाहला विशेष । निर्पेधी माता स्वकुलास आक्रोश करी उच्चस्वरें ॥ २१ ॥ सारागांव जाला गोळा । पाहती साधुवेषी बाळा । विरक्त साधु आगळा बोल उमटला त्यास्थानी ॥ २२ ॥ तीर्थयात्रा मार्गात । नित्यानंद भ्रमण करित । असता पातले तेथ । वृत्तांत सारा परिसला ।२३। करुनिया अंतर्धान । बालकाचे जाणिले थोरपण । असामान्य बाल जाणून । साधुत्व मन पुणत्वे ॥ २४ ॥ वदले करावा जगदुध्दार । प्रेमें तया जगदीश्वर । कृष्ण भजनी राही स्थिर । ग्रंथ संभार निर्मी हा । २५ । यास्तव खेद न करावा । सुख स्वाधीन करावा । उद्धरी वंश आधवा । आचार्य व्हावा जीव हा ॥ २६ ॥ कष्टे बाल केला स्वाधीन । नित्यानंदे केले गमन । द्विप धामाचे परिक्रमण । करुनि काशीस पातले ॥ २७ ॥ शास्त्राध्ययन करविले । भागवता दिग्रथ लाविले । अभ्यासी मन रंगले । प्रेम भक्ति उदित हो ॥ २८ ॥ मधूसूदन वाचस्पती । विद्रमान्य । बृहस्पती । त्याचे सान्निध्य शास्त्र प्रगती केली पुढती श्रीजीवें ॥ २९ ॥ विविध शास्त्राभ्यास । मान्यता पावे विशेष । केला वृंदावना वास पित्रव्य सन्निध राहिले ॥ १३० ॥ आलोडी भागवतास । सेविला भक्तिशास्त्ररस । व्रजी किर्तन भजनास । करी अहर्निश श्रीजीव ॥ ३१ ॥ भक्ति सिद्धांत पंडित श्रीजीव हो विख्यात । ग्रंथ संशोधन तयाप्रत । भार सर्वस्व साथा ये ॥ ३२ ॥ सनातनें देखिला अधिकार । ग्रंथ कर्तृत्व टाकिला भार । श्रीजीव विश्वेश्वर । अवर कोण असे सुधी ॥ ३३ ॥ वृंदावनी केला वास । सेवा राधा दामोदरास । त्यागिले अन्य क्षेत्रास । दंडक मनास लाविला ॥ ३४ ॥ भक्ति वैराग्य, ज्ञान परम । वैष्णव । संप्रदायी उत्तम । झाले आचार्य सार्वभौम । श्रीजीव स्वामीपाद हें ॥ ३५ ॥ विविध ग्रंथ संभार । भारती जाहला मान्यवर । ज्ञानभक्ति वैराग्य सागर । अपार रचिला श्रीजीवे ॥ ३६ ॥

श्रीजीवाचें साधुत्व थोर । तया पाचारी दिल्लीश्वर । नामे असे अकबर । कष्टें आग्रा नगरी ये । ३७ । जीवस्वामीचा सत्कार । करुनि धाडिला सत्वर । अश्वरथी बैसविला भक्तवर । ऐसा निर्धार तयाचा ॥ ३८ ॥ व्हावे गौर दर्शन । परि प्रभू जाहले अंतर्धान । तेणें आर्त हो मन । स्वप्नीं चैतन्य देखिले ॥ ३९ ॥ झाले प्रभू दर्शन । संतोषले जीव मन । वृंदावनी चालवी ग्रंथ लेखन । भजन किर्तन सप्रेम ॥ ४० ॥ एकदा दिग्विजयी पंडित य वृंदावनीं अकस्मात । विजय मान आस चित्ती । शास्त्रार्थ व्हावा म्हणोनिया ॥ ४१ ॥ सनातनें वादा वाचून । विजय पत्र दिधले लिहून । करावे पंडीत गर्व हरण । जिरवावा अभिमान तयाचा ॥ ४२ ॥ विव्दते पोटीं अभिमान । हे जाणावे करंटपण । गुरु अपमान जाणुन । आव्हान स्वीकारी श्रीजीव ॥ ४३ ॥ श्रीरुप सन्निधी अध्ययन । गुरुत्वाची स्वभावे आला मान । पंडित निंदाव्यंजक वचन । केलें श्रवण यमुनातटीं ॥ ४४ ॥ पंडिता झाला अभिमान । वाद न करता सनातन । शरणागति दे लिहून । अन्य कोण ? समर्थ असे ॥ ४५ ॥ परि सूनिया गुरुनिंदा । जीवासी जाहला विषाद जिरवावा पंडीत मद । म्हणोनी विवाद केला तै ॥ ४६ ॥ केला कठिण शास्त्रार्थ । हारविला विजयी पंडित । श्रीरुप जाहलें दुखित ॥ जीवाप्रत वदलें तै ॥ ४७ ॥ वैष्णव करि पंडितावमान । तो सत्य वैष्णव नेणा । ऐसा वदलें कठोर वचन । शरण जावया आज्ञापिले ॥ ४८ ॥ अवमाने नरक पतन । मी न पाही तव वदन । धिक्कारि जीवा लागून । केलें गमन अन्यत्र ॥ ४९ ॥ गुरुनें केला धिक्कार । जीवासी दुःख अपार । गुरु त्यजी सत्वर । कष्टद फार जाहले ॥ १५० ॥ यमुना तटी एकांत उपवन । उच्चस्वरे करि तेथ रुदन । देवा ! मज कोण करी पावन । गुरु अपराधी पापी मी ।५१। देवाचे होय रुष्टपण । वाचवी गुरु तयातुन । गुरु रुष्ट झालीया जाण । कोणी न मुक्त करि तया । ५२ । करि अन्न पान वर्जन । दुःखे लोटती बहुत दिन । उदकि पिष्ठ मिश्रण । करुनि पान करी जल । ५३ । उदरी जाहला आम्ररोग । कर्माचे फळ जाण भोग । त्यात गुरु वियोग । दुःखावेग न रुध ॥ ५४ ॥ ऐसा लोटता बहुदिन । मार्गात करिता भ्रमण । पातले स्थली सनातन । भिक्षान्न ग्रामी करियले ॥ ५५ ॥ भिक्षा मागता एका सदनी । वदली बोचक ब्राम्हणी । सिध्दान्न मागसी साधु असोनी । रसनी लौप्य वाढवी ॥ ५६ ॥ आमुचा साधु कठिण

व्रतीं अतीव दारूण । न मागे कदा भिक्षान्न । पिष्ठ घोळूनि जळी घे ।५७। ऐसा थोर महात्मा । कायवर्णू तयाचा महिमा विरक्त निःसंग पुण्यात्मा । नसे उपमा तयासी ॥ ५८ ॥ श्रवणी पडता स्त्रीवचन । बोले तीसी सनातन । दावा मज साधु कोण । करी नयन तृप्तीसी ॥ ५९ ॥ यमुनातीरी उपवन । त्यात पाही सनातन । तो जीव दशा दारूण । केले अवलोकन तया ॥ ६० ॥ दुःखद दशा पाहोनी । आलिंगले तया लागोनी । समग्रवृत पडे कर्णी । जीवा बोधोनि समजावी ॥ ६१ ॥ श्रीरूपा चरि कथन । तुझे करील समाधान । न हो शंकित मन । करी स्मरण कृष्णाचे ॥ ६२ ॥ श्रीरुपा भेट सनातन । कथीं वैष्णव लक्षण । श्रीरुप बोले वचन । भूति अपारपण दयेचे ॥ ६३ ॥ सकल जीवासी दया करणें । एक्या जीवासी दुःख देणे । ही नव्हेत लक्षणे वैष्णवांची ॥ ६४ ॥ अल्प अपराध शिक्षा घोर । हे कोणते भक्तिशास्त्र । जीवासी यातना अपार । जाई उद्धार करी त्वरे ॥ ६५ ॥ सनातन आज्ञा प्रमाण । मानुनि केले गमन जीवाची दशा दारूण । पाहोन दुःख जाहले ॥ ६६ ॥ श्रीरूपे दिधले दर्शन । देऊनि जीवासीं आलिंगन । केले शिष्य समाधान । पावन केला तयासी ॥ ६७ ॥ उदर पीड दुःख दारूण । चालवेना शक्ति क्षीण । कुटीत नेला उचलून । भक्तजने सत्वर । ६८ । जीवाची अवस्था दुःखदा । सतत भोगी आपदा । शय्येवरी ग्रंथ संपदा । सर्वदा करी श्रीजीव । ६९ । पंडिता प्रतारिले । याचे जीवा दुःख झाले । सनातने वाचविले । संतोषले श्रीजीव ॥ ७० ॥ हृदय आले भरुन काका देती आलिंगन । जीवाधिकार जाणून । कृपावलोकने क्षमियला ॥ ७१ ॥ श्रीजीवे स्वाश्रमीं । एकांती राहावे भक्तिप्रेमी । स्त्रियासी प्रतिबंध धामी । नामी रत निरंतर ॥ ७२ ॥ कळे मिराबाईस वर्तमान । स्वामीचे घ्यावे दर्शन जावया निघे त्यास्थानी । वर्जिले भक्तांनी तियेसी ॥ ७३ ॥ आश्रमी पुरुषावाचून । प्रतिबंध असे जाण । आश्चर्य मिरेसी ऐकुन । संदेश प्रेषण केले तै ॥ ७४ ॥ वृंदावन कृष्णाचे अंतःपुर । गोपिकाचे असे माहेर । कृष्णावांचून अन्यत्र अन्य नर कोण ? वृंदाबनी ॥ ७५ ॥ वृंदावन आमुचे घर । तयात कोण पुरुष चोर । कृष्णावांचून इतर । न जाणे नर यास्थानी ॥ ७६ ॥ ऐसा ऐकिलासी देश । जीवासी वाटे संतोष । पाचारी भेटाया मिरेस । तिच्या अधिकारास जाणुनी ॥ ७७ ॥ ज्ञानी भक्त प्रेमळ । संत मिरा निर्मळ । भेटीत भाव सोज्वळ । गोपाळ चित्ती उभयांच्या ।७८।

(श्रीं चै. वि, ग्रंथ वृंदावन भक्त))



ऐसे संत ज्ञानी भक्त। त्याचे कथिले अल्प चरित्र। भक्तिरस चाखावा हेत। धरूनि कवित्व करविले ॥ ७९ ॥ ज्ञान भक्ति वैराग्यहिन। ऐसे माझे रूक्ष जीवन। संत कृपे उद्धरण। व्हावे या सेवकाचे ॥ ८० ॥ श्री. चै, वि, ग्रं रसाळ वृंदावन गोस्वामीषट भक्त सोज्वळ। अंतरंगीचे कथा मंगल। एक्कावन्नाध्यायी वर्णिली ॥ ८१ ॥ श्री. चै, वि ग्रंथ वृंदावन पट गोस्वामी भक्त चरित कथा कथन नाम अध्याय एक्कावन्नावा समाप्त (५१) ओ. वी सं १८१ ॥

एकूण सं ६६०७ दि, २८-१०-६४ बुधवार आश्विन ब ८ शके १८८६ सं २०२०

# समाप्त

## अध्याय ५२ वा

॥ श्रीगणेशाय नम: ॥ श्रीसरस्वत्यै नम: ॥ श्रीगुरुभ्यो नम: ॥ श्रीकृष्ण चैतन्याय नम: ॥

नमन माझे चैतन्या देवा । चैतन्य विजय ग्रंथ आघवा । अर्पावा चरणीं बरवा । मुक्तिलाभ व्हावा हेत हा ॥ १ ॥ प्रथमाध्यायी एक्कावन्न अध्यायी कथन । चरित्र तसे पार्षदगण । रचिले तव कृपा म्हणून । मरणीं कथीन यापुढे ॥ २ ॥ संत सज्जन दया गणेश नमन । शारदा सदाशिव करुणा घन । सीताराम राजीवनयन । नमन जगज्जननीचे ॥ ३ ॥ चैतन्य भाजन । माता पिता गुरूजन । तसे भक्त कविजन । स्तवन द्वितीयाध्यायी हे ॥ ४ ॥ तृतियी मंगलाचरण । चैतन्य चरित्राकारण । आदिलिला प्रकरण । अवतार कारण कथियलें ॥ ५ ॥ यवनाचे राज्य वैभव । धर्मांधतेचे चालें तांडव अत्याचार कथा अपूर्व । अनाचार ही वर्णिला ॥ ६ व्हावे साधु परिमाण । दुष्कृत्याचे व्हावे दमन । धर्माचें संस्थापन अवतार कारण प्रभूचें ॥ ७ ॥ अवतार हेतु दोन । अंतरंग बहिरंग कारण । दशमस्कंधी गर्ग वचन । भक्तिप्राधान्य बहिरंगी ॥ चतुर्थी परम पावन । जन्मरहस्य । केलें कथन । पूर्वज वृत्तांत प्रभु जनन । बाललिला वर्णिल्या ॥ ९ ॥ पंचमाध्यायीं चूडा संस्कार । लिला वर्णिल्या मनोहर । विद्याभ्यासी प्रारंभ सत्वर । विश्वरुप आचार्यें पढविला ॥१०॥ विश्वरुप संन्यास ग्रहण । करी बाल्यी विरक्तपूर्ण । मातापित्यासीं दु:ख दारुण । झाले वर्णन अध्यायी ॥ ११ ॥ षष्टाध्यायी उपनयन । वट जाहले अभिनंदन । करविलें शिशुसि अध्ययन । संशयग्रस्त मन हो ॥१२॥ वैकुंठी पित्याचें गमन । गंगेमाजीं ग्रंथ समर्पन । मिथ प्रमास्तव केला जाण । अध्यायीं कथन केले तें ॥ १३ ॥ सप्तमी विवाहमंगल पांडित्यें भारत गाजविला । जाणूनि भक्ति रहस्याला । भविष्य वाणीं प्रकटलीं ॥ १४ ॥ ईश्वर पुरीचें मीलन । तसे ग्रंथ परिक्षण । अष्टाध्यायी चरित्र कथन । श्रीधर भक्त वर्णन तें ॥ १५ ॥ पंडिताचें गर्वहरण । अष्टाध्यायी संपुर्ण विजय लक्ष्मीचें अंतर्धान । वृत्तकथन तपनाचें ॥ १६ ॥ सदाचार शिक्षा प्रदान । द्वितीय विवाहवृत कथन । केले गया यात्रा भ्रमण । ईश्वरपुरीं मीलन नवमात ॥ १७ ॥ कृष्ण विरह कथा प्रसंग । संसाराचा वाटे उबग । उद्वेग स्विकारी मथुरा मार्ग । वाणी सुभग उमटें नभीं ॥ १८ । दशमांत अद्भुत भावांतर । कृष्ण भक्तिमार्ग सत्वर । छात्रगणा दाविती

गौर । तैसे मातेसीं समजाविती । १९ । अद्वैताचार्य चरित । प्रकट लीला श्रीवास गृहांत । करिती शचिसुत । दशमांत वर्णिलें । २० । एकादशी वाराह चरित । दाविती चैतन्य अद्वैत । हरिदास ठाकूर वृत्त । मुरारि गुप्त बोधिला । २१ । नित्यानंदाचे द्वादशांत । व्यास पुजन वर्णिले ख्यात । जैसा प्रिय बंधु भरत । प्रीत निमाई निताईची । २२ । तेराविया आत्मप्रकाश । आचार्य सन्मुख विशेष । पुंडरिक विद्यानिधी सुरस । वृत्त सरस वर्णिलें ॥ २३ ॥ श्रीवास गृही संकीर्तन । तैसे राम क्रीडन । प्रभु प्रकाश मकुंद उद्धरण । तारिले दुष्टजन चौदावियां ॥ २४ ॥ विविध लीला आम्र महोत्सव । शुक्लांवर सुवर्ण सेन, भाव । स्त्री स्पर्श टारी सन्यासी सदैव । त्याच कथोद्भव पंधरावियां ॥ २५ ॥ नित्यानंद तत्व ओळख । सोळावियां वर्णिली निःशेख । भक्ति प्रदान करुनी तोख । देवानंदा सुख दिलें ॥ २६ ॥ नित्यानंदा दर्शन । माता. निंदका भक्ति दान । ब्रह्मचारीं उद्धरण । काजी कृपा वितरण ही ॥ २७ ॥ अद्वैता, विश्वरुप दर्शन । वृद्ध केलें तें कथन । सोळावियां समग्र जाण । आदिलीला अनुसंधान साधूनीं ॥ २८ ॥ सतराविया दुःखी दासी । सर्वे सुखी केले तिसीं । श्रीवास सुत निधनासी । अपूर्व कथिलें अध्यायीं ॥ २९ ॥ अठराविया संन्यास ग्रहण । यति झाले चैतन्य । त्याचे संपुर्ण वर्णन । केले यया अध्यायीं ॥ ३० ॥ एकोणिसावियां दीक्षा ग्रहण । त्याचे केलें विवरण । भक्त दर्शन, शंका समाधान । प्रसन्न चित्तें चैतन्यें ॥ ३१ ॥ चैतन्य आदिलीला समाप्त । संपूर्ण जाहली येथ । पुढती मध्यलीला विस्तृत । अध्यायीं यथार्थ वर्णिली ॥ ३२ ॥ दक्षिण देशीं यात्रा भ्रमण । श्रीजगन्नाथ दर्शन । भट्टाचार्य समाधान । भक्तोद्धारण विसावियां ॥ ३३ ॥ एकविसाव्यां परिभ्रमण । केलें तीर्थयात्रा गमन । वासुदेव कुष्ठि उद्धरण । भक्ति संभाषण रायासी ॥ ३४ ॥ बावीसीं व्यंकटेश चरित कृष्णदास उद्धरिला त्वरित । वेश्यां चित्त परिवर्तित । श्रीराम भक्त आशंका फेडिली ॥ ३५ ॥ क्षेत्र पंढरी, कऱ्हाड दर्शन । तैसे मध्वाचार्य मीलन । केला वृतांत कथन । अध्यायीं जाण यथार्थ ॥ ३६ ॥ तेविसावियां डाकू उद्धारण । जनस्थानीं गोदा दर्शन । प्रतापरुद्रराय मीलन । तीर्थ भ्रमण सर्वत्र ॥ ३७ ॥ राजपुत्र प्रेमदान । गुंढिया मंदिर संशोधन । केले प्रसंगाचें वर्णन । चोविसाध्यायीं ॥ ३८ ॥ नाथ रथयात्रा प्रसंग । गौर नृत्य लीला सांग । भक्तांसी

घडे सत्संग । पचविसाध्यायीं वर्णिला ॥ ३९ ॥ प्रतापरुद्र प्रेमदान । भक्त शंका निवारण । उपदेश, भक्ति तत्त्व कथन । सव्विसाविया वर्णिले ॥ ४० ॥ केला अमोघोद्धार । नित्यानंद बोध थोर । कथियला सविस्तर । सत्ताविसाध्यायीं ॥ ४१ ॥ प्रकाशानद पत्र व्यवहार । वृंदावन यात्रार्थ सचार । करावया जनोद्धार । योजिले अठ्ठाविसाविया । ४२ ॥ घनले मातेचें दर्शन । केले पत्नीचें उद्धरण । कथिले समग्र वर्णन । एकूणतीसाव्या अध्यायीं ॥ ४३ ॥ तिसाविया गोविंदोद्धार । रूप सनातन चरित्र । एकतिसी रघुनाथ चरित्र । पार्षदगण वर्णिले ॥ ४४ ॥ तपन मिश्रोद्धार । यावां मिषें भक्तोद्धार । वृंदावनी वास पवित्र पठाण प्रेमदानें उद्धारिला ॥ ४५ ॥ तीर्थ वर्णन, रूप सनातन । यांचे चरित्र कथन । श्री वल्लभाचार्य वृत्त वर्णन । अध्यायीं बत्तीसाविया ॥ ४६ ॥ तेहतीसांत वल्लभाचार्य मीलन । रघुपतिसह सभाषण । तपन सत्कार ग्रहण । भारुप शिक्षा कथियली ॥ ४७ ॥ चौतिसांत सनातन चरित । तैसा केला बोध पवित्र । सनातन शिक्षा सर्वत्र । छात्रगणा ख्यात जो ॥ ४८ ॥ पसतिसांत प्रकाशानंद । मानी त्याचा जिरला मद । ते चरित्र विशद । केलें भक्तिप्रद व्हावया ॥ ४९ ॥ सुबुद्धिराय उद्धरण श्रीरूप चरित्र कथन । केले भक्तवर जाणून । छत्तिसाध्यायी । ५० ॥ या अध्याया पासून । अत्यलिला केली वर्णन नाथपुरी वासस्थान । चैतन्ये लिलार्थ केले तै ॥ ५१ ॥ कथिले वृत्त छोटा हरिदास । तैसे सनातन थोरपणास । रघुनाथ गृहत्याग अद्वैत याचनेस । सदतीसाध्यायी वर्णिले ॥ ५२ ॥ वल्लभ गर्वहरण । निंदक वचन श्रवण । त्यागिले त्वरे अन्न । चैतन्ये अडतिसाविया ॥ ५३ ॥ राघव झाली चंदनयात्रा । गोविंद सेवा कर्णपूर । गोपिनाथपूरीद स चरित्र एकूण चाळीसांत वर्णिले ॥ ५४ ॥ चाळीसांत हरिदास ठाकूर । चरित्र त्याचे समग्र । जगदानंद चरित्र एकेचाळीसात वर्णिले ॥ ५५ ॥ बेचाळीसी रघुनाथ । देवदासी गान गीत । उत्कल महिला भावात । अध्यायात वर्णिले ॥ ५६ ॥ चैतन्य दिव्योन्माद । त्रेचाळीसांत विशद । कालीदास वृत्त । कर्माकृति सच्चिनंद । बारोत्तरे चाळीसांत वर्णिले ॥५७ ॥ भावावेशं सागरात । चैतन्य प्रवेश करित । लिला केली सांगत । पचेचाळीसात वर्णिली ॥ ५८ ॥ लिला संगोपन संकेत । सहेचाळीसात अध्यायात । शिक्षाष्टक सत्तेचाळीसात । सांगेन दिधला प्रभुबोध ॥ ५९ ॥ लिला संहरण

वृत्त । अप्रकट लिला अद्भुत । वर्णिली अठ्ठेचाळीसांत । अंत्यलिला समाप्त जाहली ॥ ६० ॥ विष्णुप्रिया प्रभुपत्नी एकुणपन्नासी वर्णुनी । पार्षदगण चरित्र कथनी । पन्नास एक्कावन्नी अर्पिले ॥ ६१ ॥ बावन्नाविया अध्याय सरणी । ठेविली समजावी म्हणोनी । चरित्र अर्पिले चैतन्य चरणी । संत सेवाने ॥ ६२ ।'इये ग्रंथीच' फलश्रुति चैतन्य विजय ग्रंथ हाती । घेऊनि श्रध्देने वाचिती । श्रीकृष्ण प्राप्ती तया होय ॥ ६३ ॥ ग्रंथाचे श्रवण पठण । करिता भवसागर तरुण । जाती अंती समाधान । चित्त प्रसन्न तयाचें ॥ ६४ ॥ काळाचे तया नुरे भय । जग देखिती चैतन्यमय दु:खी जीवासी सदय । होऊनि अभय देती त्या ॥ ६५ ॥ मुखे करिती संकिर्तन । ईश्वर प्राप्ति हे साधन । साध्वप्रेम भक्ति लागून । संप्रदाय लक्षण उपजे तया ॥ ६६ ॥ चुकावे जनन मरण । यास्तव करिती कृष्ण भजन । प्राप्त जाहले जनन । भक्ति जीवन मानिती ॥ ६७ ॥ चैतन्य विजय ग्रंथ । सकळा करी आनंदित । भक्ति ज्ञान वैराग्य प्राप्त । दु:ख मुक्त करी सदा ॥ ६८ ॥ जोवरी असे कलेवर । तो करिती परोपकार । नाम संकिर्तन प्रचार । हाचि आधार जीवाचा ॥ ६९ ॥ मानुनि राहती भक्तजन । ईश्वर चरणी सदैव मन । सदैव रामकृष्ण चिंतन । चाले अनुदिन जीवनी ॥ ७० ॥ हेचि फल अनुचित । पडे सेवक पदरात । बिनवी रघुनाथसुत । संसार मुक्त व्हावया ॥ ७१ ॥ प्रभो आपुल्या कृपे करून । चैतन्य विजय विवरण । माझे काय थोरपण । मति प्रकाशन तुमचेचि । ७२ । संत कृपेचा ठेवा । मज लाभला अज्ञान जीवा । दीनाचा भाग्य लाभ व्हावा । केवळ प्रभाव आपुला ॥ ७३ ॥ माझे काय थोरपण करावे चैतन्य कवन । बुध्दि प्रेरक राम दयाघन । कृपे केले वर्णन म्या ॥ ७४ ॥ रघुनाथ पिता नर्मदा माता संस्कारे उपजे धार्मिकता सात्विक वृतांत उमगता । दत्ता रामा सेविता ॥ ७५ ॥ निर्मळ चित्त उदार वृत्ति । दिन दु:ख हरणी मति । सत्याची जीवनी महति । जाणली निश्चिती जयांनी ॥ ७६ ॥ दारिद्रय राही संसारी । धार्मीक वृत्ति राहेपरी । कुळधर्म । कुलाचारी । भावे शक्ति कामारी पूजिता ॥ ७७ ॥ बाल्ली माता पिता संस्कार । स्वामी केवलानंद गुरु थोर । दत्त गुरुचें आदर्श चरित्र । श्रीधर संतद्वय लाभले ॥ ७८ ॥ विरक्त संत उध्दार चरित्र । तैसे थोर धर्म भक्त । त्यांच्या सहवासे पुनीत । झाले चित्त सदभावे ॥ ७९ ॥ त्यासंकारे चाकरी त्यजुन । करू लागलो

सकिर्तन । तीर्थदेवता दर्शन । घडे अज्ञान जीव मी ॥ ८० ॥ तीर्थक्षेत्र संचारात । विश्वरुप दिसले भगवंत । तेणें पावन जाहले चित्त । संतचरित करवियले ॥ ८१ ॥ ब्रम्हचैतन्य रामभक्त । तैसे श्रीसोमनाथतीर्थ । उपरी चैतन्य f जज ग्रंथ । षटसहस्रोत्तरे रचियला ॥ ८२ ॥ शके अठराशे एक्यायंशी । ज्येष्ठ शुक्ल अष्टमीसीं । माध्यान्ही आदित्य दासराशी । प्रारंभ कवनासी जाहला ॥८३॥ एकोणीसशे एकूण साठ । दिनांक चौदा जुन स्पष्ट । माधव वाणी धर्म शाळेत काव्यात प्रारंभ जाहला ।८४॥ शके अठराशे पंचायशी । भृगुवासर पौष एकादशीं । निवृत्ति यात्रा पुण्यदिवशी जनस्थानासी हो य समाप्ति ॥ ८५ ॥ सन एकोणीसशे चौसष्ट । दिनांक दशम प्रथममास । श्रीचैतन्य विजय ग्रंथास कृष्णचरणास अर्पिले ॥ ८६ ॥

## पसायदान प्रार्थना

जयजयाजी उदारा । परमपुरूषा परमेश्वरा । जगच्चालका विश्वंभरा । दीनदयाळा गौरहरि ॥ ८७ ॥ विश्वात्मका जगज्जीवना । तुष्ट व्हावें काव्य यजना । तोषोनि द्यावे पसायदाना । अभ्यर्थना करी सेवक ॥ ८८ ॥ खळांचीं सांडोनि दुष्टमति । सत्कर्मी व्हावी तया प्रीति । मैत्र व्हावें भूताप्रति । परस्परें वृत्ती जीवाची ८९ पापियांचा जावा अंधकार । विश्वस्वधर्म सूर्ये निरतर । पाहो, लाहो प्राणिमात्र । वांछी अपार जो जें तयां ॥ ९० ॥ सकळ मंगळाचा करो वर्षाव । ईश्वर निष्ठांचा समुदाय । भूमंडळी भेटो सदैव । वैभव द्यावया भवतीचें ॥ २६ ॥ चालते कल्पतरूंचे बगीचे । सजीव ग्राम चितामणीचे । सागर बोलके अमृताचे । संताचें ऐसे संतपण ॥ ९२ ॥ जे चंद्र असोनि अकलकित । उष्णते वाचूनि आदित्य । ऐसिया सज्जनाची प्रीत । व्हावी नितांत भक्तांना ॥ ९३ ॥ किंबहुना सकळ लोक । त्यासी व्हावा भक्ति विवेक । भजावा प्रेमे जगन्नायक । आदि पुरूख संज्ञा जया ॥ ९४ ॥ सकळ सुखाचा आराम । जानकी जीवन श्रीराम । भक्ताचें पुरवा संकल काम । विश्राम द्याजी जीवासीं ॥ ९५ ॥ पाठक कुलोत्पन्न गौतम गोत्रीं झालें जनन । त्र्यंबक नाम जनस्थान । निवास यशवंत देवाचा ॥ ९६ ॥ गोदातीर परम पावन । यशवंतराव संतजन । त्यांचें सान्निध्ये केलें कथन । चैतन्य विजय ग्रथ हा ॥ ९७ ॥ उमा शिवाचे करूनि स्मरण ।

श्रीरामाचे अंतरीं ध्यान । करूनि ग्रंथ कृष्णार्पण । स्मरोनी चैतन्य चरणातें ॥ ९८ ॥ महंत दीन बंधुदास । चैतन्य संप्रदायी विशेष । त्यांनी दिधल्या स्फूर्तीस । केले कवनास यथार्थ ॥ ९९ ॥ आखाडा चतुःसप्रदाय । तेथ वसती मय । राधारठा श्रीरामराण,विईमाय । वसे नित्य त्याठाया ॥ १०० ॥ संत सेवेचा हव्यास । महंत दीन बंधुजीस त्याचिया प्रेरणे केले कवनास । चैतन्य विजयास निमिलें ॥ १ ॥ सत्संगाचें महत् ऋण । मजवरी, मानी कल्याण मित्रत्व राखिलें भावपूर्ण । म्हणोनि चरण वंदितो ॥ २ ॥ संतभूमी पिपळनेर । खंडोजी महाराज संतथोर । पितामह भीमाशंकर । थोर पुण्य पुरुष ॥ ३ ॥ पितामही पार्वती माता नर्मदा । पावित्रें हारवी नर मदा । रघुनाथ पित्याची संपदा । सात्विक वृत्ति परंपरा ॥ ४ ॥ कुळी जन्मूनि घतलें ऋण । अल्प केलें विद्यार्जन । वडिलांचें कृपे कवन । केले संपुर्ण ग्रंथाचे ॥ ५ ॥ ग्रामी पितृऋण विमोचन । साजरा केला उत्सव दिन । पितयाचें चरणी ग्रंथ अर्पण । केला सोमनाथ तिर्थ हा ॥ ६ ॥ अध्यक्षस्थानी शंकर । देशमुख जन शंकर । त्याचिया स्फूर्तीनि महत्व अपार । वाढे पवित्र समारंभाचें ॥ ७ ॥ माता पितयाचें पश्चात । झाला चैतन्य विजय ग्रंथ । जनी जनार्दन संकेत । मानुनि कृष्णी अर्पिला । ८ । श्री, चै. वि ग्रंथ रसाळ । अध्याय सरणी सोज्वळ । पसायदान मंगल । बावन्नाध्यायी वर्णिलें ।१०९।

श्री चैतन्य विजय ग्रंथ बावन्नाअध्याय संगती पसायदान स्फूर्तिदान कर्ते कथाकथन नाम बावन्नावा अध्याय समाप्त (५२)

ओ सं १०९ एकूण ६७१६ दि २९–१०–६४ गुरुवार शके १८८६ आश्विन शु ९ संवत २०२० (महालयादिन)

